# सिमिलीपाल



जर सुटीमध्यें तुम्हाला जंगलांत फेरफटका मारायचा असेल, हिरवाईचा रानगंध अनुभवायचा असेल, पक्षांचे कूजन ऐकायचे असेल तर तुम्ही सरळ ओरिसामधल्या सिमिलीपालचा अभयारण्याचा रस्ता धरा.

सिमिलीपाल हे एका पठारावर आहे आणि समुद्रसपाटीपासून तिथली सरासरी उंची ९०० मीटर्स आहे. सिमिलीपाल अभयारण्य २७५० चौरस कि.मी. च्या क्षेत्रांत पसरलेले आहे. हे क्षेत्रफळ विस्तृत असल्यामुळें आणि डोंगरी चढउताराची जमीन असल्यामुळें, पावसाचे प्रमाणही निरनिराळे आहे. साहजिकच वृक्षवेली व झाडेझुडुपें यांच्या सर्व तऱ्हा इथें दिसतात. शुष्क निष्पर्णी वृक्षांपासून ते सदापर्णी सदाहरित वृक्षांपर्यंत!

हे अरण्य वन्य प्राण्यांसाठी राखीव असून वाघांसाठी खास परिसर राखलेला आहे. सिमिलीपालमध्यें झाडांच्या १०७६ जाती, ऑर्किडस्च्या ८७जाती, ४२ जातींचे सस्तन प्राणी, २९ प्रकारचे सरपटणारे प्राणी आणि २३१ जातींचे पक्षी इथें सुखेनैव नांदतात. खैरीबुरू व मेघासानीच्या शिखरांचे अनुपम निसर्गसौंदर्य, बुधबालंगा, खैरी आणि सालंदी या नद्यांचे चमचमणारे पाणी, ही सिमिलीपालची इतर आकर्षणें आहेतच.



जाशीपूरजवळच्या रामतीर्थ मधले सुसरसंवर्धन केंद्रही तुम्ही अवश्य पाहायला हवे.

## तिथें कसे जाता येईल?

बारीपाडापासून २२ किमी अंतरावर असलेल्या पुनायाताहून किंवा ९४ कि.मी. अंतरावरच्या जाशीपूरहून सिमिलीपालला जाता येते. सिमिलीपालचे अभयारण्य १ नोव्हेंबरपासून १५ जूनपर्यंतच खुले असते.

या अभयारण्यांत जाण्यासाठी आवश्यक त्या प्रवेशपत्रिका पुनायाता किंवा जाशीपूरच्या प्रवेशद्वारावर मिळतात.



# जीवांवर दया

गंगा नदीच्या कांठावर रामनगर म्हणून एक गांव आहे. त्या गांवात धवन नावाचा एक माणूस राहात होता तो आपल्या उदर निर्वाहासाठी घोड्याची गाडी चालवी. गांवात दुसऱ्या कुणाजवळही गाडी नसल्याने कुठेही बाहेर जायचे असल्यास सर्वजण त्याचीच मदत होत असत. त्यामुळे तो अतिशय गर्विष्ठ झाला होता. गांवातल्या अन्य लोकांप्रमाणे तो ग्रामाधिकाऱ्याची सुद्धां पर्वा करत नसे. कारण दुसरी घोडा-गाडी नसल्याने लोक नाईलाजाने त्यालाच बोलावत.

गांवाजवळून नदी वाहात असल्याने सरकारने लोकांना शेतीत मदत व्हावी म्हणून कालव्याची व्यवस्था केली. त्यामुळे शेतकऱ्यांना शेतीसाठी पाणी मिळूं लागले. त्यांच्या ओसाड जमिनीत देखील कांही ना कांही धान्ये येऊन त्यांचे उत्पन्न वाढले. बाहेरगांवातून लोक येऊन इकडे राहूं लागले. लोकांच्या जीवनांत आबादी आबाद झाली. त्यामुळे आणखी चार घोडागाड्या गांवात धावायला लागल्या.

घमेंडखोर धवनचे उत्पन्न त्यामुळे कमी झाले. लोक दुसऱ्यांच्या गाडीत चढताना पाहून ह्याच्या पोटांत दुखू लागले. ते त्याला बोलवेनासे झाले व धवनला कित्येक वेळां उपाशी राहायची वेळ आली.

त्याचे मन अस्वस्थ झाले. एक दिवस तो नदीकिनाऱ्यावर असलेल्या शिवमंदिरात गेला. तिथे पुजारी भक्तांना सांगत होते, "सर्वांनी एकमेकांशी सद्भावनेने व्यवहार केले पाहिजेत. जीव-जंतूवरही दया केली पाहिजे. आपण जे कार्य कराल ते श्रद्धेने करा, नेकीने काम करा. असे केल्याने तुमच्या परिश्रमांना अवश्य यश मिळेल."

धवनने पुजाऱ्याचे बोलणे लक्षपूर्वक ऐकले. ते आणखी काय सांगतात ते ऐकण्यासाठी तो आणखी जवळ जाऊन ऐकूं लागला. पुजारी भक्तांना सांगत होते, "देवळांत देवाचे दर्शन घेतल्यानंतर भक्तांनी गुळाचा एक लहानसा तुकडा कां होईना, पण मुंग्यासाठी म्हणून द्यायला हवा. त्यामुळे पुण्य तर मिळतेच पण त्याबरोबरच

जीवजंतूचे रक्षणही केले जाते. जेवणापूर्वी थोडेसे अन्न भिंतीवर ठेवले तर ते खाऊन कावळा आपली भूक भागवू शकतो. अशी जीवजंतूवर व पशु-पक्ष्यांवर दया केली, तर त्याचे फळ तुम्हांला मिळाल्याशिवाय राहणार नाही. जेव्हां आपण त्यांना अन्न देतो, तेव्हा ते मनोमन आपल्याला दुवा देतात. मनुष्यप्राण्यांनी तर सर्वांशी प्रेमाने व मायेने व्यवहार केले पाहिजेत, सर्वांवर दया केली पाहिजे''.

पुजाऱ्याने जे गुळाविषयी व मुंग्याविषयी सांगितले ते धवनला अगदी योग्य वाटले. तो लवकर दुकानांत गेला व दहा पैशाचा गूळ त्याने खरेदी केला, तो घेऊन शिव मंदिराच्या पायऱ्यांवर त्याने ठेवला.

थोड्याच वेळांत त्याला मागून कुणीतरी हाक दिली, ''अरे धवन, जरा एक मिनिट थांब''.

त्याने मागे वळून पाहिले तर त्याला आश्चर्यच वाटले. बोलावणारी व्यक्ती दुसरी तिसरी कोणी नसून ग्रामाधिकारी शिवशंकर होते. त्यांनी धवनला म्हटले, ''बरं झालं, तू अगदी योग्य वेळीच भेटलास. माझ्या धाकट्या मुलीला गांवापासून जवळच असलेल्या शिवपूर इथल्या चांगल्या शाळेत घालायचे ठरवले आहे. तू रोज तिला तुझ्या घोड्याच्या गाडीत घेऊन जायचं आणि परत संध्याकाळी आणायचं. त्यासाठी मी तुला महिन्याला दोनशे रुपये देईन. तू या गांवात बऱ्याच वर्षांपासून गाडी चालवतोस, म्हणून हे काम मी तुला सोपवतोय. बोल, तुला मंजूर आहे कां?''

ग्रामाधिकाऱ्याचे ते बोलणे तो स्तंभित होऊन ऐकतच राहिला. पण त्याबरोबरच त्याला अतिशय आनंदही झाला. त्याला स्वप्नांतसुद्धां वाटले नव्हते कीं गुळाचा एक लहान तुकडा इतक्या लवकर असा चमत्कार करेल म्हणून! त्याचा गर्व आता बराच कमी झाला होता. तो नम्रतेने म्हणाला, ''जरूर साहेब, जरूर नेईन''.

त्या दिवसापासून धवन मुंग्या आणि कावळे यांना खायला तर देऊं लागलाच, पण त्याच्या घरासमोर भुकेने तडफडणाऱ्या कित्येक कुत्र्यांनाही तो खायला देऊ लागला. गांवकऱ्यांनी धवनमध्ये झालेले हे परिवर्तन पाहिले. तसेच त्याचा गर्वही नाहीसा झाल्याचे त्यांनी ओळखले. ते त्याच्याशी आता मित्रत्वाच्या नात्याने वागू लागले. घरीं कांही शुभ कार्य असले की त्यांत त्याला भाग घेता यावा म्हणून ते निमंत्रण देऊं लागले.







# माया सरोवर

## 11

**(जयशीलला वाटलं कीं मायासरोवरापर्यंत पोंचायला आपल्याला सर्पनखची मदत लागेलच. सर्पनखला भावाचा ठावठिकाणा शोधण्याची घाई होती. नरवानराच्या मालकाला पाहून तो जलाश्वर स्वार झाला व त्याचा पाठलाग करूं लागला. पळून जाणाऱ्या कृपाणजितला मृत्युवृक्षाच्या फांद्यांनी जखडून ठेवले होते.) - त्यानंतर**

मृत्युवृक्षाच्या डहाळ्यांनी कृपाणजितच्या-भोवती पाश आवळून त्याला जखडून जसे वर खेंचले, त्याचप्रमाणे त्याच्याजवळच्या आणखी एका फांदीने विळखा घालून त्याचा खांदा, व दुसऱ्या फांदीने त्याचे हात घट्ट पकडून त्याला वरच उचलले. त्यांच्या वेटोळ्यांतून सुटण्याची पराकाष्ठा करीत कृपाणजित ओरडायला लागला, ''मला वांचवा, वांचवा!''

ठेंगू लोक त्याचा केविलवाणा आवाज ऐकत होते, पण कुणीही त्याला सोडवायला पुढे आले नाहीत. मृत्युवृक्षाजवळ यायला प्रत्येकजण घाबरत होता. पण जलाश्वरला जे जखडलेले होते, त्यांना पळताही येईना.

जयशील आणि सिद्धसाधक जरा दूर असलेल्या एका खडकावर उभे होते, ते लगेच खाली उतरले आणि पळतपळत ते मृत्युवृक्षा-जवळ आले. पण त्यापूर्वीं जलाश्वर स्वार होऊन सर्पनख तिथें आला व त्यांना म्हणाला, ''या एकाच माणसाला



माझ्या भावाचा पत्ता माहीत आहे. हा मरेल. त्याला बांचवायलाच हवं," असं म्हणून त्याने आपल्या तलवारीने एक फांदी छाटली.

त्यामुळें मृत्यूवृक्ष मुळापासून अगदी वरती टोंकाच्या फांदीपर्यंत हलायला लागला. त्यानंतर एक बारीक कण्हण्याचा आवाज ऐकूं आला. आंगठ्याएवढ्या जाडीची एक डहाळी सापाप्रमाणें सरसरत खाली आली आणि तिने सर्पनखच्या गळ्याला वेढा घातला. तेव्हां सर्पनख घाबरून ओरडूं लागला, "हे माया सर्वेश्वरा, मला बांचव रे, माझं रक्षण कर." जलाश्व भेदरला आणि पळत सुटला. जयशील आणि सिद्धसाधक पळतच तिथें पोंचले.

सर्पनखाचे दोन्ही पाय सिद्ध-साधकाने पकडले आणि तो त्याला ओढूं लागला. सर्पनखाच्या गळ्याभोवती लपेटलेली वृक्षाची डहाळी जयशीलने आपल्या तलवारीने कापली. पडणाऱ्या सर्पनखाला सिद्धसाधकाने पकडून म्हटले, "अरे अे, पाणपक्ष्या, तुझ्या अगोचरपणामुळें तू आम्हाला सोडून गेला असतास नि मग मायासरोवराचा पत्ता सांगणारा कुणीच शिल्लक राहिला नसता!"

सर्पनखने स्वत:ला सांवरत आणि कण्हत-कण्हत सांगितले, "मला ठाऊक होतं कीं माया-सर्वेश्वर माझे निश्चितच रक्षण करेल. आपल्या सेवकांना तो कधीही मरूं देणार नाही."

सिद्धसाधक नाराज झाला व त्याला म्हणाला, "मूर्खच आहेस! आत्ता काय तुझ्या त्या देवाने तुला वाचवलं होय?"

"माझा मायासर्वेश्वर जरी इथें आला नाही, तरी तुम्ही दोघे आलात ना! तुमच्यामार्फत त्याने मला बांचवलंय." असं म्हणून त्याने मृत्यू-वृक्षाकडे पाहिलं. त्याच्या फांद्यात लटकलेल्या कृपाणजितला पाहून तो पुढें म्हणाला, "हा बहुधा नक्की मरणार असं वाटतंय. माझा भाऊ सर्पस्वर कुठे आहे, हे फक्त या माणसालाच माहिती आहे. त्याला बांचवलंच पाहिजे." असं म्हणून तो त्या मृत्युवृक्षाकडे घाईने जाऊं लागला.

पण जयशीलने त्याचा खांदा पकडून त्याला थांबवलं. आणि आसपास उभे असलेल्या ठेंगू मंडळींना विचारलं. "तुमचा सेनाध्यक्ष कुठे आहे? याचं डोकं फिरलंय बहुतेक. याला नदीवर घेऊन जा आणि एकदा पाण्यांत बुडवून काढा, आणि मग नदीकांठावर वाळण्यासाठी ठेवून द्या."

जेव्हां ठेंगूंनी सर्पनखाला पकडलं तेव्हां तो जोराने ओरडायला लागला, "मी कांही वेडा नाही. माझं डोकं ठिकाणावर आहे. मला सगळं ठाऊक



आहे. हे ठेंगू जमातीचे लोक आहेत, तुम्ही जयशील व सिद्धसाधक आहात. या नदींत सुसरीमगरी आहेत."

"अरे अे पाणकोंबड्या, जरा गप्प बैस बघूं, तुला आता नाहीतर भक्ष्य बनवतो बघ." असं म्हणत ठेंगूंनी त्याला नदीकडे ओढत नेले. त्याच-वेळीं रथांत बसून ठेंगूंची राणी तिथें आली.

गडेकोंडा व त्याचे साथीदार रथाच्यापाठीमागे हात जोडून उभे होते. राणीला बघून जयशील तिला म्हणाला, "ज्या स्वार्थी कृपाणजितने तुमच्या जमातींतल्या लोकांमधें फूट पाडण्याचा प्रयत्न केला, त्याला मृत्युवृक्षाने खाल्ले आहे. आता तुमचे लोक सुखासमाधानांत राहूं शकतील. आम्हीही आमचे काम पूर्ण करून इथून निघून जाऊं. पण जाण्यापूर्वी या मृत्युवृक्षाला जाळून टाकायला हवं. याने बऱ्याचजणांचे प्राण घेतले आहेत."

"अगदी तसंच करा. तुम्ही आम्हाला मदत केलीत त्याबद्दल आम्ही सर्वजण कृतज्ञ आहोत. नरवानराचा मालक तर मेलाच पण तो नरवानरही अरण्यांत कुठेतरी भटकत असेल. आम्ही सावध राहिलं पाहिजे. कारण केव्हां तो हल्ला करेल ते कांही सांगता येणार नाही." एक दीर्घ श्वास घेऊन राणी बोलली.

"जलाश्ववर बसून आलेला सर्पनख आम्हाला भेटलाय. त्याच्या भावाला तो नरवानर घेऊन गेला. मायासरोवरचा पत्ता शोधून काढण्यासाठी आम्हाला सर्पनखाच्या मदतीची जरूर आहे. त्याच्या भावाला शोधण्यासाठी आम्ही जाणार आहोत. त्या प्रयत्नांत नरवानराला मारावं लागलं



तर त्याला आम्ही मारून टाकूंच." जयशीलने राणीला आश्वासन दिलं.

"मी त्याला मारूं देणार नाही. त्याला मी पाळीन आणि त्याच्यावर स्वारी करीन. पण आता सांग, बिस्तव कुठे आहे? हा वृक्ष जाळून बेचिराख करायचा आहे ना!" असं बोलताना सिद्धसाधक आजूबाजूला पाहूं लागला.

पेटलेल्या मशाली घेऊन चार पांच ठेंगू माणसें पुढे आली. सिद्धसाधकने एक मशाल हातांत घेऊन म्हटले, "माणसांना खाणारा हा वृक्ष आहे. त्याच्यांत मांस आणि चरबी असेलच. या मशाली आपण त्याच्यावर फेकून देऊं या. मग पाहूं काय होतंय ते." सिद्धसाधक हातांतली मशाल त्या वृक्षावर फेकायला निघाला होता. तेवढ्यांत कुणीतरी मोठ्याने ओरडलं, "अरे पाप्या, जरा थांब. हा मृत्यूवृक्ष तुला जाळून टाकण्याची इच्छा आहे कां? पण ते अशक्य आहे."



जयशील व सिद्धसाधकाने मागे वळून पाहिले. तिथे इतर ठेंगू लोकांपेक्षा जरा उंच असलेला एकजण उभा होता.

त्याच्या गळ्यांत मण्यांची माला होती नि खांद्यावर कुऱ्हाड होती. त्याचे केस विस्कटलेले होते. तो उड्या मारतच जयशील व सिद्धसाधक उभे होते तिथें आला.

सिद्धसाधकाने आपल्या शूळाने त्याला स्पर्श करून म्हटले, ''कोण रे तू? माझ्यासारख्या महाकालीमातेच्या भक्ताला पापी म्हणण्याचं तुला धाडस झालंच कसं?''

तो ठेंगू निर्भयपणे म्हणाला, ''मी या चिरंजीव मृत्युवृक्षाचा पुजारी आहे. जेव्हां तुम्ही पहिल्या वेळीं वृक्षावर तलवारीने घाव घातलेत, तेव्हां वृक्षाने धीम्या स्वरांत कण्हण्याचा आवाज काढला होता. तुम्हाला तो आवाज ऐकायला आला होता ना?''

जयशीलने विचारलं, ''वृक्षाच्या पाठीमागे लपून बसून तूंच तो आवाज काढला होतास कीं नाही? खरं काय ते सांग!'' असं म्हणून त्याने त्याचा गळाच पकडला.

तो पुजारी न गांगरता बोलूं लागला, ''हो, मीच तो आवाज काढला होता. पण असं करण्याचा आदेश मला वृक्षावर असलेल्या मृत्युदेवीने दिला होता. मी तिचा पुजारी आहे, तिचा सेवक आहे.''

जयशीलने सिद्धसाधकाकडे बघितलं. आता या पुजाऱ्याला काय सांगावे अशा विचारांत दोघेही होते.

सिद्धसाधकाने पुजाऱ्याच्या खांद्यावरची कुऱ्हाड खेंचली आणि तो म्हणाला, ''अरे ए धूर्त पुजारी बाबा, आजपासून मृत्युवृक्ष असणार नाही. आम्ही तो जाळून टाकणार आहोत. आता तुझी पुजाऱ्याची नोकरीदेखील गेली असं समज. आता या कुऱ्हाडीने अरण्यांतली लांकडे तोड आणि आपला चरितार्थ चालव. निरपराध लोकांचे प्राण हरण करणारा हा वृक्ष जळून भस्मीभूत होईल.''

एवढं बोलून सिद्धसाधक आपल्या हातांतली पेटती मशाल त्या वृक्षावर फेंकणार तोंच त्या पुजाऱ्याने चटकन त्याचा हात पकडला.

''अरे दुष्टा, महाकालीच्या या शिष्याला शिवण्याचं तू साहस करतो आहेस? सोड माझा हात!'' असं म्हणत त्याने आपला हात झटकला.

तो पुजारी रडवेला होऊन म्हणाला, ''माझ्यावर विश्वास ठेवा. हा मृत्युवृक्ष दुष्ट व दगाबाज यांनाच खाऊन टाकतो. धर्मात्म्यांचं तो कांहीही अनहित करीत नाही.''

तेव्हां जयशीलने पुजाऱ्याला पकडले आणि



कठोर आवाजांत दरडावले, ''तर मग तू काय पापी नाहीस कां? तू कधी कोणतं पाप केलं नाहीस कां? लोकांना फसवलं नाहीस कां?''

''याबद्दल तुमच्या मनांत शंका आहे कां?'' पुजाऱ्याने विचारले. पुजारी असं बोलल्यानंतर जयशीलने त्याला उचलून वर धरले आणि त्या मृत्युवृक्षावर तो पुजाऱ्याला फेंकणार तेवढ्यांत पुजारी ओरडला, ''महाराज, मला सोडून द्या. मला मृत्यूच्या तोंडी देऊं नका. माझ्यावर दया करा.''

जयशीलने हंसतहंसत त्याला जमिनीवर उभे केले आणि तो सिद्धसाधकाला म्हणाला, ''आता आपण इथें वेळ घालवता कामा नये. मृत्युवृक्षाला आग लावून द्या.''



सिद्धसाधकाने पेटत्या मशाली वृक्षावर फेंकल्या. झालं, बघताबघता तो वृक्ष जळून त्याची राखरांगोळी झाली.

जयशीलने जळत असलेल्या कृपाणजितचे शव दाखवून म्हटले, ''हा अमरावती नगराच्या राजाच्या पागेचा सरदार होता. एका घरी जेव्हां जुगार खेळला जात होता, त्यावेळीं आमची दोघांची तिथें भेट झाली होती. बोलता बोलता आमच्या दोघांत भांडण सुरुं झाले. त्या भांडणामुळेच मला अरण्यांत वनवास पत्करावा लागला. दुष्ट व्यक्तीला कधीही चांगले मरण येत नाही. त्या द्यूतगृहांत देवशर्मा माझा एक मित्र राहात होता. तो कुठे गेला ते नंतर कळलेच नाही. कुठेतरी बिचारा फिरत असेल.''

''आपल्याला मायासरोवराला जायचे आहे, हिरण्यपुरच्या राजाच्या मुलांची सुटका करायची आहे. यांत बराच वेळ लागेल या साऱ्या यातायातीमधें कदाचित् कुठेतरी तुझ्या मित्राची भेट होईलही!'' सिद्धसाधकने समजावले.

''तुझं म्हणणं बरोबर आहे, साधक. मलाही वाटतंय कीं तो नक्की भेटेल. सर्पनख कुठे आहे?'' जयशीलने आजूबाजूला नजर वळवीत विचारले.

जलाश्वच्या पाठीवर बसून सर्पनख दूरच्या पर्वतराजीकडे बघत विचार करीत होता. दुसऱ्या जलाश्वाकडे बोट दाखवत जयशीलने साधकास सांगितले, ''या जलाश्वाला आपण इथें उगीचच कशाला सोडून द्यायचा? आपणा दोघांपैकी कुणीही याचा उपयोग करूं शकेल.''

''जयशील, तो जलाश्व तुझाच आहे. मी तुझ्या पाठीमागे पायीपायी चालत येईन. तो भयंकर नरवानर जर आपल्याला दिसला तर मी त्याच्यावर स्वार होईन.'' साधकाने उत्तर दिले.

जयशील त्यावर म्हणाला, ''तसं करायला तू कचरणार नाहीस हे मला माहीत आहे. ठीक

आहे, तुला वाटेल तसंच तू कर. आता आपण इथून निघायचं कां?'' नंतर त्याने ठेंगू लोकांच्या राणीकडे वळून म्हटले, ''तुमचा जबरदस्त शत्रू कृपाणजित आता जिवंत नाही. तेव्हां तुम्हा मंडळींनी आता भिण्याचे अजिबात कारण नाही. तुम्ही सुखाने व शांततापूर्ण जीवन आता जगूं शकाल. बरं आहे, आता आम्ही निघतो.''

जयशील जलाश्ववर स्वार झाला आणि त्याचा पाठीमागून सिद्धसाधक पायीं चालूं लागला. सर्व ठेंगू लोकांनी जयजयकार केला. त्यांचा जयघोष ऐकल्यावर सर्पनख मागे वळला आणि तिथून जाणाऱ्या जयशील व साधकाला त्याने पाहिले. तो त्यांना ओरडून सांगायला लागला, ''थांबा, थांबा. माझ्या भावाला अजून शोधून काढायचं आहे. मी पण तुमच्याबरोबर येतो.'' आपल्या घोड्याला पिटाळत सर्पनख त्यांच्याजवळ आला.

जयशीलने त्याला निरखून पाहिले व म्हटले, ''मला वाटतं, नदींत स्नान केल्यानंतर तू बरा झालेला दिसतो आहेस. आता आपला रस्ता सुधार. जिथें तुला जायचं असेल तिकडे जा. आम्हाला मायासरोवराचा पत्ता शोधून काढावयाचा आहे. तिथें पोंचल्यानंतर त्याच्या मालकाच्या शरीराचे तुकडेतुकडे करुन जनावरांच्यासमोर टाकायचे आहेत!''

हे ऐकून सर्पनखचा चेहरा काळवंडला. पण त्यावर तो कांही बोलला नाही. नंतर तिघेही घटकाभरांतच अरण्यांत शिरले. प्रथम जयशील आणि सिद्धसाधक ज्या धबधब्याजवळ पडताना वांचले होते त्या भागांत पोंचले.

त्यावेळचा अनुभव सर्पनखला जयशील सांगायला सुरवात करणार तितक्यांत सर्पनखने आपला हात उंचावून दूरवरच्या डोंगरातल्या गुहेकडे बोट दाखवले व म्हटले, ''त्या गुहेबाहेर जो वाकून पाहातो आहे तो नरवानर तर नाही ना?''

''हो, हो, तो नरवानरच आहे.'' जयशीलने त्याचा संशय दूर केला. दुसऱ्याच क्षणीं मोठ्याने आरोळी ठोकत नरवानर गुहेच्या बाहेर आला. मकरकेतुचे वाहन असलेला जलाश्वदेखील गुहेतून बाहेर आला आणि त्याने नरवानराला आपल्या सोंडेने विळखा घातला. (अपूर्ण)





राजा विक्रम व वेताळाच्या नव्या कथा

# वारस

निश्चयाचा पक्का विक्रमार्क पुन्हां झाडाजवळ गेला. त्याने झाडावरुन शव खाली उतरवले, खांद्यावर घेतले आणि तो स्मशानाच्या दिशेने चालूं लागला. तेव्हां शवांत लपलेला वेताळ त्याला म्हणाला, ''राजन्, तुझी जिद्द व सहनशक्ती असामान्य आहे यांत शंकाच नाही. परंतु यांत योग्य-अयोग्य काय, त्याचा निर्णय करण्याची शक्ती तुझ्यामधे कितपत आहे, ते सांगता येणार नाही. कारण सत्ता व धन हे रास्त प्रमाणांत जवळ असणारी व्यक्तीच सुखासमाधानाने नांदू शकते, आणि शांतचित्ताने विचार करूं शकते, कारण तिच्यांत सहनशक्ती असते. पण सत्ताधीश व धनवंत अहंकारी असतात आणि आपले नैतिक संतुलन घालवून



बसतात. तू राजा आहेस, मनांत येईल ते करुं शकतोस. न्यायाला अन्यायदेखील ठरवूं शकतोस. म्हणून माझ्या मनांत शंका येते, कीं इतक्या असीम संपत्तीचा स्वामी असूनही तू मध्यरात्रीं असा कां भटकतो आहेस? कांही वेळां अनुचित निर्णय कसे घेतले जातात त्याचं ज्वलंत उदाहरण म्हणजे वज्रनाथ. त्याची गोष्ट ऐकताना तुझा थकवाही दूर होईल." आणि वेताळाने आपली गोष्ट सुरुं केली.

"वज्रनाथ विक्रमपूरला राहात होता. तो धनाढ्य होता पण अतिशय दयाळू होता. कुणीही त्याच्याकडे मदत मागितली कीं तो जराही आढेवेढे न घेता त्याला मदत करीत असे. थोडक्यांत तो उदार होता.

परंतु धनवंत असूनही तो उदास होता, कारण त्याला मूलबाळ नव्हते. त्यांच्यापश्चात या संपत्तीचे रक्षण करुन तिचा सदुपयोग कोण करुं शकेल ही काळजी सतत त्याला व त्याच्या पत्नीला पोखरत होती.

जेव्हां त्यांच्या नातलगांना समजलं कीं त्यांना आता मूल होणार नाही, तेव्हां त्या संपत्तीच्या लोभाने ते ह्या दोघांची वारेमाप स्तुती करायला लागले. ते पाहून वज्रनाथला जास्तच वाईट वाटले.

एक दिवस वज्रनाथचा एक दूरचा नातेवाईक नागेंद्रवर्मा त्याला भेटायला आला. जेवण झाल्यानंतर तो वज्रनाथला म्हणाला, "माझा मुलगा चंद्रशेखर अतिशय बुद्धिमान आहे. गांवच्या शाळेंत त्याचे शिक्षण पूर्ण झाले आहे. आता वाणिज्यशास्त्राचा पुढचा अभ्यास करायचा तर त्याला मणिद्वीपला पाठवायला हवं. तेवढी माझी आर्थिक कुवत नाही. आपण जर कृपा केलीत तरच हे जमण्यासारखे आहे."

"सरस्वतीची कृपा असली तर हे जरूर जमेल. आता पैशाबद्दल म्हणशील तर मी त्याची व्यवस्था करीन. त्याचा सारा शिक्षणखर्च मी देईन. तू त्याला मणिद्वीपला पाठवायची तयारी सुरुं कर." असं म्हणून वज्रनाथने त्यासाठी आवश्यक तेवढी रक्कम नागेंद्राला दिली.

ही बातमी वज्रनाथच्या इतर नातेवाईकांना कळली. वज्रनाथ चंद्रशेखरच्या बुद्धिमत्तेवर भाळला आणि त्याने सारा शिक्षणखर्चाचा भार उचलला, म्हणून त्या सर्वांना वाटलं कीं आता चंद्रशेखरच वज्रनाथचा वारस होणार!

एकदा वज्रनाथ पत्नीबरोबर मंदिरात जात होता, तेव्हां एका तरुणाने दीनवाण्या स्वरांत म्हटले, "महोदय, मी भुकेने तडफडतो आहे, मला मदत करा हो!" वज्रनाथने त्याला कांही रुपये दिले. त्या मुलाचे डोळे आनंदाने चमकायला लागले.

आठवडाभरानंतर वज्रनाथ पुन्हां त्या मंदिरात गेला तेव्हां तो तरुण मुलगा त्याला दिसला. तो भीक मागत नव्हता, तर फुलें विकत होता. वज्रनाथला पाहून त्याने आदराने हात जोडले व तो म्हणाला, "महोदय, आपल्यासारख्या उदार मंडळींच्यासमोर हात पसरुन मी आपले पोट भरत होतो. पण त्या दिवशीं तुम्ही मला बरेच रुपये दिलेत. त्या रकमेंतून मी फुलें खरेदी केली आणि भक्तगणांना विकली. आता या धंद्यात मला पुरेसे पैसे मिळतात. आपण दिलेली रक्कम मी पुढे केव्हांतरी जरूर परत देईन."

त्याचे उद्‌गार ऐकून वज्रनाथला आनंद झाला. वज्रनाथ जेव्हां त्या मंदिरात जाई, तेव्हां त्या मुलाकडून फुलांच्या माळा खरेदी करीत असे. असे कांही दिवस गेले.

त्या दिवशी मध्यरात्र झाली. तरी वज्रनाथ जागाच होता. त्याच्या पत्नीने जेव्हां त्याच्या चिंतेचे कारण विचारले व ती म्हणाली, "देवाने आपल्याला फक्त मूलबाळ दिले नाही. तेव्हां मला वाटतं कीं आपल्या नात्यांतलेच एखादे चांगले मूल आपण दत्तक घेऊं या. म्हणजे मोठा झाल्या-नंतर तो आपल्या व्यापारांतही मदत करील. माझा विचार ठीक आहे ना?"

"हो तर! माझ्या मनांतही तोच विचार आहे. ज्यांना दैवाचा धाक वाटतो, तेच धनाचा चांगला उपयोग करुं शकतात, अशी माझी श्रद्धा



आहे. म्हणून ज्याला दैवाबद्दल वचक असतो व धर्माबद्दल जाण असते, अशाच व्यक्तीच्या शोधांत मी आहे." वज्रनाथने सांगितलं.

"तुम्ही हा निर्णय परमेश्वराबर सोंपवा आणि आता निश्चिंत मनाने झोंपा." एक प्रदीर्घ श्वास घेऊन त्याच्या पत्नीने त्याला दिलासा दिला.

दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं वज्रनाथ नेहमीप्रमाणें मंदिरात गेला. तिथें एका युवकाकडे त्याचे लक्ष वेधले गेले. मंदिराच्या एका कोंपऱ्यांत तो तरुण पद्मासन घालून बसला होता व ध्यानमग्न होता. ओळीने चारपांच दिवस त्याच जागीं तो बसलेला वज्रनाथला दिसला. त्याने डोळे उघडल्यानंतर वज्रनाथने त्याला विचारलं, "मुला, तुझं नांव काय? कोण आहेस तूं? आणि काय करतोस?"



"मी अनाथ आहे. मला सत्यवान म्हणतात. मी नेहमी भगवंताचे ध्यान करण्यांत गुंतलेला असतो. हेच माझं काम!" त्या तरुणाने नम्र स्वरांत सांगितलं. "तू कांही खात पीत नाहीस कां?" वज्रनाथने त्याला विचारलं.

"परमेश्वराचं चिंतन करण्यांत जेव्हां मी मग्न होतो, तेव्हां तहानभूक लागत नाही. तो सर्वांचा रक्षणकर्ता आहे. त्याच्या दयेवर सारेजण जगतात. असा दयाळू देव माझी भूक भागवणार नाही कां?" तरुणाने उत्तर दिले.

त्याचे विचार ऐकून वज्रनाथ प्रभावित झाला. आपण अशाच तरुण मुलाच्या शोधांत आहोत असे त्याला वाटले. कदाचित देवाची देखील हीच इच्छा असेल.

घरीं परतल्यानंतर त्याने आपल्या पत्नीला त्या तरुणाची सारी माहिती सांगितली. तिलाही फार आनंद वाटला. त्या तरुणावर नजर ठेवून त्याच्याबद्दल जास्त माहिती शोधून काढायची असे या पतीपत्नींनी ठरवले.

त्या दिवसापासून वज्रनाथचे नोकर तिन्ही वेळां त्या तरुणासाठी जेवण नेऊं लागले. त्याच्या हालचालींवर लक्ष ठेवण्यासाठी त्याने आणखी कांही माणसें नेमली. कांही दिवसानंतर त्या माणसांनी वज्रनाथला सांगितले, "महाशय, त्या तरुणाच्या डोळ्यांतून सारखे अश्रू वाहात असतात." वज्रनाथला चैन पडेना. संध्याकाळीं तो मंदिरात गेला आणि त्याने त्या युवकाला विचारले, "मला कळलंय कीं तू गप्प राहातोस आणि तुझ्या डोळ्यांचे पाणी खळत नाही. तुला कसली अडचण आहे कीं त्यामुळे तुला सारखे रडूं येते? तुझे दुःख; चिंता जर तू मला सांगितलीस तर मी कांहीतरी उपाय त्यावर शोधण्याचा प्रयत्न करीन."

सत्यवानाने वज्रनाथाच्या पायावर लोटांगण घातले आणि रडतरडत तो म्हणाला, "आपण मला अगोदर क्षमा करा."

"मी तुला क्षमा करूं? तू मला सांग कीं खरी गोष्ट काय आहे?" वज्रनाथने त्याला उठवत विचारले.

"आपण समजता त्याप्रमाणें मी कांही देवाचा भक्तबिक्त नाही. मी एक चोर आहे. आपल्या घरीं एका रात्रीं मी चोरी करण्यासाठीं शिरलो होतो. त्यावेळेला आपल्या पत्नीबरोबर आपण एखाद्या भाविक, श्रद्धाळू तरुणाला दत्तक घ्यावे असा विचार करीत होतात. ते ऐकून मला



मोह झाला. आपल्या संपत्तीचा वारस व्हायला ही एक सुवर्ण संधीच मला मिळाली होती. मुकाट्याने मी तुमच्या वाड्याबाहेर पडलो. दुसऱ्या दिवशी आपण मंदिरांत देवदर्शनाला येणार हे मला ठाऊक होतं. मी भक्ताचा वेष घेतला आणि मी परमेश्वराचे ध्यान करतो आहे अशी बतावणी केली. आपण मला बघितलंत. आणि नंतर जे मला हवं होतं, तसंच घडत गेलं. परंतु, हळूंहळूं, तिथें बसून माझी देवावरची श्रद्धा वाढत गेली. जेव्हांजेव्हां मला माझ्या जुन्या पापांची, दुष्ट कर्मांची, व केलेल्या चोऱ्यांची आठवण येई, तेव्हां तेव्हां मला माझीच घृणा येऊं लागे, आणि माझ्या डोळ्यांतून अश्रुसरी वाहायला लागत."

त्याचा खुलासा ऐकून क्षणभर वज्रनाथ स्तंभित झाला. सत्यवान पुढे सांगायला लागला, "आपण तर धर्मात्मा आहात. मी पापी आहे. आपल्याला फसवण्यासाठीं मी ही चाल केली. आपण जी शिक्षा मला द्याल, ती मी भोगायला तयार आहे. शिक्षेची मुदत संपली कीं हे शहर सोडून मी निघून जाईन."

वज्रनाथने विचार केला आणि स्वतःच्या मनाशीच एक निर्णय त्याने ठरवला. तो म्हणाला, "सत्यवान, हे शहर सोडून जायची तुला कांही आवश्यकता राहाणार नाही. तूच माझा वारस होणार आहेस." आणि त्याने सत्यवानाला उठवून आपल्या घरीं नेले."

ही गोष्ट सांगून वेताळ राजाला म्हणाला, "राजन्, स्वतःला चोर, पापी समजणाऱ्या सत्यवानाला वज्रनाथने आपला वारस म्हणून जाहीर केले. मला तर वाटतं कीं, अफाट संपत्तीचा मालक असल्यामुळें त्याचे मानसिक संतुलन बिघडले होते. योग्य-अयोग्य काय याचा निर्णय करण्याची विचारशक्ती त्याच्याजवळ उरली नव्हती. त्याने घेतलेला हा निर्णयच सांगतोय कीं



तो श्रीमंत आहे, परंतु बुद्धिहीन श्रीमंत! आता चंद्रशेखर हा हुशार विद्यार्थी आहे, उच्च शिक्षण घ्यायची त्याला तीव्र इच्छा आहे. शिक्षण घेतल्यावर तो वाणिज्यशास्त्रांत पारंगत झाला असता आणि वज्रनाथाला त्याने व्यापारांत मदत केली असती.

फळें विकून चरितार्थ चालवूं शकणारा तो मुलगासुद्धां समर्थ होता, आत्मनिर्भर होता. त्याची कमाई बेताची असली तरी तो आपल्या पायावर उभा राहण्याची इच्छा धरुन होता. या दोन तरुणांना सोडून एका खोटारड्या चोराला आपला वारस नेमणे हे कांही बरोबर आहे कां? यांत वज्रनाथचा मूर्खपणाच दिसून येतो कीं नाही? माझ्या या शंकांचं उत्तर तुला माहीत असेल आणि तरीही तू गप्प बसलास तर तुझ्या मस्तकाची शंभर शकलें होतील.''

वेताळाची शंका दूर करण्यासाठी राजा विक्रमार्कने उत्तर दिलं, ''वज्रनाथने आपला वारस निवडण्याच्या विषयांत चूक केली नाही किंवा उतावळेपणाही केला नाही. त्याने योग्य निर्णय घेतला. तो स्वतः उदार होता, इतरांना मदत करण्याची त्याची वृत्ती होती, म्हणून त्याने चंद्रशेखरला उच्च शिक्षणासाठीं पैशाची मदत केली. तो आपला वारस होईल या अपेक्षेने मदत दिली नव्हती. दुसरा होता भिकारी, तो बनला व्यापारी! त्याला पैशाची किंमत समजली होती व पैसे कसे मिळवावेत याचीही कल्पना होती. परंतु वज्रनाथची संपत्ती जर त्याला लाभती, तर त्याच्या वृत्तींत बदल होऊं शकलाही असता. आता सत्यवानाने वज्रनाथला फसवायचं ठरवलं होतं खरं, पण परमेश्वराचं निरंतर ध्यान आणि वज्रनाथाचा चांगला स्वभाव यामुळें त्याची वृत्ती बदलली. त्याला पश्चात्ताप झाला. म्हणून त्याने सत्य परिस्थिती सांगून शिक्षा देण्याची विनंती केली. आपल्या पापांचे त्याने परिमार्जन केले. वाल्या कोळ्याचा वाल्मिकी झाला होता तसा सत्यवानही आता खराच देवभक्त झाला होता. वज्रनाथाला विश्वास वाटला कीं तो आपली संपत्ती न्याय्य मार्गाने खर्च करील व धर्माचरण करील. म्हणूनच त्याने सत्यवानाला आपला वारस निवडला. त्यांत त्याचा मूर्खपणा दिसत नाही.''

राजाचे मौन-भंग करण्यांत वेताळ यशस्वी झाला, व शवासहित अदृश्य होऊन तो पुन्हां झाडावर जाऊन बसला.






## लपंडाव



चांदण्या रात्रीं वातावरण प्रसन्न असले तरी मुलें अस्वस्थ असतात. तेव्हां काय करायचे? आपले सवंगडी गोळा करायचे आणि सर्वांनी मिळून लपंडाव खेळायचा! हा खेळ म्हणजे पकडापकडीचाच एक प्रकार आहे. आणि तमिळनाडमधें गांवोगांवी हा खेळ मुले खेळतात. मोकळ्या अंगणात किंवा पटांगणात मुलें दोन संघात विभागणी करतात. एक संघ अंधारात लपतो नि दुसरा चंद्रप्रकाशांत! जेव्हां एका संघातले गडी आपल्या क्षेत्राच्या हद्दीबाहेर येतात तेव्हांच त्यांना पकडता येते. प्रत्येक संघ आपला एकेक खेळाडू विरुद्ध पक्षाच्या खेळाडूंना पकडण्यासाठीं धाडतो. मात्र जर पकडायला जाणारा खेळाडू विरुद्ध पक्षाच्या हद्दींत चुकून शिरला तर त्याच्या संघाचे गुण कमी होतात. पुढच्या पौर्णिमेला खेळून बघणार कां?

## न खाण्याचे बदाम



जेव्हां तुम्ही पैसे देताना नाणीं किंवा नोटा काढाल तेव्हां हे लक्षांत ठेवा. गुजरातमधें, सतराव्या शतकांत कडू बदामांचा पैशासारखा उपयोग केला जात होता. एका पैशाऐवजी साठ









# मेघांचा लाडका ऋषी



तो गोंडस मुलगा अरण्यांत फिरत होता. त्याचे आध्यात्मिक ज्ञान बरेच होते. परंतु संसाराविषयीं मात्र तो अगदी अनभिज्ञ होता. त्याच्या कपाळावर मध्यभागी शिंगासारखी दिसणारी एक बारीकशी गांठ होती, त्यामुळें त्याचे नांव ऋष्यशृंग पडले. त्याची माता एक अप्सरा होती, पण ती शापदग्ध असल्यामुळें हरिणीच्या रुपांत राहात होती, त्यावेळीं तिने या मुलाला जन्म दिला.

ऋष्यशृंगाला निसर्गाची ओढ होती. निसर्गदेवताही त्याच्यावर प्रसन्न होती. तो अरण्यांत जेव्हां फिरत राही, तेव्हां फुलें जास्त सतेज दिसत आणि इंद्रधनुष्याचे रंगही जास्त मोहक वाटत. पण त्याहीपेक्षां आश्चर्याची गोष्ट म्हणजे त्याने आकाशाकडे नुसतं बघितलं कीं पावसाची रिमझिम सुरुं होई.

एकदा लोमपद राजाच्या अंगदेशांत मोठा दुष्काळ पडला. काय उपाय करावा हे कांही कुणालाच सुचेना. जे ऋषीमुनी अरण्यांतून हिंडत त्यांना ऋष्यशृंगाची ती अद्‌भुत शक्ती माहीत होती. त्याने नुसतं वरती बघितलं असतं कीं पाऊस पडला असता. या तरुण ऋषीला राजधानीला येण्याची विनंती करावी असे त्यांनी राजाला सुचवले.

कांही मानकऱ्यांना बरोबर घेऊन राजाचे मंत्री अरण्याकडे निघाले. त्यांनी राजातर्फे या तरुण मुनीला राजमहालांत येण्याचे निमंत्रण दिले. परंतु ऋष्यशृंगाने ते आमंत्रण स्वीकारले नाही. ते सुंदर अरण्य, त्यांतले पशुपक्षी त्याला लोभावत होते. एका दिवसासाठीदेखील ते अरण्य सोडून जाण्यास तो राजी नव्हता. राजांचे दूत नकार घेऊनच परतले.

"तो तरुण मुनी कधी त्या अ ...बाहेर पडलेलाच नाही. जगांतली इतर अनेक आकर्षणें कोणती असतात हेदेखील त्याला ठाऊक नाही. परंतु अनोख्या गोष्टींबद्दल माहिती करुन घेण्याची उत्सुकता मात्र त्याच्यांत आहे. गाणारे पक्षी किंवा नाचणारे मोर पाहाण्यासाठीं तो अरण्यांत अनेक कोसांचं अंतर पार करतो. आपण त्याचे हे औत्सुक्य चाळवले पाहिजे. त्याने जी वस्तू पांहिली नसेल ती पाहाण्यासाठी तो इथवर येईल." एका ज्येष्ठ सरदाराने मत दिले.

राजाने सुंदर तरुणींचा, नर्तिकांचा व गायिकांचा समूह जमवला. त्यांच्यावर ऋष्यशृंगाला बोलावून आणण्याची अवघड कामगिरी सोंपवली.

त्या साऱ्याजणीं अरण्यांत गेल्या आणि ऋष्यशृंगासमोर गायन व नृत्य करुं लागल्या. त्यांना पाहून तो चकित झालाच, पण त्यांचे गायन व नृत्य त्याला आवडले.

त्या वेळेपर्यंत त्याने कोणतीही स्त्री बघितलेली नव्हती. भारल्यासारखा होऊन तो त्या नृत्यांगना व गायिकांच्या पाठोपाठ जाऊं लागला. तो राजवाड्यांत केव्हां येऊन पोंचला हे त्यालाच





> ''सार्‍या ज्ञानाचा झरा आप[illegible] आहे.
> सारे विश्व म्हणजे एकतेत विविधता, व विविधतेत एकता यांचा खेळ आहे.''
>
> *- स्वामी विवेकानंद*

कळले नाही. किती वेळ झाला आहे व कोणता प्रहर आहे ते सूर्याची दिशा बघून ठरवण्यासाठी त्याने आभाळाकडे पाहिले. लगेच आकाशांत मेघांची दाटी झाली आणि पावसाच्या धारा सुरुं झाल्या.

या तरुण ऋषीचे स्वागत करण्यासाठी स्वतः राजा व राणी महाद्वारापाशीं आले. त्यांनी त्याचे पाय धुतले, त्याला फुलांचा हार घातला आणि त्याला आदराने राजवाड्यांत ती दोघे घेऊन आली.

कोमलहृदयी आणि विनम्र वृत्तीच्या ऋष्यशृंगाला त्यांचे मन मोडवेना. सुरवातीला तो राजाचा सन्माननीय अतिथी म्हणून राजवाड्यांत राहिला. लौकरच राजकन्या शांताशी त्याचा विवाह करण्याचा बेत राजा व राणीने योजला. शांता ही अयोध्येच्या राजा दशरथाची कन्या. अंगदेशाच्या लोमपद राजाने तिचा प्रतिपाळ केला होता.

दोन्ही राजे जिवलग मित्र होते. पुढें राजा दशरथाचा ऋष्यशृंगाशी परिचय झाला. नंतर ऋष्यशृंगाच्या मार्गदर्शनाखाली दशरथराजाने पुत्रकामेष्टी यज्ञ केला. त्याचा प्रसाद म्हणून त्याला राम, लक्ष्मण, भरत व शत्रुघ्न असे चार पुत्र झाले.

**- बिंदुसार**





# अतिशर्माची स्तुती

विशालसेन विदेह देशाचा राजा होता. त्याला लोकांकडून आपली स्तुती ऐकायला फार आवडत असे. जे कुणी त्याची स्तुती करत त्यांना तो किंमती वस्तू भेट देत असे. त्यामुळे अनेक लोक त्याची स्तुती करायला येत असत.

राजाचा मुक्तानंद नांवाचा एक अनुभवी मंत्री होता. त्याला राजाची ही पद्धत बिलकुल आवडली नाही. तो एक दिवस राजाला म्हणाला, ''महाराज, राजाला स्तुती हवी असेल तर तिला तोटा आहे का? पण स्तुती ऐकली कीं गर्व येतो. गर्व आला तर विवेकबुद्धी नाहीशी होते. विवेक नाहीसा झाला तर राज्यशासनांत दोष निर्माण होऊं लागतात व लोकांना अनेक समस्यांना तोंड द्यावे लागते. ज्या राजाची आपली प्रजा सुखांत व आरामांत राहावी अशी इच्छा असेल, त्यांनी स्तुतीपासून दूर राहिले पाहिजे. जो राजाचे दोष सांगेल त्याला बक्षीस देऊन, भेट देऊन प्रोत्साहित केले पाहिजे'' मंत्र्याने असा राजाला हितबोध केला.

राजाला मुक्तानंद मंत्र्याविषयी आदर होता. त्यामुळे लगेच त्याने प्रशंसा करणाऱ्यांना भेट देण्याचे थांबवले व त्यानंतर पुढे जे कुणी राजाचे दोष शोधून काढत असत, त्यांना भेटी द्यायला सुरवात केली. राजाने तसे जाहीरही केले. पण तरीही लोक राजाची प्रशंसा करीत राहिले. कोणीही राजाला त्याचे दोष सांगितले नाहीत. तेव्हां राजा मंत्र्याला म्हणाला, ''आता लोकांची ही प्रशंसा थांबवण्यासाठी तुम्हीच कांहीतरी उपाय सांगायला हवा''.

मुक्तानंद म्हणाला, ''कुणीही कुणाची उगीचच स्तुती करत नाहीत. आपले प्रशंसक आपली स्तुती कशासाठी करतात ते आधी आपण



जाणून घ्यायला हवं''.

विशालसेनने दुसऱ्याच दिवशीं आपल्या एका अनुयायाला बोलावले. तो सदैव राजाची स्तुती करण्यांतच आपला वेळ घालवत असे. राजा त्याला म्हणाला, ''माझ्यातले दोष सांगितलेस तर तुला बक्षीस मिळेल. पण तू अद्यापी माझा एकही दोष दाखवून दिलेला नाहीस, उलट स्तुतीच करत आहेस, याचं कारण काय?''

त्यावर अनुयायी हात जोडून म्हणाला, ''महाराज, समवर्गीय लोकांचे दोष सहजतेने दिसून येतात. त्यांना ते दाखवून दिले नाहीत तर त्यांना त्रास होईल. म्हणून समवर्गीय लोकांचे दोष मी नेहमी सांगत असतो. मोठ्या लोकांचे दोष माझ्यासारख्या सामान्याला दिसत नाही. माझी खात्री आहे की मोठे लोक आपले दोष स्वतःच समजू शकतात व ते सुधारतातही. आपण तर फार मोठे आहात. मी एक साधारण माणूस आहे. हाच एक दोष आता प्रशंसेविषयी बोलूं या. जे सत्य आहे, वास्तविक आहे तेच मी सांगतो आहे, तेव्हा ती प्रशंसा कशी बरं होऊं शकेल?''

ते ऐकून अत्यानंदाने विशालसेनाच्या अंगावर मूठभर मांस चढले. ''मी तुझ्यावर नेहद खूष आहे. प्रशंसकाला भेट न देण्याचा नियम नसता तर मी तुला सोन्याच्या मोहरा दिल्या असत्या. पण तुझी कुठलीही इच्छा असल्यास सांग, मी ती पुरी करेन. कारण नियमानुसार इच्छा पुरी करता येते.''

त्यावर तो म्हणाला, ''महाराज, आपल्या दरबारांत काम दिलेत, तर माझा भार खूप कमी होईल. मी आपला सदैव ऋणी राहीन. माझ्यावर एवढी कृपा करावी''.

विशालसेनने अनुयायाच्या भावाला नोकरी दिली. त्याचप्रमाणे आणखी कांही अनुयायांनी त्यांची प्रशंसा करून आपली कामे उरकून घेतली. मंत्र्याने राजाला सावध केले, त्यावर राजा म्हणाला. ''माझे सर्व अनुयायी सांगत होते की जे सत्य आहे, जे वास्तविक आहे तेच ते सांगतात. त्यांचं म्हणणं आहे की माझ्याकडून ते कसलाहा फायदा होण्यासाठी तसं म्हणत नाहीत''.

त्यावर मुक्तानंद म्हणाला, ''महाराज, आपण जर लोकांना तुम्ही स्तुती कां करता असे विचारले, तर कांही लोकांना खरे कारण सांगायला भीती वाटते, तर कांहींना संकोच वाटतो. त्यामुळे त्यांनाच कारण न विचारता, दुसऱ्यांना विचारले तर बरे होईल, असे मला वाटते''.

विशालसेन राजाला मुक्तानंदाचा मनांतल्या मनांत खूप राग आला. राजाला वाटले की हा प्रत्येक वेळी माझ्या आनंदाच्या मार्गात विघ्न आणतोय पण तरीसुद्धां मंत्र्याचे ऐकायचे असे राजाने ठरवले. त्याने सोम नांवाच्या अनुयायाला बोलावले व विचारले, ''राम माझी जितकी स्तुती करतो, तुला तितकी करता येत नाही. याचं कारण काय?''

सोम निर्भीडपणे म्हणाला, ''महाराज, मी निस्वार्थीपणे आपल्याविषयी जे खरे आहे ते सांगू लागलो, कीं राम मला ते सांगूच देत नाही. तो स्वार्थी राम आपल्याला कांही ना कांही मिळावे या उद्देशाने आपली अधिकाधिक प्रशंसा करतो. आमच्यात हाच फरक आहे''. असे म्हणून सोमने रामच्या कांही इच्छा उघडपणे सांगून टाकल्या. राजाला त्याच्या सांगण्यात सत्य आहे असे वाटले. त्याचवेळी हासुद्धां आपल्याला कांहीतरी मिळेल अशी अपेक्षा करतोय असे राजाला वाटले. मग ह्या दोघांमध्ये काय फरक आहे?

त्यानंतर राजा मुक्तानंदला म्हणाला, ''स्तुती ऐकून मला आनंद मिळतो. आणि ती ऐकून ऐकून स्तुतीचं मला जणू व्यसनच लागलं आहे. पण स्तुती करायला खरंच कुणी निःस्वार्थी व्यक्ती मिळणार नाही का?'' राजाने आपले दुःख प्रगट केले.

मुक्तानंद मंत्र्याला आपल्या गांवच्या अतिशर्माची एकदम आठवण झाली. तो पंडित



होता. पण नेहमी दुसऱ्यांची स्तुतीच तो करीत असे. आणि कुणाकडूनही कसलीही अपेक्षा करीत नसे.

मुक्तानंद राजाला म्हणाला, ''महाराज, माझ्या गांवात अतिशर्मा नांवाची व्यक्ती आहे. त्याला आपण कांही दिवस आपला अनुयायी बनवा व आपल्याबरोबरच ठेवा. दुसऱ्या कुणालाही जवळसुद्धा येऊं देऊं नका. आपली इच्छाही पूर्ण होईल व देशाचे कल्याणही होईल''.

विशालसेन अतिशर्माची मोठ्या उत्सुकतेने वाट पाहू लागला. दोन तीन दिवसांतच अतिशर्मा राजदरबारी येऊन पोहोचला. आल्याबरोबर त्याने राजाच्या रूपाची स्तुती केली. नंतर राजाच्या नांवाची प्रशंसा केली. नंतर त्याच्या वस्त्र आभूषणांची खूप स्तुती केली. त्याच्या आवडी-

निवडींची, त्याच्या प्रत्येक गोष्टीची तारीफ केली.

अतिशर्माकडून प्रशंसा एकल्यानंतर राजाला कळले की त्याच्यात किती विविध गुण आहेत। अत्यानंदाने राजा अतिशर्मावर प्रसन्न झाला.

असेच कांही दिवस गेले. अतिशर्मा राजाला विविध प्रकारच्या स्तुतीसुमनांनी प्रशंसा करु लागा. राजाला शिंक आली तरी अतिशर्मा स्तुती करे. पुन्हा एकदा शिंकले तर त्यांत काय महत्वपूर्ण संदेश आहे, ते लगेच स्तुतीरूपे सांगे. त्याचप्रमाणे राजाने खाकरले किंवा त्याला उचकी आली तरी त्याची खूप प्रशंसा करे.

एक दिवस राजाला संताप आला आणि तो अतिशर्माला खूप बोलला. तेव्हांदेखील अतिशर्माने राजाच्या रागाची प्रशंसा केली. राजा म्हणाला, "आणखी किती माझी स्तुती करणार आहेस?"

"महाराज, आपण सर्व शास्त्रांत पारंगत आहात. सर्व कलांत निपुण आहात. आकाशांत चमकणारा सूर्यसुद्धा कधीतरी एक दिवस तळपणार नाही. पण ते कधी, याचा अंदाज माझ्यासारख्या साधारण माणसाला बांधता येत नाही. आपली प्रशंसा करणे हेदेखील तसेंच आहे". अतिशर्मा भावप्रधान होत म्हणाला.

असाच आणखी एक महिना निघून गेला. एक दिवस विशालसेन मंत्री मुक्तानंदला म्हणाला, "मला आता माझी स्तुती ऐकण्यांत अजिबात रस वाटत नाही. कां कुणास ठाउक मला उलट भीतीच वाटते. अतिशर्माला त्वरित गांवी पाठवल्यास बरे होईल. पण मला त्याला कसे सांगायचे ते समजत नाही".

त्यावर मुक्तानंद हंसून म्हणाला, "महाराज, अतिशर्मा एक महान पंडित आहे, इतका मोठा पंडित असूनही तो स्वतः ची स्तुती कधी करीत नाही. त्याला दुसऱ्यांनी त्याची स्तुती केलेली बिलकुल आवडत नाही. त्यामुळे तो स्वतः दुसऱ्यांची स्तुती करतो. विवेक असणारी माणसं थोडा वेळ त्याची प्रशंसा ऐकली की कंटाळून जातात. त्यामुळेच आमच्या गांवातले लोक प्रशंसेच्याविरुद्ध आहेत. म्हणून आमचा गांव सुधारला आहे. जो राजा स्तुती ऐकण्यापासून दूर राहील. त्या राजाच्या प्रजेचे कल्याण होईल".

विशालसेनला खऱ्या अर्थाने ज्ञानप्राप्ती झाली. विदेह राज्यांत लवकरच भरपूर प्रगती झाली.



# खास बातम्या

## कांहीतरीच!

ऑक्टोबरच्या ९ते १६ तारखेपर्यंत रशियांतली शिरगणती झाली. नेहमीप्रमाणेंच, घरोघरी जाऊन जनगणना केली गेली. एकही घर, एकही व्यक्ती यांतून वगळली जाऊं नये म्हणून सरकारी अधिकारी अत्यंत जागरूक होते. दोन नागरिक आंतरराष्ट्रीय अंतराळ-स्थानकावर राहात होते. तेव्हां समक्ष माहिती गोळा करण्यासाठी दोन अंतराळ-वीरांना तिथें पाठवण्यांत आले. त्यांनी व्हॅलरी कॉरस्थून आणि सर्जी त्रेश्चेव यांच्याकडून माहिती पत्रकावर सह्या घेतल्या व काम पूर्ण केले!



## अतिजलद

सध्यां गोवा-मुंबई एक्सप्रेसला या प्रवासासाठी आठ तास लागतात. बारा वर्षांपूर्वी सुरुं झालेली महत्वपूर्ण कोंकण रेल्वे आता गोवा ते मुंबई हा प्रवास फक्त साडेचार तासांत पूर्ण करणार आहे. ही गाडी ताशीं १५० कि मी या वेगाने धांवेल. सध्यां दिल्ली व भोपाळ या दोन शहरांमधें धांवणाऱ्या राजधानी एक्सप्रेस व शताब्दी एक्स्प्रेस या





# गुप्त दान

कलाधर हा कोठर गांवातला एक करोडपती होता. असे म्हटले जाते की जिथे धनसंपत्ती भरपूर आहे तिथे चांगले गुण असत नाहीत. पण कलाधर त्याला अपवाद होता. तो अतिशय उदार व विशाल मनाचा माणूस होता. कुणीही संकटात असले की त्यांना मदतीचा हात द्यायला तो लगेच पुढे येत असे.

कलाधरचा राम हा अतिशय प्रामाणिक नोकर होता. कुणालाही कसलीही मदत हवी असेल तेव्हां कलाधर रामच्यामार्फत ती करत असे. अशा रीतीने कित्येक दु:खी कुटुंबांना कलाधरने सहाय्य केले होते, या बाबतींत राम अगदी जागरूक राहायचा व आपल्या खऱ्या दात्याचे नांव गुप्त राखायचा. कारण कलाधरला प्रसिद्धी, प्रशंसा व प्रचार यात बिलकुल रुची नव्हती.

जवळच्याच एका गांवात कलाधरचा मेहुणा भूषण राहायचा. तोही थोडा फार दानधर्म करायचा. पण त्याचा नेहमी आग्रह असायचा कीं आपण केलेल्या दानाला प्रसिद्धी मिळाली पाहिजे, लोकांमध्ये त्याची चर्चा व वाहवा व्हायला हवी असा तो नेहमी प्रयत्न करत असे. दहा रुपये देणगी देतानासुद्धां तो दहापंधरा लोकांच्यासमोर ते करत असे.

भूषणला कलाधराची वृत्ती बिलकुल आवडत नव्हती. एकदां तो त्याला म्हणाला, "इतके दान तू देतोस पण लोकांना माहितीसुद्धा नसतं कीं कोण दानी आहे? त्यांत लपवण्यासारखे काय आहे? तू तर कुठलेही वाईट काम करत नाहीस. तुझ्यासारखे चांगली कामं करणारे फार थोडेजण असतात."

त्यावर कलाधर हंसून म्हणाला, "सर्वांच्या देखत दान दिल्याने, दुसऱ्यांकडून स्तुती ऐकल्याने, मनुष्यमध्ये अहंकार निर्माण होतो. आणि कुठल्याही परिस्थितीत दात्याला अहंकार असू नये. मला तर गुप्तपणे दान देण्यांतच सर्वात

-निर्मला गुमा -

अधिक समाधान मिळते. अहंकार असणे वाईट आहे. त्याच्यापासून दूर राहण्यांतच आपले भले असेल".

कलाधराच्या या उत्तराने भूषणला राग आला. तो म्हणाला, "तू जर असं म्हणतोस तर आमच्या गांवातल्या सदैव रडक्या दामोदरशी तुझी ओळख जरूर करून दिली पाहिजे".

"हा कोण दामोदर?" कलाधर म्हणाला.

भूषण म्हणाला, "दामोदर हा एक म्हातारा माणूस आहे. त्याचा चेहरा सदैव रडवा असतो. त्याला पाहिलं की असं वाटतं की जगांतली सगळी दु:खें हाच भोगतोय. तू त्याला सोन्याच्या मोहरांनी कनकाभिषेक केलास तरी त्याच्या चेहऱ्यावर हसू किंवा आनंद दिसणार नाही. तू गुप्त दाता आहेस तर तो गुप्त याचक आहे."

भूषणचे बोलणे कलाधराने ऐकले पण तो कांहीही बोलला नाही. दुसऱ्या दिवशी त्याने आपल्या विश्वासू रामला भूषणच्या गांवी जाऊन दामोदर-विषयी सर्व माहिती काढून आणायला सांगितली.

त्याच दिवशी संध्याकाळी राम भूषणच्या गांवाला गेला. परत आल्यावर त्याने दामोदरचा सर्व वृत्तांत कलाधरला सांगितला.

दामोदरच्या वृद्धावस्थेत त्याची पत्नी वारली. त्याला चार मुलगे होते व सर्वजण कामधंदा करून सुखांत होते. परंतु त्यांनी दामोदरची घरामागे असलेल्या गोठ्यांत राहायची व्यवस्था केली होती. सर्वांची जेवणे झाल्यानंतर जे कांही थोडे फार उरलेले अन्न असे, ते त्याच्या सुना त्याला जेवायला म्हणून आणून देत. परंतु दामोदर ते राहिलेले, उष्टें अन्न खात नसे. तो ते सरळ



कचऱ्याच्या पेटीत टाकून लोकांनी दान दिलेल्या पैशांतून हॉटेलमधले जेवण आणून जेवत असे, व कुणालाही हे रहस्य कळणार नाही याची काळजी घेत असे.

दामोदरविषयी सर्व कळल्यानंतर कलाधरने रामजवळ थोडे पैसे दिले व त्याच्या घरी जाऊन जे कांही सांगायला पाहिजे ते सांगितले.

राम जेव्हां दामोदरच्या घरी पोहोचला तेव्हा त्याचे चारी मुलगे घरीच होते. रामने त्यांना सांगितले, "खूप वर्षांपूर्वीची गोष्ट आहे. माझे वडील लहान असताना नदींत पोहायला गेल्यावेळी अचानक नदीच्या प्रवाहांत वाहून जायला लागले. त्यावेळी तुमच्या वडिलांनी त्यांना वाचवलं. मरताना माझ्या वडिलांनी मला हे सांगितलं, आणि माझ्याकडून वचन घेतलं की त्यांच्या प्राणदात्याला कृतज्ञता प्रगट

करण्यासाठी दर महिन्याला थोडी रक्कम दिली पाहिजे. आत्ता यापुढे दर महिन्याला मी इकडे येईन व आपल्या वडिलांना, दामोदरला रक्कम देत जाईन".

ते ऐकताच दामोदरच्या मुलांना अत्यानंद झाला. लगेच ते वडलांना त्या गोठ्यांतून घरांत घेऊन आले व म्हणाले, "बाबा, आजपासून तुम्ही आमच्याबरोबरच या घरांत राहा व तुमच्या पलंगावर झोपा". असे म्हणून त्याला पलंगावर बसवत पुढे म्हणाले, "आजपासून तुम्हांला जेवायला काय हवं ते सांगा, ते तुम्हाला मिळेल. तुमच्या सुना तुमची सेवा करतील, तुमची नातवंडं तुम्हाला हवं नको ते सर्व आणून देतील".

दामोदरला कळले नाही की हा बदल अचानक कसा काय झाला! पण इतके निश्चित कळले की आता आरामांत राहण्याचे दिवस आले आहेत. व सर्व कष्ट दूर होणार आहेत. रामने दामोदरच्या चेहऱ्यावर आनंद प्रगट झालेला पाहिला. तो लगेच गांवी परतला व त्याने हे कलाधरला सांगितले. त्यावेळी भूषणही तिथे उपस्थित होता. कलाधरने त्याला म्हटले, "पाहिलंस का भूषण, मी दामोदरला खूष केलं, त्याला प्रसन्न केलं".

भूषण नाराजीच्या स्वरांत म्हणाला, "जोपर्यंत दामोदर जिवंत असेल तोपर्यंत ही पद्धत चालू ठेवणार काय?".

त्याच्या या प्रश्नाला कलाधर त्याच्या पाठीवर थोपटत म्हणाला, "आपण नदीवर धरण कशाला बांधतो? आपल्याला पाणी सुरक्षित ठेवता यावे, ज्यावेळी त्याची गरज पडेल त्यावेळी त्याचा उपयोग करता यावा म्हणून. माझ्या पूर्वजांनी इतकी संपत्ती कमावली आहे, ती अशा चांगल्या कामासाठी वापरली जावी म्हणूनच. त्यामुळे पुण्यही मिळेल व पुरुषार्थही! काय? माझे म्हणणे ठीक आहे ना?"

"आपल्याबरोबर कांही मला वाद-विवाद करायचा नाही." असे म्हणत भूषण तिथून निघून जाऊं लागला.

मेहुण्याच्या या विचित्र वागण्यावर मोठ्याने हंसत कलाधर म्हणाला, "अरे हे बघ, दामोदर-सारखा आणखी कुणी गरजू माणूस आढळला, तर मला अवश्य कळव, बरं कां!"



# तुमची नियती तुम्हीच घडवा!

तुंपा आणि रत्नगिरी ही शेजारी राज्यें होती. त्यांची एकामेकांशी नेहमीच लढाई होत असे. पण या वेळेला लढाई वेगळ्या प्रकारची होती. हे आमरण युद्ध होणार होते. तुंपाचा सेनापती वीरसेन आपल्या सेनेला रणांगणाकडे घेऊन निघाला. शत्रूचे सैन्य आपल्या सैन्यापेक्षां खूपच मोठे आहे हे त्याला ठाऊक होते. पण त्याला लढण्याखेरीज दुसरा पर्याय नव्हता. युद्ध न करताच शरणागती पत्करणें म्हणजे साऱ्या राज्याशी व महाराजांची मानहानी झाली असती आणि ही गोष्ट तुंपाच्या स्वाभिमानी नागरिकांना मुळींच आवडली नसती.

आपले सैनिक आत्मविश्वास गमावून बसले आहेत व आपण विजय मिळवूं अशी त्यांना खात्री नाही हे वीरसेनला माहीत होतं. त्याने त्यांची कुजबुज ऐकलेली होती. त्यांच्या खाली वळवलेल्या माना व शिथिल खांदे त्यांची निराशा स्पष्ट दाखवत होते.

त्यांचा आत्मविश्वास पुन्हां मिळवण्या-साठीं कांहीतरी तांतडीने करायला हवे होते.

रणभूमीच्या वाटेवर एक प्राचीन मंदिर होते. देवीची मनोभावे प्रार्थना केल्यानंतर वीरसेन त्याच्या सैनिकांना म्हणाला, "तुमच्यापैकीं बहुतेकांना आपण जिंक

म्हणून आपण या देवीमातेलाच कौल लावून बघूं या!" त्याने एक चांदीचे नाणें काढले आणि तो म्हणाला, "मी हे नाणें आता उडवतो. जर शाही शिक्का असलेली बाजू वरती आली तर देवीने आपल्याला विजय मिळेल असा आशिर्वाद दिला आहे असं आपण समजूं. जर शिक्याची बाजू जमिनीकडे तोंड करणारी असली, तर आपला पराभव होईल. तेव्हां आता नियती काय आहे ते तरी पाहूं या!"

वीरसेनने नाणें उंच उडवले. सैनिक श्वास रोधून पाहात होते. नाणें जमिनीवर पडले; आणि शाही शिक्का सर्वांकडे दिमाखांत पाहात होता. सारेजण आनंदून गेले.

हे पाडलेले खांदे ताठ झाले. आपण जिंकणारच असा विश्वास सैनिकांच्या मनांत निर्माण झाला. त्यांनी आवेशाने आणि तडफदारपणें रत्नगिरीवर हल्ला केला आणि विजय मिळवला. लढाई संपल्यानंतर एका सेनाधिकाऱ्याने वीरसेनला म्हटले, "नियतीची इच्छा कुणीही बदलूं शकत नाही."

"अगदी बरोबर!" वीरसेनने उत्तर दिले आणि मिस्कीलपणें हंसत त्याने मंदिराबाहेर हवेंत उडवलेले नाणें त्या अधिकाऱ्याला दाखवले. त्याच्या दोन्ही बाजूंवर शाही शिक्का



# भारताची ओळख

जानेवारी महिन्यांतला सर्वांत महत्वाचा समारंभ म्हणजे प्रजासत्ताक दिन. त्या दिवशी राजधानींत होणारे संचलन म्हणजे आपल्या देशाची उन्नती, तंत्रज्ञानाची प्रगती, व्यापार, उद्योगधंदे, शेती, आरोग्य व शिक्षण क्षेत्रांतली भरारी, या सर्वांचे एक मनोहर दर्शन असते. भारताची चौफेर प्रगती किती होते आहे यावर या महिन्याची प्रश्नावली आधारलेली आहे.

१. आपल्या अणुशक्ती निर्मितीची क्षमता किती आहे?
२. इनसॅट-१बी हा उपग्रह भारताने यशस्वीरित्या केव्हां अंतराळात सोडला?
३. अत्यंत आधुनिक व सर्वांत मोठी असलेली 'सागरकन्या' या नौकेवर सागरी शास्त्राचा अभ्यास करण्यांत येतो. ही नौका आपण कोणत्या राष्ट्राकडून खरेदी केली?
४. भारताच्या पहिल्या क्षेपणास्त्राचे नांव काय?
५. भारताने एक पुरुष व एक स्त्री यांना अंतराळयानांत पाठवले होते. त्यांची नांवे सांगा. त्यांनी अंतराळांत केव्हां प्रवास केला?
६. भारताने दशांश नाणेपद्धती केव्हां स्वीकारली?
७. युनिव्हर्सिटी ग्रँटस् कमिशनची स्थापना केव्हां झाली?
८. भारताची पहिली गगनचुंबी इमारत केव्हां व कुठे बांधली आहे?

*(उत्तरें पुढील अंकी)*

## डिसेंबर २००२च्या कोडयाची उत्तरें

१. बिर्ला हाउसमधें प्रार्थनास्थळीं सभामंचाजवळच एका बॉंबचा स्फोट झाला.
२. पहिले भारतीय सरसेनापती ले.ज.के.एम्. करिअप्पा होते.
३. ७४ पक्ष; त्यापैकीं १४ राष्ट्रीय पक्ष होते.
४. सी.डी. देशमुख - सहा वेळां!
५. १९५४ फेब्रुवारींत, अलाहाबादमधें; यावेळीं सुमारे ५०० मंडळी मरण पावली.
६. १९५४ डॉ. एस्. राधाकृष्णन, सी. राजगोपालाचारी आणि सी.व्ही. रामन.
७. १०० मीटर्स फ्रीस्टाईल पोहण्यासाठीं, सचिन नाग.
८. १२ जानेवारी १९५३ रोजीं मुंबईचे आर्चबिशप व्हॅलेरियन ग्रासिआ.
९. मध्य भारत - इन्दौर.
१०. श्री. रमण महर्षी व श्री. अरोबिंदो.





# गणेश पुराण

कृष्ण म्हणाला ते ऐकून हंसत मृदंगकेसरी म्हणाला - "ओहो, तसं सांगून सुटून जाशील असं वाटलं होय तुला? ते होणार नाही. तुझं मुरलीवादन मोठं की माझं मृदंगवादन मोठं ते आत्तांच कळलं पाहिजे!"

कृष्णाने सर्व अंग हादरल्यासारखं सोंग करून मुरली वाजवायला म्हणून काढली. मृदंगकेसरीने मृदंग काढला व वाजवूं लागला. कृष्णाने यमन कल्याण राग वाजवायला सुरवात केली आणि मृदंगकेसरीला गडबडलेला पाहून एकदम हंसध्वनी रागाचे सूर काढले. मृदंगकेसरी तो राग ऐकून इतका गुंग झाला कीं मृदंग वाजवायचे सोडून देऊन डोलूं लागला. त्याने मृदंग बाजूला सरकवून ठेवला आणि स्वत:ला विसरुन नृत्य करुं लागला. कृष्ण हंसध्वनी रागाचे तानांसह स्वर काढीत नादब्रह्मांत पोचला असतां विघ्ननाश गणनायकाने मृदंगकेसरीचे रूप टाकून सोंड वर करून आपले मोठे पोट हलवीत तांडवनृत्य प्रारंभिले. मृदंग अदृश्य झाले आणि मूषकाने उड्या मारायला सुरवात केली.

विघ्ननाश गणनायकाला आवडणारा हंसध्वनी राग होता, म्हणून त्या रागात स्वत:ला विसरुन तो नृत्य करीत होता. तो अगदी दमून गेला आहे, हे पाहून कृष्णाने हंसध्वनी राग एकदम आवरता घेतला, आणि गणपती खाली पडतो की काय हे पाहून कृष्णाने गणपतीला धरले व म्हणाला - "विघ्ननाशा, पार्वतीनंदना! तू जमिनीवर पडलास तर तू पुन्हां मुरली ऐकूं नकोस असे तुझी आई तुला बजावील, म्हणून मी भिऊन तुला थांबविले, रागावूं नकोस किंवा गैर मानूं नकोस बरं कां, लंबोदरा!"

१३. स्यमंतकमणि - विनायक चतुर्थी



विघ्नेशवर म्हणाला - "कृष्णा, तुझी मुरली ऐकायला म्हणून मी असा आलो होतो, आपलं कृष्णविनायक द्वंद्व म्हणजे खरोखर सुंदरकांडच होतं!"

त्यावर कृष्ण म्हणाला, "विघ्नेश्वरा, तुझ्या उंदराने तुझ्या त्या मृदंगाचं दोन्ही बाजूंचं कातडं कुरतडून खाल्लं कीं रे!" असं म्हणत त्याने हळुवारपणें उंदराच्या पाठीवर हात फिरविला.

विघ्नेश म्हणाला - "कृष्णा, कंसाचा काळ जवळ येऊन ठेवला आहे. धनुर्याग समयी तुला घेऊन यायला तो अक्रूराला पाठवील. तर तू जा. विजयोस्तु!" असा आशीर्वादही गणपतीने दिला.

कृष्ण म्हणाला, - "ही सर्व तुझी कृपा आहे. देवा!" असे म्हणत कृष्ण हात जोडून गणपती-समोर वांकला.

विघ्नेश्वर म्हणाला - "तू अवतारपुरुष आहेस. माझी कृपा नाही, तुझी लीला आहे सर्व! कुब्जा मथुरेला तुझी वाट पाहते आहे, तिच्यावर कृपा कर." असे सांगून गणेश मूषकवाहनावर बसला आणि आकाशात उडाला. बघतां बघतां तो अंतर्धान पावला.

अक्रूर कृष्णबलरामांना रथांत घेऊन मथुरेला गेला तेव्हां अष्टवक्रा असलेली कुब्जा सामोरी आली. तिने कृष्णबलरामांच्या पायांना चंदन लावले आणि पायांवर डोके टेकून त्यांना नमस्कार केला. नंतर तिने कृष्णबलरामांच्या गळ्यांत पुष्पमाळा घातल्या. कृष्णाने कुब्जाने दोन्ही हात धरून तिला उठविले. तिचे कुब्जा रूप नाहीसे झाले व तिला अप्सरेचे रूप आले व ती देवलोकाला गेली.

कंसाने कृष्णाला ठार करण्यासाठी केलेले सर्व प्रयत्न निष्फळ झाले व कृष्णाने त्याला सिंहासनावरून खाली ओढून त्याचा वध केला.

नंतर कृष्णाने देवकी वसुदेवांना कारागृहांतून सोडविले आणि नंतर उग्रसेनाला सुद्धां तुरुंगातून सोडवून त्याला त्याचे सिंहासन परत मिळवून दिले.

कृष्णबलराम मोठे झाले. कृष्णाने अनेक दुष्टांचा वध केला व राक्षसांचा संहार केला. समुद्रांत प्रवेश केला आणि दुर्भेद्य अशी द्वारकापुरी स्थापन केली. त्याने बलरामाला राजधानीचा प्रमुख केला व त्याच्यावर द्वारकेचा राज्य कारभार सोंपविला.

कृष्णाने रुक्मिणीहरण करून तिच्याशी विवाह केला. सर्व वैभव प्राप्त असूनही कृष्ण नेहमीसारखा गाईंना चरायला घेऊन जाऊ लागला आणि त्यांचे दूध काढून गोपाळकृष्ण हे आपले नांव सार्थक करीत द्वारकेला राहू लागला.





द्वारकानगरीच्याजवळ सत्राजित नांवाचा एक प्रमुख नागरिक राजासारखा सर्व ऐश्वर्य उपभोगीत व एक छोटेखानी राज्य स्थापन करून रहात होता. तो सूर्यवंशी म्हणून स्वतःला मिरवीत असे. तो सूर्योपासक होता. सूर्याचे स्मरण करून त्याने तपश्चर्या केली व सूर्याने प्रसन्न होऊन त्याला स्यमंतकमणी नांवाचा एक तेजस्वी हिरा दिला. स्यमंतकमण्यातून जी कांती बाहेर येई तिच्या किरणांतून दररोज सुवर्ण कण्या बाहेर येत. अशा तऱ्हेने त्याने अलोट सोने एकत्र केले.

सत्राजित आपला स्यमंतकमणी थोरा मोठ्यांना बोलावून दाखवी व त्याचं वैशिष्ट वर्णन करून मोठ्या गर्वाने सांगे. त्याने एकदां कृष्णालासुद्धा बोलावून आपला स्यमंतकमणी दाखवायचे ठरविले. त्याप्रमाणे त्याने कृष्णाला बोलाविले. परंतु कृष्ण आला नाही. 'केव्हांतरी येऊन पाहून जाईन' असा निरोप त्याने पाठविला. घमेंडखोर सत्राजिताला त्याचा राग आला व तो त्याचा द्वेष करू लागला. कृष्णाने अनेक अद्भुत कार्ये करून दाखविल्याचे त्याने ऐकले होते, परंतु तो त्यांकडे दुर्लक्षच करीत राहिला आणि कृष्णाला यादव वंशीयांतला एक प्रमुख, यापेक्षां जास्त महत्व त्याने कधी दिले नाही.

सत्राजिताला सत्यभामा नांवाची एक असाधारण रुपवती अशी मुलगी होती. स्यमंतकमण्याबरोबर सत्यभामेच्या सौंदर्याची कीर्तिसुद्धा सर्वत्र पसरली. जरासंधासारख्या थोर राजाधिराजाच्या मनांतसुद्धा सत्यभामेचे पाणिग्रहण करण्याची महत्वाकांक्षा होती. सत्यभामेची विघ्ननाश गणाधिपतीवर फार भक्ती होती. ती प्रत्येक गणेश चतुर्थीला गणपतीची पूजा करी व त्याची कृपा संपादन करून कृष्ण तिच्या आधीन होईल असं कांहीतरी वरदान देण्याची प्रार्थना करी. कृष्ण त्यांच्या वाड्यावरून नित्य जाई, तेव्हां ती त्याचे लक्ष आकर्षित करण्याचा प्रयत्न करी. परंतु कृष्णाने कधी तिच्याकडे मान वळवूनही पाहिले नाही. म्हणून ती गणपतीचे ध्यान करून त्याला सांकडे घाली.

सत्राजितला मुलीच्या मनांतील हेतू चांगला कळला असूनही तो त्याला कांहीच माहीत नसल्यासारखे दर्शवी. एके दिवशी सत्यभामा गणपतीच्या मूर्तीसमोर गुडघे टेकून बसली असतां तिला पाहून सत्राजित म्हणाला, "आपलं कुलदैवत प्रत्यक्ष सूर्यभगवान याची आपल्यावर कृपा असताना असल्या देवांची प्रार्थना आणि नवस कशाला ग मुली?"

सत्यभामा दचकून उभी राहिली व म्हणाली



- ''असं बोलूं नये बाबा! मनोकामना निश्चितपणे पूर्ण करणारा देव हा एकटा विघ्ननाश गणाधिपतीच आहे!''

''तुझी मनोकामना काय ती तर सांगशील? रुक्मिणीच्या पोळीवरचं तूप ओढायचं आहे होय?'' सत्राजिताने विचारले.

''तिच्या पोळीवरचं तूप कशाला ओढूं? मी कृष्णाला आपल्या मुठीत ठेवीन!'' सत्यभामा म्हणाली.

सत्यभामेचा हट्ट सत्राजितला माहीत नव्हता असे मुळीच नाही. तरी तो वाढावा असंच त्याच्या मनाला वाटलं व तो मनांतल्या मनांत हंसत निघून गेला.

दुसऱ्याच दिवशी कृष्ण सत्राजिताकडे आला. कधी न येणाऱ्या कृष्णाची नजर तिच्यावर पडावी म्हणून सत्यभामा नटून-थटून दिवाण-खान्यात आली तर पाहते की कृष्ण निघून गेला होता. सत्राजित स्यमंतकमणी मुठींत घट्ट धरून कृष्णाकडे क्रुद्ध नजरेने पहात उभा होता.

सत्यभामेने बापाला विचारले - ''बाबा! असे का उभे आहात? तो आला होता तो मला मागणी घालायला तर आला नव्हता?''

''त्याने तशी मागणी घातली असती तरी मी तेवढे मनाला लावून घेतले नसते! पण त्याने काय मागितले माहीत आहे का? त्याने स्यमंतकमणी मागितला. त्याच्याजवळ तो असला तर प्रजेच्या हिताची कित्येक कामे तो करू शकेल म्हणे!'' सत्राजित म्हणाला.

सत्यभामा थोडी रागावल्यासारखी म्हणाली, ''म्हणजे, तुम्हाला माझ्यापेक्षा स्यमंतकमणी मोठा वाटला म्हणावयाचा?'' असे म्हणत ती तेथून निघाली. तेव्हां सत्राजित तिला समजावूं लागला.

''तो स्यमंतकमणी सोनं देतो ते जमा करून ठेवतो असं नाही ना म्हणाला? मग त्याचा तो लोभ कसा होईल बाबा? कृष्णासारख्याने मागितल्यावर तुम्ही देऊन टाकला असतात तर किती बरं झालं असतं बाबा?'' सत्यभामा म्हणाली.

सत्राजिताच्या अंगाचा जणूं कांही भडका उडाला. म्हणाला - ''देणार नाही. जिवांत जीव असेपर्यंत माझ्याजवळचा तो मणी कोणाला मिळणार नाही. हा मणी माझं सर्वस्व आहे!'' सत्राजित संतापून म्हणाला.

सत्यभामा चिडल्यासारखी होऊन म्हणाली - ''होय, तर, मणी म्हणजे तुम्हाला एवढा मोठा वाटतो ना! माझ्याहून मोठा! तो मोठा की मी मोठी



हे तो कृष्णच सिद्ध करून दाखवील!'' असं म्हणत सत्यभामा तिनक्यांत तोऱ्यांत तिथून निघून गेली.

कांही दिवसांनी गणेशचतुर्थी आली. सत्य-भामेने गणपतीची पूजा केली आणि त्या दिवशी संध्याकाळच्या सुमारात पालखीत बसून ती द्वारकेला निघाली.

त्या वेळीं आकाश मेघाच्छादित होते. काळोख पडूं लागला होता. कृष्ण गाईचं दूध काढीत होता. एकाएकी ढगाआडून चंद्र बाहेर आला व कृष्णाला कासंडीतल्या दुधांत कोर दिसली. त्या पाठोपाठ चंद्र ढगाआड गेला.

गणेशचतुर्थीला आपण चंद्र पाहिला याबद्दल कृष्ण विचारांत पडला. तो लगेच पूजेच्या खोलीत गेला. त्याने गणपतीच्या डोक्यावर अक्षता वाहिल्या आणि डोळे मिटून गणपतीची मनांतल्या प्रार्थना केली - ''देवा, मी चंद्राचं फक्त प्रति-बिंबच पाहिले. याउपर तुझी इच्छा!'' नंतर तो ध्यानस्थ होऊन तो उभा राहिला. तो तसा ध्यान करीत उभा असता गणपतीच्या मूर्तीतून निघाल्यासारखा आवाज कृष्णाला ऐकू आला - ''कृष्णा, तू चंद्र पहायला म्हणून गेला नव्हतास ना! म्हणून लोकनिंदा झाली तरी परिणामी तुला लाभच होणार आहे, बरं का!''

कृष्णाने डोळे उघडून म्हटले - ''देवा, ही सर्व तुझी लीलाच असे मी मानतो!''

त्याच वेळी रुक्मिणीने पूजेच्या खोलीत पाऊल टाकले व कृष्णाला गणपतीसमोर जप करीत असल्यासारखा पाहून चकित होऊन ती म्हणाली - ''प्रभो! आपण गणपतीजवळ कांही मागण घालता आहा वाटतं?''

कृष्ण म्हणाला - ''रुक्मिणी, याच दिवशी मागे एकदां गणेश चतुर्थीच्या दिवशी, मला वाढवणाऱ्या यशोदामातेला मी म्हटलेले बोलणं मला आठवलं एवढंच!''



"तेव्हां काय म्हणाला होतात मला ऐकू द्या तरी!" रुक्मिणी म्हणाली.

कृष्ण सांगू लागला - "यशोदा माता दूध काढीत होती व मी तिच्या पाठीवर चढून कासंडीतल्या दुधांत चंद्राची कोर पाहिली व आईला ऐटीत सांगितलं. तेव्हां ती मला रागे भरली व म्हणाली - "बाळारे बाळा! अरे, लोक तुझ्यावर निरनिराळे खोटे आरोप लावतील की रे! मोठा झाल्यावरही या लोकनिंदेतून सुटका नाही रे, बाळा!" मी म्हणालो - "तर मग पाहिलेच पाहिजे कीं नाही आई!"

"तेव्हां तुमच्यावर कोणता आळ आला होता?" रुक्मिणी ने विचारले.

"मी माती खाल्ली हे माझ्या बलराम दादाने सांगितलंच होतं!" कृष्ण म्हणाला.

"पुन्हां आतां चंद्राची कोर पाहिली नाहीत ना? बाकी तुम्ही पाहायची म्हटलीत तरी ती दिसणार नाही म्हणा! छान आभाळ आलं आहे!" असं म्हणत तिला पुढे आणखी काही म्हणावयाचं असल्यासारखं ती पाहू लागली.

"रुक्मिणी, काय ग, अशी काय पाहते आहेस? तुला कांही म्हणायचं आहे का?" कृष्णाने विचारले. "होय, सत्राजिताच्या घरांतला मणी आपल्या घरी आला आहे."

"सत्राजिताच्या घरचा स्यमंतक मणी आपल्या घरांत?"

"अहो, तो मणी नाही हो! सत्राजिताचं कन्यारत्न! सत्यभामा आली होती! आतांच तर ती निघून गेली. तिला निरोप देऊन मी इकडे आले आणि तुम्ही दिसलात!" रुक्मिणी म्हणाली.

कृष्ण मान खाली करून म्हणाला - "अस्सं! आपल्या घरी गणपतीची मूर्ती पाहायला ती आली असेल. पाहिली का तिने?"

रुक्मिणी म्हणाली - "विघ्नेश्वर दर्शनासाठी आली की आपली नजर तिच्यावर पडावी म्हणून आली हे तिचं तिलाच ठाऊक! परंतु तिची फिरती नजर पाहून तीं तुमच्याच दर्शनासाठी उतावीळ झाली होती असं मात्र मला भासलं!"

"हे काय विचित्र! कधी तोंडाबाहेर शब्द फुटत नसे त्या रुक्मिणीदेवीच्या तोंडी हे गूढार्थ असलेले चातुर्य! मी काय ऐकतो आहे!" कृष्ण म्हणाला.







# उपकारकर्ता

एका गांवात रतनशंकर नांवाचा एक वीस वर्षांचा तरुण राहात होता. बालवयांतच त्याचे आईवडील मरण पावले, म्हणून त्याच्या आजीने त्याचे पालनपोषण केले होते. तो अत्यंत आळशी होता. भाग्यदेवता आपल्यावर केव्हां प्रसन्न होईल व आपल्याला श्रीमंत करील याची स्वप्नें तो दिवसभर पाहात बसे.

त्याची आजी गांवांतल्या दोनतीन घरांत धुणींभांडी करुन घरखर्च कसाबसा चालवत होती. एकदा आजी आजारी पडली. तिने रतनला समजावले, "बघ, आता कांही माझ्याच्याने काम होत नाही. तू जंगलात जाऊन थोडी लांकडे तोडून घेऊन ये. ती विकून जे कांही थोडेसे पैसे मिळतील, त्यांतून आपली चारपांच दिवसांची खर्चाची सोय होईल."

रतनला नाईलाजाने आजीचे म्हणणे ऐकावे लागले. खांद्यावर कुऱ्हाड टाकून तो जंगलात गेला. लांकडे तोडून तो त्यांची मोळी बांधायला लागला, तेव्हां त्या झाडाच्या खोडावर चिकटलेली एक वेल चमकत होती. यापूर्वी कधी त्याने अशी चमचमणारी वेल पाहिली नव्हती. त्याने ती वेल तोडली आणि आपल्याबरोबर घरी नेण्यासाठी कमरेला खोंचली. आजीला ती सुंदर वेल तो दाखवणार होता.

परतीच्या वाटेवर रस्त्याच्या कडेलाच एक बाई निमूटपणें जमिनीवर झोंपलेली होती आणि तिच्याजवळच एक पुरुष अतिशय दु:खी चेहरा करुन बसला होता. रतनने त्यांच्याजवळ जाऊन त्यांच्या काळजीचे कारण विचारले. तेव्हां त्याला कळलं कीं त्या व्यक्तीचं नांव धनंजय आहे.



- कृष्णकुमारी -



आसपासच्या गांवांमधे प्रसिद्ध वैद्य म्हणून त्याची ख्याती होती. उपाचारांसाठी येणारे रोगी जर गरीब असले तर तो त्यांच्यावर विनामूल्य उपचार करीत असे. श्रीमंत रोगी असतील तर ते जे देतील त्यावर तो संतोष मानी. त्यामुळें त्याचे उत्पन्न बेतांतच होते.

कधी कधी त्याच्याकडे दूरच्या गांवांतून येणाऱ्या रोग्यांचा अकस्मात मृत्यू होई, कारण त्यांच्यावर योग्य वेळेवर उपचार झालेले नसत. धनंजयला या गोष्टीचे फार वाईट वाटे. प्रत्येक गांवात एक उपचार केंद्र असावे अशी त्याची फार इच्छा होती.

अशा वेळीं एक साधू त्याच्या गांवात आला. धनंजयने त्याचे आदराने स्वागत केले. साधू संतुष्ट होऊन त्याला म्हणाला, "मी तुझी एखादी इच्छा पूर्ण करूं शकेन. बोल, तुला काय हवंय?"

धनंजयने आंपल्या मनांतला हेतू साधूला सांगून म्हटले, "स्वामीजी, गांवोगांवी जर उपचार केंद्र असले तर रोग्यांच्यावर तावडतोब इलाज करता येतो, व त्यांना वांचवता येते."

त्यावर साधूने हंसून उत्तर दिले, "असली उपचार केंद्रे सुरुं करणें हे राजालाच शक्य आहे. कारण त्यांच्याजवळ अपार धन संपत्ती असते. शिवाय लोकांचे कल्याण करणारी कामें त्यांनी करायला हवीतच." दोनतीन क्षण थांबून साधूने पुढें सांगितले, "एक काम कर. आजपासून तिसऱ्या दिवशीं महाराजांचा वाढदिवस आहे. त्यावेळीं जो उत्सव समारंभ होईल, त्यावेळीं तू त्यांना एक मूल्यवान रत्न उपहार म्हणून दे. तुला दगडातून रत्न निर्माण होईल असा वर मी देतो. त्यानंतर तू त्यांना गांवांतून उपचार केंद्रांची स्थापना करण्याच्या तुझ्या कल्पनेबद्दल सविस्तर सांग. तुझी मनीषा जरूर पुरी होईल."

धनंजय आपल्या पत्नीला घेऊन राजधानीला निघाला होता. वाटेंत त्याच्या पत्नीला सांप चावला आणि आता ती मरणासन्न अवस्थेंत पडली होती.

रतनने धनंजयची कहाणी लक्षपूर्वक ऐकली. त्यावेळेस धनंजयला रतनच्या कमरेला लोंबणारी चमकती वेल पाहिली.

ती पाहून धनंजय चकित झाला. त्याने रतनला विचारले, "ही चमचमणारी औषधी वेल तुला कुठे मिळाली? ही तू मला जर दिलीस तर माझ्या पत्नीला मला वांचवता येईल."

"तुला मी ही वेल दिली तर त्यांतून मला कसला लाभ होईल?" रतनने विचारलं. "मी राजाला एक रत्न भेट म्हणून देईन. ते जी धनराशी मला देतील, त्यांतली अर्धी मी तुला देईन, असं मी तुला वचन देतो." धनंजयने सांगितलं.

मनांतल्या मनांत रतन विचार करूं लागला. राजाजी रक्कम देईल, ती संपूर्णपणें मलाच मिळाली पाहिजे. तशी त्याने धनंजयला अट घातली. वेल देण्यापूर्वीच धनंजयने त्या दगडाचे रत्नांत रुपांतर करायला हवे. धनंजयचा निरुपाय झाला. त्याने त्या दगडाचे रत्न बनवले. तेव्हां रतनने ती औषधी वेल त्याला दिली व ते रत्न घेतले.



धनंजयने लागलीच ती वेल पाण्यांत बुडवली आणि थोड्या वेळानंतर ती बाहेर काढली. ते पाणी त्याने आपल्या पत्नीला पाजले. ते पिऊन तिची प्रकृती सुधारली व ती उठून बसली.

पत्नीला पुनर्जीवन मिळाल्यामुळें धनंजय फारच प्रसन्न झाला. त्याने रतनला म्हटले, "राजाकडून मला जे धन मिळालं असतं त्यांतून परोपकार व्हावा ही माझी इच्छा आहे. गांवातून उपचार केंद्रांची स्थापना व्हावी ही माझी एकमेव आकांक्षा आहे. त्यासाठीं राजा तुला जे धन देईल, त्यांतले निम्मे तू मला दिलं पाहिजेस."

"हो, हो, जरुर देईन कीं!" खोटं आश्वासन देत रतन तिथून निघाला. पत्नीला जरा आराम वाटल्यानंतर धनंजय पुढें राजधानीला गेला. त्याच्या मनांत होतं कीं रतनला जी रक्कम राजा भेट म्हणून देईल, त्यापैकीं अर्धी रक्कम तिथेच काढून घ्यावी. आणि जर संधी मिळाली तर गांवोगांवी उपचारकेंद्रांची स्थापना करण्याची आवश्यकता राजाला समजावून सांगावी.

राजधानीत पोंचल्यावर त्याला तिथें उत्सवाचे वातावरण दिसले. दूरदूरच्या प्रदेशांतून महत्वाचे पाहुणे आलेले होते. राजाला आशिर्वाद द्यायला कांही साधूही दिसले. ज्या साधुमहाराजांनी धनंजयला ते वरदान दिले होते, तेही तिथें उपस्थित होते.

धनंजय व रतन दोनतीन वेळां एकमेकांसमोर आले, पण रतनने त्याच्याशी बोलणेंदेखील टाळले. रतनच्या मनांत कांहीतरी काळेंबेरें आहे हे धनंजयला लागलीच समजले. त्याने साधूला सारी हकीकत सांगितली.

राजाचा अभिनंदन समारंभ सुरुं झाला. कितीतरी ज्येष्ठ, श्रेष्ठ मंडळींनी राजावर कौतुकाची सुमने उधळली, आणि वाढदिवसा निमित्त त्याचे शुभचिंतन केले. आलेल्या पाहुण्यांनी राजाला भेटवस्तू दिल्या. राजानेही त्या सर्वांना कांही ना कांही मूल्यवान भेटी दिल्या. रतनने राजाला ते रत्न अर्पण केले.

परंतु आश्चर्याची गोष्ट म्हणजे राजाच्या हातांत ते रत्न जाताच त्याचा दगड बनला, आणि घसरुन तो राजाच्या पावलावर आदळला. राजाच्या पायाच्या बोटांतून रक्त येऊं लागले. राजा नाराज झाला आणि त्याने रतनला कैद करण्याचा हुकूम दिला.

हे असं कसं झालं ते रतनला कळेना. त्याच्याजवळच बसलेल्या धनंजयकडे तो टक लावून पाहूं लागला. नजरेनेच त्याने आपल्या प्राणांची भिक्षा मागितली.

कोमल हृदयाच्या धनंजयने साधूकडे बघितले. साधूने पुढें येऊन रतनला म्हटले, "रतन, तुला ती औषधी वेल विनासायास मिळाली होती. त्या औषधीमुळें धनंजयची पत्नी वांचली खरी, पण तू त्यांतून आपला फायदा करुं पाहात होतास. धनाच्या लोभाने तू ते रत्न घेतलेस आणि मनांत ठरवलेंस कीं जी धनराशी राजा तुला देईल, त्यांतली एक पैदेखील तू धनंजयला देणार नव्हतास. म्हणून राजाकडून तुला भेट मिळण्याची तुझी योग्यता राहिली नाही. म्हणून मी त्या रत्नाचा दगडामधें बदल केला."

रतन रडतच साधूच्या पायावर कोसळला. दुसऱ्या क्षणींच दगडाचे पुन्हां रत्न बनले. राजाने त्या रत्नाची खूप प्रशंसा केली आणि धनंजय तिथें कशासाठी आला आहे तेही त्याने ऐकले. राजाला हेही कळून चुकले कीं राज्यांत रोगचिकित्सा व उपचार केंद्रांचा अभाव आहे.

राजाने मंत्र्याला आज्ञा दिली कीं प्रत्येक गांवात एकेक रोगचिकित्सा केंद्र स्थापन व्हावे. या केंद्रांच्यावर देखरेख करण्याची सारी जबाबदारी राजाने धनंजयवर टाकली. त्याचबरोबर राजाने रतनलाही एक नोकरी दिली, कारण लोभी असला तरी त्याच्यामुळें प्रजेचे कल्याणच झाले.







# व्यापाराची जबाबदारी

कठियापूर गांवात नारायण नांवाचा एक व्यापारी रहात होता. लोक त्याला खूप मान देत असत. प्रतिष्ठेबरोबरच त्याने बरीच संपत्ती कमावली होती. एक दिवस अचानक त्याला वाटूं लागले कीं आता आपले वय झाले, आपण आता म्हातारे झालो आहोत. त्याला तीन मुलगे होते. त्याने विचार केला कीं तिन्हींपैकी कुणा एका मुलालाच व्यापाराची जबाबदारी द्यावी. एक दिवस तिघा मुलांना जवळ बोलावून तो म्हणाला, "हे बघा मुलांनो, माझं आता वय झालेय. मी माझा व्यापार तुमच्यापैकी कुणाही एकावर सोपवावा असं म्हणतोय. आणि व्यापार करायला योग्य माणूस हवा. तुम्हा तिघांपैकी कोण व्यापार करायला योग्य आहे ते पाहण्यासाठी मी तुमची एक परीक्षा घेणार आहे. त्यांत जो कोणी पास होईल, त्याला माझा व्यापार मिळेल. काय, कशी आहे माझी कल्पना? तुम्हाला कांही सांगायचं आहे कां याविषयी?"

तिघांनीही वडिलांचा प्रस्ताव मान्य केला. नारायणने आपल्या खिशांतून तीन नाणीं काढली. एकेकाला एकेक नाणे देत म्हटले, "हा एक रुपाया घ्या व संध्याकाळी सूर्य मावळेपर्यंत कुठलेही चांगले काम करून दाखवा".

कांहीही न बोलता ते तिघेही तिथून निघून गेले. त्यांना त्यांच्या वडिलांविषयी खूप प्रेम वाटायचे. ते त्यांचा खूप आदर करत.

संध्याकाळी नारायण कामावरून घरी परत आला. पाहतो तर तिन्हीं मुलगे आतुरतेने त्यांच्या येण्याची वाट पहात बसले होते. त्यांनी प्रथम सर्वांत मोठा मुलगा सोमेश्वरला बोलावले आणि विचारले, "बरं, मी तुला एक रुपाया दिला होता, त्याचं तू काय केलंस?"

- ईश्वर -

सोमेश्वर आनंदाने म्हणाला, ''रामाच्या देवळाजवळ भुकेने कासावीस झालेली एक म्हातारी उभी होती. तिला मी तो रुपया दिला आणि म्हटलं की याच्यातून तुला हवे असेल ते घेऊन खा आणि आपली भूक भागव. भुकेल्याची भूक भागवणे, हे एक चांगलं कामच आहे कीं नाही?''

नारायणने गालांतल्या गालांत हंसत आपल्या दुसऱ्या मुलाला, रामब्रह्माला, बोलावले आणि विचारले, ''तू काय केलंस रे तुझ्या रुपायाचं?''

रामब्रह्म अभिमानाने म्हणाला, ''आपला व्यापार आणखी चांगला होऊं दे म्हणून देवळांत मी पूजा करवली व तो रुपाया पुजाऱ्याला दिला.''

नारायणने नंतर आपल्या तिसऱ्या मुलाला, लक्ष्मणला बोलावले. व त्याला विचारले, ''तू सांग बरं, तू काय चांगलं काम केलंस? तू तुला दिलेले पैसे कसे खर्च केलेस?''

लक्ष्मणने एक अक्षरही न बोलता खिशांत हात घातला व एक रुपया आपल्या वडलांच्या समोर ठेवला. ते पाहून नारायण म्हणाला, ''हे काय, तू कांहीच केलं नाहीस. फारच कंजूष दिसतोस तूं?'' लक्ष्मण हंसत म्हणाला, ''मला माहीत आहे की अनावश्यक खर्च करणे तुम्हाला बिलकुल आवडत नाही. मी खर्च पण केला, चांगले काम पण केले, आणि त्याबरोबरच तुमचा एक रुपयाही परत करत आहे''.

तो काय सांगतोय ते नारायणला नीट समजेना. तो लक्ष्मणकडे पाहातच राहिला. तेव्हां लक्ष्मण म्हणाला, ''बाबा, तुम्ही जे पैसे दिले त्यांतून तीन कोहळे घेतले. बाजारांत एका दुकानाजवळ बसलो आणि येणाऱ्या जाणाऱ्यांना ते कोहळे किती उपयोगी आहेत ते सांगू लागलो. तीन कोहळे मी दोन रुपयाला विकले. एक रुपया जो फायदा झाला त्यांतच्या आठ आण्यांतून एक फळ विकत घेऊन भुकेलेल्या गरीब मुलाला दिले, राहिलेले आठ आणे देवळांतल्या हुंडीत घातले. आणि हा एक रुपया तुम्ही दिलेला, तुम्हांला परत देत आहे''.

लक्ष्मणची दूरदृष्टी, बुद्धिमत्ता व दयाळू वृत्ती पाहून नारायणला आश्चर्य तर वाटलेच, पण त्याचबरोबर आनंदही झाला. आपल्या तीन मुलात व्यापाराची जबाबदारी सांभाळायला लक्ष्मणच सर्वांत योग्य आहे, हे ओळखून त्याने लक्ष्मणवर व्यापाराची जबाबदारी सोंपवायचे ठरवले.







# चतुराईची रवानगी

चित्रपुरी हे एक छोटेसे राज्य होते. युवराज चित्रवर्मा नुकताच राजा झाला होता. राज्यकारभार संभाळण्याचा त्याला अनुभव नव्हता, पण योग्य, बुद्धिमान व समर्थ मंत्र्याच्या मदतीने तो चांगल्या रीतीने राज्य सांभाळत होता.

चित्रपुरीच्या शेजारी अंगराज्य हे सर्व दृष्टीने चित्रपुरीपेक्षा मोठे राज्य होते. वर्धन हा राजा त्या राज्याचा कारभार पहात असे. त्याची खूप वर्षापासूनची इच्छा होती की चित्रपुरी हे पण आपल्या ताब्यांत यावे. त्याच्या वडिलांची देखील हीच इच्छा होती, पण ते असेपर्यंत त्यांना ती पुरी करता आली नाही. वर्धनला वाटले की चित्रपुरीवर विजय मिळवायला हीच एक सुवर्णसंधि आहे. कारण चित्रवर्मा नव्यानेच सिंहासनावर बसला होता, त्याला कसलाही अनुभव नव्हता, राजनीतीचे डावपेच त्याला माहित नव्हते.

वर्धनने एक दिवस सर्व मंत्र्यांची सभा बोलावली व त्यांचा सल्ला विचारला. राजाच्या या विचाराला सर्वांनी पाठिंबा दिला व आनंद व्यक्त करीत ते म्हणाले, ''आपण जो विचार मांडलात तो अगदी योग्य आहे. अशा परिस्थितीतच आपण चित्रपुरी जिंकून घेऊं शकतो. परंतु कुठलाही निर्णय घाईघाईने न घेणेच बरोबर ठरेल. आपला शत्रू किती बलवान आहे हे जाणून घेणे आवश्यक आहे. त्या राजाच्या मंत्र्यांची बुद्धिमता व युद्धसामर्थ्य यांचा अंदाज न घेता त्यांच्यावर आक्रमण करणे वेडेपणाचे ठरेल. त्यामुळे आपल्याला प्रथम त्यांच्या बुद्धिकौशल्याची परीक्षा घ्यावी लागेल''.

वर्धनने त्यांना सांगितले की त्यांच्या बुद्धि-कौशल्याची परीक्षा कशी घ्यायची ते तुम्हीच ठरवा. तेव्हा त्या सर्वांनी मिळून त्यावर बराच खल करून अखेर विचाराअंती एक पत्र वर्धनला दिले व म्हटले, ''हे पत्र तुम्ही चित्रवर्माला पाठवा. त्याचे उत्तर आल्यानंतर आपण पुढे करायचे ते ठरवू या'' त्या पत्रांत लिहीले होते, ''आपण आपल्या राज्यांतून चतुराई पाठवून द्या.''

चांदोबात २५ वर्षांपूर्वी प्रसिद्ध झालेली गोष्ट



चित्रवर्माला ते पत्र अंगराज्याच्या राजदूताने आणून दिले. ते वाचून राजा चित्रवर्मा बुचकळ्यांत पडला. त्याने आपल्या मंत्रीमंडळाला दाखवले. तेही सर्वजण चकित झाले. त्यांना सर्वांना वर्धनची ती इच्छा मोठी चमत्कारिक वाटली. वस्तू, पदार्थ, संपत्ती पाठवून देता येते. पण शहाणपणा किंवा चतुराई कशी पाठवून देता येईल? कुठलीही अदृश्य वस्तू कशी पाठवून देता येईल?

जेव्हां सर्वांनाच ते पत्र म्हणजे रहस्य वाटले, तेव्हां चित्रवर्माचा चेहरा उतरला. त्यावेळी वयाने सर्वांत लहान असलेला मंत्री, बृहस्पती उठून उभा राहिला आणि म्हणाला, ''महाराज, या पत्राचं उत्तर मी देईन, पण मला चार महिन्यांचा अवधी द्या. राजा वर्धनाला ज्या चतुराईची रवानगी करायला हवी, ती मी करीन. पण एक अट आहे, या चार महिन्यांच्या अवधीत या विषयावर तुम्ही मला कांहीही विचारूं नये''. चित्रवर्माने लगेच त्याची अट मान्य केली. नंतर त्याने वर्धनला पत्र पाठवले की ''आपल्या इच्छेप्रमाणे चतुराई रवाना करीन, पण त्यासाठी मला चार महिन्यांचा अवधी हवा''.

चार महिने जवळजवळ संपत आले. बृहस्पती एक मोठी पिशवी घेऊन राजाच्या जवळ आला तेव्हां तिथे बाकीचे मंत्रीही उपस्थित होते. त्याने राजाला पिशवी दाखवत म्हटले, ''महाराज, वर्धनला हवी असणारी चतुराई यांत आहे. ही पिशवी त्याला पाठवून द्या. परंतु ही पिशवी अतिशय काळजीपूर्वक पाठवावी, आंत असलेल्या वस्तूला धक्का लागणार नाही याची काळजी घ्यावी''. मोठ्या कौशल्याने ती पिशवी बांधली होती. त्या पिशवींत काय आहे याचा कुणालाही अंदाज हे आला नाही. चित्रवर्माने कांहीही प्रश्न न विचारता ती पिशवी अंग राजाला पाठवून दिली.

वर्धन व त्यांच्या मंत्र्यानी काळजीपूर्वक पिशवी उघडली. त्यांत मातीची एक घागर होती. त्याच्यावर एक झांकण होते. घागरीत एक मोठा भोपळा होता. तो सबंध घागरींत भरून होता, आजूबाजूला बिलकुल जागा नव्हती. फक्त त्याचा देंठ थोडा वर पर्यंत आला होता. घागर एकदम नवी कोरी व कुठेही फुटलेली नव्हती. ते पाहून वर्धन व त्याचे मंत्री आश्चर्यचकित झाले. त्या घागरीला एक पत्र बांधले होते. मोठ्या उत्सुकतेने त्यांनी ते पत्र काढले व वाचले. त्यांत लिहीले होते, ''राजा वर्धनाच्या इच्छेनुसार चतुराई रवाना करत आहोत. ह्या घागरींत चतुराई आहे. घागर न फोडता ती बाहेर काढावी. ही भेट मिळताच आम्हाला कळवावे''.

तिथे उपस्थित असलेले सर्वजण अवाक् होऊन पाहातच राहिले. इतक्या लहान तोंडाच्या घागरींत इतका मोठा भोपळा कसा काय आंत गेला असेल? उलट त्यांनीच आम्हांला आव्हान दिले आहे कीं घागर न फोडता भोपळा बाहेर काढा म्हणून. त्यांनी दावा केलाय की ही चतुराई आहे पण हे अगदी अशक्य आहे. सर्वजण मूग गिळून गप्प बसले. तेव्हा राजा वर्धन मंत्र्यांना म्हणाला, ''आपल्याला वाटलं होतं की ते मूर्ख आहेत. पण या घटनेने शाबित केलं की आपला शत्रू आपल्यापेक्षां बुद्धिशाली आहे. आपण त्यांच्याशी युद्ध न करणे ठीक होईल, बुद्धिवानांशी दोस्ती करण्यांतच आपले भले आहे.'' नंतर त्याने चित्रवर्माला पत्र पाठवले, ''आपण पाठवलेली भेट मिळाली, आपली प्रशंसा केल्याचांचून राहवत नाही. आपल्याबरोबर दोस्ती करण्याची माझी प्रबळ इच्छा आहे, आपल्या उत्तराची वाट पहात आहे, आपला मित्र, वर्धन''.

हे पत्र पाहून चित्रवर्माला अतिशय आनंद झाला. अजून ही त्याच्या लक्षांत आले नव्हते की वर्धनला हवी असणारी चतुराईची रवानगी कशी केली? त्याने बृहस्पतीला बोलावून त्याचे अभिनंदन केले व विचारले, ''मंत्रीमहोदय, आपल्या कामगिरीमुळे माझी कीर्ती व गौरव वाढला आहे. आपण अशी काय जादू केली कीं युद्ध करायला निघालेल्या शत्रूने मैत्रीचा हात पुढे केला?''

तेव्हा बृहस्पतीने सर्व सविस्तर खुलासा करत सांगितले, ''मी असं काही फार मोठं काम केलेलं नाही. चार महिन्यापूर्वी मी भोपळ्याचा वेल लावला. थोड्याच दिवसात त्याला छोटी छोटी फळें आली. त्यांतले एक तसेच काळजीपूर्वक उचलून लहान तोंडाच्या घागरीत अलगद ठेवले व त्याची दिवसरात्र निगा राखली. जेव्हां ते फळ मोठे होऊन घागरींत भरून राहील इतका मोठा भोपळा झाला, तेव्हां पिशवीत बंद करून आपल्याकडे आणून दिला व आपण वर्धनला तो पाठवून दिला. त्याच्याबरोबरं वर्धनराजाला मी एक पत्र पण पाठवले होते की ह्या घागरींत चतुराई आहे व घागर न फोडता ती बाहेर काढा. याचं काय उत्तर मिळालं ते तर आपण जाणताच''.



# भितरकणिका

तुम्हाला जर कर्णकटु गोंगाट, वेड्यासारखी गर्दी, गजबज टाळून, एखाद्या शांत, वेगळ्या ठिकाणीं सुटी घालवायची असेल तर तुम्ही ओरिसांतल्या भितरकणिकाची वाट धरा. एक निसर्गसुंदर, रमणीय विश्रांतिस्थळ असणारा हा ६०० चौरस किलोमीटरचा पाणथळ प्रदेश आहे. भारतांतले पर्यावरण संतुलन राखणारी ही घनदाट वनराजी दुसऱ्या क्रमांकावर आहे. दलदलीच्या व चिपीच्या झाडांच्या साठापेक्षां जास्त जाती इथें सांपडतात.



भितरकणिका हे अभयारण्य व राष्ट्रीय उद्यानदेखील आहे. अनेक दुर्मिळ व नष्ट होण्याच्या मार्गावर असलेल्या पशु पक्ष्यांच्या जाती इथें आहेत. १७०पेक्षां जास्त प्रकारचे पक्षी इथे निवासी आहेत. कांही स्थलांतरित पक्षीही इथें येतात.

एका बाजूला समुद्र व तिन्ही बाजूंनी नद्यांनी वेढलेले भितरकणिका म्हणजे अनेक लहान खाड्या व कालवे यांचे एक जाळेंच आहे. हे सर्व शेवटी बंगालच्या उपसागराला मिळतात व तिथे नदीच्या मुखापाशी एक जाळीदार दुआब तयार होतो.

भितरकणिकाला बंगालच्या उपसागराचे क्रीडांगण असे म्हटले जाते. दर वेळेला भरतीचे पाणी आंत आले, कीं सारे दलदलीच्या झाडांचे अरण्य तरंगायला लागते. खाडीला ओहोटी लागून पाणी ओसरले कीं खाडीच्या किनाऱ्यावर बहुंगी चिखल दिसूं लागतो. आणि त्यांत खेकडे, मासे, सरपटणारे प्राणी व इतर समुद्रांतले जीव भरपूर दिसतात. ते दृश्य अगदी बघण्यासारखे असते.

इथले दुसरे आकर्षण म्हणजे ऑलिव्ह रिडली कासवें! दरवर्षी दोनदा लाखों कासवे या भागांत अंडी घालण्यासाठी येतात. भितरकणिका भागांत प्रवेश करण्यासाठी परवानगी घ्यावी लागते व जलमार्गानेच जावे लागतें. इथे भाड्याने मोटरबोटी मिळण्याची सोय आहे.

**तिथें कसे जाता येईल?** भितरकणिकांत भुवनेश्वर पासून १९० किमी अंतरावर असलेले चांदबली, किंवा केंद्रपारापासून ३० किमी वर असलेले राजनगर, व राजनगरपासून २५ किमी वर असलेल्या गुप्ती,



# म्हातारीला मदत

श्रीपुरहून रामपूरला पोंचायला उदयला खूप रात्र झाली. सारे रस्ते निर्मनुष्य होते.

या गांवात तो प्रथमच येत होता. आता रात्रीं-साठी कुठे राहायचे हे त्याला कांही उमजेना. त्याला खूप भूकही लागली होती. त्याने एका घराचा दरवाजा ठोठावला.

थोड्या वेळानंतर एका म्हाताऱ्या आजीबाईने दार उघडले. तिने कांही विचारण्याअगोदरच उदयने आपली माहिती सांगितली, ''आजी, मी श्रीपुरहून इथें आलो आहे. माझं नांव उदय. मी नोकरीच्या शोधांत इथें आलो आहे. पण आत्ता मात्र फारच भूक लागलीय.'' आजीने उदयला नीट न्याहाळले व म्हटले, ''ये आंत!''

पाट मांडून तिने त्याला पाटावर बसायला सांगितले. नंतर ताटांत जेवण वाढले. त्याने भराभर जेवून म्हटले, ''आजी, मी आज रात्रींपुरता इथेंच राहीन आणि सकाळ झाली कीं उठून जाईन.'' त्याने घरभर इकडेतिकडे नजर टाकली व विचारले, ''घरांत आणखी कुणी नाही कां?''

''माझा मुलगा व सून जवळच्याच गांवात गेली आहेत. उद्यां संध्याकाळपर्यंत परत येतील.'' म्हातारीने उत्तर दिले.

झोंपायला जाण्यापूर्वी उदयने त्या आजीला आपल्या कुटुंबाबद्दल माहिती सांगितली, ''माझी आई व वडील, दोघेही आहेत. पण वडील व्यसनी आहेत, म्हणून जी थोडीफार जमीन होती तीही विकावी लागली. त्यामुळें मी आता नोकरी शोधायला इथें आलो आहे.'' हे सांगून त्याने दाराजवळच आपली गोधडी अंथरली आणि तो आडवा झाला. पण उदयला कांही झोंप येईना. कामधाम आवरुन आजीने गळ्यांतली सोन्याची सांखळी कपाटांत ठेवली, कपाटाला कुलूप लावले आणि आपल्या उशीखाली किल्ली ठेवून तीही झोंपी गेली.

उदयने हे पाहिलं होतं. ती सांखळी जर चोरता आली तर कांही दिवस तरी उपाशी राहावं लागणार नाही असा विचार त्याच्या मनांत आला. ती सांखळी जर जास्त किंमतीची असली तर ती विकून वडिलांचे कर्ज फेडता आले असते. एखादा जमिनीचा लहानसा तुकडासुद्धां खरेदी करता आला असता.

पण दुसऱ्याच क्षणीं त्याला वाटलं कीं ही माझी चूक होईल. ज्या म्हातारीने मला भुकेच्या वेळी जेवायला वाढलं, रात्रीं झोंपण्यापुरती जागा दिली, तिच्याशी मी अशी प्रतारणा करुं? छे, छे, असा कृतघ्न होऊं? बराच वेळ तो विचार करीत होता. शेवटी त्याने निर्णय घेतला. ही संधी हातून जाऊं द्यायची नाही.

थोडा वेळ झोंप लागल्याचे नाटक उदयने केले. नंतर तो उठून बसला. तितक्यांत त्याला खिडकीच्या बाहेर दोघांचा आवाज ऐकूं आला. त्याने पाहिले तर दोघेजण कुजबुजत होते. एक इसम दुसऱ्याला सांगत होता, ''सावध राहा. म्हातारीच्याजवळ फक्त सोन्याची सांखळीच नव्हे, तर बरेच दागिने आहेत. जरूर पडली तर तिच्या तोंडात बोळा कोंबून सारं घर आपण शोधून पाहूं.''

हे बोलणें ऐकून उदयला स्वत:चीच लाज वाटली, कारण तोही हेच काम करायचा विचार करीत होता. त्याने हळूंच उठून आजीला उठवले आणि चोरांचे बोलणें तिला सांगितले. त्या दोघांनी त्यानंतर काय करायचे तेदेखील त्याने तिला सुचवले.

उदयने दार उघडले व आजीबरोबर तो घराच्याबाहेर आला. दार उघडेच राहिले होते. घरांत कुणीच नाही हे पाहून चोर खूष झाले. दोघेही थोड्या वेळानंतर घरांत शिरले. त्याबरोबर उदयने दार बाहेरून लावून दाराला कुलूप लावले. दोन्ही चोर घरांत अडकले.

आजीने 'चोर चोर' ओरडत शेजाऱ्यांना जागे केले. आजूबाजूचे लोक धांवतच आले. दार उघडून त्यांनी दोन्ही चोरांना पकडले आणि त्यांना दोरीने बांधून ठेवले. सर्वांनी उदयच्या हुशारीचे खूप कौतुक केले आणि दोन्ही चोरांना त्यांनी कोतवालाच्या स्वाधीन केले.

तेव्हां उदयने आजीचे पाय धरले नि म्हटले, ''आजी, मलादेखील कोतवालाच्या स्वाधीन करा. जर चोर आले नसते तर मीच तुमची सांखळी चोरणार होतो.''

म्हातारीने मायेने त्याच्या पाठीवरून हात फिरवत म्हटले, ''मी एकटी होते म्हणून तुला चोरी करायची कल्पना सुचली. तुला आपले चुकले हे समजले आणि मी आणि माझे दागिने चोरांच्या तावडींतून वांचले. हे तुझ्यामुळें झाले म्हणून मी तुला माफ केलंय. माझा मुलगा आता परत येईल. तेव्हां तू त्याला शेतावर मदत करायला जाऊं लाग, आणि आमच्या घरीच राहा.''

उदयने पुन्हां एकदा कृतज्ञतेने आजीचे पाय धरले आणि तिला प्रेमादराने नमस्कार केला.







# माया सरोवर

## 12

*(जयशीलने आपला प्रबळ शत्रू कृपाणजित हा मृत्युवृक्षाचा बळी झाल्यानंतर मायासरोवर शोधण्यासाठी सिद्धसाधकासह प्रयाण केले. सर्पनखनेही त्याचे अनुकरण केले. एका गुहेतून बाहेर पडणाऱ्या नरवानरास जलग्रह हत्तीने आपल्या सोंडेत आवळून धरले. या तिघांनीही ते पाहिले. त्यानंतर)*

जयशील, सिद्धसाधक व सर्पनख, तिघेही जलग्रहला पाहून अचंबित झाले. सर्पनख जलाश्ववरुन खाली उतरणार होता, पण तो विचार करीत थबकला व म्हणाला, ''जयशील आणि सिद्धसाधक! जलग्रह नांवाचा हा पाणहत्ती शक्तिशाली मकरकेतूचे वाहन आहे. माया-सरोवरेश्वराच्या कृपेने त्याला 'सेवक श्रेष्ठ' ही पदवी प्राप्त झालेली आहे. हे तुमच्या ध्यानांत आलंय कां?''

सिद्धसाधकाने आपला शूळ उचलून मोठ्याने 'जय महाकाल'' अशी घोषणा करुन पुढें म्हटले, ''अरे जलप्राण्यांनो! मकरकेतू किती शक्तीमान आहे ते आम्हाला ठाऊक आहे. माझे वाहन बनणाऱ्या नरवानराला मारण्याचा प्रयत्न करणाऱ्या या जलग्रहचा वध मी सर्वांत आधी करीन, आणि त्यानंतर, मी त्याच्या मालकालाही महाकालचा बळी करुन टाकीन.'' असं म्हणून तो गुहेच्या दिशेने पळायला लागला.

''सिद्धसाधक! अरे काय हे? असा उतावळेपणा करुं नकोस!'' जयशीलने



सिद्धसाधकास थांबले. त्यानंतर जलाश्वला त्याच्यासमोर नेऊन तो हळू आवाजांत म्हणाला, ''सिद्धसाधक, आपल्याला मायासरोबरापर्यंत पोंचण्याची संधी आत्ता कुठे हाती येतेय. मकरकेतूशी गोड बोलूनच त्याच्याकडून कनकाक्ष राजाच्या मुलांचे अपहरण करणाऱ्या मायासरोवरेश्वरापर्यंत आपल्याला कोणत्या तरी उपायाने पोंचलंच पाहिजे.''

आपला शूळ खाली नेत सिद्धसाधक म्हणाला, ''मकरकेतू अद्याप जिवंत आहे याची खात्री आहे कां? आपला मालक नसेल म्हणून जलग्रह या अरण्यांत मोकाटपणें भटकत असेल कदाचित.''

जयशील व सिद्धसाधक बोलण्यांत गुंतले होते आणि तिकडे डोंगरात जलग्रह आणि नरवानर गुहेसमोरच्या प्रांगणात जोराने ओरडत लढत होते. हत्तीच्या सोंडेच्या विळख्यांतून सुटून नरवानर हत्तीवरच तुटून पडला, आपल्या कराल दाढांनी त्याने हत्तीचे कुंभस्थळ फाडले. आणि आपल्या बलदंड हातानी त्याला खूप मारले. हत्तीने त्याला सोंडेने पकडून खाली आपटले आणि त्याला पायदळीं तुडवण्याचा प्रयत्न तो करुं लागला.

''सिद्धसाधक, ते बघ! गुहेच्या वरच्या खडकावर एकदोन नव्हे, तर चौघेजण ही भयंकर लढाई आश्चर्यचकित होऊन पाहात आहेत.'' जयशीलने सांगितलं.

सिद्धसाधकाने गुहेच्या दिशेने नजर टाकली. तिथें खरोखरच चौघेजण उभे होते. त्या चौघांची वेषभूषा पाहून सिद्धसाधकाला त्यांच्यापैकी फक्त मकरकेतूला ओळखता आले. परंतु तिथें उभ्या असलेल्या आणखी दोन व्यक्तींनी जयशीलला ओळखले. एकजण चकित झाला होता आणि दुसरा भयभीत होऊन त्यांच्याकडे बघत होता.

मकरकेतूने सर्वांच्याकडे एकवार निरखून पाहिले. नंतर आपल्या अंगावर शाल ओढून, काळी, छोटी दाढी असलेल्या आणि हिरेजडित सोन्याची मूठ असलेली काठी हातांत घेणाऱ्या व्यक्तीला तो म्हणाला, ''वैद्यदेव, जलाश्वर बसलेला तरुण हा जयशील आहे. हातांत शूळ घेऊन जमिनीवर उभा असलेला सिद्धसाधक आहे. तिसऱ्या व्यक्तीला तुम्ही ओळखताच - तो माझ्या शिष्यांपैकींच एक आहे - या सर्पस्वरचा भाऊ!''

''माझ्या आयुष्यांत माझा थोरला भाऊ मी जिवंत पाहीन असं मला मुळीच वाटत नव्हतं.'' आवाजांत थरथरत्या हे शब्द बोलताना सर्पस्वर



पुढे झाला पण मकरकेतुने संतापून त्याचा हात जोराने पकडून त्याला धरुन त्याला मागे खेंचले.

''अरे सर्पस्वर! तुझं डोकं ठिकाणावर आहे ना? जयशील आणि सिद्धसाधक दोघेही आपले शत्रू आहेत, तरीसुद्धां मायासरोवरेश्वराच्या आदेशाप्रमाणें आपण त्यांच्याशी लढाई न करता उलट त्यांच्याशी मैत्रीचे नाटक केले पाहिजे. त्यासाठी आपण कांहीतरी युक्ती योजली पाहिजे'' असं म्हणून मकरकेतूने सर्पस्वरला दम भरला आणि हिरेजडित काठी घेतलेल्या व्यक्तीला म्हटले, ''वैद्यदेव! अद्याप याबाबतीत आपला विचार आपण सांगितला नाहीत?'' वैद्यदेवाने डोंगराच्या पायथ्याशी पाहिले नि आश्चर्याने म्हटले, ''मकरकेतू, त्या मैदानांत काय झालं ते तू नीट पाहिलं नाहीस. जयशीलच्या तलवारीचा वार लागून तुझा जलग्रह मरायला टेकला आहे.''

मकरकेतू झपाट्याने डोंगराची दरड उतरुं हे ऐकल्याबरोबर लागला. त्याच्या मागोमाग इतरही कांही लोक येऊं लागले. त्यांत एक पंचविशीचा तरुण होता. तो लंगडा होता आणि त्याचा डावा पाय लांकडी होता. एका मोठ्या सोटयाच्या साहाय्याने तो हळूहळू डोंगर उतरायला लागला.

जलग्रहाच्या हल्ल्यामुळें घाबरुन नरवानर पळून जायचा प्रयत्न करीत होता. सिद्धसाधक शूळ घेऊन प्रांगणाच्या दिशेने जाऊं लागला. जयशीलने त्याला सावध करीन म्हटले, ''सिद्धसाधक! यावेळीं आपण मकरकेतूच्या मागून येणाऱ्या आणखी तीन व्यक्तींशी लढलं पाहिजे. म्हणून तू अगदी सावध राहा.''



''जयशील, आपल्याला या जगांतल्या कोणत्याही व्यक्तीला भ्यायची जरुर नाही. साक्षात महाकालच्या शिष्याकडून मिळालेली ही अद्‌भुत महिमा-मंडित तलवार तुझ्या हातांत आहे. आता माझ्या शूळाची ताकद मला आज-मावयाची मुळीच जरुर नाही.'' सिद्धसाधकाने सांगितलं.

त्याच्या पाठोपाठ जलाश्वर जाताना असलेला सर्पनख त्यांच्याकडे बघून एकदम ओरडला, ''महाशयांनो, तुम्ही नरवानराचा वध करा. पण जलग्रहाला मात्र जखमी करुं नका, कारण त्याचा मालक अत्यंत सामर्थ्यशाली महापुरुष आहे.''

''तू ज्याला महापुरुष म्हणतो आहेस, त्याला मी माझा शूळ भोसकून त्याची कातडीच सोलून काढीन, समजलं? आता आपलं तोंड बंद ठेव!'' असं दांतओंठ खात सिद्धसाधक त्याला रागावून

म्हणाला, आणि 'जय महाकाल' अशी गर्जना करीत तो पुढें सरसावला.

लढणाऱ्या त्या दोन जनावरांजवळ सिद्धसाधक पोंचणारच होता, तितक्यांत आपल्या जलाश्वावर आरूढ होऊन जयशीलही तिथें पोंचला. नरवानर जमिनीवर उताणा पडला होता, आणि जलग्रह आपल्या सोंडेने त्याला ढोसत होता, तेव्हां जयशीलने त्याच्या सोंडेवर तलवारीच्या मुठीने वार केला. लागल्यामुळें जलग्रह वेदनांनी कळवळला आणि जयशीलवर हल्ला करण्यासाठी मागे फिरला. जयशीलने जलाश्वला चटकन मागे हटवले आणि एकाच मोठ्या झेपेंत त्याने जलग्रहावर उडी घेतली.

तेव्हां जलग्रहाने आपला शत्रू नरवानर याच्यावरची पकड ढिली केली व आपल्या सोंडेने तो जयशीलला पाडण्याचा प्रयत्न करूं लागला. जयशीलने डाव्या हातांत त्याची सोंड पकडली व उजव्या हाताने त्याच्या गंडस्थळावर तो तलवारीने वार करूं लागला.

तोपर्यंत मकरकेतु पळतच तिथें आला. त्याला बघून जयशील म्हणाला, "मकरकेतु, प्रथम तुझ्या जलग्रहाचा संहार करून नंतर मी तुझाही समाचार घेईन. तुमच्यामुळेंच माझा मित्र सिद्धसाधक आणि मी, आम्ही दोघे ही या अरण्यांत नाना प्रकारच्या यातना अकारण भोगतो आहोत."

"जयशील, तुझे आमच्यावर खरोखरीच उपकार होतील. तू जलग्रहला मारूं नकोस. या क्षणापासून आपण मित्र आहोत. तुला तर मायासरोवरापर्यंत पोंचायची इच्छा आहे ना? तर मग तुझा मित्र म्हणून मी तुला तिथें जायचा मार्ग दाखवतो ना!" मकरकेतुने नम्र स्वरांत सांगितलं.





हे ऐकून जयशीलने जलग्रहावरुन खाली उडी मारली आणि त्याने उत्तर दिले, "मला मायासरोवराचा मार्ग तर हवाच आहे, परंतु त्याच्याबरोबर तिथें बंदिवासात असलेली राजा कनकाक्षची मुलें आहेत, त्यांना मला सोडवायचे आहे. म्हणून त्यासाठी इथल्याच एखाद्या गुहेंत तुला बंदी बनवून ठेवलं आणि तुझ्या साथीदारांकडून तुझ्या मायासरोवरेश्वराला जर हे कळवलं तर ते ठीक होईल की नाही?"

त्यावर मकरकेतू कांहीतरी उत्तर देणार इतक्यांत सिद्धसाधक ओरडला, "महाकालचा विजय असो!' नि पुढें म्हणाला, "जयशील, तुझा विचार अगदी योग्य आहे. हा पळून जाऊं नये म्हणून याचे हातपाय बांधून याला गुहेंत टाक आणि त्याच्या गळ्याला अर्धवट जखम कर. याच्या तिघा मित्रांना बांधून नरवानरासाठीं राखून ठेवूं या!" यानंतर त्याने नरवानराच्या छातीशी कान लावून त्याची नाडी चालतेय कीं नाही ते पाहिलं व तो म्हणाला, "हा अद्याप मेलेला नाही. याचं काळीज धडधडतंय. जलग्रहाच्या प्रहारांनी हा बेशुद्ध झाला आहे इतकेच! अरे जलपक्षी सर्पनख, तू लवकर नदीकडे जा. एखादे वस्त्र पाण्यांत भिजवून लौकर घेऊन ये."

मकरकेतू निमूटपणें चौफेर बघत न्याहाळत होता. ते पाहून सर्पनख तिथून हलला आणि जवळच असलेल्या नदीकडे जाऊं लागला. त्यानंतर सिद्धसाधक मकरकेतुच्या जवळ जाऊन म्हणाला, "मकरकेतु, तुझ्याबरोबर आणखी तिघेजण आहेत वाटतं!" जवळ येणाऱ्या त्या



मंडळींकडे पाहात उपरोधिक सुरांत तो म्हणाला, "अरे, ही तर आश्चर्याची गोष्ट आहे. लांकडी पाय असलेला एक लंगडा इसमदेखील तुझ्याबरोबर तू आणला आहेस कां?"

"सिद्धसाधक! हा इसम आमच्यासारखा मायासरोवराच्या प्रदेशांतला नाही. हा तर तुम्हा लोकांसारखा सपाटीवरचा इसम आहे. तोदेखील तुमच्या कनकाक्ष राजाच्या मुलांच्या शोधांत इकडे आलेला आहे. एका चित्त्याशी झटापट झाली त्यांत त्याचा एक पाय गेला. त्याचं नांव मंगलवर्मा आहे." मकरकेतुने उत्तर दिले.

"अरे, हिरण्यपुरच्या सेनापतीचा मुलगा आहे हा मंगलवर्मा! जयशीलबरोबर स्पर्धा करणारा आणि वाघांशी लढत घेताना पळून जाणारा हा तर भित्रीभागुबाई आहे!" आणि आश्चर्याने तो आपल्या साथीदारांना म्हणाला, "जयशील, तू

अजून याला ओळखलं नाहीस कां? लांकडाचा पाय असलेला हा मंगलवर्मा आहे.''

जयशीलने यापूर्वीच मंगलवर्माला ओळखले होते, पण मकरकेतु ज्याला 'वैद्यदेव' म्हणून हांक मारीत होता, त्या व्यक्तीला पाहून तो नखशिखान्त थरारला आणि त्याच्या तोंडून शब्द फुटेना. त्याला 'देवशर्मा' म्हणून हांक मारायची होती पण त्याची बोबडीच वळली. ते लक्षांत येऊन वैद्यदेवाने जयशीलला डोळ्यांनीच खूण केली कीं ''तू मला ओळखत नाहीस असेच नाटक कर.''

तोपर्यंत सर्पनखाने पाण्यांत भिजवलेले एक वस्त्र आणून सिद्धसाधकाच्या हातांत दिले. सिद्धसाधकाने नरवानराच्या डोक्यावर पाणी शिंपडले आणि त्याचे डोके हाताने खूप थोपटले. तरी नरवानराने डोळे उघडले नाहीत, तेव्हां तो, ओरडून म्हणाला, ''नरवानरा! तूं जिवंत आहेस. उठ. या जगांत सिद्धसाधकाचे बोलणें कधी खोटे ठरत नाही.''

नरवानराने डोळे उघडले. चारी बाजूंना नजर फिरवून पाहताना त्याला थोड्या अंतरावर नदीच्या किनाऱ्यावर सोंड उंचावून उभा असलेला जलग्रह दिसला. नरवानराने भयंकर आवाज काढून गर्जना केली व तो उठूं लागला.

त्याचा खांदा दाबून सिद्धसाधकाने त्याला रोखले आणि म्हटले, ''अरे नरवानर, शांत हो आधी! मी तुला प्राणदान दिले आहे. या क्षणांपासून तू आता माझा सेवक आहेस, माझे वाहन आहेस. होय कीं नाही?'' आणि आपला शूळ सिद्धसाधकाने त्याच्या मानेवर टेकवला.

चिडून जाऊन नरवानर उठून उभा राहिला आणि डोळे गरागरा फिरवीत, दांतओठ खात, तो सिद्धसाधकावर चालून गेला. सिद्धसाधक अगदी सावध होताच, त्याने नरवानराच्या कपाळावर आपल्या पंजाने जोरांत फटका मारला. नरवानर पुन्हां कोलमडून खाली पडला. लडखडत, कण्हतकण्हत, तो हळूंहळूं उठला. कांही क्षणांनंतर त्याने मागे वळून पळण्याचा विचार केला खरा, पण तो बदलून झटकन सिद्धसाधकाच्या पायाशी त्याने जमिनीकडे तोंड करुन लोटांगण घातले आणि आपले दोन्ही हात वरती केले. सिद्धसाधक आनंदाने जोरजोरांत हंसायला लागला. **(अपूर्ण)**





वेताळ कथा

# जगन्नाथचा आदर

निश्चयाचा पक्का विक्रमार्क पुन्हा: झाडाजवळ गेला. त्याने झाडावरुन शव खाली उतरवले आणि ते खांद्यावर घेऊन तो स्मशानाच्या दिशेने चालूं लागला. तेव्हां प्रेताच्या आंत लपलेला वेताळ राजाला म्हणाला, ''राजन्, मी वारंवार समजावून सांगून देखील तू आपला हेका सोडीत नाहीस व निष्फळ कष्ट उपसतो आहेस. मी तुझ्या भल्या-साठीच सांगतो आहे कारण मी तुझा हितचिंतक आहे. माझं तू कां ऐकत नाहीस? विश्वास ठेव. तुझे ध्येय साध्य होण्यासाठी तू



जे सतत प्रयत्न चालवले आहेस ते पाहून मला तर असं वाटतं कीं तुला धीर आणि धोरण यांची फार जरुर आहे. तू माझं ऐक. तुला मी माधवशर्माची गोष्ट सांगतो; तो एक विद्वान व महाकवी मानला जात होता. तुझा थकवाही गोष्टीमुळे कमी वाटेल.'' आणि वेताळ गोष्ट सांगायला लागला.

''फार पूर्वी रामपूर गांवात जगन्नाथ नांवाचा एक श्रीमंत गृहस्थ राहात होता. तो अतिशय चांगला होता व सगळ्यांशी सारख्याच तऱ्हेने वागत असे. मग तो ओळखीचा असो किंवा अनोळखी! रामपुरांत आलेला प्रत्येक प्रमुख पाहुणा त्याच्या घरी राहात असे. जे लोक श्रेष्ठ मानले जातात ते सर्वांशी सारख्याच तऱ्हेने वागतात, असा सामान्य लोकांचा गैरसमज असतो. खरं पाहिलं तर त्यांची व्यवहार-शैली अनेकवेळां अविचारी व क्षुद्रही असू शकते.

जगन्नाथच्या पाहुणचाराची प्रसिद्धी होण्यास त्याच्या गांवातल्या रामचंद्राचेही योगदान होते. ते दोघे बालमित्र होते पण त्यांची व्यवहार-पद्धत वेगळी होती. रामचंद्राच्या घरी कुणी गेलं तर तो तुटकपणें वागत असे. मागितलं तरच प्यायला पाणी देई. पैसा म्हणजे परमेश्वर हे त्याचे ब्रीदवाक्य होते. ते ऐकणारे गांवकरी साहजिकच त्याची तुलना जगन्नाथशी करीत असत. तरीदेखील जेव्हां त्याचे नातेवाईक व ओळखीपाळखीचे लोक त्या गांवी येत, तेव्हां ते त्याला आवर्जून भेटायला जात. कारण तो एक सधन व्यापारी होता.

एकदा महाकवी माधवशर्मा त्या गांवात आला. तोही या दोघांचा बालमित्र होता. एकाच गुरुकडून तिघांनी शिक्षण घेतलेले होते. परंतु माधवशर्मा सर्वांत बुद्धिमान होता. जगन्नाथ व रामचंद्राला धडा समजला नाही, तर ते दोघे माधवशर्माकडून शिकून घेत. त्यावेळेस जगन्नाथ एकदा माधवशर्माला म्हणाला, ''तू समजावून सांगितलेलं आम्हाला सगळं समजतं. तेव्हां तू आपल्या



गुरुजींच्यापेक्षां जास्त बुद्धिमान आहेस.''

''अरे, मलाही गुरुजी सांगतात तेव्हांच समजतं. तुम्ही नीट लक्ष देऊन ऐका म्हणजे तुम्हालाही समजेल कीं.'' माधवशर्मा म्हणाला.

पण त्या दोघांना गुरुजींचा पाठ नीट समजत नव्हता. एके दिवशी ही गोष्ट माधवने गुरुजींना सांगितली. ते हंसून म्हणाले, ''गुरुकडून विद्या शिकायला मनाची एकाग्रता लागते. ती तुझ्यांत आहे पण त्यांच्यात मुळीच नाही. गुरूकडून लक्षपूर्वक शिकतात, त्यांना विषयाचे आकलन होते. ती विद्या त्यांचे जीवन उजलते. मित्रांकडून शिकलेली विद्या तात्पुरती असते, व त्याचा ती संपूर्ण त्याचा संपूर्ण फायदा होत नाही असे लोक आयुष्यांत यशस्वी व समर्थ होणे कठीण असते. त्यांना एकाग्रतेची संवय करायला सांग.''

जेव्हां तिघांचा गुरुकुलांतला अभ्यास संपला, तेव्हां गुरुजींनी तिघांना आशिर्वाद दिला. ते माधवला म्हणाले, ''तू महाकवि व पंडित होशील. राजाश्रय मिळवून साहित्याची सेवा कर.'' रामचंद्रला ते म्हणाले, ''तुझी नजर व्यापारावर केंद्रित होईल. इतरांच्यावर उपकार कर किंवा नको करूंस, पण अपकार मात्र कधीही करूं नकोस. हे लक्षांत ठेवून व्यापार कर.'' नंतर जगन्नाथकडे वळून त्यांनी



सांगितलं, ''तू संपन्न घरांतला आहेस. तुझ्या पूर्वजांनी खूप मोठी संपत्ती जमवलेली आहे. तुला मोठेपणा मिळवायची खूप हौस आहे. या जगांत माणूस केवळ शिक्षणानेच मोठा होतो असं नाही. ज्यांना मोठेपणा मिळालेला आहे. अशांचा तू आदरसत्कार करीत जा आणि तुमच्या गांवामधे तू मान्यता व श्रेष्ठत्व प्राप्त कर.''

जगन्नाथ व रामचंद्र आपल्या गांवी परतले. माधवशर्माने राजाश्रय मिळवला व तो पुढे पंडित व कविराज म्हणून प्रसिद्ध झाला. रामपुरच्या ग्रामाधिकाऱ्याच्या निमंत्रणावरुन माधवशर्मा रामपुरला आला. त्याचे स्वागत



करुन ग्रामाधिकारी त्याला म्हणाला, "आपण या गांवात पाहुणे म्हणून आलात, म्हणून मी माझ्या घरीच आपली राहायची व्यवस्था केली आहे. बहुतेक श्रेष्ठ मंडळी जगन्नाथरावांकडे राहातात. त्यांच्याकडले आतिथ्य फार प्रसिद्ध आहे."

तेव्हां माधवशर्मानें जगन्नाथ आपला हा बालमित्र असल्याचं व आपण त्याच्याकडेच राहूं असं सांगितलं. ग्रामाधिकाऱ्याने आनंदाने तसा निरोप जगन्नाथला धाडला. जगन्नाथने उत्तरादाखल माधवला धाडण्यास कळवले. माधव व त्याचा शिष्य कुशल जगन्नाथकडे पोंचले.

जगन्नाथने दारांतच मित्राचे प्रेमाने स्वागत केले. त्यांची जी व्यवस्था केली होती तो थाट पाहून कुशल अवाक् झाला. दुसऱ्याच दिवशी माधवशर्मा गांवकऱ्यांसमोर काव्यवाचन करुं लागला. गांवकरी त्याची प्रतिभा पाहून प्रभावित झाले होते. दोन दिवसानंतर रात्रीं भोजनोत्तर गप्पा मारताना माधवने रामचंद्रची चौकशी केली.

"तो तर सदा व्यापारांत बुडलेला असतो. इतर कांही त्याला सुचत नाही. तो सध्यां गांवात नाही. दोन दिवसांत परत येईल." जगन्नाथने सांगितलं.

"म्हणजे त्याने गुरुजींची आज्ञा प्रमाण मानलीय. तू सुद्धां कांही कमी नाहीस हं! तूही त्यांची आज्ञा पाळतो आहेसच." थट्टेत माधवशर्मानें म्हटले.

पण जगन्नाथला ही तुलना खटकली. तो कुरकुरला, "गुरुजींनी त्याला सोपं काम दिलं. पण मोठ्या लोकांची सेवा करायची म्हणजे सोपं नसतं. कुणी येणार असं कळलं कीं त्या नामवंतासाठी गाडीची व्यवस्था करा, त्यांच्यासाठी झोपायला अंथरुण, पांघरुण, जेवायला स्वादिष्ट प्रकार, मी आवर्जून करवतो. आसपासची ठिकाणें पाहायची सोय करतो. माझ्याच नव्हे तर जवळपासच्या गांवातही लोक माझा पाहुणचार नांवाजतात. यासाठीं मला किती कष्ट उपसावे लागतात ते तुला माहीत आहे? गुरुजींनी सांगितलं खरं, पण ते अंमलात आणणं किती कठीण आहे हे कुठे त्यांना माहीत आहे?"

माधव शर्मा जगन्नाथाची प्रशंसा करीत असतानाच रामचंद्र तिथें येऊन थडकला. माधवला पाहून तो फारच खूष झाला, त्याने प्रेमाने त्याला मिठी मारली आणि म्हटलं, "मी गांवात नव्हतो तेव्हां तू आलास ना? तू आला आहेस हे जेव्हां कळलं तेव्हां मी तडक इथें काम सोडून आलो आहो. चल आता माझ्या घरी राहायला."

रामचंद्र हेका धरुन बसला म्हणून माधवला कुशलसह त्याच्या घरी जावेच लागले.

रामचंद्रांच्या सांगण्यावरुन माधवशर्मानें त्याला आपली एक कविता ऐकवली. त्यावर रामचंद्र म्हणाला, "चांगली वाटतेय ऐकायला, पण जरा अर्थ मात्र समजावून सांग रे!" माधवने अर्थ सांगितल्यानंतर रामचंद्र म्हणाला, "आत्ता नीट समजली. तू सांगितलंस म्हणून तर समजली. पूर्वी सारखीच!"

दुसऱ्या दिवशी सकाळीं स्नानाला गरम पाणी नव्हतं. जेवणही साधं होतं. नोकरचाकरांची सोय नव्हती. त्या दिवशी संध्याकाळी जगन्नाथने पाहुण्यांना परत आपल्या घरीं बोलावले. कुशल परत जायला उतावीळ झाला होता. पण रामचंद्र म्हणाला, "माधव, इथें आहेस तितके दिवस आता माझ्याकडे राहा ना!"



आणि माधवशर्मा तिथेंच राहिला. त्यांनी परत जाण्यापूर्वी रामचंद्रने किंमती वस्तू स्नेहभेट म्हणून दिली आणि म्हणाला, "तुझ्या घरी येईन तेव्हां सव्याज वसूल करीन बरं!"

कुशलला हे आवडलं नाही. ही गोष्ट सांगून वेताळ म्हणाला, "राजन्, जगन्नाथ सुसंस्कृत होता, रामचंद्र सामान्य; तरीही जगन्नाथने परत घरी बोलावल्यानंतर माधव गेला नाही. याचं कारण काय असूं शकेल? मला तरी ते लक्षांत येत नाही. तुला ते माहीत असूनही जर तू उत्तर दिलं नाहीस तर तुझ्या मस्तकाची शकलें शकलें होतील."

विक्रमार्क म्हणाला, "माधवशर्माला माणसांची चांगली पारख होती. जगन्नाथ प्रसिद्धीलोलुप होता आणि त्याची मैत्री दिखाऊ होती. आपल्या आदरातिथ्याच्या गोष्टी त्याने सांगितल्या, पण ग्रामाधिकारी त्याला सांगेपर्यंत त्याने माधवची दखल घेतली नव्हती. त्याने माधवशर्माला म्हटलं होतं, कीं तो मोठ्या व्यक्तींसाठी गाडी पाठवायचा, आसपासच्या प्रेक्षणीय स्थळांना भेटी देण्याची व्यवस्था करायचा व त्यांचे उत्तम आदरातिथ्य करण्यांत मग्न असायचा. परंतु माधवशर्मा येणार हे माहीत असूनदेखील त्याने तशी व्यवस्था अगोदर केलेली नव्हती. ग्रामाधिकारी निरोप पाठवेपर्यंत जगन्नाथ स्वस्थ बसला होता. त्याच्या उलट रामचंद्र होता. प्रामाणिक व रोखठोक. माधवशर्माच्या मोठेपणाशी त्याला कांहीही देणंघेणं नव्हतं. त्याच्यालेखी तो बालमित्रच होता. स्वार्थापोटी आदर येत नाही, ती भावना मनांतून यावी लागते."

राजाचे मौनभंग करण्यांत सफल झालेला वेताळ पुन्हां शवासहित अदृश्य झाला व झाडावर बसला.

(आधार - शकुंतला गर्गची कथा)






## रंगीला सम्राट



रंगाची पसंती तुम्ही जेव्हां कराल तेव्हां तुमच्या यदींत शहेनशहा अकबराचे आवडते रंग जरुर लक्षांत ठेवा. अैने-अकबरी, या त्यावेळच्या बखरींत अकबराच्या कपड्यांच्या रंगांचा उल्लेख नमूद केलेला आहे. त्यांतले रंग म्हणजे माणकांचा, सोन्याचा, नारंगी, पितळी, गवताचा, कपाशीच्या फुलांचा, चंदनी, बदामाचा, द्राक्षांचा, मधाचा, बदामीसर जांभळा, सफरचंदी, पेंढयाचा, पिस्ता, चिनी मातीच्या भांड्यासारखा, निळा, आंबा व कस्तुरी; या सर्व रंगांचे कपडे सम्राटाकडे होते. याखेरीज बादशहाकडे लालभडक, बैंगणी, जांभळा, गुलाबी, आकाशी, व गुलबक्षी या रंगाचे कपडेही होते. त्याचा कपडेपट खरोखरच सुंदर व रंगीबेरंगी

## कंगव्याचे महत्त्व

कंगव्याचा उपयोग फक्त केंस विंचरून नीट नेटके करण्यासाठी असतो, असं कोण म्हणतं? दुसरे उपयोगदेखील असतात बरं! ओरिसामधल्या जुआँग जमातींत कंगवा हे प्रेमाचे निशाण समजले जाते. त्यांच्या लग्नसमारंभात तर कंगव्याला फार महत्त्व असते. सामाजिक समारंभांत जुआंग तरुण नृत्यांत साथ करणाऱ्या तरुणीला कंगवा भेट देतो. जर एखाद्या तरुणीचे मन एखाद्या तरुणावर बसले असेल, तर ती त्याचा कंगवा चोरुन देखील नेऊं शकते - तिची भावना व्यक्त करण्याचा हा एक मनोज्ञ प्रकार! विवाहाच्यावेळीं जुआंग वर वधूला कंगवा भेट देतो. आणि तो कंगवा घेऊन वधू काय करते आहे माहित? अहो, नवरोजींचे केंस त्या कंगव्याने विंचरते!



# अमर राक्षस



हिमालयाच्या पायथ्याशी दक्षराजाचे राज्य होते. त्याच्या मुलींपैकी राजकन्या दिती हिचा विवाह कश्यपमुनींशी झाला होता. तिला अनेक पुत्र झाले. पण ते सर्व दैत्य किंवा राक्षसी वृत्तीचे होते. ते सारखे देवांशी भांडण करीत. त्याचा शेवट लढाईत होत असे. शेवटी हे सर्व दैत्य मारले गेले.

राजकन्या दितीने एकांतस्थळीं विजनवास स्वीकारला आणि कठोर तपश्चर्या सुरुं केली. तिने परमेश्वराची आराधना केली आणि त्याच्यापाशी ज्याला देव मारुं शकणार नाहीत असा पुत्र मिळावा म्हणून विनवणी केली.

परमेश्वराने तिची प्रार्थना ऐकली. तिला एक मुलगा झाला खरा पण त्याला हजार हात, हजार पाय आणि दोन हजार डोळे होते. जसा हा मुलगा मोठा होऊं लागला तसा तो अत्यंत बलाढ्य व शूर होत गेला.

शक्ती आणि शौर्य हे दोन गुण उत्तम नाहीत, असं कोण म्हणेल? या गुणांचा उपयोग चांगल्या ध्येयसिद्धीसाठी करता येतो. या गुणांच्यामुळें दुर्बलांना मदत करता येते व पृथ्वीचे अपरिचित प्रदेशही पाहाता येतात. परंतु दितीचा मुलगा मात्र या गुणांचा वापर इतरांना त्रास देण्यासाठी करूं लागला. आपल्या शक्तीचा त्याला इतका गर्व झाला कीं त्याच्या हितचिंतकांनी त्याला दिलेला चांगला सल्ला त्याने धुडकावून लावला. त्याला कुणाचीही पर्वा नव्हती. ऋषीमुनींवर त्याने जुलमी अत्याचार केले व त्यांची टर उडवली. उन्मत्तपणाने तो आंधळा झालेला होता. म्हणून



त्याला अंधक असे नांव पडले. त्याच्या मातेने त्याला दुसरे चांगले नांव ठेवले असेलही, पण त्याची कुणाला आठवण राहिली नव्हती. हळूहळू अंधकाला समजले कीं देवांनीच त्याच्या सर्व भावांना मारले होते. त्याने याचा सूड घेण्याचा निश्चय केला. आणि मग देव विरुद्ध अंधक अशी एक दीर्घकाळ चाललेली लढाई सुरुं झाली. प्रत्येक वेळेला अंधक देवांचा पराभव करूं लागला. त्याला कुणीही मारूं शकणार नाही असा वर त्याच्या आईने मिळवला होताच. त्यामुळे तो अविनाशी होता.



परंतु अंधकाच्या या त्रासाचा अंत तर व्हायला हवा होताच. देवांकडून त्याचा नाश होणे अशक्य होते. परंतु ब्रह्मा, विष्णू किंवा महेश या त्रिमूर्तीपैकी कुणा एकाकडून त्याचा मृत्यू होणे शक्य होते.

एके दिवशी नारदमुनी अंधकाकडे गेले. नारदमुनींच्या गळ्यांत एका विलक्षण सुगंधी फुलांचा हार घातलेला होता. ती फुलें अतिशय सुंदर होतीच व त्यांचा सुगंधही मोहक होता. त्या हारावर अंधकाची दृष्टी खिळलेली होती. त्या सुगंधाने तर त्याला भारून टाकले होते. इतकी अप्रतिम सुंदर व मनमोहक सुगंधी फुले त्याने आजपर्यंत कुठेही पाहिली नव्हती, किंवा त्यांच्या विषयी ऐकले नव्हते.

"हे मुनीवर्य, ही फुलें फारच सुंदर आहेत. तुम्हाला ही कुठे मिळाली?" राक्षसाने विचारले.

"त्रिलोकांमधे - म्हणजे स्वर्ग, पृथ्वीलोक किंवा पाताळ यापैकीं एकाच ठिकाणीं ही फुलें सांपडतात. मंदारपर्वतावर ही जागा आहे. या फुलांचे नांव देखील तेच आहे." मुनींनी सांगितले.

"असला हार घालायला मिळाला तर मला फारच आनंद होईल." त्यावर राक्षसाने त्यावर म्हटले.

"हा हार तुला द्यायला मलाही अगदी नक्की आवडलं असतं. पण असं बघ, कीं हा हार मी कांही दिवस वापरला आहे आणि आता त्यांतली फुले कोमेजायला लागली आहेत. शिवाय तुझ्या-सारख्या वीरश्रेष्ठाला दुसऱ्याने वापरलेला हार गळ्यांत घालणें उचित दिसणार नाही." नारदमुनी म्हणाले.

"बरोबर, मग मी तुम्ही सांगितलेल्या पर्वताच्या दिशेने जातो. या फुलांमुळें तिथले

वातावरण अगोदरच सुगंधित झालेले असेल. त्या जागेची मला पाहाणी करायची आहे. मी स्वतःच फुलें तोडीन आणि हार तयार करुन माझ्या गळ्यांत घालीन.'' राक्षस आनंदाने उद्गारला.

त्याने नारदाकडून पर्वताकडे जाण्याचा मार्ग विचारुन घेतला व तो तडक तिकडे जायला निघाला. पर्वताच्या शिखरावर मंदाराची असंख्य फुले पाहून तो फारच खूष झाला. त्याने ठरवलं कीं तो पर्वत आता त्याच्या अधिपत्याखालीच असेल. कारण या अद्वितीय फुलांचा आनंद फक्त त्याने एकट्यानेच घ्यायला हवा.

त्या निसर्गसुंदर उद्यानांत त्याला एक जोडपें विहार करीत असताना दिसले. त्यांना पाहून अंधकाचा आनंद मावळला, व त्याच्या रागाचा पारा क्षणांत चढला. त्यांचा त्याला मत्सर वाटायला लागला. कदाचित् ते उद्यान त्यांच्याच मालकीचे असूं शकेल हे देखील त्याच्या लक्षांत आले नाही. राक्षस व दानवांची एक नेहमी आसुरी इच्छा असते. त्यांना आवडलेली प्रत्येक वस्तू त्यांच्या मालकीची असावी असा त्यांचा प्रयत्न असतो.

''तुम्ही इथें येण्याचं धाडस कसं काय केलंत?'' तो त्यांच्याकडे बघत गरजला. ''इथून चालते व्हा. नाहीतर मी तुम्हाला खाली दरींत ढकलून देईन आणि तुमच्या शरीराचं अगदी चूर्ण होऊन जाईल.''

त्याला यत्किंचित कल्पना नव्हती कीं तो ज्यांच्याशी बोलत होता ते दांपत्य म्हणजे भगवान शंकर व त्यांची पत्नी देवी उमा हे होते.

शंकराने अंधकाकडे रोखून पाहिले. पण अंधक रागाने काळा निळा झाला होता. तिथल्या प्रसन्न व रमणीय वातावरणाचा त्याच्या संतापावर कांहीच परिणाम झाला नाही. त्या दोघांनी त्याच्या बोलण्याकडे दुर्लक्ष केले. ते पाहून तो जास्तच चिडला. दांतओंठ खात आणि दोन्ही हात पसरुन तो त्यांच्यावर चालून गेला.

दुसऱ्याच क्षणीं श्रीशंकराचे त्रिशूळ त्याच्यावर आदळले. त्याला पुढें येता येईना. त्या पर्वतावरुन तो गडगडत खाली गेला आणि पायथ्याशी जो कोसळला, तो पुन्हां कधी वर उठला नाही.





# एका आजीची गोष्ट

एक होती आजी. अगदी भोळीभाबडी होती. तिला एक नातू होता. आजीच्या गांवमैत्रिणी तिच्या भोळ्या स्वभावाचा फायदा घेत. तिच्याशी गोडगोड बोलून डाळ, तांदूळ वगैरे सामान उसने मागून नेत असत. आजीने घराबाहेर काम करूं नये असं चंदूला, तिच्या नातवाला वाटे. तो मेहनत करी पण मिळालेले सारे पैसे आजीच्या भोळेपणामुळें खर्च होऊन जात. म्हणून चंदूला अनेकवेळा राग येई.

आजी शांतपणे त्याची समजूत घालत म्हणे, ''हळू बोल. या खोलींतली गोष्ट त्या खोलीत समजता कामा नये, असं घर चालवायचं असतं. आपले बोलणें इतरांच्या कानावर पडता कामा नये.''

''मी मेहनत करुन कमावतो. पण तू मनाला वाटेल तसा खर्च करतेस. दोन दिवस उपास पडले म्हणजे समजेल. उगीच मला उपदेश करं नकोस. नाहीतर भीक मागावी लागेल दारोदार!'' चंदू चिडलाच होता.

आजी त्यावर नुसतं हंसली नि म्हणाली, ''गप्प बस रे. अशी पाळी आपल्यावर कांही देव आणणार नाही.''

एकदा आजी घरांत केर काढीत होती तेव्हां तिला एक लहानशी किल्ली मिळाली. तिला वाटलं कीं ती किल्ली चंदूच्या पत्र्याच्या पेटीची असावी. त्यांत तो आपले कपडे नीट घड्या करुन ठेवत असे. आजीने ती पेटी उघडली. त्यांत कपड्यांच्या खाली एक पुरचुंडी होती. ती उघडून पाहिली तर त्यांत दोनशे रुपये होते.

''अरे वा! मला न सांगता याने इतके पैसे सांठवले आहेत होय?'' खूष होऊन आजीने शेजारणींना ती पुरचुंडी दाखवली.

याबद्दल जेव्हां त्या साऱ्याजणी मिळून बोलत होत्या तेव्हां दोन तरुण धांपा टाकीत तिथे आले व म्हणाले, ''चंदूची आजी कुठे आहे? तो नारळाच्या झाडावरुन खाली पडला. आत्ता

- किशोर साहू -



त्याच्या डोक्याला फार मोठी जखम झाली आहे. गांवच्या पाटलाने त्याला गाडींत घालून शहरांतल्या दवाखान्यांत नेले आहे. त्याच्या पेटींत कांही रुपये आहेत, ते आजीला सांगून घेऊन यायला चंदूने आम्हाला सांगितले आहे.'' घाबरून जाऊन आजी रडायलाच लागली. तिने ती पुरचुंडी त्यांना दिली. ते पैसे घेऊन निघून गेले. आजी तिथेंच ओटीवर हुंदके देत बसली होती.

तासाभराने डोक्यावर तांदळाचे पोते घेऊन चंदू तिथे आला. तो दुरुन येताना दिसताच आजीला खूपच आनंद झाला. ती पुढे जाऊन त्याला पाहात म्हणाली, ''तुला अजून दुखतंय कां? आता जखम कशी आहे? डॉक्टरांनी काय सांगितलं?

चंदूला जेव्हां सारी हकीकत कळली तेव्हां नाराजीने तो प्रथम आजीवर खूप चिडला. जरा वेळाने राग शांत झाल्यानंतर तो नाराजीने म्हणाला, ''माझी सारी मेहनत तू धुळीला मिळवलीस. पैसे सांठवून शहरांत व्यापार सुरुं करायची आणि तुला सुखांत ठेवायची माझी फार इच्छा होती. पण तुझ्या नशिबांतच सुख नाही दिसत ठेवलेलं!'' आणि तो रागारागाने न जेवताखाता तिथून चालता झाला.

चंदूचे बोलणें आजीच्या मनाला लागले. ती तिला फार वाईट वाटले. ती देखील जेवली नाही. स्वतःशीच बडबडूं लागली, ''छे! असं जगण्यापेक्षां जंगलात गेले तर निदान भुतेखेते मला मारुन तरी टाकतील.'' ती घरांतून चालत गेली, व एका वडाच्या झाडापाशी बसली, आणि म्हणूं लागली, ''इतका अंधार झालाय, पण एकही भूत मेलं कुठे दिसत नाही'' आणि 'भुतांनो, हडळींनो,'' अशा जोरजोराने हांका मारुं लागली.

दोन ठेंगणी भुते तिच्यासमोर येऊन तिला दरडावून म्हणाली, ''कां उगाच ओरडतेस ग? आमच्याशी तुझं काय काम आहे?''

त्यांना पाहून तिला आनंद झाला. तिने आपली सारी कथा त्यांना सांगितली. त्या भुतांना तिची दया आली. ते आपसांत हळूंहळूं कुजबुजूं लागले. ''आजीच्या सांगण्यावरुन वाटतंय कीं बगळ्यांच्या तलावाजवळच्या झोंपडीत जी चोरटी मुले राहातात, त्यांचीच ही लबाडी असावी बहुतेक! त्यांनी आधीच एका मुलीला फसवून इथें आणलंय. ती बिचारी मुलगी सारखी



रडत असते.'' नंतर त्या दोन भुतांनी आजीला म्हटलं, ''आजी, तुमच्या नातवाचे पैसे परत मिळाले तर तुम्ही घरी जाल, की मरण्याचा तुमचा निश्चय कायम आहे?''

आजीने खुषींत म्हटलं, ''पैसे जर परत मिळाले तर मी अगदी आनंदाने घरीं परत जाईन. अरे, मग मला कांही मरायची इच्छा राहाणार नाही रे! माझ्या नातवाला, चंदूला, आनंदात असलेला मला पाहायचाय!''

दोन्ही भुतांनी तिला बगळ्यांच्या तलावा-जवळच्या झोंपडीपाशी नेले, आणि तिला त्यांनी सांगितलं, ''इथेंच एका बाजूला लपून उभी राहा आणि झोंपडीत काय गंमत होईल ती फक्त पाहा.'' दोन्ही भुतें झोंपडीत शिरली.

आंत एक रूपवती मुलगी त्या भुरट्या चोरांना रडत रडत सांगत होती, ''मला सोडून द्या हो, तुम्हाला हवे असतील तर माझ्याजवळचे दागिने, पैसे - सारं सारं घेऊन टाका!''

त्यावर ते चोर जोराने हंसले आणि तिला म्हणूं लागले, ''तसं नाही चालणार. आमच्यापैकीं एकाशी तू लग्न केलं पाहिजेस.''

दुसऱ्याच क्षणीं त्या मुलीचे कालीमातेत रुपांतर झालं. तिचे डोळे लाललाल दिसूं लागले. कोपऱ्यांत पडलेली काठी तिने उचलली आणि त्या दोघांना तडाखे मारत ती बोलूं लागली, ''तुम्ही माझं म्हणणं ऐकत नाही कां? तुम्हाला मी कोण वाटले? अरे, मी भुतांच्या आजीची लाडकी मुलगी आहे. आता मी तुमचा नीट



समाचार घेते बरं!''

तिच्या काठीचा प्रसाद सहन होईना म्हणून दोघेही चोर झोंपडीच्या बाहेर पळत आले. ते दाराबाहेर आल्यानंतर लगेच बाजूला लपलेल्या भुताने त्यांना दोरीचा फांस घालून घट्ट पकडले आणि त्या मुलीकडे नेले. दुसऱ्या भुताने तिच्या शरीरांत प्रवेश केलेला होताच. या आकस्मिक गडबडीमुळें चोर फारच घाबरले.

त्या मुलीच्या शरीरांत जे भूत होतं त्याने आजीला आंत बोलावले व चोरांना सांगितले, ''तुम्ही या भोळ्या आजीला फसवले आहे ना?''

चोरांनी लागलीच चोरी कबूल केली. ते थरथर कांपत होते. ''किती दुष्ट आहात तुम्ही! तुम्हाला लाज नाही वाटत? ताबडतोब तिचे पैसे परत देऊन टाका पाहूं.'' चोरांनी निमूटपणें ती पुरचुंडी

आजीला दिली. भूत त्या चोरांना पुढें म्हणाले, ''तुम्ही नव्यानेच चोऱ्या करायला लागला आहात ना, म्हणून तुम्हाला फक्त काठीनेच चोप दिला आहे. नाहीतर तुम्हाला आम्ही चावून चावून खाऊन टाकलं असतं! चालते व्हा इथून आणि मेहनत करुन जगायला शिका!''

चोर तिथून पळून गेले. त्यानंतर भुतांनी आपले खरे रूप प्रकट केले. ते पाहून ती मुलगी फारच घाबरली. भुतांनी तिला गोड बोलून समजावले. तेव्हां त्या मुलीने सांगितले कीं तिचे नांव शांता होते. सावत्र आईच्या त्रासाला ती कंटाळली होती. म्हणून घरांतून थोडे पैसे व सावत्र आईचे दागिने घेऊन ती पळाली, परंतु या चोरांनी तिला पकडून इथें आणले होते.

भुतांनी लक्ष्मीला आजीची व चंदूची कहाणी सांगितली व पुढे त्यांनी तिला सुचवले, ''तू खूप सुंदर आहेस, सुशील आहेस. आम्हाला वाटतं तू या आजीच्या नातवाशी लग्न केलेस तर ठीक होईल. आजीबाई, तुला काय वाटतं?''

भुतांची ही सूचना ऐकून आजी फारच सुखावली. ती म्हणाली, ''यांत काय सांगायचं रे? तुम्ही तर अगदी माझ्या मनांतली गोष्ट बोललात.'' तेवढ्यांत 'आजी, आजी' अशी चंदूची हांक ऐकू आली. आजीने पटकन लक्ष्मीचा हात पकडला आणि पुढें येऊन ती ओरडली, ''अरे चंदूबाळा, मी इथेंच आहे रे!''

चंदू आजीजवळ येऊन रुसक्या स्वरांत म्हणाला, ''रागाच्या भरांत मी कांहीतरी बोलून गेलो, आणि तू इकडे अंधारात कशी आलीस? तुझ्याशिवाय मी एकटा कसा राहू शकेन?''

आजीने प्रेमाने हंसतहंसत म्हटले, ''शेवटी पैसे गेलेत तरी कुठे? तुझ्यासाठी एक सोन्यासारखी बायको त्या पैशांमुळे आणलीय मी! ही बघ.'' तिने लक्ष्मीचा हात धरुन तिला पुढे केले. तिचे सौंदर्य पाहून चंदू मोहित झाला. तिलाही उमदा चंदू आवडला. पंधरवड्यांतच त्या दोघांचे मंदिरात लग्न लागले. चंदूने नंतर शहरांत व्यापार सुरुं केला. लक्ष्मी आजीची चांगली देखभाल करुं लागली. आता आजी अगदी थाटांत राहूं लागली.



# खास बातम्या

## टियाच्या टिप्स्



लंडनमधे राहाणारी पांच वर्षांची टिया लॅवर्न रॉबर्टस ही छोटी मुलगी कधी स्टॉक एक्सचेंजमधे गेलेली नाही. पण ती तुम्हाला बाजारांतल्या टिप्स् देऊं शकते. एका विशिष्ट दिवशी, शेअर बाजारांत कांही प्रमुख कंपन्यांच्या भावांत सोळा टक्के घसरण होती, पण टियाने केलेल्या भाकितानुसार तिच्या शेअर्सची किंमत ५.८ टक्क्यांनी वाढली. त्याच दिवशी एका प्रसिद्ध व्यापार समीक्षकाचे ४६ टक्क्यांनी नुकसान झाले, पण एका ज्योतिषाचे नुकसान फक्त ६.२ टक्केच झाले. वर्षअखेरीस शेवटल्या सहा आठवड्यांत तिने चांगल्या शेअर्सची खरेदी केली. त्यांत कॅडबरी, श्वेप्स्, प्रुडेन्शियल व पिअरसनचा समावेश होता.

## शहरी आयुष्यापेक्षां जंगल बरें!



सोळा वर्षांच्या जंतन बहारीने शालेय शिक्षणासाठी शहरी जीवन नाकारले. जे अधिकारी त्याला आकर्षक प्रलोभन दाखवून बोलावीत होते, त्यांना त्याने आपल्याला जंगलातच राहाणें पसंत आहे असे सांगितले. मलेशियांतल्या टेमॉकमधल्या सर्वांत छोट्या आदिवासी जमातींतला हा मुलगा आहे. ''मला जंगलाबद्दल प्रेम आहे आणि त्याऐवजीं नागरी जीवन स्वीकारायची कल्पना मला मान्य नाही'' असे त्याने सांगितले. पहांग राज्यांतल्या एका जंगलांत नऊजणांच्या कुटुंबात तो एका लांकडाच्या



# सहज गुण

राम आणि भीम शेजारी होते. राम श्रीमंत होता. भीमही सुखवस्तू होता. पण गांवकरी मात्र भीमच्या दयाळूपणाची फार थोरवी गात असत.

यामुळें रामला भीमचा फार हेवा वाटत असे. लोकांकडून कौतुक करुन घ्यायचं तर आपणही कांहीतरी करायला हवं असं त्याच्या मनांत आलं. त्याच्या घरी दान मागायला कुणी आलं तर तो मदत देऊं लागला. गांवातल्या मंदिरासाठी त्याने मोठी देणगी दिली. तरीही लोक कांही रामची स्तुती करीनात. उलट ते भीमचे नेहमीसारखे कौतुक करीत राहिले. रामला हे सहन होईना.

एके दिवशी रामचा एक दूरचा नातलग गोविंद त्याच्या घरी आला. रामने गोविंदजवळ आपली खंत उघड केली. गोविंद म्हणाला, "या जगांत प्रचाराचं फार महत्व आहे. कोणत्याही गोष्टीची जाहिरात झाली नाही तर लोक त्याच्याकडे लक्ष देत नाहीत. लहानसा उपकार जरी असला तरी त्याची भरपूर जाहिरात हवी. चार दिवसांनंतर इथें प्रमोद नांवाचा एक सद्गृहस्थ येणार आहे. त्याचं आदरातिथ्य जर तू योग्य प्रकारे केलंस तर तुला फायद्याचं होईल."

प्रमोद त्या गांवातल्या महातंत्री नांवाच्या पंडिताजवळ खास पद्धतीचे तंत्रशास्त्र शिकण्यासाठी येणार होता. ते शिक्षण चालू असतांना त्याला स्वतःचा स्वयंपाक करावा लागणार होता. कुणाच्याही घरांत पाऊल टाकण्याची त्याला परवानगी नव्हती. त्याला पलंगावर न झोंपता जमिनीवर झोंपायची सक्ती होती. कोणत्याही परिस्थितींत या नियमांचे उल्लंघन त्याने करायचे नव्हते. जंगलातून लांकडे गोळा करुन एखाद्या झाडाखाली आपले भोजन बनवायचे, अशी अट होती. कुणी त्याला बाहेर ओसरीवर झोंपायची अनुमती दिली, तर ते चालले असते. तो शिक्षणक्रम अवघड होताच. पण त्याहीपेक्षां अभ्यास चालू असेपर्यंत हे इतर नियमही फार कडक होते. ही कठोर साधना करताना जर आपण प्रमोदला मदत केली तर तो गांवभर आपली जाहिरात चांगली करेलच, असे रामला वाटले.



प्रमोदबद्दलची सारी माहिती गोविंदकडून कळली म्हणून राम फारच खूष झाला. त्याने आग्रहाने सांगितले, "प्रमोदला माझ्याच घरीं धाड बरं का!" गोविंदने होकार दिला व ज्या कामासाठी तो तिथे आला होता ते पुरे करुन तो परत गेला.

त्यानंतर दोन दिवसांनीच रामच्या घरी प्रमोद आला व म्हणाला, "मला गोविंदकडून आपले नांव व माहिती कळली. मी आपली खूप प्रशंसा ऐकलेली आहे. आपल्या घराच्या छायेंत जर माझा अभ्यास पूर्ण झाला तर मी स्वतःला भाग्यवान समजेन."

सकाळीं लौकर उठून प्रमोद नदीवर जाऊन, दैनंदिन आन्हिके उरकून, स्नानसंध्या आटोपून, कांहीतरी फळे तोडून खाई. नंतर महातंत्रीच्या घरी जाऊन अध्ययन करी. दुपारी पुन्हां नदीवर जाऊन आपले जेवण शिजवी व जेवण उरकून पुन्हां अभ्यासाला सुरवात! रात्रीं कांहीतरी फळांवर भूक भागवी आणि रामच्या घराच्या ओसरीवर झोपून जाई.

त्या गांवातल्या प्रत्येक घरांतल्या ओसरीवर एक दिवा रात्रभर जळत ठेवायची पद्धत होती. त्या दिव्याच्या उजेडांत प्रमोद पुन्हां आपल्या विषयाचा अभ्यास करी.

असे चारसहा दिवस गेले. प्रमोदकडून कांहीच कौतुकाचे शब्द ऐकायला आले नाहीत, म्हणून राम आता जरा प्रमोदवर नाराज झाला. प्रमोद कांही रामचे गुणगान इतरांजवळ करीत नव्हता. रामच्या पत्नीला वाटत होतं कीं आपल्याच दारांत हा झोंपतो, पण आपल्याला

- कपिल जोशी -



खास असा आदरभाव कांही दाखवत नाही. रामची मुलेंही प्रमोदवर नाखूष होती. तो त्यांना झोंपायला जाण्यापूर्वीं गोष्टीबिष्टी कांही सांगत नव्हता ना! रामने कसाबसा धीर धरला आणि आठवडा झाल्यानंतर प्रमोदला त्याने सरळ आपल्या मनांतली रुखरुख सांगितली.

प्रमोदला वाईट वाटले. तो म्हणाला, "अहो, माझं सारं लक्ष या अभ्यासावरच केंद्रित झालेलं आहे. माझ्याकडून तुम्हाला हा त्रास झाला त्याबद्दल मला माफ करा. मी माझी चूक सुधारीन."

त्या दिवसापासून प्रमोद रामच्या कुटुंबियांशी थोडा वेळ गप्पाटप्पा करुं लागला. चारपांच दिवसानंतर राम त्याला शेतांत पाठवूं लागला. रामची पत्नी त्याला बाजारहाट करण्यास सांगू लागली, नि मुले त्याला नदीवर खेळायचा आग्रह करुं लागली.

तीनचार दिवसांत प्रमोदला वाटलं कीं असंच जर रोज चाललं तर अभ्यासक्रम मागे पडेल. म्हणून त्याला सांगितलेली कामें करायला तो नकार देऊं लागला. रामला राग आला. तो प्रमोदला म्हणाला, "आमच्या प्रतिष्ठेला साजेसा इतरांपेक्षां मोठा दिवा मी आमच्या ओसरीवर लावतो, म्हणून तुला रात्रीं अभ्यास करता येतो. आजपासून त्या दिव्यासाठी लागणारे तेल तू विकत आणत जा."

त्या शिक्षणक्रमाच्या नियमांनुसार विद्यार्थ्याला रोजचा खर्च कमी ठेवायची अट होती. म्हणून प्रमोदने रामला सांगितलं कीं तो खर्च त्याला परवडणारा नव्हता. राम एकदम चिडला आणि त्याने दिवा ठेवायचे बंद केले. म्हणून प्रमोद आता शेजारच्या भीमच्या ओसरीवरच्या दिव्याच्या उजेडांत रात्रीं अभ्यास करुं लागला.

हे पाहून राम भीमला म्हणाला, "ही ओसरीवर दिवा लावून ठेवायची प्रथा कां सुरुं झाली ते माहिती नाही, पण त्याचा फायदा घेणाऱ्यांना मात्र त्याबद्दल कांहीच वाटत नाही. आता प्रमोदचंच बघ की. तूदेखील आता ही दिवा ठेवायची पद्धत बंद कर. मी गेल्या आठवड्यापासून ही पद्धत बंद करायची असे ठरवले आहे."

भीम म्हणाला, "तो आमच्या ओसरीवर अभ्यास करतो? हे मला माहिती नव्हतं. मी आता त्याच्यासाठी मोठा दिवा लावून ठेवीन."

"आणि त्याच्या शिक्षणासाठी तुझा तेलाचा खर्च आणखी वाढवशील?" रामने चिडून विचारले.

"देवाच्या दयेने यंदा पीकपाणी चांगलं आलंय. घरांत मला कांहीही कमी नाही. याच्या शिक्षणासाठी माझी कांही मदत झाली तर मी स्वतःला भाग्यवान समजेन. मी आता त्याला सांगतो कीं आजपासून आमच्याच ओटीवर झोंपत जा." भीमने उत्तर दिलं.

राम संतापला होता पण गप्प राहिला. त्याला वाटलं कीं भीमालाही प्रमोदचा कंटाळा येईल आणि तो त्याला जायला सांगेल. पण तसं घडलं नाही. उलट भीमने मोठा दिवा तर ठेवलाच, त्याशिवाय प्रमोदला वारा घेण्यासाठी एक पंखाही दिला. भीमची मुलें येताजाता प्रमोदसाठी दुकानांतून सामान आणून द्यायला लागली. त्याच्यासाठी वाळलेली लांकडे गोळा करुं लागली. अभ्यास पुरा होईपर्यंत प्रमोद त्या घरांतून दुसरीकडे गेला नाही. अभ्यासक्रम जेव्हां पूर्ण झाला, तेव्हां प्रमोद भीमच्या कुटुंबाचे खूप कौतुक करुं लागला. त्यांची दयाळू वृत्ती व औदार्य याचे गुणगान तो सर्वांना ऐकवूं लागला. भीमाचा चांगुलपणा साऱ्या गांवाला कळला. आपला अंदाज कुठे चुकला ते कांही रामला समजेना.

कांही दिवसानंतर गोविंद पुन्हां रामकडे आला होता. तेव्हां राम त्याला म्हणाला, "प्रमोदला आमच्या घरीं पाठवून तू आम्हाला नांव मिळवण्याची एक चांगली संधी दिली होतीस. पण काय गोंधळ झाला कोण जाणे, ती संधी हुकलीच."

गोविंदने हंसत उत्तर दिले, "दुसऱ्यांची सतत तुलना, चढाओढ केली कीं आपल्या मनांत मत्सर जागा होतो. तू राग मानूं नकोस. पण भीमाची उपकार-वृत्ती हा त्याचा सहज गुण आहे. तो गुण तुझ्यांत नाही इतकेच!"





या महिन्याची प्रश्नावली भारत आणि क्रीडाजगताभोंवती गुंफले[illegible]
जागतिक विक्रम नोंदवलेले आहेत.

१. पहिली ऐशियाड केव्हां आणि कुठे भरली होती?
२. १९८२ मधें नवी दिल्लीमधें भरलेल्या नवव्या आशियाई खेळांचे बोधचिन्ह होते?
३. नवव्या ऐशियाडमधें वीस किलोमीटर चालण्याच्या स्पर्धेत कोणत्या क्रीडापटूने सुवर्णपदक जिंकले होते? त्याने किती वेळ घेतला?
४. १९०८ पासून झालेल्या ऑलिंपिक्स स्पर्धांमधे भारताने किती वेळां हॉकीचे विजेतेपद जिंकले?
५. ऑलिंपिक्समधें कोणत्या महिलेने अंतिम फेरीमधें प्रवेश केला होता?
६. आशियाई खेळस्पर्धात पहिले सुवर्णपदक मिळवणारी कोणती महिला होती?
७. कांही खेळांसाठी दिलेल्या चषकांची नांवे खाली दिली आहेत. त्या खेळांची नांवे सांगा.
   (अ) झांशी राणी चषक, (ब) सुब्रोतो कप, (क) मुथय्या कप.
८. भारताच्या प्रसिद्ध क्रीडापटूंना कांही किताब कौतुकाने बहाल केलेले आहेत. त्यांची नांवे सांगा.
   अ) उडणारा शीख, ब) छोटा मास्टर, क) जादुगार.
९. इंग्लिश खाडी पोहून जाणारा पहिला भारतीय कोण व त्याने आणखी एक कोणता पराक्रम नोंदवला?
१०. बॅडमिंटनमधें जागतिक विजेतेपद कोणत्या भारतीयांने प्रथम मिळवले? राष्ट्रीय ज्युनियर विजेतेपद त्याने मिळवले तेव्हां त्याचे वय किती होते?
११. जगांतले सर्वांत उंच ठिकाणी असलेले क्रिकेटचे मैदान भारतांत कुठे आहे?

**(उत्तरें पुढील अंकी)**

## जानेवारी २००३ च्या प्रश्नावलीची उत्तरें

१. १०,००० मेगावॉट
२. १९८६
३. जर्मनी
४. पृथ्वी
५. राकेश शर्मा - ३ एप्रिल १९८४, कल्पना चावला १९ ऑक्टोबर, १९९७.
६. १९५७
७. १९५३
८. कोलकाता - १९५४ नवे सेक्रेटरियेट (१४ मजली)








# गणेश पुराण

श्रीकृष्णाला आश्चर्य चकित झालेला पाहून रुक्मिणी स्मित करून त्याला म्हणाली - "होय, नाथ! माझ्या मनात आनंद मावेनासा झाला आहे. ही कन्या आपल्यावर किती जीव टाकते आहे! मला तिच्या अंतकरणातील आपल्याविषयींचे प्रेम इतके आत्मीयतेचे भासले की ती जणूं कांही आपल्याला हृदयांत खोल ठेवू इच्छिते आहे!"

"तर मग तू आपल्या मनांत काय आहे, हे नाही सांगितलेस!" कृष्णाने विचारले.

"आपल्या हृदयांत एका अणूसारखी वास करण्याची माझी इच्छा आहे, मग तुम्हाला कोणीही आपल्या मुठींत ठेवले तरी हरकत नाही." रुक्मिणी म्हणाली.

"रुक्मिणी, तू केवढे मोठे तत्वज्ञान तितक्याच सूक्ष्म शब्दांत सांगितलेस! म्हणून तर मी स्वेच्छेने तुझे हरण केले." कृष्ण म्हणाला.

"मला जे मनापासून वाटले तेच मी निवेदन केले. सत्यभामेचे प्रेम माझ्या भावनेपेक्षा फार मोठे आहे. प्रभो, माझ्या हृदयांत आपल्याविषयी भक्ती भावना आहे!" रुक्मिणी बोलतच होती, तिला अडवून श्रीकृष्ण स्मित करून म्हणाला, - "रुक्मिणी, तू तत्वज्ञानाच्या गोष्टी बोलू नकोस!"

त्यानंतर आणखी काही दिवस लोटले आणि अफवा पसरली की श्रीकृष्णाने स्यमंतक मणी चोरला. सत्राजित त्या दुःखाने वेड्यासारखा फिरूं लागला. तो आरोप खोटा की खरा हे वास्तविक कोणालाच माहीत नव्हते.

कृष्ण मनांतल्या मनांत विघ्ननाश गणनाथाचे स्मरण करून त्याला म्हणाला - "विघ्नेश्वरा, ही



सर्व तुझीच लीला आहे. तुझी कृपा असेल तसेच होणार!'' नंतर तो स्यमंतक मण्याच्या शोधार्थ जंगलाच्या दिशेने निघाला.

सत्राजितच्या मनांत सत्यभामेचे लग्न त्याचा भाचा शतघ्वनु राजाशी करून द्यावे असे होते, आणि त्यासंबंधी बोलणी करण्यासाठी त्याने आपला धाकटा भाऊ प्रसेनजित याला शतघ्वनु याच्याकडे पाठविले होते. प्रसेनजित स्यमंतक मणी गळ्यांत घालून जंगलाच्या वाटेने जात असतां त्याला एका सिंहाने ठार केले. जांबुवानाने त्या सिंहाचा वध करून तो स्यमंतक मणी आपली मुलगी जांबुवती हिला आणून दिला.

प्रसेनजित परत न आलेला पाहून सत्राजित सांगत सुटला कीं श्रीकृष्णाने तो मणी चोरला. तिकडे शतघ्वन व जरासंध सत्यभामेशी विवाह करण्यास उतावीळ झाले होते. त्यांनी सत्राजिताला कळविले की ते आपला शत्रू कृष्ण याचा कांटा काढण्यासाठी सत्राजिताच्या मदतीला धांवून येत आहेत.

स्यमंतक मण्याच्या शोधार्थ हिंडत असताना कृष्णाला प्रसेनजिताचे प्रेत व सिंहाचा मृत देह दिसला व त्याच्याजवळ जांबुवानाच्या पावलांच्या खुणा दिसल्या. म्हणून तो त्या पावलांच्या खुणांच्या अनुरोधाने जांबुवानाच्या गुहेपर्यंत गेला.

त्या गुहेत जांबुवानाची मुलगी जांबुवती तो मणी घेऊन त्याच्याशी सागरगोट्यासारखी खेळत असलेली दिसली.

मणी घेण्यासाठी श्रीकृष्णाने जांबुवतीचा हात धरला. परंतु जांबुवतीने आपला हात सोडवून घेण्याचा प्रयत्नही केला नाही व तिरक्या नजरेने श्रीकृष्णाच्या दृष्टीला दृष्टी भिडवून ती त्याच्याकडे पाहू लागली. त्याचवेळी जांबुवानाने कृष्णाला पाहिले व त्याला मारण्यासाठी तो धावला. त्या घटकेपासून लागोपाठ बारा दिवस त्यांचे परस्परांशी मल्लयुद्ध चालू होते. श्रीकृष्णाने जांबुवनाच्या छातीत मुष्टिप्रहार केला, तेव्हां जांबुवानाला श्रीकृष्णाच्या रूपांत श्रीरामचंद्राचे दर्शन घडले.

जांबुवानाने तत्क्षणीं श्रीकृष्णाचे पाय धरले व त्याची माफी मागून निवेदन केले - ''कृष्णा, तू जांबुवतीचे पाणिग्रहण केलेच आहेस. आता जांबुवती तुझीच आहे.'' असे सांगून जांबुवानाने स्यमंतक मणी व जांबुवतीला कृष्णाच्या हाती सोंपविले.

त्यानंतर श्रीकृष्ण, जांबुवती, व जांबुवानाला बरोबर घेऊन द्वारकेला आला आणि त्याने स्यमंतक मणी सत्राजितला आणून दिला. जांबुवानाने सत्राजितला स्यमंतक मणी त्याच्या हाती कसा आला हे सांगितले. सत्राजित पश्चाताप करून म्हणाला - ''कृष्णा, आपली संपत्ति घालवून बसणारा पापी असतो, असे म्हणतात, तेव्हां तुला वाटेल तो दंड मला दे!''

कृष्ण म्हणाला - ''सत्राजिता, पश्चा-तापाच्या अश्रूंनीच अशा चुकीचे क्षालन होते!''

त्यानंतर सत्राजिताने स्यमंतक मणी कृष्णाला भेट म्हणून दिला व सत्यभामेचे पाणिग्रहण करण्यास विनंती केली. श्रीकृष्णाने सत्यभामेचे पाणिग्रहण करण्याचे स्वीकारले व स्यमंतक मणी परत केला. तेव्हां सत्यभामेने आपल्या वडिलांकडे सार्थ दृष्टीने पाहिले. जणूं कांही ती म्हणत होती - ''बाबा, स्यमंतक मणी मोठा आहे कीं मी, हे तुम्हीच आता ठरवा!'' नंतर उघड म्हणाली - ''तुम्ही विघ्ननाश गणनायकाचे महात्म्य ओळखल्याशिवाय मनांत आले ते बोललात. मी विघ्नेश्वराला शरण गेले. त्याच्या-वरच माझा पूर्ण विश्वास आहे. त्यानेच माझे मनोरथ पूर्ण केले.'' असे म्हणत तिने दोन्ही हात जोडून विघ्नेश्वराचे ध्यान केले व त्याला नमस्कार केला.

तेव्हां विघ्नेश्वर लीलारूप धारण करून म्हणाला - ''देवाला जो खरोखर प्रिय असतो व जो सद्भावनेने भगवंताचे चिंतन करतो, त्यालाच तो पावतो.'' पुढे तो म्हणाला - ''सत्यभामेशी विवाह करून श्रीकृष्ण सत्यभामेचा प्रियकर म्हणून सर्व प्रसिद्धी प्राप्त करील.'' असे म्हणत गणनायकाने आशीर्वादस्वरूप अक्षता श्रीकृष्ण



व सत्यभामेवर टाकल्या.

श्रीकृष्णाने भक्तिपूर्वक विघ्नेश्वराला प्रणाम केला व म्हणाला - ''विघ्नेश्वरा, ही सर्व तुझी लीला आहे. तुझ्या कृपेने मी दोषारोपाच्या पापांतून मुक्त झालो आणि स्यमंतकण्याहूनही एक अनमोल रत्न अशा सत्यभामेची प्राप्ती मला झाली.'' त्यानंतर विघ्नेश्वर म्हणाला - ''जे लोक स्यमंतक मण्याची गोष्ट ऐकतात ते दोषारोपांतून मुक्त होतात.'' असे सांगून गणनायक अंतर्धान पावला.

सत्राजिताने श्रीकृष्णाचे चरण धुतले आणि सत्यभामेसारख्या कन्येचे दान करून तो स्वतःला धन्य मानूं लागला. श्रीकृष्णाचा जांबुवतीबरोबरही यथाविधि विवाह झाला. जांबुवान श्रीकृष्णाला म्हणाला - ''कृष्णा, तू रामावतारात असताना तुझ्याशी मल्लयुद्ध करण्याची इच्छा मी व्यक्त केली होती. त्यावेळी



मी असेही म्हटले होते की तुझ्यासारखा जामात प्राप्त करणारा श्वशुर हेवा करण्यासारखा आहे. आता माझ्या मनांतल्या त्या दोन्ही इच्छा आज पूर्ण झाल्या. मी धन्य झालो. मी जीवनमुक्त झालो!'' असे सांगून तपश्चर्या करण्यासाठी जांबुवान निघून गेला.

त्यानंतर कांही दिवसांनी शतध्वनूने प्रतिकार भावनेने सत्राजिताचा वध केला आणि स्यमंतक मणी घेऊन कृतवर्मा व अक्रूराबरोबर तो पळून गेला. श्रीकृष्णाने सत्यभामेच्या मनाचे सांत्वन करून शतध्वनूला युद्धांत ठार केले. कृतवर्मा व अक्रूर स्यमंतक मणी घेऊन पळून गेले. त्यांचा शोध काढून कृष्णाने स्यमंतक मणी आणला व पित्याचे एक स्मृतिचिन्ह म्हणून तो सत्यभामेला दिला.

त्यानंतर कृष्णाने मित्रविंदा, कालिंदी, भद्रा, नाग्नजिती, लक्षणा नांवाच्या राजकन्यांशीसुद्धा विवाह केला. अष्टभार्यांसह कृष्णाने संसार थाटला व दरवर्षी गणेश चतुर्थीला गणेशाची पूजा करू लागला.

स्यमंतक मण्याच्या प्रभावामुळें सत्यभामेचे अंतःपुर जणूं कांही सोन्याची खाणच झाले. त्या सोन्याच्या सहाय्याने सत्यभामेने निरनिराळी अमूल्य आभूषणे विकत घेतली व आपले अंतःपुर अनमोल पैठण्या व साड्यांनी भरून काढले.

श्रीकृष्णाच्या अष्ट महिषींत तिचे अंतःपुर सर्वांत अधिक ऐश्वर्य संपन्न झाले. म्हणून तिला गर्व होऊ लागला की तीच श्रीकृष्णाच्या आठही राण्यांत श्रेष्ठ व कृष्णाची सर्वांत लाडकी राणी आहे.

श्रीकृष्णाच्या अष्टमहिषीत जांबुवती वीणावादनांत निपुण होती. नारदमुनी आकाशमार्गे आपली अपूर्व वीणा वाजवीत प्रयाण करीत होते. तेव्हां त्यांना थट्टा करीत कोणीतरी हंसत असल्याचा आवाज एकूं आला.

नारदाने चकित होऊन चहूंकडे नजर फिरविली व विचारले - ''हे कोण हंसते आहे?''

तेव्हां आकाशवाणी झाली - ''नारदा, तुला अद्याप बरेच शिकावयाचे आहे. तुला वाटते आहे की तू वीणावादनांत अद्वितीय आहेस. पण तू चुकतो आहेस, म्हणून हसूं आले.''

नारद विचार करू लागला - 'मला ही विद्या कोणाजवळ शिकावी लागणार आहे बुवा!' तितक्यांत विघ्नेश्वर प्रगट होऊन म्हणाला - ''जांबुवतीजवळ वीणावादनातील मुख्य गोष्टी शिकून घे.'' तेव्हां नारदाने श्रीकृष्णाच्या अनुग्रहाने जांबुवतीजवळून वीणावादनातील सर्व वैशिष्ट्ये शिकून घेतली.

एके दिवशी श्रीकृष्ण रुक्मिणीच्या अंतःपुरांत बसला असतां नारदाने तेथे प्रवेश करून पारिजातकाचे एक फूल कृष्णाला दिले. कृष्णाने ते रुक्मिणीला दिले. ते कळल्यावर सत्यभामा रुसून बसली. कृष्णाने मोठ्या कष्टाने तिची समजूत घातली व तिला बरोबर घेऊन तो गरुडवाहनावर इंद्राच्या स्वर्गात गेला. नंदनवनात पारिजातक वृक्ष होता. तो उपटून सत्यभामेच्या अंगणात लावला. तरी सत्यभामेच्या मनांत नित्य ही शंका राहू लागली की कृष्णाचे प्रेम तिच्यावर कमी होऊ लागले आहे की काय! तिच्या मनांतलीही शंका नित्य वाढतच गेली. कृष्णाला आपल्या हातचं एक बाहुलं करून घेऊन त्याला आपल्या अंतःपुरातच ठेवून घेण्याची तिची इच्छा होती.

एके दिवशी नारदाने सत्यभामेच्या महालांत प्रवेश करून तिला सांगितले कीं तिने जर पुष्पक व्रत केले तर श्रीकृष्ण पूर्णपणें तिला वशीभूत होईल. त्या व्रताच्या नियमाप्रमाणे सत्यभामेने श्रीकृष्णाला नारदाला घेऊन त्याच्या हातावर पाणी सोडले. तेव्हां नारदाने श्रीकृष्णाच्या वजनाएवढे सोने देऊन कोणीही त्याला विकत घेऊं शकेल, असे सांगितले.

सत्यभामेने आपल्याजवळचे सर्व सोने तराजूंत घालून शेवटी स्यमंतक मणीसुद्धा घातला. तरी कृष्णाच्या बाजूचे पारडे खालीच राहिले व सोन्याचे वरच राहिले. तेव्हां सत्यभामेने आपला अहंकार सोडून रुक्मिणीची पायधरणी केली की श्रीकृष्णाला काय वाटेल ते करून तिने सोडवावे.

रुक्मिणी म्हणाली - ''ताई, श्रीकृष्णाची बरोबरी करू शकेल अशी एकच वस्तू आहे व ती



म्हणजे भक्ती. भक्तिपूर्वक आत्मसमर्पण करून एक तुलसीदलही टाकले तरी ते कृष्णाच्या वजनाबरोबर होईल!'' या शब्दांत रुक्मिणीने सत्यभामेच्या हातांत एक तुळशीचे पान दिले. सत्यभामेने ते पान आपल्या डोळ्याला लावून भक्तिभावनेने तराजूंत टाकले, त्यासरशी श्रीकृष्ण बसला होता ते पारडे एकदम वर झाले.

त्या क्षणांपासून सत्यभामेच्या मनांत ज्ञानोदय झाला. ऐश्वर्य व स्यमंतक मण्याविषयी तिच्या मनांतला मोह कायमचा नाहीसा झाला. श्रीकृष्णच आपले सर्वस्व असल्याची भक्तिभावना तिच्या मनांत उपजली. स्यमंतक मणी जे सोने देई ते ती श्रीकृष्णाच्या सल्ल्याप्रमाणे गोरगरिबांना व तीर्थयात्रा करणाऱ्या यात्रेकरूंना वाटूं लागली. आपल्या पित्याच्या स्मरणार्थ तिने अनेक धर्मशाळा बांधल्या व धर्मसत्रे उघडली आणि यात्रेकरूंच्या उतरण्याची व जेवणाची सत्राजि-ताच्या नांवाप्रमाणे 'सत्र' नांवाने प्रसिद्ध झाल्या.

त्यानंतर कांही दिवसांनी अर्जुन, व बलराम यांची बहीण सुभद्रेचा, विवाह झाला. तेव्हां सत्यभामेने स्यमंतक मणी सुभद्रेला अहेर म्हणून देऊन टाकला. अशा तऱ्हेने तो मणी पांडवांच्या घरी पोचला.

मण्याच्या सहाय्याने जे सोने मिळाले ते घेऊन युधिष्ठिराने राजसूय यज्ञ केला. त्यानंतर युधिष्ठिर द्यूतांत सर्व राज्य व वैभव आणि स्वतःबरोबर द्रौपदीसह आपल्या भावंडांना घालवून बसला. राजसूय यज्ञासमयी दुर्योधनाने पांडवांचे वैभव पाहिले. तेव्हांपासून त्याच्या मनांत पांडवांविषयी द्वेषभावना वाढली. पांडवांचे पुरोहित धौम्य यांनी अर्जुनाला सल्ला दिला कीं स्यमंतक मण्यामुळेच पांडवांवर एकामागून एक संकटे येत आहेत. यास्तव त्याचा त्याग करावा. तेव्हां अर्जुनाने तो मणी आपल्या गांडीवाच्या प्रत्यंचेवर ठेवून सर्वशक्ति लावून पृथ्वीवर सोडला. तेव्हां तो मणी पृथ्वींत खोल तिच्या गर्भात अदृश्य झाला.

पांडव द्यूतात हारल्यावर वनवासांत असताना त्यांना भेटायला नारद आला. त्याने सल्ला दिला कीं गेलेले सर्व राज्यवैभव प्राप्त करण्यासाठी त्यांनी श्रद्धा व भक्तिपूर्वक विघ्नेश्वराची आराधना करावी, आणि गणेशव्रत स्वीकारून अज्ञात-वासांत प्रवेश करावा.







पंचवीस वर्षांपूर्वी चांदोबात प्रसिद्ध झालेली गोष्ट

# मधुकरचे भाग्य



एका गांवात एक श्रीमंत सद्‌गृहस्थ राहात होता. तो कर्णासारखा उदार होता. मधुकर या गृहस्थाकडे लहानपणापासून नोकरीस होता. एकदा तो सद्‌गृहस्थ मधुकरबरोबर बाजारांत गेला. तिथें त्याने चंदनाच्या लांकडावर कोरीवकाम केलेला एक मूल्यवान रथ पाहिला. त्या रथाला दोन घोडेदेखील जोडलेले होते. मधुकर देहभान विसरुन ती रथाची कोरीव प्रतिमा पाहात होता. जेव्हां त्या गृहस्थाने हे पाहिले तेव्हां त्याने तो रथ विकत घेतला व मधुकरला भेट दिला.

एके दिवशी त्यांच्या घरी एक पाहुणा आला. मधुकरच्या खोलींतला तो रथ पाहून तो पाहुणाही मोहित झाला. तो म्हणाला, ''किती सुरेख आहे हा रथ! असा रथ कुठे मिळेल?''

तो श्रीमंत सद्‌गृहस्थ लागलीच म्हणाला, ''तुम्ही हा [illegible] जा ना!'' आणि त्याने मधुकरच्या हातून तो रथ त्या पाहुण्याला दिला. मधुकरने आपल्या मालकाची आज्ञा पाळलं, पण या गोष्टीने त्याला वाईट वाटले. त्याच्या मालकाच्या ते लक्षांत आले व तो मधुकरला म्हणाला, ''मीदेखील प्रथम खूप कष्ट करीत होतो व आयुष्य कंठीत होतो. माझा भाऊ म्हणून मी तुझी ओळख सर्वांशी करुन देतो. मला वाटलं कीं तुझ्यांतही माझ्यासारखीच दानी वृत्ती आहे.''

मधुकरचे मन या शब्दांमुळे जरा शांत झाले. या घटनेनंतर कांही दिवसांनी तोच पाहुणा आपल्या मुलीसह तिथे आला व म्हणाला, ''माझ्या मुलीचा विवाह आपल्या या भावाशी व्हावा अशी माझी इच्छा आहे.'' झालं, आता मधुकरला चंदनाच्या प्रतिमेबरोबरच चंदनाची मूर्ती असावी अशी सुंदर पत्नीदेखील मिळाली.

तो तुरुंगाच्या दाराजवळ आला. त्याने वाकून पाहिले तर त्या वाटेने एक इसम चालला होता. त्याला बोलावून मिस्किनने सांगितले, "मित्रा, हे धन घे आणि त्यांतून फळें, फुलें, डाळ विकत घेऊन ये. माझं एवढं काम तू करशील कां?"

तो इसम त्यावेळीं घाईत होता. त्याला नुकतंच कळलं होतं कीं त्याचा मुलगा अतिशय आजारी असून मृत्यूच्या दारांत होता. परंतु मिस्किनच्या केविलवाण्या शब्दांनी त्याचे हृदय हेलावले. आपले काम विसरुन त्याने त्या पैशांतून मिस्किनने सांगितलेल्या साऱ्या वस्तू आणल्या. मिस्कीनने त्याला आपली दुर्दशेची कहाणी सांगितली आणि परमेश्वराची आराधना करुन त्या वस्तूंचा प्रसाद त्या वाटसरूला दिला.

तो इसम जेव्हां घरी पोंचला तेव्हां त्याचा मुलगा एकदम चांगला हंसतखेळत त्याच्यासमोर आला. तेव्हांपासून तोदेखील त्या दिव्यपुरुषाची आराधना करायला लागला.

जशी मिस्किनची त्या दिव्यपुरुषावरची श्रद्धा वाढत गेली, तसे त्याचे भाग्यही उजळूं लागले. एक दि[illegible] शाही [illegible] पक्षाच्या चोंचीतून राजकन्येचा कंठा जमिनीवर पडला. राजकन्येने तो कंठा पाहून म्हटले, "बाबा, हा हार माझाच आहे. यास्मिनवर मी उगीचच आळ घेतला."

मिस्कीनची पत्नी व मुलगी निरपराध असून आपण त्यांना उगीचच शिक्षा दिली याचे बादशहाला फार दुःख झाले. त्याने लागलीच मिस्किनलाही मुक्त केले.

बादशाहा मिस्किनला म्हणाला, "मला माफ कर. माझ्या हातून ही फार मोठी चूक झाली आहे. तिचे परिमार्जन करण्यासाठी माझ्यापाशी एकच मार्ग आहे. तुमच्यासारख्या सात्विक परिवाराशी नाते जोडणें हे माझे सद्भाग्यच नाही तर दुसरे काय?"

मिस्कीन फारच आनंदित झाला. यास्मिनचा राजकुमाराशी मोठ्या थाटामाटांत विवाह झाला ही सारी त्या दिव्यपुरुषाची कृपादृष्टी आहे याची मिस्किनला सदैव जाणीव होती.





# काय उत्तम आहे?

सुवर्णगिरी आणि भुवनगिरि ही राज्यें एकमेकांना लागून होती. शेजारी असली तरी पाण्याच्या बाबतींत दोन्ही राज्यांत फार अंतर होते. सुवर्णगिरीत लहानशा असल्या तरी तीन नद्या वाहात होत्या. जमीन चांगली सुपीक होती आणि शेतकरी दोन पिकें घेऊं शकत होते.

परंतु भुवनगिरीची स्थिति अगदी निराळी होती. त्या राज्यांत एकही नदी नव्हती. पाऊस वेळेवर पडत नसे. वरचेवर दुष्काळी परिस्थिति येत असे. पण त्यांचा राजा विमलादित्य एक समर्थ राजा होता. प्रजेच्या कल्याणासाठी तो सतत झटत असे. त्याच्या कारकीर्दीत उद्योगी प्रजाजनांची नेहमी प्रगती होत राहिली.

त्यावेळीं सुवर्णगिरीचा राजपंडित कमलनाथ भुवनगिरीच्या राजाला भेटायला आला व म्हणाला, "महाराज, केवळ नैसर्गिक साधन-संपत्तीबाबतीतच नव्हे, तर आमची सुवर्णगिरी सर्व कलांचेही माहेरघर आहे. "राजाने हंसून प्रत्युत्तर केले, "वा, फारच चांगली गोष्ट आहे." "आमचे महाराज आमचा सल्ला मानतात व त्याची कार्यवाही करतात, म्हणून संस्कृत ही देववाणी सामान्य लोकांनीही शिकली. आमची प्रजा अत्यंत बुद्धिमान व हुशार आहे." आपल्या राज्याचे गुणगान करताना कमलनाथ अत्यंत खूष होता.

हे सगळं ऐकत असलेला राजा मात्र निमूटपणें बसला होता. तेव्हां राजकवी कुमुदचंद्र पुढे होऊन बोलला, "पंडितजी, आपल्या राज्यांत जी साधनसंपत्ती आहे, ज्या कलांचा प्रसार आहे, त्या गोष्टी कदाचित आमच्या राज्यांत नसतीलही. पण बुद्धिमत्ता व चतुराई ही केवळ आपल्याला प्रजेंत आहे आणि इतर कुठेही नाही असं समजणं हे मात्र चुकीचं आहे. आमचे प्रजाजनदेखील हुशारींत कांही कमी नाहीत." "हे तुम्ही सिद्ध करुं शकाल कां?" कमलनाथने जरा जोरांतच विचारले.

"वाटल्यास आपणच त्यांची परीक्षा घेऊन पाहा. आपली इच्छा असल्यास आमच्या



गांवांतल्या नागरिकांपासूनच परीक्षा सुरुं करता येईल.'' कुमुदचंद्राने मोठ्या आत्मविश्वासाने सांगितलं.

''ठीक आहे, ही परीक्षा मी आत्ताच घेतो'' असं म्हणून कमलनाथ घुश्शांतच बाहेर पडला. दुसऱ्या दिवशी तो नगराच्या वेशीबाहेर असलेल्या एका लहानशा गांवात गेला. गांवाबाहेरच एक गुराखी गुरांना चरायला घेऊन आला होता. कमलनाथने त्याला विचारलं, ''तुझं नांव काय आहे रे मुला? तू काय करतोस?''

''माझं नांव रंगा. तुम्हाला दिसत नाही कां? मी बाभळीची फळें तोडतोय कीं!'' या तरुणाने उत्तर दिलं.

''इतक्या रखरखीत उन्हांत हे काम कशाला करायचं? एखादी नोकरी करता येईल कीं तुला!'' कमलनाथ म्हणाला.

''मला लिहायवाचायला येत नाही. मला कोण नोकरी देणार? आणि नोकरीसाठी सगळेजण शहरांत पळाले, तर इथली कामें कोण करणार?'' रंगाने उत्तर दिलं.

कमलनाथने हंसत त्याला विचारलं, ''रंगा, माझ्या मनांत तीन शंका आहेत. तुला त्याचं निरसन करता येईल?''

''आपल्यासारख्या मोठ्या व्यक्तींच्या शंकांना मी बापडा कसा काय उत्तर देऊं शकणार? तरीही मला जमलं तर मी तुमचं समाधान करण्याचा प्रयत्न करीन.'' रंगाने निर्धास्तपणें सांगितलं ''फुलांमधें कोणते फूल उत्तम आहे?'' कमलनाथने विचारलं.

''कमलपुष्प'' रंगाने लगेच उत्तर दिलं.

''तू अगदी बरोबर उत्तर दिलंस. कमळ हे लक्ष्मी व सरस्वती या दोघींचे घर आहे. आता सांग, कोणते पाणी उत्तम असते?'' पंडिताने दुसरा प्रश्न विचारला.

''धबधब्याचे पाणी.'' रंगाने उत्तर दिले.

''तुझं हे उत्तरही अगदी बरोबर आहे. हे स्वच्छ पाणी म्हणजे शिवशंकराच्या जटेतून प्रवाहित होणारी आकाशगंगा आहे.'' पंडिताने रंगाची पाठ थोपटत पुन्हां विचारले, ''प्रकाशांतला कोणता प्रकाश उत्तम आहे?''

''सूर्यप्रकाश'', रंगाने सांगितले. ''सर्व प्रकाशाचे मूळ आहे भगवान सूर्यदेवाची दिव्य किरणें! ती उत्तम व अद्वितीय आहेत.'' पंडित फारच खूष झाला आणि आपल्या बोटांतली आंगठी रंगाच्या बोटांत घालण्यासाठी त्याने काढली. पण रंगाने तसे करण्यास मनाई केली व म्हटले, ''थांबा, आपण जे प्रश्न विचारलेत, त्याची उत्तरें कुणीही साधासुधा माणूसही देऊं



शकेल. त्याच्यासाठीं बक्षीस द्यायची काय आवश्यकता?''

पंडिताने आश्चर्याने त्याला विचारलं, ''तर मग इतर लोकांना जी माहिती नाहीत अशीं उत्तरें तुला देता येतील?'' ''मी प्रयत्न करीन'' रंगाने नम्रपणें सांगितलं. ''तर मग सांग बरं, मलाही कळेल!'' पंडिताने उत्सुकतेने म्हटलं.

''उत्तम फूल कमळ नव्हे, उत्तम फूल आहे कपाशीचं फूल. कमळ दिसतं अतिशय सुंदर, पण संध्याकाळ झाली कीं ते मिटून जातं. कापसाच्या फुलाचं, बोंडाचं, कापूस व बीत रुपांतर झालं कीं कापड बनवण्यासाठी त्याचा उपयोग होतो. म्हणून ते सर्वांत उत्तम फूल आहे. वाळवंटात मिळणारं पाणी हे उत्तम पाणी आहे, कारण ते तहानेल्याची तृषा शमवते; त्याला जिवंत ठेवते. आता राहिली प्रकाशाची बाब! माणसाच्या डोळ्यांत जी कारुण्यमय तेजस्वी माया झळकते ना, तो सर्वांत उत्तम प्रकाश आहे. कारण तो दीनदुबळ्यांचं रक्षण करतो.'' रंगाने उत्तर दिलं.

सामान्य रंगाची असामान्य प्रतिभा पाहून कमलनाथ अगदी चक्रावून गेला. त्याने प्रेमाने रंगाला मिठी मारली. आजपर्यंत केवळ आपल्याच राज्यांतली जनता बुद्धिमान आहे आणि त्यांच्या तोडीचे कुणी नाही अशी त्याची भ्रामक समजूत होती. हा त्याचा अहंकार आता दूर झाला. या राज्यांतले नागरीक तर एकीकडे प्रतिकूल परिस्थितीशी निकराने सामना करीत होते आणि त्याबरोबर प्रगतीही करीत होते. दुसऱ्या बाजूला विद्यांच्या अभ्यासाबाबत देखील त्यांची प्रतिभा असामान्य होती. जो राजा आपल्या प्रजेला योग्य मार्गदर्शन करतो आणि प्रजेच्या कल्याणासाठी सतत प्रयत्न करीत राहातो अशा या राजाची प्रशंसा केल्यावाचून कमलनाथला राहावले नाही. विमलादित्याचे मनोमन कौतुक करीतच तो सुवर्ण गिरीला परत गेला.





# सुकर्मचे स्वप्न

साधु सुकर्म आपला शिष्य, कौशल्य याच्या बरोबर देशांत हिंडत होते. प्रवास करीत करीत ते एका छोट्या गांवात पोहोचले. त्यावेळी रात्र झाल्यामुळे एका घराच्या पडवींत ते झोपले.

ते घर रतन नांवाच्या एका शेतकऱ्याचे होते. भल्या पहांटेच महेश नांवाचा आणखी एक शेतकरी हातांत नांगर घेऊन रतनकडे आला, आणि भिंतीजवळ नांगर ठेवून त्याने दार ठोठावले. रतनने दार उघडताच नांगराचे जे कांही काम होते ते पूर्ण झाले, आता परत वायला आलो असे सांगून तो निघून गेला.

थोड्या वेळाने सूर्य वर आल्यानंतर रतनने बाहेर जाऊन नांगर पाहिला तर त्याचा फाळ मोडला होता. त्याने लगेच बायकोला बोलावले व म्हणाला, ''पाहिलंस, महेश किती धूर्त आहे तो! नांगराचा फाळ मोडून कांहीही न सांगता निघून गेला, जणूं कांही माहितच नाही. मी बघ आता काय करतो तो!'' असे म्हणून हातांत कुऱ्हाड घेऊन तो महेशच्या घरी गेला आणि त्याच्या बैलगाडीचे चाक त्याने मोडून टाकले.

ते पाहून महेश रागाने लाल झाला. घरांत जाऊन त्याने एक मोठी जाड काठी आणली व रतनच्या डोक्यावर जोराने मारली. रतनला त्या जोराच्या प्रहाराने जखम झाली. पण त्यामुळे आणखी रागांत आलेल्या रतनने आपल्या कुऱ्हाडीने महेशच्या डोक्यावर प्रहार केला. तो वार त्याच्या डोक्यावर इतक्या जोराचा लागला, कीं तो रक्तबंबाळ होऊन खाली पडला.

रक्त पाहताच रतनचे हातपाय कांपायला लागले, तो अतिशय घाबरला. धांवतपळत तो आपल्या घरांत शिरला व दरवाजा बंद करुन आंत बसला. कांही क्षणांतच ही बातमी महेशच्या दोन्ही भावांना समजली. ते कुदळ व कुऱ्हाड घेऊन रतनच्या घरी आले.

जेव्हां ही बातमी रतनच्या मामांना व मेहुण्याला समजली, तेव्हां तेही हातांत जे कांही हत्यार मिळेल ते घेऊन रतनकडे आले. मग काय, गांवातले एकेक करत सर्व लोक तिकडे येऊ लागले आणि भरपूर गर्दी जमा झाली.

रतनचे नातेवाईक व महेशच्या भावांमध्ये प्रथमच जोराचे भांडण झाले. ते एकमेकांना शिव्या व मारून टाकण्याच्या धमक्या देऊं लागले. शेवटी तिथेच मारामारी व गुद्दागुद्दी करण्यास ते तयार झाले.

सुकर्म हे सर्व लांबून पहात होते. त्यांना वाटले की आता हे आवाक्याच्या बाहेर जात आहे व कुठल्याही क्षणाला खून-खराबी होण्याची शक्यता आहे. म्हणून ते लगबगीने पुढे आले व दोघांच्या मधे उभे राहिले. अचानक आपल्या-मध्ये साधूला उभे असलेले पाहून ते सर्वजण चकित झाले. सुकर्मने रतनच्या व महेशच्या नातेवाईकांना शांत केले. नंतर घरांत जाऊन त्यांनी रतनला समजावून, शांत करुन महेशच्या घरी आणले.

तोपर्यंत वैद्याने औषधें, मलम इ.लावून महेशच्या डोक्याला पट्टी बांधली होती. महेशही झोपून थोडी विश्रांती घेत होता.

सुकर्मने रतनला महेशजवळ आणून बसवले आणि सर्वांना ऐकू जाईल इतक्या मोठ्या आवाजांत म्हटले, ''बंधूनो, आम्ही गांवोगांव फिरणारे प्रवासी, काल रात्री या गांवात येऊन पोहोचलो व रात्री रतनच्या ओट्यावर झोपलो. हवेंत रात्री चांगला गारवा असल्यामुळें लवकरच गाढ झोप लागली, आणि झोपेंत मी एक स्वप्न पाहिलं. स्वप्नांत मला असं दिसलं की महेश रतनचा नांगर देऊन परत जात आहे. नंतर रतनने जेव्हा नांगराचा फाळ मोडलेला पाहिला, तेव्हां लगेच त्याने महेशला बोलावून फाळ कसा मोडला,

- राधेश्याम तिवारी -



म्हणून विचारले. महेशने आपली चूक कबूल केली, त्याची क्षमा मागितली व तो नांगर दुरुस्त करून देईन म्हणून त्याने वचन दिलं. त्यानंतर तो नांगर घेऊन लोहाराकडे जाऊं लागला, तितक्यांत माझे स्वप्न तुटले आणि पुढे काय झाले ते मला समजले नाही.''.

साधूचे बोलणे ऐकताच महेशला आपली चूक समजून आली. तितक्यांत महेशची बायको पुढे येऊन म्हणाली, ''काल मी सांगायला विसरले. काल संध्याकाळी नोकराने म्हशीला मारताना काठी चुकून नांगराच्या फाळाला लागली व तो तुटला''.

महेशला खूप वाईट वाटले, तो म्हणाला, ''माफ कर रतन.माझी चूक झाली. नांगराचा फाळ तुटल्याचं मी पाहिलं नव्हतं''.

रतनच्या डोळयांत पाणी आले. महेशचे दोन्ही हात हातांत घेत तो म्हणाला, ''माफी तू नाही तर मी मागायला हवी. नांगराचा फाळ तुटलाय म्हणून मी तुला विचारायला हवं होतं. उलट मी तुझ्याविषयी गैरसमज करुन घेतला आणि तुझ्या बैलगाडीचे चाक मोडले''.

सुकर्मने महेश व रतनला धीर दिला व समजावून सांगितले, ''पाहिलंत, राग माणसाचे कसा जनावर करतो ते! त्रागा कधी करूं नये, घाई करूं नये. शांत चित्ताने नेहमी विचार करावा. तेव्हांच काय योग्य व काय अयोग्य ते समजते. मानव जन्म उत्तम जन्म आहे. माणसाचे जीवन हे क्षणभंगुर आहे, अतिशय मर्यादित आहे, त्यामुळे एकमेकांशी प्रेमाने राहायला हवे, मायेने व्यवहार करायला हवेत. आता ऐका, मी एक सत्य सांगणार आहे. मी कुठलंही स्वप्न पाहिलं नाही. दुर्भाग्याने माझ्या डोळ्यांसमोर होत असलेल्या घटना पाहिल्यानंतर मला असं वाटलं कीं, असं सांगितल्यावर तुम्हांला तुमच्या चुका कळून येतील आणि तुम्ही शांत व्हाल. स्वप्न म्हणून मी जे सांगितले, ती माझी केवळ कल्पना होती''.

महेश आणि रतनने साधूचे खूप आभार मानले. त्या दिवशी सुकर्म आणि त्याच्या शिष्याने त्या दोघांच्या आदरातिथ्याचा स्वीकार केला आणि दुसऱ्या दिवशी ते दोघेही आपल्या पुढच्या प्रवासाला निघाले.







# धोरण

बाबुलने एक नवे घर बांधले. त्यांत चार खोल्या होत्या. तीन खोल्या त्याने आपल्या कुटुंबासाठी ठेवल्या आणि एका खोलींत राघव नांवाच्या एका तरुणाला भाडेकरू म्हणून ठेवले.

राघव फारच गरीब होता. एका दुकानांत तो काम करी व मोठ्या मुष्कीलीने दिवस कंठीत होता. त्याच्याजवळ वापरायला चांगले कपडे नव्हते. कधीकधी पैसे नसले कीं तो उपाशी राही. बाबुलला त्याची दया येई व त्याला मदत करायची इच्छा होई. परंतु बाबुलचा मामा त्याला तसे करुं देत नसे.

''दयेच्या पोटी रोज त्याला मदत करायला लागलास तर त्याला त्याची संवय होईल आणि तो नेहमीच तुझ्यावर अवलंबून राहूं लागेल. जास्त कष्ट करुन कमवावे असे त्याला वाटणार नाही. तो तरुण आहे. या वयांत त्याने कष्ट करुन पैसे मिळवलेच पाहिजेत आणि स्वतंत्रपणे जगायची मनाची तयारी केली पाहिजे. त्याला पावलोपावली मदत करण्याचा विचार मनांतून काढून टाक.'' मामाने बाबुलला बजावले.

बाबुलला आपल्या मामाबद्दल फार आदर होता. बाबुलचे आईवडील तो लहान असतानाच वारले व मामानेच त्याचा प्रतिपाळ केला होता. केवळ मामाच्यामुळेच आज त्याची परिस्थिती चांगली होती. मामा बाबुलचा गुरु होता व बाबुल त्याचे सांगणे कधीही अमान्य करीत नसे. म्हणून राघवला मदत करण्याबाबत बाबुल गप्प बसला.

एके दिवशी बाबुलचा मामा कुणा दूरच्या नातलगांकडे लग्नासाठी म्हणून शेजारच्या गांवी गेला. संध्याकाळी जेव्हां बाबुल बाजारांतून घरी परत आला तेव्हां राघवचा कण्हण्याचा आवाज ऐकून बाबुल त्याच्या खोलींत गेला.

राघव चटईवर झोंपला होता आणि त्याने अंगावर चादर पांघरली होती. मधूनमधून वेदनेने 'आई ग, आई ग' असं कळवळून कण्हत होता. बाबुलने त्याची चौकशी केली.

''प्रकृती बरी नाही. ताप आलाय असं वाटतंय.'' राघवने हळू आवाजात सांगितलं.

- कमलनाथ -

"असं बरोबर नाही. वैद्याकडून औषध आणलं असतंस तर ठीक होतं" बाबुलने सांगितलं.

"मी वैद्याकडे कसा जाऊं? पैसे दिल्याखेरीज ते नाडीसुद्धां तपासत नाहीत. उद्यापर्यंत ताप आपोआप उतरेल." राघव म्हणाला.

खिशांतून कांही रुपये काढून त्याला द्यावे असे बाबुलला वाटले. पण त्याला मामाची आठवण झाली आणि त्याने ते पैसे परत खिशांत ठेवले.

असे तीन दिवस गेले. चौथ्या दिवशी राघवचा दुकानदार मालक राजनाथ त्याला पाहायला आला. राघवला भेटण्यापूर्वी त्याने बाबुलला भेटून चौकशी केली.

राजनाथ राघवच्या खोलींत गेला आणि त्याच्या कपाळावर हात ठेवल्यानंतर तो बाबुलला म्हणाला, "हे हो काय? याचं अंग तापलंय, आणि याला वैद्याकडे नेण्याचा विचार तुम्हाला कसा सुचला नाही? हे शोभतं तरी कां तुम्हाला?"

बाबुलचा चेहरा पडला. त्याला आपल्या चुकीची जाणीव झाली. तेव्हां त्याने राजनाथला आपल्या मामाने दिलेला सल्ला सांगितला.

राजनाथने त्याच्याकडे रोखून पाहात म्हटले, "तुम्ही तरी औरच दिसता हो! मामाने सांगितलेलं तेवढंच तुम्हाला माहित आहे कां? त्यांचा विचार व सल्ला योग्य आहे, खरा आहे, पण जेव्हां एक माणूस खूप आजारी आहे, तर त्याला मदत करणें हे तुमचे कर्तव्य नाही कां ठरत?" आणि राघवला घेऊन राजनाथ वैद्याकडे गेला.

लग्नाला गेलेला बाबुलचा मामा त्याच वेळेस घरी परत येत होता. रस्त्यांत त्याला राजनाथ व राघव दिसले. घरी आल्यावर बाबुलने त्याला सर्व कांही हकीकत सांगितली. त्यावर मामा म्हणाला, "राजनाथने जे सांगितलं ते खरं व रास्त आहे. कोणत्याही निर्णयाला धरून बसणें ही चूक ठरत नाही. पण जरूर असेल तिथें परिस्थितीनुसार निर्णय बदलणें हे ही आवश्यक ठरते. तू केलंस ते चुकीचं आहे. तू स्वतः विचार करुन निर्णय घ्यायला शिकलं पाहिजेस. तरच तुझी प्रगती होईल. परिस्थिती लक्षांत घेऊन काय करायचे ते तू ठरवत जा. त्यासाठीं धोरणाने वागावे लागते!"

मामाने सांगितल्यानंतर बाबुलला आपल्या स्वभावांतली उणीव लक्षांत आली.







# माया सरोवर

## 13

(नदीतीराबरच्या डोंगरी गुहेसमोरील मैदानांत जयशील व सिद्धसाधकाला मकरकेतु दिसला. त्यांनी बघितले कीं त्याच्याबरोबर जयशीलचा बालमित्र देवशर्मा आणि सेनापतीचा मुलगा मंगलवर्मा हे देखील आहेत. सिद्धसाधकाने नरवानराची जलग्रहाच्या तावडीतून सुटका केली. हात जोडून नमस्कार करीत तो सिद्धसाधकाच्या पायावर कोसळला.) यानंतर ....

मकरकेतु आणि इतरांनी नरवानराला सिद्ध-साधकाचा गुलाम झालेला बघितला आणि ते आश्चर्यचकित झाले. खूष होत जयशील म्हणाला, "चला! इतक्या दिवसांनतर कां होईना, शेवटी सिद्धसाधकाने आपल्याला एक चेला मिळवलाच. पण तो धोकेबाज आहे. कृपाणजितला तर त्याने जवळजवळ मारुनच टाकले होते. सर्पस्वराला तो घेऊन गेला होता. तो त्याच्या तावडीतून कसा सुटला, ते माहित नाही."

"मीच सर्पस्वराला नरवानरापासून वांचवले. त्याच्यामुळेच तुम्ही इथेच जवळपास आहात असं माझ्या लक्षात आलं." मकरकेतु म्हणाला.

मकरकेतुला नीट निरखून बघत जयशील म्हणाला "तुझ्या जखमांचे काय झाले? इतक्या लौकर बरा झालास? नवलाईचीच गोष्ट आहे."

मकरकेतु देवशर्माकडे बघत म्हणाला "हा डोंगरांत निचेष्ट पडलेला होता. जगण्याची देखील आशा नव्हती, पण औषधोपचार करुन वांचवले.



वैद्यांना सगळेजण भगवान म्हणतात, पण मी त्यांना वैद्यदेव म्हणतो. एकदा मी यांना घेऊन माया सरोवराशी गेलो आणि तुला शोधत शोधत इथे आलो.''

देवशर्मा हा जयशीलचा बालमित्र अमरावती नगरांत राहात होता. तो जुगारी होता. पुष्कळ दिवसांनंतर त्याची द्यूत-गृहात जयशीलशी गांठ पडली. वैद्यकीय शिक्षण याने केव्हां आणि कुठे घेतले, हे जयशीलला कधी कळले नाही. देवशर्मांना नमस्कार करत तो म्हणाला, ''वैद्यदेव, हा मंगलवर्मा आपला शिष्य आहे कां?''

यावर हंसत हंसत देवशर्मा म्हणाले, ''मंगलवर्मा माझा शिष्य आहे. तो माझ्याकडे शिकतो आहे. माया सरोवराला जाण्याची त्याची तीव्र इच्छा होती. वर्मा, मी बरोबर बोललो ना?''

एक दीर्घ श्वास घेत आपल्या लांकडी पायाकडे बघत मंगलवर्मा कांही बोलणार एवढ्यांत आकाशांत जोरजोरांत पंख फडफडविल्याचा आवाज ऐकूं आला. सगळे मान वळवून तिकडे बघूं लागले. हंसांची एक टोळी एक रथ ओढत आकाशांतून जात होती. ते पाहून मकरकेतु, सर्पनख, सर्पस्वर ''सरोवरेश्वराचा जयजयकार असो.'' असे जोरजोरांत ओरडूं लागले.

त्यांचा हा ओरडा रथांत बसलेल्या लोकांनी ऐकला. दुसऱ्याच क्षणीं तो रथ आकाशांत थांबला. आणि वेगाने जयशील व इतर लोकांच्या दिशेने येत शेजारच्या नदीच्या पाण्यावर उतरला.

रथ पाण्यावर उतरत असताना नदीच्या कांठावर उभे असलेले मकरकेतु, सर्पनख, सर्पस्वर चकित होऊन एकमेकांना विचारत होते, ''अंगरक्षक एकटेच रथांत कसे?'' मग तिघांनी पाण्यांत उड्या मारल्या आणि ते रथाकडे जाऊं लागले.

आता नदीच्या कांठावर फक्त सिद्धसाधक जयशील, वैद्यदेव नांवाने प्रसिद्ध असलेला देवशर्मा आणि सेनापतीचा मुलगा मंगलवर्मा, एवढेच राहिले. जयशील देवशर्मांला डोळ्याने इशारा करत मंगलवर्माला म्हणाला, ''आपण कांही कट्टर शत्रू नाही. तसे आपण मित्र पण नाही. तुला बघून असं वाटतंय कीं तू माया सरोवराला जाऊन आला आहेस. मी जो अंदाज केला तो खरा आहे ना? तिथे तू कनकाक्ष राजाचा मुलगा कांचनवर्मा



आणि मुलगी कांचनमाला यांना बघितलंस कां? ते कसे आहेत?''

मंगलवर्माने याचे उत्तर देण्यापूर्वी आपल्या लांकडी पायाकडे बघत आणि देवशर्माकडे बघत म्हटलं, ''अशा प्रश्नाचे उत्तर द्यायला वैद्यदेवांची परवानगी हवी.''

त्याचे कौतुक करीत जयशील म्हणाला, ''तुझी गुरुभक्ती वाखाणण्याजोगी आहे. ठीक आहे. हाच प्रश्न मी तुझ्या गुरुला विचारतो.'' तेवढ्यांत सिद्धसाधक ''जय महाकाली'' म्हणत नरवानरावरुन खाली उतरला. ''जयशील, हे तर जलपक्षी आहेत. यांच्याशी बोलून वेळ वांया कशाला घालवतोस? तिकडे तो मगरीचे तोंड वाला आणि त्याचे साथीदार त्या पक्षांच्या रथांत बसून पळून जाण्याच्या तयारीत आहेत.''

''साधक, त्यांना जर कां पळून जायचंच असेल तर जाऊं दे. आणि आपण त्यांना अडवूं देखील शकत नाही. इथे त्यांचे शिष्य आपल्याबरोबर आहेतच.'' जयशील म्हणाला.

सिद्धसाधक मंगलवर्मा व देवशर्माकडे रागाने बघत म्हणाला, ''हा मंगलवर्मा ओळखीचा आहे. हा दुसरा माणूस जलमानव नाही. मायासरोवराला जायला जे आपल्याला मदत करुं शकतील, ते नदींत आहेत. ते जर पळून गेले तर माया-सरोवराला आपण क्वचितच जाऊं शकूं.''

त्याच्या या बोलण्यावर रागवत देवशर्मा म्हणाला, ''साधक, तू कमी विचार करतोस आणि जास्त रागवतोस. तुला माहित आहे कां



कीं तो मकरकेतु या डोंगराळ भागांत जाणूनबुजून कां आलाय? तुला आणि तुझ्या मित्राला माया-सरोवराला घेऊन जाण्यासाठीच! तिथे तुम्हाला भयंकर अशा जलवृक्ष राक्षसांशी लढावे लागेल. आणि त्यांच्यापासून स्वतःचे रक्षण करावे लागेल.''

''जलराक्षस! महाकालच्या मदतीने, या त्रिशूलाने, त्यांना मारुन पाण्यांतून उचलून किनाऱ्यावर फेकून देईन. आता राहिला जयशील; त्याच्याजवळ महाकालाचा सेवक कालाकालने दिलेले खड्ग आहे.'' सिद्धसाधक म्हणाला.

जयशीलच्या लक्षांत आले कीं वाद वाढेल आणि साधक देवशर्माशी भांडण करेल. कारण त्याला हे माहिती नाही की देवशर्माच त्याचा बालमित्र आहे. हे टाळण्यासाठी तो देवशर्माला



म्हणाला, ''वैद्यदेवजी, आपण मंगलवर्माला त्या रथाजवळ पाठवून तिथे काय बोलणे चालले आहे हे जाणून घेऊं शकतो कां?''

देवशर्माला जयशीलच्या बोलण्याचा मतितार्थ कळला. त्याने मंगलवर्माला सांगितले, ''शिष्या, तू त्या रथाजवळ जाऊन शोधून काढ कीं त्या हंसांच्या रथात मायासरोवरेश्वर कां नाही? आणि त्याच्या जागी त्याचा अंगरक्षकच कां आला आहे?''

मंगलवर्माने मस्तक लववून देवशर्माला नमस्कार केला आणि पाण्यांतून तो रथाकडे जाऊं लागला. तो जाताच जयशीलने देवशर्माला विचारले, ''शर्मा, आता तरी सांग, मायासरोवरेश्वराकडे हिरण्यपुरचे अपहरण केलेले राजकुमार व राजकुमारी सुरक्षित आहेत ना?''

''दोघेही सुरक्षित आहेत. त्यांच्या अपहरणामुळे तिकडे हिरण्यपुरचा राजा दुःखांत आहे. तर इकडे मायासरोवरेश्वरांना देखील आपण केलेल्या कृत्याचा पश्चात्ताप होतो आहे.'' देवशर्मा म्हणाले.

त्या दोघांचे चाललेले हे बोलणे ऐकून सिद्धसाधक ''जय महाकाल'' असे ओरडत म्हणाला ''जयशील, तुम्ही आधीपासूनच एकमेकांना ओळखता कां? आत्तापर्यन्त ही गोष्ट तू माझ्यापासून कां लपवून ठेवलीस?''

त्याला हळू आवाजांत बोलायला सांगून जयशील म्हणाला, ''साधका, शांत हो. मी आणि देवशर्मा बालमित्र आहोत. त्या गांवातले आम्ही नांवाजलेले जुगारी होतो. ती तर एक मोठीच कहाणी आहे. पण आम्ही मित्र आहोत हे मकरकेतुला कळता कामा नये. जर ही गोष्ट त्याला समजली तर आपण माया सरोवरेश्वरांना बंदी बनवून कांचनवर्मा आणि कांचनमाला यांची सुटका करुं शकणार नाही.''

''हे ठीक आहे. आता मला समजलं. मी. काळजी घेईन. पण या हंसांच्या रथाचे काय करायचे? हे तर एक कोडेंच आहे. याच्या मागे काय चाल आहे हे तर आपल्याला माहिती नाही. कदाचित् आपला मित्र देवशर्माला याबद्दल कांही माहिती असेल.'' असे म्हणत त्याने देवशर्माला प्रेमाने मिठी मारली.

सिद्धसाधकाच्या खांद्यावर थोपटत हंसत देवशर्मा म्हणाला, ''मायासरोवराच्या जलवृक्ष



राक्षसाला जर तुम्ही मारुं शकलांत तर तुम्हाला महाकालाकडून सर्व शक्ती प्राप्त होतील. तो जलवृक्ष तुमच्या महाकाल देवाचा कट्टर शत्रू आहे.''

''असं काय? त्याला पकडून या नरवानराला खायला देतो. नरवानर, त्याला खाशील ना?'' असं म्हणत सिद्ध साधकाने नरवानराच्या खांद्यावर त्रिशूळ थोडा दाबला.

उडी मारुन नरवानर लगेच नदीतीरावर उभ्या असलेल्या जलग्रह हतीकडे जाऊं लागला. साधकाने त्याचा हात पकडून त्याला थांबवत म्हटलं ''नरवानरा, थांब. आता आपण मकरकेतु आणि त्याचे मालक सरोवरेश्वर यांचे मित्र आहोत. तो पाणहत्ती तुला मोठ्या भावासारखा आहे.''

साधकाचे बोलणे ऐकून देवशर्मा खदखदून हंसला. मग वज्रासारखा असलेला आपला दंड उचलून नदीकडे रोखत तो म्हणाला, ''मायासरोवरांत कुठल्यातरी गोष्टीवरुन चांगलीच खळबळ उडाली आहे. असं नसतं तर सरोवरेश्वराचा रथ इथें नदीमधे उतरला नसता.''

देवशर्मा याविषयी अजून कांही बोलणार एवढ्यांत मंगलवर्मा आणि मकरकेतु तिथे आले. दोघंही खूप दुःखी दिसत होते. कांहीतरी अप्रिय गोष्ट घडली आहे हे त्यांच्या चेहऱ्यावरुन स्पष्ट दिसत होते. रडक्या आवाजांत मकरकेतु म्हणाला, ''वैद्यदेव, एका तासापूर्वी जेव्हां मायासरोवरेश्वर हंसांच्या रथांत बसून जलविहार करत होते, तेव्हां जलराक्षस अचानक पाण्यांतून वर आला, आणि रथात त्यांच्या शेजारी बसलेल्या कांचनमालेला पकडण्याचा प्रयत्न करुं लागला. या संकटातून सुटण्यासाठी सारथी आणि अंग-



रक्षकांनी तो रथ आकाशांत नेला. पण....'' पुढे तो कांही बोलूं शकला नाही. डोळे पुसत तो तिथेच उभा राहिला.

देवशर्मानि मोठ्या आतुरतेने विचारले, ''रथांत बसलेल्या सरोवरेश्वर आणि कांचनमालेचे काय झाले?''

स्वत:ला सांभाळत मकरकेतु म्हणाला, ''मोठाच अनर्थ झाला. हंसांचा रथ जेव्हां आकाशांत उडत होता तेव्हां गिधाडांच्या एका टोळीने त्यांच्यावर हल्ला केला. हंस घाबरुन इकडे तिकडे पळून जाण्याचा प्रयत्न करुं लागले. त्यामुळे रथ उलटापालटा होऊं लागला आणि सरोवरेश्वर, कांचनमाला, सारथी व अंगरक्षक, खाली असलेल्या जंगलात पडले.''

ही हकिगत ऐकून देवशर्मा, जयशील, सिद्धसाधक थक्कच झाले. ''राजकुमारी कांचनमाला जर एवढ्या उंचावरुन खाली पडली असेल तर ती यांतून वांचणे अशक्य आहे. साधक, आपण आत्तापर्यन्त जे कष्ट केले ते सगळे फुकट गेले. आपण आपले दिलेले वचन पूर्ण करुं शकलो नाही.'' असे म्हणत जयशीलने म्यानांतून तलवार काढून लांब फेकून दिली.

''तिच्या वडिलांवर ओढवलेला प्रसंग ऐकून पद्ममुखी स्वत:चे बरेवाईट करायला मागेपुढे पाहाणार नाही.'' असे म्हणत देवशर्मानि आपल्या हातांतली काठी जमिनीवर फेकली.

सगळ्यांचे उदास चेहरे बघून सिद्धसाधक म्हणाला, ''निराश होऊं नका! ते दोघं एखाद्या तळ्यांत किंवा झाडांवरही पडले असतील. त्यांना शोधायला आपण कांही माणसें पाठवूं. आणि त्या जलराक्षसाचा बळी महाकालाला द्यायच्या तयारीला लागूंया. मायासरोवर इथून किती दूर आहे?''

सिद्धसाधकाचे बोलणे पुरे होण्याआधीच नदींतून ''जलराक्षस, जलराक्षस!'' असा मोठमोठ्यांदा ओरडा ऐकूं येऊं लागला.

जयशील आणि इतर सगळेजण तिकडे पहातात तो काय, लांडग्यासारखी डोकी असलेले राक्षस दगडाचे सोटे हातांत घेऊन रथाला घेरुन वेगाने पुढे येत होते. (क्रमशः)





वेताळ कथा

# रामसेनचा निर्णय

निश्चयाचा पक्का विक्रमार्क पुन्हां झाडाजवळ गेला. त्याने प्रेत खाली उतरवले. खांद्यावर घेतले, आणि स्मशानाची वाट धरली. तेव्हां प्रेतांत लपलेला वेताळ त्याला म्हणाला, ''राजन, हे स्मशान विषारी सर्प, घुबडें आणि जनावरांनी भरलेले आहे, तरीही तू निर्धास्त मनाने चालतो आहेस. तू असं कां करतो आहेस ते सांग तरी! अजूनही तू आपल्या प्रयत्नांत कधी यशस्वी झाला नाहीस. खूप वर्षांपूर्वी रामसेन नांवाचा एक राजा होता. त्याच्या राज्यांत दोन प्रमुख नगरें होती. त्या दोन्ही नगरांत त्याने दोघा अधिकाऱ्यांची नेमणूक केली. ते अधिकारी कर्तव्यदक्ष



आहेत कां याची पाहाणी राजाला स्वतः तिथें जाऊन करायची होती. वेष पालटून राजा तिथें गेला. तिथे अनेक अडचणी समोर आल्या. राजाने अनुभव घेऊन आपला अनुचित निर्णय घेतला. त्या राजाची गोष्ट मी तुला सांगतो. म्हणजे तुझी चूक सुधारण्याचा प्रयत्न तू करशील.'' आणि वेताळ त्या राजाची गोष्ट पुढे सांगू लागला.

रामसेन प्रमोद देशचा राजा होता. तो नेहमी प्रजेचे कष्ट दूर व्हावेत हे आपले ध्येय मानीत असे. लोकांना समाधान मिळावे व त्यांचे जीवन सुखी व्हावे यासाठी त्याने अनेक उपाय अंमलात आणले. जनतेची सेवा त्याचे कर्मचारी नीट करतात कीं नाही ते पाहण्यासाठी त्याने गुप्तचरदेखील नेमले होते. कधीकधी राजा वेषांतर करुन त्या नगरांत फेरफटका मारत असे व चौकशी करवीत असे.

एकदा तो वेष पालटून भाग्यपुरीला गेला. तिथें प्रत्येक नागरिकाच्या तोंडी भाग्यपुरीचा अधिकारी दिव्यदत्त याची फारच प्रशंसा त्याला ऐकायला मिळाली. ती ऐकून तो कंटाळला. त्याला वाईट वाटलं कीं लोक आपल्या राजाला विसरून दिव्यदत्ताचेच गुणगान गात आहेत. तो राजधानीला परतला आणि त्याने कांही गुप्तचरांना बोलावून सांगितले, ''मला वाटतं, भाग्यपुरीचा अधिकारी दिव्यदत्त याला आपलीच स्तुतीस्तोत्रे ऐकायची वाईट संवय लागली आहे. त्यासाठी तो निश्चितच सरकारी रकमेचा अपव्यय करीत असला पाहिजे. तुम्ही तिथें जा आणि त्याच्या चुकांचा शोध घ्या.''

एका आठवड्यानंतर गुप्तचरांनी परत येऊन राजाला सांगितले, ''महाराज, दिव्यदत्त राजनिष्ठ आहे. तो जे जे काम करतो, ते आपले नांव घेऊनच करतो. जनतेच्या कल्याणासाठी तो सर्व प्रकारच्या सुखसोयींची व्यवस्था करतो त्यामुळें तो फारच लोकप्रिय झालेला आहे. तो राज्याच्या खजिन्यांतल्या एका पैचादेखील दुरुपयोग करीत नाही.''

त्यांची माहिती ऐकून रामसेनचा विश्वास बसला नाही. गुप्तचरांना दिव्यदत्ताने लांच तर दिली नसेल ना अशी त्याला शंका उत्पन्न झाली. म्हणून स्वतःच वेषांतर करुन तो भाग्यपुरीला गेला.

तिथें तो एका खानावळींत उतरला. संध्याकाळीं तिथल्या मालकाला राजा म्हणाला, ''हे पहा, माझ्याकडे दहा हजार रुपये आहेत. मला या नगरांत रात्रीची शोभा पहायला जरा हिंडायला,





जायचे आहे. मी ही पैशाची थैली इथें ठेवून जाऊं कां?''

''अहो, दिव्यदत्त या नगराचा अधिकारी आहे. इथें चोरांची अजिबात भीती नाही. इथें चोरी होतच नाही. तुमची रुपयांची थैली तुमच्या खोलींत जरी ठेवलीत तरी चालेल. नाहीतर तुमच्या हातांत बाळगा, किंवा माझ्या स्वाधीन केलीत तरी चालेल.'' त्या मालकाने सांगितले.

रुपयांची थैली बरोबर घेऊन नगरांत फिरायला निघाला. सगळीकडे जणूं दीपोत्सव असावा अशी आरास होती. कित्येक वैद्यशाळां-कडे पाहूनच समाधान वाटत होते.

रामसेनने एका बोळकंडीत ती पैशाची थैली एका जागी ठेवली व तो पुढे जाऊं लागला; तोच 'थांबा' असा आवाज त्याला ऐकूं आला.

रामसेन चकित होऊन थांबला. एक सैनिक त्याच्या समोर येऊन उभा राहिला व त्याने विचारले, ''ही थैली इथें ठेवून तुम्ही पुढें कुठे निघालात? यांत कांही विषारी पदार्थ तर ठेवलेला नाही ना?''

''तू कोण रे मला विचारणारा? मला वाटेल ते मी करीन.'' रामसेनाने नाराजीच्या नाटकी सुरांत म्हटले.

''हे बघा, मी या नगराचा सैनिक आहे. कांही वेडेवांकडे होत नाही ना हे मी लपून पाहात असतो. लोकांवर संकट येऊं नये हे पाहाणं माझं कर्तव्य आहे.'' सैनिकाने अभिमानाने सांगितलं.

रामसेन मुद्दामच पळायला लागला. आणि सैनिक त्याचा पाठलाग करुं लागला. राजा वेगाने पळत होता तेव्हां अंधारात त्याचा पाय मुरगळला आणि तो खाली पडला. त्याच्या डोक्याला मार लागला व तो बेशुद्ध झाला.

सैनिकाने जोरांत शिटी वाजवली. तेव्हां चारी बाजूंनी गस्त घालणारे सैनिक गोळा झाले. त्यांनी रामसेनला रुग्णालयांत नेले.

वैद्यांनी परीक्षा केल्यानंतर म्हटले, ''जखम फार खोल आहे.'' त्यांनी औषधोपचार करुन जखमेवर पट्टी बांधली.

शुद्धीवर आल्यानंतर रामसेन म्हणाला, ''प्रत्येक सामान्य नागरिकाचे प्राण वांचतील अशी सोय या नगरांत केलेली आहे, ही कौतुकास्पद गोष्ट आहे. ज्या दिव्यदत्ताने अशा उत्तम सुविधा केल्या आहेत, त्याला भेटूनच मी गांवी परत जाईन.''

जेव्हां ही गोष्ट सैनिकांच्यामार्फत दिव्यदत्ताला

समजली, तेव्हां तो स्वतः रामसेनला भेटायला आला. पैशाची थैली मागे ठेवून जाण्यांत रामसेनचा कोणता हेतू होता हे त्याने विचारले. तेव्हां राजाने सांगितलं, "मी महाराज रामसेन आहे, तुझा या नगरांतला कारभार पाहाण्यासाठी मी इथें आलो. प्रजेच्या कल्याणासाठी तू इतकी चांगली कामें करतो आहेस हे पाहून आनंद झाला. मी तुझे अभिनंदन करतो."

दिव्यदत्तने त्वरित गुडघे टेकून महाराजांना अभिवादन केले. "महाराज, आपण या संकटातून वांचलांत ही दैवी कृपाच झाली. माझी कामगिरी पाहाण्यासाठी आपण आपला जीव धोक्यांत घातला होतात."

रामसेनने पुन्हां एकदा दिव्यदत्ताची प्रशंसा केली. राजधानीला परत गेल्यानंतर तिथें त्याला बोलावून त्याचा आदरपूर्वक सन्मान केला. ते बघून राज्यांतल्या इतर नगरांतल्या अधिकाऱ्यांनीही आपापली नगरे त्या प्रकारें नीटनेटकी ठेवून चांगला राज्यकारभार करावा, असा निर्णय घेतला. सौभाग्यपुरचा अधिकारी भव्यवर्मा याला मात्र आपला सन्मान लवकर व्हावा असे वाटत होते.

भव्यवर्मा चैनी होता. प्रजेच्या कल्याणाबद्दल त्याला कांहीही वाटत नव्हते. तो महाराणींचा जवळचा नातलग होता, म्हणून रामसेनला नाईलाजाने त्याला सौभाग्यपुरचा अधिकारी नेमणें भाग पडले.

भव्यवर्माने महाराणींना भेटून सांगितले, "माझ्या नगरांतली जनता सुखी आहे. त्यांना सर्व प्रकारच्या सुखसोयी मिळतात, परंतु जो आदर व प्रेम देवदत्ताला मिळाले, ते अद्याप मला मिळालेले नाही. माझ्या नगराला भेट द्यावी असे आपण महाराजांना सुचवावे. म्हणजे मी किती





चांगला व समर्थ प्रशासक आहे ते महाराजांना लागलीच समजेल."

राणीने राजाकडे हा विषय काढला. तेव्हां राजा म्हणाला, "ठीक आहे. आठवडाभरांत मी त्या नगरांत जरुर जाईन. जर त्याला प्रथम कळवले तर तो सतर्क राहील व आवश्यक ती व्यवस्था करील. म्हणून ही गोष्ट गुप्तच राहिली पाहिजे."

आठवड्यानंतर राजाने आपल्या एका विश्वासू सेवकाला वेषांतर करुन सौभाग्यपुरला धाडले. आणि राजा स्वतः मात्र एका सामान्य नागरिकाप्रमाणें त्या सेवकाच्या मागोमाग जात राहिला. भव्यवर्माला वाटलं कीं तो सेवक म्हणजे वेषांतर करुन आलेले महाराज! म्हणून त्याने त्याची चांगली सरबराई केली.

तो सेवक रात्रीं नगरांत फिरत असताना. त्यानेही पैशाची थैली एका बोळांत ठेवली. तेव्हां आसपास पहारा करीत असलेल्या सैनिकांनी त्याला गुंगीचे औषध दिले व रुग्णालयांत दाखल केले.

तितक्यांत नागरिकाच्या वेषांत असलेला राजा रामसेन तापासाठी औषध मागायला म्हणून त्याच रुग्णालयांत शिरला. परंतु त्याच्याकडे कुणीही लक्ष दिले नाही. सर्वजण त्या वेषांतर केलेल्या सेवकाची सेवा करण्यांत गुंतले होते. एका सैनिकाने रामसेनला हळूंच सांगितलं, "या नगरांतल्या रुग्णालयांतून चांगले हुशार वैद्यच राहिले नाहीत. इथें त्यांना वेळेवर नीट पगार मिळत नाहीत, म्हणून सगळेजण भाग्यपुरीला निघून गेले आहेत. उत्तम वैद्यांची चिकित्सा फक्त इथें भव्यवर्मालाच मिळते. तुला जर आपला प्राण



वांचवायचा असेल तर तू तडक भाग्यपुरीला जा."

रामसेन राजधानीला परतला आणि त्याने राणीला सविस्तर हकीकत सांगितली. राजा तिला म्हणाला, "आता तुलाही कळलं असेल की भव्यवर्मा हा चांगला अधिकारी नाही. तो अगदी नालायक आहे. नाहीतरी तो तुझा नातलग, म्हणून तूच त्याला मी येणार असल्याची बातमी कळवली असशील, होय ना?"

राणी चकित झाली व म्हणाली, "मी कशाला सांगीन? पण जेव्हां तुम्ही ही गोष्ट मला सांगितलीत तेव्हां माझ्या दासींपैकी कुणीतरी ते ऐकलं असेल आणि तिनेच ही गुप्त गोष्ट भव्यवर्माला कळवली असेल. मी नीट चौकशी करीन आणि त्या दासीला चांगली कठोर शिक्षा करीन."

त्यावर रामसेन म्हणाला, ''देवी, असं करुं नकोस. भव्यवर्मा तुझा आप्त आहे म्हणून त्याचं हित सांभाळण्यासाठी आणि तुला खूष करण्यासाठी त्या दासीने हे काम केलं असलं पाहिजे.''

या घटनेनंतर लौकरच रामसेनने भाग्य-पुरीच्या दिव्यदत्तला सौभाग्यपुरचा अधिकारी म्हणून नेमले व भव्यवर्माला त्याने भाग्यपुरीला धाडले.

ही गोष्ट सांगून वेताळाने राजाला विचारले, ''हे राजन, रामसेनने ही नियुक्ती केली त्याच्यावरुन असं स्पष्ट दिसत नाही कां की त्याला भव्यवर्मा व दिव्यदत्ताच्या कारभाराचे नीट मूल्यमापन करता आले नाही? कर्तव्यदक्ष व लोकप्रिय दिव्यदत्तला सौभाग्यपुरचा अधिकारी नेमणे आणि अकार्यक्षम व चैनी भव्यवर्माला भाग्यपुरीचा अधिकारी नेमणे, हा रामसेनने घेतलेला निर्णय उतावळा व अयोग्य आहे असं तुला वाटत नाही कां? माझ्या शंकांचं उत्तर तुला माहीत असूनदेखील जर तू मौन पाळलंस तर तुझ्या मस्तकाचे असंख्य तुकडे होतील.''

तेव्हां विक्रमार्क म्हणाला, ''राजा रामसेनने मुख्यत: दोन्ही नगरांच्या प्रजेच्या हितासाठीच हा निर्णय घेतलेला होता. दिव्यदत्ताच्या कारभारामुळें भाग्यपुरची प्रजा दीर्घकाल सुखी होती. नवीन नेमलेल्या भव्यबर्माची विलासी जीवनशैली व प्रजेबाबत दुर्लक्ष या नागरिकांनी फार काळ सहन केलं नसतं. त्यांनी आपल्या दुर्दशेबद्दल राजाकडे तक्रार केली असती. म्हणजे राजालाही त्या पदावरुन भव्यवर्माची उचलबांगडी करता आली असती. त्या परिस्थितींत राणीदेखील राजाशी सहमत झाली असती. आता सौभाग्यपुरबद्दल म्हणायचं तर नवा अधिकारी दिव्यदत्त तिथली वाईट स्थिती सुधारण्यासाठी निश्चितच आटोकाट प्रयत्न करील व सौभाग्यपुरची स्थिती भाग्यपुर-सारखीच वैभवशाली बनवील. हा विचार करुनच राजा रामसेनने हा निर्णय घेतला. म्हणून त्याला अयोग्य व उतावळा निर्णय म्हणता येणार नाही.''

राजाचा मौनभंग करण्यांत यशस्वी झालेला वेताळ पुन्हां एकदा शवासहित अदृश्य झाला नि झाडावर जाऊन बसला.

*(सुभद्राच्या कथेवर आधारित)*






## केशदान



तुम्ही कधी तिरुपतीला गेला आहात? या तीर्थक्षेत्रांत तुम्हाला एक आगळे दृश्य दिसते. डोक्यावरचे केस कापून अगदी तुळतुळीत गोटा केलेली असंख्य डोकीं इथें दिसतात. ते पाहून नवखा माणूस बुचकळ्यांत पडतो. पण जरा चौकशी केली तर हे सर्व स्त्रीपुरुष व लहान मुलें ही भक्तमंडळी आहेत हे समजते. आंध्रप्रदेश व तमिळनाडमधून मोठ्या संख्येने येणारी मंडळी आपले केस वेंकटेश्वराला आनंदाने अर्पण करतात. अनेक बालकांचे पहिले जावळ तिरुपतीला किंवा दुसऱ्या एखाद्या तीर्थक्षेत्रांत जाऊन करण्याची तमिळनाडमधें प्रथा आहे. आता देवाला हे केंस कशासाठी द्यायचे? भक्तांची श्रद्धा आहे कीं देवापुढें प्रसाद देण्याबरोबर त्याग व समर्पणाची भावनाही तितकीच महत्वाची आहे. प्रत्येक व्यक्तीला आपला केशकलाप प्रिय असतो, आणि तोच देवाला अर्पण करणें हा मोठाच त्याग ठरतो.

## मिरीं - प्रसादाची



तुमच्या दैवताला तुम्ही गुलाब, मोगरा, झेंडू किंवा जास्वंदीची फुलें वाहात असाल ना? तुम्ही मिरींदाणे देखील वाहूं शकता. होय, तिखट मिरीं!

उत्तर केरळमधल्या कोडुंगल्लूरमधें भद्रकाली किंवा दुर्गेचे मंदिर आहे. तिथल्या देवतेला इतर वस्तूंबरोबर मिरींही वाहिली जातात. काली म्हणजे काळा, मिऱ्याचा रंग! देवीचा आजार येऊं नये म्हणून या देवतेची उपासना










# सोन्याचे अंडे

पांढरीपूर गांवात धनिया नांवाचा एक शेतकरी होता. त्याला गोपाळ व गोविंद असे दोन मुलगे होते. दोघांची लग्ने झाली होती. धनियाचे प्रशस्त घर होते व सर्वजण मिळूनमिसळून राहात होते.

धनियाजवळ चार एकर जमीन होती. तो जेव्हां म्हातारा झाला तेव्हां शेतीवाडीचे सर्व काम त्याने आपल्या मुलांच्यावर सोंपवले. गोपाळ रोज लवकर उठून शेतावर जाई, पण गोविंद आळशी होता. तो उशीरा उठायचा व दिवसभर मनोराज्यें करीत बासयचा.

गोविंदच्या बायकोला, राधाला, आपल्या नवऱ्याचा हा आळशीपणा बिलकुल आवडत नव्हता. ती त्याला वारंवार सांगायची, "अहो, जेव्हां पाहावं तेव्हां हवेंत मनोरे कसले बांधत बसता? शेतावर जाउन भावजींना जरा मदत करायला काय झालं?"

पण गोविंदवर कांही त्याचा ढिम्म परिणाम झाला नाही. तो तिला मख्खपणें उत्तर द्यायचा, "तू कशाला काळजी करतेस? जरा एकदा सोन्याची अंडी देणारी बदकीण माझ्या हातांत येऊं दे कीं मग बघ! मी कष्ट न करताच लक्षाधीश होईन."

गोपाळ व त्याची पत्नी अत्यंत सुस्वभावी होती, त्यामुळें ती दोघे याकडे फारसे लक्ष देत नसत. व गोविंदबद्दल तक्रारही करीत नसत. असेच दिवस चालले होते. एके रात्रीं एक अनोळखी तरुण गोविंदाच्या घरीं आला. खाटेवर सुस्तपणे पहुडलेल्या गोविंदाने उठून त्याला विचारले, "कोण तुम्ही? कुणाला भेटायचंय?"

"माझं नांव हरी. मी जवळच्याच गांवातला आहे. दुसऱ्या गांवी कांही जरूरीचं काम निघालं म्हणून निघालो आहे. पण आता अंधार पडला. तेव्हां मी तिथें अपरात्रीं पोंचेन. कृपा करुन मला इथें रात्रीपुरता आसरा द्याल कां? सकाळ झाली कीं मी निघून जाईन." हरीने नम्रपणें विचारले.

"ठीक आहे. या ओसरीवर तुला एक खाट द्यायची व्यवस्था करतो. आमच्याबरोबर जेव आणि आरामांत झोंप." गोविंदने सांगितल्याप्रमाणे त्याची व्यवस्था केली.

[illegible] हरीला अंथरूण देत होता, तेव्हां हरीच्या हातांत सोनेरी रंगाची चमचमणारी कोंबडी गोविंदला दिसली. ती पाहून त्याला आश्चर्य वाटले व तो म्हणाला, "हे काय? ही कोंबडी तर सोन्यासारखी चमकतेय!" हरीने हंसतमुखाने म्हटले, "ही खरोखरीच सोन्याची कोंबडी आहे. ती सोन्याचे अंडे देणारी आहे."

"काय सांगतो आहेस? कोंबडी कधी सोन्याची अंडी देते तरी कां?" गोविंदने विचारले.

हरीने चटकन आपल्या खांद्यावरच्या पिशवींतून एक चमकणारे अंडे काढले आणि ते दाखवून म्हटले, "बघ, हे याच कोंबडीने दिलेले अंडे आहे. महिन्यांतून एकदा ती असले अंडे देते."

"ही कोंबडी खरंच कां तुझ्या मालकीची आहे? ही घेऊन तू कुठे जातो आहेस?" गोविंदाचे डोळे आश्चर्याने विस्फारलेले होते. कोंबडीकडे पाहात तो प्रश्नावर प्रश्न विचारूं लागला.

"एका मांत्रिकाने मला ही कोंबडी दिली आहे. पण हिला पोसण्याची माझ्यांत शक्ती नाही, म्हणून [illegible]जारच्याच गांवातल्या माझ्या एका नातेवाईकाला ही विकावी म्हणून मी कोंबडी घेऊन चाललो आहे." हरीने अगदी केविलवाण्या स्वरांत सांगितले. त्याच्या बोलण्यावरुन त्याची दीन अवस्था स्पष्टपणें समजत होती.

गोविंदने मोठ्या सहानुभूतिपूर्वक त्याला विचारले, "या कोंबडीला तू पोटभर खायला कां घालूं शकत नाहीस? ही काय हिरे खाते कीं माणकें?"

हरीने क्षणभर थांबून उत्तर दिले, "असं कांहीच नाही ही खात. हिचा आहार जरा विचित्र आहे. ही रोज साधीच अंडी घालते. पण तिच्या मालकाने मेहनत करून काढलेले धान्य खाऊनच ही महिन्यांतून एकदा सोन्याचे अंडे देते. ते धान्य खातखात तिचे अंडे सोन्याचे होते. मी तर अगदीच गरीब आहे आणि गांवात माझी स्वतःची कांही शेतीवाडी नाही."

गोविंदच्या मनांत आलं की कांहीही करून ती कोंबडी आपण मिळवायचीच. त्याने हरीचे दोन्ही हात धरले आणि त्याला आर्जवून सांगितले, "हे





बघ मित्रा, माझा भाऊ व मी मिळून आमच्याकडे चार अेकरांचं शेत आहे. माझ्या वांटणीचे दोन अेकर आहेत. त्यांत मी बीं पेरीन आणि जे धान्य उगवेल त्यांतून या कोंबडीला पोटभर खाऊं घालीन. तेव्हां ही कोंबडी तू मलाचा वीक.''

हरी आता बुचकळ्यांत पडला. नंतर तो म्हणाला, ''ठीक आहे, या कोंबडीची किंमत कांही तू आत्ता लगेच चुकती केली पाहिजेस असं नाही. तू मेहनत करुन जे धान्य पिकवशील त्यांतलं एक पोतंभर धान्य माझ्यासाठी बाजूला ठेवून दे. सहा महिन्यानंतर पुन्हां इथे मी येईन. त्या पोत्यांतलं धान्य तू मला दिलंस कीं झालं. मला तेवढं पुरे आहे.''

गोविंद मनताच खूष झाला. ''देवाशपथ, मी माझा शब्द पाळीन'' असं म्हणून त्याने ती कोंबडी आपल्या हातांत घेतली.

दुसऱ्या दिवशी सकाळ होताच हरी गांवी परत गेला. गोविंदने गोपाळशी बोलणी केली आणि आपल्या वांटणीचा दोन एकरांचा हिस्सा आपल्याला मिळावा असा हट्ट धरला. आपण स्वतःच शेती करणार असून गोपाळवर अवलंबून राहाण्याची आपली इच्छा नाही असे त्याने स्पष्ट सांगितले. गोविंदाचा हा पवित्रा पाहून प्रथम गोपाळ चकित झाला. पण नंतर मात्र त्याने या प्रस्तावाला मान्यता दिली.

त्या दिवसापासून गोविंद सकाळींच उठून शेतांत जाऊं लागला. दिवसभर तो कामांत गुंतलेला असे. ज्या दिवशी नवीन धान्य हातांत येईल त्या दिवसाची तो मोठ्या उत्सुकतेने वाट पाहूं लागला.

असे कांही महिने गेले. शेतांत छान पीक डोलत होतं. कापणी झाली आणि धान्याची पोती भरभरुन गोविंद घरी घेऊन आला. अखेर ती शुभवेळा आली होती.

घरांत सगळीकडे धान्याची पोती होती. ती पाहून राधा आनंदाने फुलून गेली. कुणाचीही मदत न घेता गोविंदाने हे सारे कष्ट एकट्याने उपसले, त्याबद्दल गांवकरी देखील त्याची स्तुती करायला लागले.

गोविंदाने मोठ्या प्रेमाने आपल्या कोंबडीवरुन हात फिरवला. आपल्या मेहनतीने पिकवलेल्या धान्यांतले दाणे त्याने तिला भरवले. ती कोंबडीही आनंदाने ते दाणे मटकावूं लागली.

एक महिना उलटला. गोविंद अस्वस्थ झाला होता. ती कोंबडी सोन्याचे अंडे केव्हां देतेय याची वाट पहात होता. तसं पाहिलं तर ती कोंबडी साधी अंडी देत होतीच. पण तिला कितीही धान्य खाऊं घातलं तरी ती कांही सोन्याचे अंडे देईना. गोविंदला वाटलं कीं हरीच्या सांगण्यानुसार त्या अंड्यांच्या रंग सोन्यासारखा व्हायला लागेल. पण तसंही होईना. गोविंदाने अंडी फोडून पाहिली, पण त्यांत सोने नव्हते. तो अगदी निराश झाला. हरीवर संतापलादेखील! या लबाड हरीला आता आपण चांगला धडा शिकवायचा असा त्याने निश्चय केला. तो आता हरीची वाट पाहूं लागला.

एके दिवशी हरी गोविंदाच्या घरी येऊन पोंचला आणि त्याने मोठ्या प्रेमळपणे गोविंदाला विचारले, ''कसा आहेस? सारं कांही ठीकठाक चाललंय ना?'' पण गोविंदाने त्याला रागावत उत्तर दिले, ''तू मला चांगलं फसवलं आहेस. तुझ्या कोंबडीला सोन्याची अंडी देता येत नाहीत.''

त्यावर हरी मोठ्याने हंसला आणि गोविंदाच्या खांद्यावर हात ठेवून म्हणाला, ''बघ, मी कांही तुला फसवलेलं नाही. ती आता कांही माझी कोंबडी नाही, ती तुझी आहे. तिने सोन्याचे अंडे दिलेले आहे. तिच्या अंड्यामधे सोने नसले, तरी तुझ्या पिकामधे आहे ना! खूप मेहनत करुन, आळस झटकून टाकून तू एकट्याने एवढं सारं पीक निर्माण केलेलं आहेस. तुझ्या घरांत जी धान्याच्या पोत्यांची थप्पी लागली आहे. ती सोन्यासारखीच आहे ना?'' हरीने गंभीर होऊन विचारले.

या प्रश्नाचे काय उत्तर द्यावे हे हरीला उमजेना. थोडा वेळ तो स्तब्ध राहिला. नंतर, स्वतःला सांवरत तो म्हणाला, ''होय हरी, तुझं म्हणणं खरं आहे. आता माझ्या घरांत सोन्याचे अंडे देणारी कोंबडी खरोखरच आहे. पण मला एक शंका आहे. तू आळस आणि दिवास्वप्नें यांच्या कचाट्यांतून मला सोडवले आहेस. तू माझा दूरचा कुणीतरी नातलग तर नाहीस ना?''

''नाही, नाही, मी तुझा नातेवाईक नाही. शेजारच्या गांवात मी राहातो. तिथल्या शाळेंत मी शिकवतोय सध्या! या गांवांतून येताजाताना लोकांकडून तुझ्याबद्दल मी ऐकलं होतं. सोन्याचे अंडे देणारे बदक तुझ्या मनांत ठसलंय आणि तू त्याबद्दल हवेंतले किल्ले बांधतोस असं ऐकलं होतं. मला या गोष्टीचं नवल वाटलं. सोन्याचे अंडे देणारी कोंबडी असली काय अन् बदक असले काय, त्याने काय फरक पडणाराय? म्हणून मी कोंबडी घेऊन आलो इतकंच'' हरीने हंसत हंसत उत्तर दिले.





# वृक्षावरची देवी

पारिजातक हा कल्पवृक्ष देवलोकांत आहे. तुम्ही जे मागाल ते हा वृक्ष देतो. सुनंदा अप्सरेला वाटलं कीं ती देवेंद्राची पत्नी व्हावी. आपली इच्छा पूर्ण करण्यासाठी ती त्या वृक्षानजीक गेली. परंतु अचानक तिला आपली इच्छा आठवेनाशी झाली. जशी ती त्या वृक्षापासून लांब गेली, तशी तिला इच्छा आठवली. असं अनेकवेळा घडलं. एकदा ती त्या पारिजातकाजवळ जाऊन म्हणाली, "अरे पारिजाता, मी तुझ्यानजीक आले कीं आपली इच्छा विसरून जाते. तू मला असा वर दे कीं माझी इच्छा मी विसरणार नाही."

"ते जमणार नाही, वरदान देणे हे परमेश्वराचे काम आहे. जे कुणी कांहीतरी मागतात, ते देणें हे माझे काम आहे." पारिजातकाने उत्तर दिले.

"तर मग माझी इच्छा कशी पूर्ण होईल?" सुनंदाने विचारले. "तुझी इच्छा मला माहीत आहे. पण ती गैर आहे. तू एका पतिव्रता स्त्रीच्या पतीची पत्नी होऊं इच्छितेस. म्हणून मी ती इच्छा तुला विसरायला लावतो. तुला हवं असेल ते इतर कांहीही माग. मी तुझी इच्छा पूर्ण करीन." पारिजातकाने खुलासा केला.

सुनंदा नाराज होऊन म्हणाली, "इच्छापूर्ती करण्याऐवजी तू इच्छा विसरायला लावलोस. तेव्हां मी कशाला तुझं ऐकूं?" आणि तिने त्याच्या चार डहाळ्या रागाने तोडून फेकून दिल्या.

वृक्ष चिडून तिला म्हणाला, "तू माझ्या फांद्या तोडल्यास? आता मी तुला शाप देतो कीं यापुढें तू पृथ्वीवरच राहशील. देवलोकांत आता तुला जागा नाही. ज्या वृक्षाच्या फांद्या तुटल्या आहेत, अशा एखाद्या वृक्षावरच तुला राहावं लागेल."

सुनंदा घाबरून त्याला विनवायला लागली, "तुझ्यामुळें माझी इच्छापूर्ति होत नव्हती. तेव्हां रागाने मी फांद्या तोडल्या. तेव्हां माझ्या या चुकीच्या वागण्यांत तुझीदेखील भागीदारी आहे. तेव्हां फक्त मलाच शिक्षा कशाला?"

"परमेश्वराची इच्छा आहे कीं कल्पवृक्ष म्हणून माझ्या हातून सत्कर्म व्हावे. त्याने इतरांच्या इच्छेवर नियंत्रण ठेवण्याची शक्ती मला दिली. पण तुझा राग आवरण्याची शक्ती मला दिलेली नाही. म्हणून माझ्या चार फांद्या तू तोडल्यास. त्यामुळें मला किती वेदना झाली ते तुला ठाऊक नाही. ही माझी शिक्षा होती. आता तुला तुझी शिक्षा भोगलीच पाहिजे. पृथ्वीवर तू ज्या वृक्षावर राहशील, आणि त्या वृक्षाची पीडा जाणशील, तेव्हांच तुझी चूक तुला कळेल. त्यासाठीच तर मी तुला शाप दिला आहे." पारिजातक म्हणाला.

जेव्हां सुनंदाला समजलं कीं आता या शापांतून मुक्त होण्याची शक्यता नाही, तेव्हां तिने पारिजातकाला विनंती केली, "माझ्या साऱ्या शक्ती निष्प्रभ होणार नाहीत असा तू मला वर दे."

"तुझ्या साऱ्या शक्ती पृथ्वीवरही समर्थशाली राहतील. परंतु त्यांचा उपयोग परोपकारी कामांसाठीच झाला पाहिजे." पारिजात म्हणाला.

दुसऱ्याच क्षणीं सुनंदा पृथ्वीवर उतरली. एका घराच्या मागल्या अंगणात एक झाड होते, त्यावर ती राहूं लागली.

ती झाडावर बसली होती, तितक्यांत त्या घराचा मालक कोदंडराम तिथे आला, आणि त्याने त्या झाडाची एक फांदी तोडली. सुनंदाला वाटलं कीं कुणीतरी तिचा हातच तोडतंय. ती वेदनेने कळवळली व कण्हायला लागली.



तो आवाज ऐकून कोदंडराम घाबरला व झाडाकडे एकटक पाहूं लागला.

"माझी फांदी तू कां रे तोडलीस? मी तुझं कांही नुकसान केलं होतं कां?" सुनंदाने ओरडून विचारलं.

कोदंडरामला ही देवी कांही दिसली नव्हती. त्याला वाटलं कीं झाडच आपल्याशी बोलतंय. तो म्हणाला, "स्वयंपाकाची लांकडे संपली आहेत. विकत घ्यायला माझ्याकडे पैसे नाहीत. म्हणून माझा नाईलाज झाला."

- वसुधा -



सुनंदा त्याच्यासमोर प्रकट होऊन म्हणाली, ''हा वृक्ष कित्येक वर्षे मानवाची सेवा करतो आहे. हा परमेश्वराचा प्रियवृक्ष आहे. त्यानेच मला या वृक्षाची सेवा करण्यास सांगितले आहे. मी या वृक्षावरची देवी आहे. यापुढें कोणत्याही झाडावर अपकार करुं नकोस. तुला जे हवे असेल ते माझ्याकडे माग, मी तुला देईन.'' असं म्हणून तिने तिथेच एक जादूची चूल निर्माण करुन त्याला दिली.

जेव्हां जेव्हां कोदंडरामला स्वयंपाक करायचा असे, तेव्हां ती चूल आपोआप पेटायची. काम झालं कीं विस्तव विझून जायचा. त्यानंतर चारच दिवसांनी तो कुऱ्हाड घेऊन पुन्हां झाडापाशी आला.

सुनंदादेवीने त्याला पाहून त्याचं कारण विचारलं. कोदंडरामने उत्तर दिलं, ''माझी आई फार आजारी आहे. तिला औषध देणारा वैद्य फार मोठी रक्कम मागतो आहे. तेव्हां आता हे घर विकून टाकण्याखेरीज मला गत्यंतर नाही. हे घर विकत घेणारा गृहस्थ म्हणतोय कीं मागल्या बाजूचं हे झाड जर तू तोडून टाकलंस तरच मी घर विकत घेईन.

कारण घराच्या पाठीमागे झाड असणं त्याला अशुभदायी वाटतंय. म्हणून हे झाड आता मी मुळापासूनच उखडून टाकतो.'' असं म्हणत त्याने कुऱ्हाड वर उचलली.

सुनंदाने त्याला थांबवत म्हटले, ''तुझ्या आईला तू आणून या झाडाखाली निजवून ठेव. इथल्या मोकळ्या हवेने तिला दोनतीन दिवसांत बरे वाटेल बघ. माझ्यावर विश्वास ठेव.''

कोदंडरामने सुनंदाच्या सांगण्यानुसार केले. दोन दिवसांतच त्याच्या आईची प्रकृति



सुधारली. त्या दिवसापासून त्याचे सारे कुटुंबीय त्या झाडाची पूजा करायला लागले. ते जे कांही मागत, ते त्यांना त्या वृक्षापासून मिळायला लागले, व तो कल्पवृक्ष मानला जाऊं लागला. गांवातल्या इतर लोकांना जेव्हां समजलं तेव्हां ते देखील येऊन आपापली इच्छा पूर्ण करुन घेऊं लागले.

अशा रीतीने झाडावरच्या देवीने अनेक लोकांना मदत केली. आजारी लोकांना बरे केले. परंतु येणाऱ्यांपैकी ज्या कांही लोकांना आपल्या दंडेलशाहीने इतरांना त्रास द्यायचा होता, त्या लोकांची इच्छापूर्ती मात्र देवी करत नव्हती. हे लोक नाखूष होऊन देवीबद्दल उलटसुलट बोलूं लागले.

सुनंदाला जेव्हां हे कळलं तेव्हां तिने मनोभावे पारिजातवृक्षाची प्रार्थना केली, ''हे वृक्षदेवा, मला असा वर दे कीं येणाऱ्या लोकांच्या इच्छा मला अगोदरच कळतील, आणि जर कुणाच्या वाईट इच्छा असल्या तर त्या इच्छा ते विसरून जातील!''

सुनंदाच्या कानांत पारिजातकाचा आवाज गुंजला, ''आत्ता तुला खरे ज्ञान प्राप्त झाले आहे. ज्या वृक्षजातीने आजपर्यंत तुला आसरा दिला, त्या वृक्षजातीवर तू आणखी उपकार केलेस तर तू शापमुक्त होशील, आणि पुन्हां स्वर्गलोकांत येशील.''

हे ऐकून सुनंदा आनंदून गेली. परोपकार करण्यासाठी उपयोगी पडणाऱ्या आपल्या साऱ्या शक्ती तिने वृक्षांच्या निरनिराळ्या जातींना वाटून दिल्या आणि ती स्वर्गात परत गेली.

तेव्हांपासून झाडें ही देवतास्वरूप बनून मानवजातीवर उपकार करीत आहेत व मानवांचा फायदा करुन देत आहेत.

या झाडांचे, मानवाला वरदान देणाऱ्या हिरवाईचे रक्षण करणें, संवर्धन करणे हे प्रत्येकाचे कर्तव्य आहे.

प्रत्येकाने जमेल तेव्हां आयुष्यांत किमान पांच उपयुक्त झाडें लावावी व त्यांचे जतन करावे असा उपदेश आपल्या पूर्वजांनी केलेला आहे.





# भारताची ओळ[illegible]

*तुम्हाला वाचनाची आवड असेल तर तुम्ही आपल्या पुराणांतील गोष्टी वाचल्या असतीलच. तुम्हाला अनेक प्रसंग आठवतात, पण व्यक्ती व स्थळें यांच्या नांवांचा विसर पडतो. या महिन्याची प्रश्नावली तुमच्या स्मरणशक्तीला ताण देणारी आहे. तुमची उत्तरें नीट लिहून जपून ठेवा व आमची उत्तरें प्रसिद्ध होतील तेव्हां ताडून बघा.*

१. आपल्या पौराणिक कथेनुसार सप्त चिरंजीव कोणकोण आहेत?
२. देवांचा धनकोष सांभाळणारा खजिनदार कोण आहे?
३. सूर्याच्या पत्नीचे नांव काय?
४. गणेश व कार्तिकेय या दोघा भावंडांना आपल्या मातेकडून कांहीतरी हवे होते. म्हणून तिने त्यांच्यासाठी एक स्पर्धा लावली. तिच्या हातांत ती कोणती वस्तू होती?
५. महाभारतांत, सत्यवती ही एक धीवरकन्या होती. तिच्या नांवावरोबर एका पितापुत्रांचे नांव जोडले जाते. त्यांची नांवे सांगा.
६. छोट्या भरताला सिंहाच्या छाव्यांशी खेळायला आवडत असे. त्याचे दुसरे नांव कोणते?
७. अर्जुनाने जेव्हां भीष्माचार्यावर अखेरचा बाण सोडला, तेव्हां तो एका व्यक्तीच्या आड लपला होता. त्यामुळें भीष्मांना प्रत्युत्तरादाखल बाण सोडणे शक्य झाले नाही. ते नांव कोणते आहे?
८. काकुत्स्थ, त्रिशंकू व अंबरीश यांच्यात कोणते साम्य आहे?
९. पृथाचे दुसरे नांव सर्वांना माहीत आहे. ते नांव कोणते?

**(उत्तरें पुढील अंकीं)**

## २००३ फेब्रुवारींतल्या प्रश्नावलीची उत्तरें

१. १९५१ - नवी दिल्ली
२. अप्पू हत्ती
३. चंद्रराम. त्यांना १ तास २९ मिनिटें व २९ सेकंद लागले.
४. आठ वेळां - १९२८, १९३२, १९३६, १९४८, १९५२, १९५६, १९६४ व १९८०.
५. पी.टी. उषा
६. कमलजित संधू
७. अ) स्त्रियांचे क्रिकेट, ब) आंतरशालेय फुटबॉल क) गॉल्फ
८. अ) मिल्खा सिंग, ब) सुनील गावसकर क) ध्यानचंद
९. १९५८ मधें मिहीर सेन; अटलांटिकमधून पनामा कालवा पार करुन पॅसिफिक महासागरांत पोहत जाणारा तो पहिलाच बिगरअमेरिकन नागरिक होता.
१०. प्रकाश पडुकोण, १६ वर्षे.
११. हिमाचल प्रदेशांत सिमल्याजवळच चैल इथें.





# गणेश पुराण

पांडवांनी नारदाच्या सांगण्याप्रमाणे गणेशाची आराधना करण्याच्या हेतूने धौम्य ऋषींना पुरोहित करून गणेशव्रत केले आणि वेष पालटून विराट राजाच्या दरबारात अज्ञातवास यशस्वीरीत्या पुरा केला. श्रीकृष्णाच्या मदतीने पांडवांनी कौरवांचा युद्धात पराभव केला. हस्तिनापूर येथे धर्मराज युधिष्ठिर याचा राज्याभिषेक झाला व तो राज्य करू लागला. त्याने अश्वमेध यज्ञ करण्याचे ठरवून यज्ञाचा घोडा सोडला. घोड्याबरोबर अर्जुन सैन्य घेऊन निघाला. त्यावेळी पांडवांचे पुरोहित धौम्य मुनीही त्यांच्याबरोबर होते.

यज्ञाचा घोडा अनेक राज्ये पादाक्रांत करीत निघाला. कित्येक राजांनी नम्रपणे धर्मराजाचे अधिच्छत्र मान्य केले. घोडा जात जात एका जागी थांबला व एक पाऊलही पुढे टाकेनासा झाला. अर्जुनाला त्या गोष्टीचे आश्चर्य वाटले व त्याने धौम्य ऋषींना त्याचे कारण काय असू शकेल असे विचारले. धौम्य 'सांगतो चल' असे म्हणत पुढे निघाले. अर्जुन सैन्यासह त्यांच्या पाठीमागून निघाला. कांही अंतर चालून गेल्यावर एक मोठे नगर दिसले. त्या नगराच्या मध्यभागी एक विशाल गणपतीची मूर्ती होती. एका मोठ्या खडकाला कोरूनच ती मूर्ती तयार केली होती. ती मूर्ती अत्यंत सुंदर होती.

"अर्जुना, या गणेशमूर्तीची पूजा कर व या देवाला साष्टांग नमस्कार घाल. नंतर मी वातापि गणपति या नांवाने प्रसिद्धी पावलेल्या या देवाची व नगराची कथा सांगतो" धौम्यऋषी म्हणाले.

अर्जुनाने धौम्य मुनींच्या सांगण्याप्रमाणे पूजा



केली आणि भक्तिपूर्वक वातापि गणपतीला साष्टांग प्रणाम केला. त्यानंतर धौम्य मुनी वातापि नगराच्या दिशेने निघाले. त्यांच्या पाठोपाठ अर्जुनाने जाऊन वातापि नगर पाहिले. एके काळी ते नगर फार भरभराटीला पोचले होते, या गोष्टीची चिह्ने तेथे स्पष्ट दिसत होती, परंतु तेथे वस्ती नसल्याकारणाने आज ते एक ओसाड नगर झाले होते. कांही मोजके लोकच त्या गांवात रहात होते. अर्जुनाला त्या नगरांत आलेला पाहून त्यांनी आनंदाने त्याचे स्वागत केले आणि त्या नगरांत राज्यव्यवस्था कायम करून त्या नगराचा पुनरुद्धार करण्यासाठी विनंती केली.

धौम्य मुनी म्हणाले - "अर्जुना, वातापि नगर ते हेच, शहराच्या मध्यभागी जी गणेशाची मूर्ती आहे तिची स्थापना अगस्त्य मुनींनी केली. याचे शिल्प अद्भुतच आहे. हे वातापि गणपति क्षेत्र या नावे प्रसिद्ध आहे. याचे महात्म्य मी सांगतो.

''गंगा नदी, कवेर नावाच्या राजर्षींच्या कमंडलात अवतरली आणि कावेरी हे नाव धारण करून त्याच्या आश्रमांत लहानाची मोठी झाली. अगस्त्य मुनींनी त्या मुलीला पाहून तिच्याशी लग्न करण्याची इच्छा कवेर यांच्या समोर व्यक्त केली.

कवेरने आपली संमती दिली व म्हणाले - "अगस्त्य मुने! कावेरीची संमतीसुद्धां घेणे बरोबर होईल नाही का?''

अगस्त्य मुनी आश्रमात कावेरी बरोबर असताना ती त्यांना म्हणाली - ''सह्याद्री पर्वतावर हिंडावं फिरावंसं मला वाटतं आहे.'' अगस्त्य तिला सह्याद्री पर्वतावर भ्रमण करायला घेऊन गेले.

बनविहार करीत असतां एका लहानशा तलावांत तिने कमळे उमललेली पाहिली व ती काढायला धांवत तलावात गेली व गंमत अशी की पाण्यांत पाऊल पडताच ती पाणी होऊन वाहू लागली आणि वाहात पूर्वेकडे समुद्रापर्यंत गेली. तिला कावेरी नदी हे नाव मिळाले.

अगस्त ऋषी कावेरीचाच ध्यास धरून कित्येक दिवस ब्रह्मचारी राहिले. त्यानंतर त्यांनी घोर तपश्चर्या केली व ते ऋषि श्रेष्ठ झाले. एके दिवशी अरण्यांत उलटे लोंबत असलेल्या पितरांना पाहिले व विचारले - "तुम्ही कोण व असे कां लोंबतां आहात?''

निःश्वास सोडीत पितर म्हणाले - ''आमचा वंशज अगस्त्य लग्न करून त्याला पुत्रसंतती लाभेपर्यंत आम्हाला असेच रहावे लागणार आहे!''

अगस्त्य ऋषींना दिव्य दृष्टीने विदर्भ देशाच्या राजाला कावेरीचा अंश असलेली लोपामुद्रा



नांवाची विवाहयोग्य कन्या असल्याचे दिसले. अगस्त्य ऋषी विदर्भ राजाकडे गेले व त्याच्या कन्येशी विवाह करण्याची इच्छा असल्याचे त्यांनी सांगितले.

कंदमुळें, फळें खाणाऱ्या व वल्कल वस्त्रे धारण करणाऱ्या या मुनीला, आपल्या सुकुमार राजकन्येला कसे द्यावयाचे? नकार दिला तर मुनी शाप देतील या भीतीने शंकाकुल झालेल्या राजाला लोपामुद्रा स्वतः येऊन म्हणाली - ''बाबा, मी अगस्त्य मुनींशी विवाहाला तयार आहे.''

विदर्भराजाने लोपामुद्रेच्या इच्छेप्रमाणे व मुनींनी इच्छिल्याप्रमाणे दोघांचे पाणिग्रहण करवून मुलीला मुनींबरोबर पाठविले.

अगस्त्य मुनी लोपामुद्रेबरोबर आपल्या आश्रमांत आल्यानंतर एके दिवशी तिला म्हणाले - ''माझे पितर पुन्नाम नरकात आहेत. त्यांचा उद्धार व्हायला तुझ्या पोटी मला पुत्रसंतती झाली पाहिजे. याचसाठी मी तुझ्याशी विवाह केला आहे!''

तेव्हां तिने आपल्या अंगावरच्या वल्कल वस्त्रांकडे पाहून उदास मुद्रेने म्हटले - ''तुम्हाला माहीतच आहे, मी एक राजकन्या म्हणूनच जन्माला येऊन वाढले आहे. तेव्हां विवाह झाल्यानंतर कां होईना, मला माझ्या योग्यतेची वस्त्राभूषणे देण्याची तुम्ही व्यवस्था करायला हवी होती, नाही कां? तेव्हां त्यासाठी धन संपादन करणे आवश्यक आहे, असे नाही कां वाटत तुम्हाला?''

अगस्त्य मुनींनी पत्नी जे म्हणाली त्याचा विचार केला आणि धनसंपादनार्थ ते निघाले. ते



अनेक राजांकडे गेले आणि राज्यकारभार सुरळीत चालविण्यास आवश्यक तेवढे धन ठेवून घेऊन बाकी धनातील योग्य तेवढे द्यावे अशी राजेरजवाड्यांना विनंती केली. परंतु एकाही राजाने कांही उरत असल्याचे सांगितले नाही. उलट म्हणाले - ''आम्हालाच धन पुरत नाही तेव्हां धनसंपादनाचा कांही मार्ग बसेल तर सांगावे.'' अशी विनंती केली.

अगस्त्य ऋषी हताश होऊन जंगलात भटकत एका मोठ्या शिलाखंडाजवळ आले. तो शिलाखंड त्यांना गणपतीच्या आकारासारखा वाटला. त्या शिलाखंडासच विघ्ननाश गणाधीश मानून त्यांनी नमस्कार केला आणि प्रार्थना केली - ''गणनायका! मला तपश्चर्या तेवढी कळते. धनसंपादनाला लागणारी विद्या मला माहीत नाही. तर मग मला धनप्राप्तीचा कांही मार्ग दाखविलास तर तुझे उपकार होतील!''

"तर मग, काय हो, मुनिवर्य! तुम्ही हे या दगडाला विचारीत आहा कां?" गणनायकाने दर्शन देऊन विचारले.

अगस्त्य मुनींनी गुडघे टेंकून नमस्कार केला व आपले दुःख निवेदन केले.

विघ्नेश्वर म्हणाला - "अगस्त्य मुने! तुम्ही जेथे यायला पाहिजे होतं तेथेच आलात की! कांही वेळाने इल्वल तुम्हाला जेवायला बोलवायला येईल तेव्हां तुम्ही जा. इल्वलजवळ अलोट धन खजिन्यांत कुजत पडले आहे. तुमच्या हातून होण्यासारखे एक कार्यही आहे!"

अगस्त्य मुनी म्हणाले - "विघ्नेश्वरा! मला या शिलाखंडात तुझे रूप दिसले, म्हणून ही शिळा अपूर्व गणपति नांवाने ओळखली जावी असे मला वाटते आहे. माझी ही इच्छाही पूर्ण व्हावी!"

विघ्नेश्वर म्हणाला - "तथास्तु!" आणि अंतर्धान पावला.

अगस्त्य मुनी फार दमलेले होते. त्यांना भूकही फार लागली होती. म्हणून त्या शिलाखंडास टेकून ते बसले असतां समोरून बरोबर कांही पाहुण्यांना बरोबरच घेऊन येत असलेला इल्वल दिसला. अगस्त्य मुनींना लवकरच सर्व गोष्टी कळल्या.

त्या अरण्यांत वातापि व इल्वल नांवाचे मोठे मायावी राक्षस ऋषींना, प्रवासी वाटसरूंना व तीर्थयात्रा करणाऱ्यांस ठार करून त्यांचे धन लुटीत होते आणि एका मोठ्या दगडी किल्ल्यांत धनराशी जमा करीत होते. एका धर्मभीरू राजाचे रूप घेऊन इल्वल आपल्याकडे आतिथ्य स्वीकारायला आलेल्या पाहुण्यांना आदरपूर्वक बोलावून त्यांना कुशलप्रश्न वगैरे विचारीत





असताना, वातापि हा एखाद्या बोकडासारखे रूप धारण करतो. इल्वल त्या बोकडाला मारून त्याचे मांस शिजवून आपल्या पाहुण्यांना वाटतो.

अतिथी मांस भक्षण करून विश्रांती घेत पडले असतांना इल्वल मोठ्याने ओरडून "वातापि" म्हणून हाक मारतो. वातापि अतिथि अभ्यागतांची पोटे फाडून बाहेर येतो. हे अगस्त्य मुनींना कळल्यावर ते संतापले.

इल्वल अगस्त्य मुनींजवळ आला व त्यांना पाहून त्याला वाटले की हे कोणी थोर मोठे मुनी आहेत. यांच्यासारख्या कित्येकांना ठार केले तर फायदाच फायदा आहे, असा विचार करून इल्वलने अगस्त्यांना जेवायला बोलाविले.



अगस्त्यांनी त्यांना फार भूक लागली असल्याचे दर्शवून म्हटले - "तुमच्यासारखे धर्मदाते या जगतांत आहेत म्हणूनच ही पृथ्वी आकाशांत अधांतरी स्थिर राहिली आहे. तर मग चला!" असे सांगून इल्वलबरोबर ते किल्ल्यांत गेले व म्हणाले - "अन्नदाता! मी कित्येक दिवसांपासून कांही खाल्लो प्यालो नाही. खूप भूक लागली आहे. मी एक सहस्र यज्ञ केले असल्याकारणाने मला बोकडाच्या मांसाशिवाय दुसरे कोणतेही मांस पचत नाही." असे सांगून इल्वलच्या हाती त्यांनी वातापीचा वध करविला.

अगस्त्य बोकडाला पाहून म्हणाले - "काय पण बोकड होता! मी एक सहस्र यज्ञ केले आहेत, परंतु या बकऱ्याच्या मांसासारखं मांस कधी मला खायला मिळालं नव्हतं! प्रथम मला याचं हृदय वगैरे मांसाचे मुख्य मुख्य तुकडे खायला वाढ. नंतर इतर तुकडे वाढ. नंतर उरलेले तुकडे इतरांना वाढ. मी प्रथम सांगून ठेवतो, गैर मानू नकोस, मी जितके खाऊं शकेन तितके मला वाढले पाहिजे, बरं का!"

इल्वलने बकऱ्याला भाजून काढले व मांस शिजवून अगस्त्यांना वाढले. किती वाढलं तरी अगस्त्य खातच गेले व सर्व बकरा त्यांनीच खाऊन पचविला.

इल्वलला आश्चर्याबरोबर थोडी थोडी भीतीसुद्धा वाटूं लागली. तो म्हणाला - "मुनिवर्य, आपण थोर धनपाठी दिसता आहा!"

अगस्त्य स्मित करून म्हणाले - "धनपाठी म्हणून माझं नांव आहे रे या पंचक्रोशीत! तर मग थोडे मद्य मागव पाहू! एक मोठे मडके भरून तरी लागेल!"

इल्वल आतां मात्र थक्कच झाला, म्हणाला - "मडके भरून व ते सुद्धा मोठे मडकं भरून तुम्हाला पाहिजे म्हणतां?"

अगस्त्य म्हणाले - "आपलं पोट आहे ना, त्यांत सप्त समुद्रसुद्धां जाऊन पुन्हां रिकामं राहील!"

इल्वल म्हणाला - "ठीक आहे, तर मग आपण आपल्याला हवं असेल तेवढे प्यावे. आमचा वातापि ते आणवून देईल! असे म्हणत त्याने मोठ्याने हाक मारली - "अरे वातापि!"

अगस्त्य हळूच म्हणाले - "आतां वातापि कोठे आहे? वातापि पुन्हां येणार नाही. जीर्ण झाला, पचला तुझा वातापि!" असे म्हणत त्यांनी पोटावर हात फिरविला व म्हणाले - "वातापि केव्हांच जीर्ण होऊन गेला!"

इल्वल प्राणभयाने थरथर कापू लागला आणि पळून गेला, कोठे गेला त्याचा पत्ताच लागला नाही. अशा तऱ्हेने वातापि आणि इल्वल यांचे भयंकर हत्याकांडाचे नाटक कायमचे थांबले.

त्यानंतर अगस्त्यांनी इतर अतिथि अभ्यागतांना जे घडले ते थोडक्यांत सांगितले आणि किल्ल्यांत जो अस्थिपंजरांचा व कवट्यांचा ढीग पडला होता, तो नेऊन दाखविला. ते दृश्य पाहून सर्वांनी आपल्या भाग्याला धन्यवाद दिले की अगस्त्य मुनींच्या कृपेने त्यांना जीवदान मिळाले. त्यांनी अगस्त्यांचे आभार मानून त्यांना नमस्कार केला. त्या किल्ल्यांत सुरक्षित स्थानी ठेवलेल्या कित्येक धनराशी अगस्त्यांनी जाऊन पाहिल्या. त्यांना हवे होते तेवढे घेऊन बाकीचे धन खर्च करून एक मोठे नगर वसविता येईल, सहस्रावधी लोकांचा उदरनिर्वाह चालू शकेल, असे त्यांना वाटले.

लगेच अगस्त्यांनी सर्वांना धन वांटण्यास सुरवात केली. जवळपासच्या राज्यांतून सहस्रावधी गरीब लोक तिकडे आले व अगस्त्यांनी दिलेले धन घेऊन आपापली घरे बांधून त्यांत सुखाने राहू लागले.

अगस्त्य मुनींना जो गणेशाकृतीचा शिलाखंड दिसला होता, त्याच्या चारी बाजूला एक मोठे नगर निर्माण झाले. वातापि राक्षसाला त्या जागी अगस्त्यांनी खाऊन जीर्ण केले होते. म्हणून त्याला वातापि नगर हे नांव प्राप्त झाले. अगस्त्यांनी आपल्या राज्याचे नियम शिलालेखांवर कोरून जागोजागी शिलाफलक लावून ठेवले. प्रजेचेच राज्य म्हणून एक आदर्श लोकतंत्र त्या नगरांत स्थापन झाले.







# शशांकचे कौशल्य

चित्रसेन महाराज चित्रदुर्गाचे शासनकर्ते होते. ते आपल्या प्रजेचा स्वतःच्या मुलांसारखा सांभाळ करीत. सर्व शस्त्रास्त्रांनी सज्ज असलेली मोठी सेना आणि रणनीति जाणणारा युद्धकुशल सेनापती असल्यामुळे शत्रूंचे देखील त्यांना भय नव्हते.

त्यांचे मंत्री चंद्रहास मोठे बुद्धिमान होते. त्यांनी वेळोवेळी दिलेले सल्ले महाराज अंमलात आणीत. त्यामुळे आसपासच्या राज्यांशी त्याचे चांगले संबंध जुळले होते.

महाराज चित्रसेनांना शिकारीचा मोठा नाद होता. जेव्हां सवड होईल तेव्हां ते जंगलात शिकारीस जात असत. त्यांच्या या छंदाचे जनतेला अतिशय कौतुक होते.

कांही दिवसांनी महाराजांनी आपला मुलगा कनकसेन याच्यावर राज्यभार सोपविण्याचे ठरवले, व एका शुभ मुहूर्तावर त्याला राज्याभिषेक केला.

चित्रदुर्ग एक संपन्न राज्य होते. त्यामुळे लोकांना कुठल्याही गोष्टीची कमतरता न भासता ते सुखासमाधानांत राहात होते. थोड्याच दिवसांत कनकसेनाने आपण आपल्या वडिलांचा मुलगा शोभतो हे सिद्ध केले.

प्रजा सुखी होती. राज्यांत सुबत्ता होती, शत्रूंचे भय नव्हते, त्यामुळे कनकसेन कलासाहित्याकडे वळला. त्याला चित्रकलेची आवड होती. राजभवनाच्या कलादालनात अतिशय सुंदर चित्रे होती, ती तो लहानपणा-पासून पाहात आला होता. या कलादालनांत चित्रदुर्गाच्या सहा पिढ्यांच्या शासकांची चित्रे होती. कनकसेनाचे वडिल चित्रसेन सातव्या पिढीतले होते. कनकसेनाच्या मनांत अशी

- अशोक -



इच्छा झाली की आपल्या आजोबा, पंजोबांच्या ओळींत आपल्या वडिलांचे पण चित्र असावे. त्याने तिथल्या चित्रकारांना आपल्या वडिलांचे एक चित्र बनविण्याची विनंती केली. त्याने अशी घोषणा केली की जो चित्रकार त्याच्या वडिलांचे सर्वांत सुंदर चित्र काढील, त्याला मोठे बक्षिस दिले जाईल.

ही घोषणा ऐकून राज्यांतल्या प्रसिद्ध चित्रकारांनी चित्रसेन महाराजांची चित्रे काढली व कनकसेनाला दाखवायला घेऊन आले. परंतु त्यांतले एकही चित्र कनकसेनाला आवडले नाही.

महाराजांचा उजवा डोळा तिरळा असल्यामुळे चित्रकारांनी आपल्या चित्रांत तो तसाच चित्रीत केला होता. यावर कनकसेन म्हणाला, ''मुख्य ज्ञानेंद्रिय डोळ्यांमधेच दोष आहे. भविष्यांतील पिढ्यांनी त्यांना असं बघणे योग्य नाही. म्हणून असे चित्र आम्ही कलादालनात ठेवूं शकत नाही.''

डोळा तिरळा नसलेली जी चित्रे काढलेली होती, ती बघून कनकसेन म्हणाला ''हे महाराजांसारखे दिसत नाहीत.''

एकही चित्रकार कनकसेनाला आवडेल असे चित्र काढूं शकला नाही.

त्या सुमारास शशांक नांवाचा एक तरुण चित्रकार पोटापाण्याच्या सोयीसाठी राजधानीत आला. त्याने पण राजाची घोषणा ऐकली होती. तो राजाला भेटून म्हणाला की चित्रसेन महाराजांचे सुंदर चित्र काढायचे कौशल्य त्याच्यांत आहे.

चकित होत राजा म्हणाला ''एवढ्या मोठमोठ्या चित्रकारांना जे जमलं नाही, ते तू कसं काय करणार? मी पण चित्रें पाहून पाहून कंटाळून गेलो आहे. तू जर नीट चित्र काढलं नाहीस तर तुला शिक्षा होईल. विचर करुन निर्णय घे.''

''महाराज, माझी एक विनंती आहे.'' शशांक म्हणाला. राजा शंकेने म्हणाला ''हं सांग काय सांगायचंय ते.''

''दोन दिवस सारा वेळ मला राजेसाहेबां-बरोबर राहावे लागेल. म्हणून आपण त्यांची तशी परवानगी मला मिळवून द्या.'' शशांक म्हणाला.

''बरं, उद्या ये.'' कनकसेन म्हणाला.

दुसऱ्या दिवशी शशांक राजवाड्यांत गेला. राजाची हालचाल, हावभाव त्याने बारकाईने नीट लक्ष देऊन बघितले.

यानंतरचे पंधरा दिवस तो महाराजांचे चित्र



काढण्यांत मग्न होता. एक दिवस दरबारांत आसनारूढ कनकसेनाला त्याने चित्र आणून दाखविले. ते चित्र पहाताच कनकसेन अगदी खूष झाला. आणि हसत त्याने ते चित्र दरबाऱ्यांना दाखवले. ते बघून दरबार आनंदाने खूष झाला आणि लोक टाळ्या वाजवूं लागले.

यावर सगळ्यांना नमस्कार करुन शशांक म्हणाला, ''जेव्हां महाराज चित्रसेनांचे नांव घेतले जाते, तेव्हां लोक अशा धर्मात्म्याची आठवण काढतात कीं ज्यांनी प्रजेला स्वतःच्या मुलासारखे सांभाळले आहे. त्यांचे कौतुक करण्यांत लोक कधीही दमत नाहीत. आपल्या सर्वांना माहीतच आहे कीं शिकार हा त्यांचा सहावा प्राण आहे. शिकारींत मग्न असलेल्या ह्या शूरवीर महाराजांमधे शोधून देखील आपल्याला उणीव सांपडणार नाही.''

प्रजेने पुन्हा एकदा आनंदाने जल्लोष केला. त्या चित्रकाराचे चित्र असे होते की चित्रसेन धनुष्यावर बाण चढवून थोड्या अंतरावरील वाघावर नेम धरत आहेत. त्या वेळी त्यांनी आपला उजवा डोळा बंद केला होता. त्यामुळे त्यांतला तिरळेपणा अजिबात दिसत नव्हता.

राज्यांतले प्रधान चित्रकार आपल्या आसनावरुन उठले. आणि शशांकला मिठी मारुन म्हणाले, ''चित्रकारांत उत्तम चित्रें काढण्याची कला. आणि चतुरपणा असायला पाहिजे, तो तुझ्यांत आहे. एका महान कलाकाराला आवश्यक असलेली कल्पनेची उत्तुंग भरारी, प्रतिभा व सूक्ष्म निरीक्षण करण्याची शक्ती तुझ्यांत आहे. तुझ्या चित्राचा जो विषय असेल त्यांतली उणीव टाकून ते चित्र कलेचा एक उत्कृष्ट आविष्कार बनवून टाकण्याची क्षमता तुझ्यांत आहे. म्हणून तू राजचित्रकार बनण्यास योग्य आहेस.

आम्ही तुझी नेमणूक दरबारांत करीत आहोत. तुझ्यामुळे आमच्या राज्यांत कलेचा गौरव होत राहील.''

राजाने शशांकला बहुमूल्य भेटवस्तू दिल्या. आणि त्याचा सन्मान केला. यानंतर कनकसेनाने कलादालनांत आपल्या इतर पूर्वजांच्या बरोबर शशांकने काढलेले चित्र लावले.





# सावकाराचा उपाय

कंटक हा एक मोठा चोर होता. यमुनापुरीच्या लोकांना लुटून त्याने त्यांची दुर्दशा केली होती. त्याचे नांव ऐकता क्षणी ते भितीने थरथर कांपत असत. तो अत्यंत हुषारीने सैनिकांना फसवून आपले काम साधत असे. हे बघून राजाने दवंडी पिटली की जो कोणी कंटकाला पकडेल त्याला एक लाख मोहरा बक्षिस मिळतील.

विश्वदत्त यमुनापुरीचा प्रमुख व्यापारी होता. तो कोणालाही फसवत नसे. सर्वांबरोबर योग्य व्यवहार करीत असे. लोक त्याच्या चांगल्या वागण्याचे खूप कौतुक करीत असत.

एक दिवस सूर्यास्ताला एक साधू त्याच्याकडे आला. तो विश्वदत्ताला म्हणाला, ''मी काशी रामेश्वराला जातो आहे'' विश्वदत्ताने त्याला त्या रात्री आपला पाहुणचार स्वीकारण्याची विनंती केली.

मध्यरात्री कांहीतरी आवाज ऐकूं आल्यामुळे तो जागा झाला. त्याने खिडकीतून डोकावून पाहिले तर आपली भगवी वस्त्रें काढून साधू रुपये, दागिने असलेले कपाट उघडण्यांत गर्क होता, तो त्याला दिसला. हा साधू नसून चोर आहे हे त्याच्या लगेच लक्षांत आले, आणि हा दुसरा तिसरा कोणी नसून कंटक डाकू आहे हे पण कळले. यमुनापुरीत जागोजागी राजाच्या घोषणेसकट त्याची चित्रे लावलेली होती.

विश्वदत्त घाबरला. कारण आत्तापर्यंत त्याने कधी कुणा चोराला बघितले नव्हते. आणि त्यांतून हा कांही साधासुधा चोर नाही. याने तर किती लोकांना लुटले आणि मारले होते. आता ही ब्याद कशी टाळायची? कांहीतरी युक्तीनेच हे काम होईल. त्याने विचार केला.

थोड्याच अंतरावर त्याची बायको दुसऱ्या पलंगावर झोपली होती. त्याने थोडा वेळ झोपण्याचे नाटक केले आणि मग मोठ्या आवाजांत म्हणूं लागला.

''काय ग एवढी डाराडूर झोपली आहेस! मी काय सांगतो ते लक्ष देऊन ऐक.''

विश्वदत्ताची बायको उठून बसली आणि म्हणाली की ''अशी काय गोष्ट आहे कीं त्यासाठी तुम्ही माझी झोपमोड केलीत?''

''एवढ्यांतच आपले कुलगुरु स्वामी सच्चिदानंद माझ्या स्वप्नांत आले.'' विश्वदत्त म्हणाला.

''स्वामीजी असे दिसण्यामागे नकीच कांही-तरी कारण असले पाहिजे. लवकर सांगा ना! ते काय म्हणाले?'' त्याच्या बायकोने विचारले.

''नीट लक्ष देऊन ऐक. खूप दिवस आपण आपल्या मुलीसाठी वरसंशोधन करतो आहोत. पण कांही उपयोग नाही. स्वामींनी सांगितलंय कीं शुक्रवारी सकाळी गांवाबाहेरच्या दुर्गा देवीच्या मंदिरासमोरच्या वडाच्या झाडाखाली ध्यानांत मग्न झालेला भक्त तुम्हाला दिसेल. त्याच्याशीच आपल्या मुलीचे लग्न करा. सर्व तऱ्हेने तो योग्य वर आहे. त्याच्याशी लग्न केल्याने तुमच्या मुलीचे आयुष्य सुखी होईल.'' विश्वदत्त म्हणाला.

''फारच चांगली गोष्ट सांगितलीत कीं हो तुम्ही. जय गुरुमहाराज! ही सगळी स्वामीजींची कृपा. आपण असंच करूं.'' बायको म्हणाली.

कंटकच्या कानावर पडले आणि तो नवराबाय-कोचे चाललेले हे बोलणे आणि तो अगदी खूष झाला. त्याने ऐकले होते की विश्वदत्त चांगलाच श्रीमंत आहे आणि त्याची साधू संन्याशांवर खूप श्रद्धा आहे. म्हणूनच तो त्याच्या घरी चोरी करायला आला होता.

कंटकने आपली भगवी वस्त्रें परत घातली. त्याने विचार केला, आत्ता आपण फक्त दागिनेच











चोरुं शकतो. पण दुर्गादेवीच्या मंदिरासमोर भक्त म्हणून बसलो तर विश्वदत्ताची सर्व संपत्ती आणि त्याची मुलगी पण आपल्याला मिळेल. एका चोरासारखे लपत छपत लुटालुट करुन जगण्या-पेक्षां आपण एका सधन प्रतिष्ठित सद्‌गृहस्था-सारखे आयुष्य जगूं शकूं. चांगली पत्नी, मुलेबाळें आणि भरपूर संपत्तीचा उपभोग आपल्याला घेता येईल.

असा विचार करुन कंटकाने सर्व दागिने व पैसे परत कपाटांत ठेवले आणि तो तिथून गुपचूप निघून गेला. विश्वदत्ताची खात्री होती की त्याची युक्ती सफल होईल. त्याच रात्री त्याने कोतवालाला भेटून सर्व हकिगत सांगितली.

शुक्रवारी सकाळी बायकोबरोबर तो दुर्गा-देवीच्या मंदिरात गेला. तिथे गेल्यावर ध्यानमग्न बसलेला कंटक त्याला दिसला. त्याने पांढरे कपडे घालून कपाळाला गंधाचा टिळा लावला होता. त्या वेषांत त्याला कोणीही ओळखले नसते.

मनांतल्या मनांत खूष होत विश्वदत्त कंटकाच्या जवळ येत म्हणाला, ''मुला, तू कोण आहेस? कुठल्या गांवचा आहेस? तुझी भक्ती पाहून वाटतं की तू कोणी साधारण मनुष्य नाहीस.''

कंटकने दोन्ही हात जोडून नमस्कार करीत म्हटले, ''मी जवळच्या गांवचाच आहे. मी लहानपणापासूनच देवीची भक्ती करीत आलो आहे. या वडाच्या झाडाखाली बसून देवीचे ध्यान करावे हीच माझी एकमेव इच्छा आहे.''

कंटकाचा आवाज ऐकून आता त्याची पक्की खात्री पटली की आपल्या घरी साधू बनून हाच आला होता. मग त्याने दूर लपून बसलेल्या कोतवालाला खुणेचा इशारा केला. मग काय, आपल्या शिपायांसह कोतवाल तिथे आला आणि त्याने कंटकला पकडले. कंटकाला यत्किंचित शंका आली नव्हती कीं आपण असे पकडले जाऊं!

त्या देशाच्या राजाने विश्वदत्ताचे तोंड भरुन कौतुक केले. आणि इनाम म्हणून जाहीर केलेल्या एक लाख मोहोरा त्याला दिल्या.





# धर्म युद्ध

अलकापुरच्या राजाचे नांव विक्रमदेव होते. त्याचा नीलकंठ नांवाचा अत्यंत शूर सेनापती होता. एका विजयादशमीला राजा आपले मंत्री-मंडळ, सेनापती यांच्याबरोबर बसून गप्पा गोष्टी करत होता. रात्रीची वेळ होती. सगळी कडे छान चांदणे पडले होते. तेव्हां एक अनोळखी घोडेस्वार तिथे आला आणि घोड्यावरुन उतरुन सरळ राजासमोर जाऊन उभा राहिला.

त्या उद्दट माणसाला पाहून रागाने राजा म्हणाला ''तू कोण आहेस? आणि इथे कसा आलास?''

''मी एक शूर लढवय्या आहे.'' त्याने उत्तर दिले.'' ते ठीक आहे. पण तुला काय हवे आहे?'' राजाने विचारले. ''एका लढवय्याला लढाई करायच्या संधीखेरीज अजून काय हवे असणार? तुमच्या कडे असा कोणी योद्धा आहे कां की जो माझ्याशी युद्ध खेळायची हिम्मत दाखवेल?'' तो माणूस म्हणाला. तिथे जमलेले सर्वजण त्या माणसाला पाहून घाबरुं लागले. चांगला धट्टाकट्टा, मजबूत करारी डोळे, हातात चकाकणारा परशू, असे त्याचे रुप बघून सगळ्यांच्या तोंडाला कोरड पडली.

''आमचा शूर सेनापती नीलकंठ तुझ्याशी युद्धाला तयार होईल.'' राजा जरासा चांचरत म्हणाला. ताबडतोब नीलकंठ उभा राहिला. पण तो योद्धा हंसत म्हणाला, ''मी इथे लढायला आलो नाही. हा परशू पहिलात ना? तुमच्यातल्या कोणीही याचा एक घाव आपल्या मानेवर झेला. त्याच्या बदल्यांत पुढल्या वर्षी माझ्या इथे येऊन याच परशूने माझ्या मानेवर वार करा.'' त्याची ही अट ऐकून सगळेजण विचारात पडले. त्या धारदार परशूचा एक वार मानेवर घेऊन जिवंत राहाणे अशक्य होते. तर पुढल्या वर्षीच्या बदल्याची गोष्ट देवच जाणे!

सगळे लोक गप्प उभे होते आणि तो अनोळखी माणूस उत्तराची वाट बघत होता. शेवटी नीलकंठने त्याच्या हातांतून परशू घेतला आणि मानेवर एक वार केला. परशू मानेत



अर्ध्यापर्यन्त रुतला. पण रक्ताचा एक थेंब देखीलबाहेर आला नाही. तो अनोळखी माणूस तसाच उभा होता. कांही क्षणांतच त्याने कांहीही झाले नसल्यासारखा परशू बाहेर काढला. बघता बघता जखम भरुन आली आणि तिथे जखमेची कांही खूण देखील राहिली नाही.

हंसत हंसत तो नीलकंठला म्हणाला "बाबारे! तुझी पाळी झाली. आता माझी पाळी आहे. हं, पुढल्या वर्षी याच दिवशी ठरल्याप्रमाणे वन-दुर्गाला ये. मी तुझी वाट बघतो." असं म्हणून जसा आला तसा तो निघूनही गेला. सगळे लोक आ वासून बघत राहिले.

एक वर्ष पूर्ण व्हायला आलं. बघता बघता विजयादशमी जवळ आली. बिचारा नीलकंठ आदल्या वर्षी विजयादशमीला घडलेली गोष्ट विसरलेला नव्हता. ठरल्याप्रमाणे त्याला वनदुर्गाला जाणे क्रमप्राप्त होते. नाहीतर साऱ्या देशाची नाचक्की झाली असती. शेवटी सगळ्यांचा निरोप घेऊन नीलकंठ वनदुर्गाला रवाना झाला.

कुणालाही तो जिवंत परत येण्याची आशा नव्हती. जंगलामधून बऱ्याच दूर गेल्यानंतर तो एके ठिकाणी घोड्यावरुन उतरला आणि एका झाडाखाली झोपला. एवढ्यांत त्याला कुठूनतरी एका बाईच्या रडण्याचा आवाज आला. धांवत पळत तिथे पोचला तर कांही चोर राजकुमारीचे दागिने चोरत होते. हातांत नंगी तलवार घेतलेल्या नीलकंठाला बघून चोर पळून गेले.

नीलकंठाने राजकुमारीची समजूत घालून धीर देत तिला विचारले काय झाले ते! राजकुमारी सगळी हकिगत सांगत म्हणाली, "आज आपण माझे प्राण वांचवलेत. मी आपले उपकार कधीही विसरणार नाही. ही अंगठी घ्या. तुमच्याजवळ ठेवा. हिच्या प्रभावाने कुठल्याही तऱ्हेच्या हत्याराने तुम्हाला इजा होणार नाही." पण नीलकंठाने अंगठी घेण्यास नकार देत म्हटले, "हा तर वीराचा धर्म आहे कीं तो जसा वार करतो तसा त्याने झेलला पण पाहिजे. जो कायम वार करुं इच्छितो, आणि शत्रूचा प्रतीवार झेलण्यास तयार नसतो, तो वीर कसला? मी भ्याड नाही. मी नेहमी धर्मयुद्ध करतो."

असं बोलून राजकुमारीचा निरोप घेऊन तो जवळच्या नदीत आंघोळीला गेला. थोड्यावेळाने राजकुमारीपण हळूंच नदीच्या कांठावर गेली आणि ती अंगठी त्याच्या कपड्यांत



लपवून परत आली. नीलकंठला या गोष्टीची जरासुद्धा शंका आली नाही.

दुसऱ्या दिवशी नीलकंठ जेव्हां वनदुर्गला पोंचला, तेव्हां तो योद्धा हातांत परशू घेऊन वाट बघतच उभा होता. "तू वचनाचा पक्का आहेस. तुला बघून मला खूप आनंद झाला." तो म्हणाला.

नीलकंठ त्याचा वार झेलण्यासाठी तयार उभा राहिला. "चला! मी तयार आहे. वार कर." तो म्हणाला. "जसं काही वार खाल्ल्यावर तू जिवंतच राहाणार आहेस! किती भोळा आहेस." असं म्हणून त्याने आपला परशू उचलला आणि नीलकंठाच्या मानेवर जोरदार वार केला.

पण काय आश्चर्य! परशू मानेत खोल घुसला पण रक्ताचा एक टिपूस नाही. त्या योद्ध्याच्या आश्चर्याला पारावार उरला नाही. नीलकंठपण चकित झाला. नीलकंठाने परशू असा बाहेर काढला कीं जसं कांहीच झालेलं नाही.

वनदुर्गाच्या योद्ध्याचा आपल्या डोळ्यांवर विश्वासच बसेना. "धोका! धोका!" असे म्हणत तो परत परशू उचलूं लागला तेव्हां नीलकंठने पण तलवार उपसली.

इतक्यांत वनदुर्गाचे महाराज व राजकुमारी तिथे आले. त्यांना बघून दोन्ही योद्धे संकोचून तसेच उभे राहिले. नीलकंठाने राजकुमारीला ओळखले. ही तीच राजकुमारी होती. तिला त्याने डाकूंपासून वाचवले होते. राजकुमारीने पण त्याला ओळखले व त्याच्या कपड्यांत अंगठी लपवून ठेवल्याचे सांगितले. तिच्या प्रभावामुळे तो योद्ध्याचा वार खाऊनदेखील जिवंत राहिला.

तेव्हां वनदुर्गाच्या महाराजांनी नीलकंठाच्या न्यायीपणा व शौर्याचे कौतुक केले. थोडे दिवस तिथे राहिल्यावर त्यांनी मोठ्या धुमधडाक्यांत नीलकंठशी आपल्या मुलीचे लग्न लावून दिले. त्या योद्ध्याने पण नवीन दांपत्याला आशिर्वाद दिला.

शेवटी महाराजांनी रहस्यभेद केला की विजयादशमीच्या दिवशी अशा विचित्र लढई साठी त्यांनीच योद्ध्याला पाठवले होते.

त्याचे कारण राजकुमारीसाठी त्यांना चांगला वर शोधता यावा असे होते. हे ऐकून लोकांच्या आश्चर्याला पारावार उरला नाही.



# कन्याविवाह

एकदा गोपीनाथ नांवाचा एक पंडित कृष्णापूर गांवच्या आपल्या एका मित्राला भेटायला गेला. जेवण झाल्यानंतर दुपारीं दोघे मित्र गप्पा मारत बसले होते. जवळच्याच घरांतली दोन वर्षांची एक लहान मुलगी तिथें आली. गोरी, गोंडस व गुटगुटीत असलेली ती बाळी बोबड्या गोड शब्दांत बोलूं लागली. तितक्यांत तिचा पिता तिथें आला.

गोपीनाथला ती मुलगी फारच आवडली. जेव्हां त्याला कळलं कीं आलेला सज्जन गृहस्थ तिचा पिता आहे, तेव्हां गंमतीत गोपीनाथ त्याला म्हणाला, "अहो, तुमची ही पोरगी म्हणजे साक्षात् बाललक्ष्मी दिसते आहे. मलाही एक चार वर्षांचा मुलगा आहे. तोही अगदी बाळकृष्णासारखा दिसतो. जेव्हां ही दोन्ही मुलें सज्ञान होतील. तेव्हां त्यांचे लग्न होईल. आपण आत्ताच ठरवून ठेवूं या, म्हणजे बरं, नाही कां?

"मी काय माझ्या मुलीचं लग्न एका म्हाताऱ्याशी करूं कीं काय?" त्या मुलीच्या पित्याने नाराजीनें विचारले. त्या गृहस्थाला काय म्हणायचे आहे ते गोपीनाथला समजेना.

"जेव्हां माझी मुलगी वीस वर्षांची होईल, तेव्हां तुमचा मुलगा चाळीस वर्षांचा होईल. ती जेव्हां पंचविशीची होईल, तेव्हां तुमचा मुलगा पन्नास वर्षांचा नाही कां होणार? बरोबर आहे ना माझं म्हणणं? मग सांगा, कीं मी माझ्या मुलीचं लग्न म्हाताऱ्याबरोबर कसं करूं?"

त्या मुलीच्या बापाचा वेडगळपणा व अज्ञान पाहून गोपीनाथ गप्प बसला. - वरलक्ष्मी





# चतुराई

प्राचीन काळांतली गोष्ट आहे ही! दोन मल्ल होते. एकाचं नांव होतं बलवंत आणि दुसऱ्याच नांव होतं छळवंत. दोघांनीही एकमेकांबद्दल ऐकलं होतं. दोघेही भीमकाय होते, मोठे मोठे डोळे, मोठाले कान आणि रुंद चेहरा, यामुळे चालत्याबोलत्या टेंकडीसारखे ते वाटायचे.

सर्वसाधारण माणसाला ते माशी झटकावी तसे मारुन टाकत. एका वेळेला मोठ्या पिंपातलं पाणी त्यांना प्यायला लागत असे. झाडांच्या फांद्या घेऊन त्यांनी ते दांत घाशीत. त्यांचे घर डोंगरभर पसरलेले होते.

एके दिवशी छळवंताने बलवंताला भेटायचं ठरवलं. छळवंत तापट होता आणि नेहमी बरोबर एक गदा घेऊन हिंडत असे. त्याच्याशी जो कोणी वाद घालील त्याला तो गदेने मारायचा. म्हणून बलवंताला या रागीट छळवंताबरोबर सामना करायचाच नव्हता. पण अशा मोठाड मल्लांना लपून थोडंच बसता येतं?

"अरेच्चा, आता मी काय करुं? तो छळवंत उगीचच भांडण उकरुन काढील. त्यांतून मी कसा सुटेन?" बलवंत उदासवाणा झाला. तितक्यांत त्याची बायको शीलावती तिथें पोचली. आपल्या पतीची काळजी समजल्यानंतर तिने त्यावर एक कल्पना लढवली.

"हे पहा, तुम्ही अगदी गप्प बसायचं आणि मुकाट्याने या खाटेवर पडून राहायचं. बाकी सारं मी बघेन. पण जोपर्यंत मी तुम्हाला सांगत नाही, तोपर्यंत तुम्ही हालायचं देखील नाही." तिने त्याला सांगितलं "पण तू एकटी काय ग करणार आहेस?"

जरा घाबरतच बलवंताने तिला विचारले. "तुम्ही अगदी काळजी करुं नका. जोपर्यंत मी इथे आहे, तोपर्यंत तो छळवंत तुम्हाला कांहीही करणार नाही" तिने त्याला धीर दिला आणि अंगावर पांघरुण ओढून घेऊन झोंपायला सांगितले. छळवंताचे स्वागत करायला ती दाराजवळ गेली.

वाटेंतल्या दगडांना लाथेने ठोकरत आणि झाडाझुडपांना पायाने तुडवत छळवंत बलवंताच्या गांवी निघाला.

गुहेंत स्वस्थ पडलेल्या वाघसिंहाना त्याने गदेचा आवाज करुन डिवचले. त्याच्या पायतळीं चिरडलेल्या बिळांतून ससे व उंदीर पळून गेले. त्याने उपटून टाकलेल्या झाडांत विश्रांती घेणारी घुबडें व वटवाघळें उडून फडफडायला लागली. किती प्राण्यांना त्याने नकळत त्रास दिला होता हे छळवंताला कांही कळले नाही.

शांतचित्त आणि धोरणी शीलावती त्याला दारांतच दिसली. तिने त्याला आंत बोलावण्यापूर्वीच

तो खेकसला, “कुठे आहे तो घाबरट बलवंत? माझे स्वागत करायला त्याने दारांत यायला काय झालं?”

“ते गांवात नाहीत. शेजारच्या अरण्यांत एका लग्नाला ते गेले आहेत. पण मी आपले स्वागत करते आहे ना!” तिने अगदी नम्रपणें सांगितले.

“खोटं बोलूं नकोस. जर तुझा नवरा बाहेर आला नाही तर मी तुमच्या सगळ्या कोंबड्यांचा फन्ना उडवीन” छलवंताने दरडावून सांगितले.

“कोंबड्या? कुठल्या कोंबड्या? तुम्ही या चिलटांना, उवांना कोंबड्या समजलात कीं काय? माझे पतिराज जेव्हां रोज केंस विंचरतात, तेव्हां त्या खाली पडतात. “तेवढ्यांत गोठ्यांतून गायीचे हंबरणें ऐकूं आले. त्या दिशेने बघत छळवंत म्हणाला, “आता जर तू तुझ्या नवऱ्याला बोलावले नाहीस तर मी गोठ्यांतल्या सगळ्या गुरांना खाऊन टाकीन.”

“गायी कुठल्या? तुमचं डोकं ठिकाणावर आहे कां? ते आमचे पाळीव उंदीर आहेत, ते ओरडत आहेत. उंदीर पाळा, म्हणून मी कितीतरी दिवस ह्यांच्यापाशी हट्ट धरला होता. कारण जनावरांना घरांत पाळायचं हे त्यांना मुळींच आवडत नाही.” शीलावतीने प्रेमळ सुरांत सांगितलं. आता मात्र छळवंताला जरा भीती वाटूं लागली. ह्यांच्याकडे जर कोंबडीच्या आकाराची चिलटं, उवा असल्या आणि गायी एवढे मोठे उंदीर असले तर? पण त्याने धीर सोडला नाही. हा बलवंत निश्चितच माझ्यापेक्षां कांही जास्त शक्तीमान असणार नाही असा त्याने विचार केला.

“अहो बाई, मला घरांत तर येऊं द्या. बघतो मी तो घाबरट बलवंत कुठे लपून बसलाय ते!” त्याने संबंध घरभर फिरून पाहिले. शेवटी तो झोंपायच्या दालनांत आला.

“[illegible] आवाज [illegible] करु नका हां! मोठ्या प्रयत्नाने मी माझ्या बाळाला आत्ताच झोंपवलंय.” छळवंतच्या मागें उभी असलेल्या शीलावतीने त्याला विनवले.

तुमचे बाळ झोंपलंय होय?” तो दचकून मागे सरला. खाटेवर बलवंत झोंपला होता तिकडे त्याने एकवार पाहिले. “जर या बलवंताचे मूल एवढे मोठे असेल तर त्याचा आकार कितीतरी मोठा असेल. त्याला हटकायची मी इच्छा केली ती माझी चूकच झाली” छळवंताच्या मनांत आलं.

“बाई, तुमच्या पतीची भेट झाली नाही त्याबद्दल मला वाईट वाटतं. ते परत आले कीं माझ्यातर्फे त्यांना नमस्कार सांगा” असं म्हणून तो परत घरी गेला.

शीलावती आंत गेली आणि तिने पतिराजाला उठवले. बलवंत “छळवंताची पीडा टळली” म्हणून फारच खुषींत होता. त्याने बायकोचे खूप कौतुक केले. तिने त्या दुष्ट छळवंताला मोठ्या हुशारीने वाटेला लावले होते. “मी देखील भीमकाय मल्ल आहे. पण आमच्या दोघांपेक्षां तूच जास्त हुशार व चतुर आहेस.” बायकोची स्तुती करत बलवंत तिला म्हणाला.





# माया सरोवर

## 14

*(जयशील आणि सिद्धसाधक यांना नदीवरच्या पुलाजवळ मकरकेतूबरोबर देवशर्माही दिसला. त्याच वेळीं हंस जोडलेला एक रथ येऊन नदींत उतरला. त्या रथांतूनच घसरून मायासरोवरेश्वर व कांचनमाला अरण्यांत कुठेतरी पडले होते; त्यांच्या सुरक्षिततेबद्दल हे लोक विचार करीत होते. तेवढ्यांत राक्षसांनी रथावर आक्रमण केले. त्यानंतर...)*

हंस जोडलेल्या रथाभोवती जलवृक राक्षसांनी वेढा घातलेला पाहून जयशीलने बाजूला फेंकलेली आपली तलवार चटकन हातांत घेतली आणि म्हटले, “अरे! हाच जलवृक राक्षस आहे होय? त्याचं शरीर माणसांचं आहे आणि शिर मात्र प्राण्यांसारखं आहे. फारच विचित्र प्राणी दिसतोय हा!”

ते दृश्य पाहून मकरकेतूने आपला शूळ उचलून गंभीरपणें नदीकडे जायला सुरवात केली. पण मधेंच थांबून तो जयशीलला म्हणाला, “जयशील! हे जलवृक राक्षस हंसांचा रथ पकडण्याचा विचार करीत आहेत. त्यांचा पाडाव करण्यासाठी तू आम्हाला मदत नाही कां करूं शकणार?”

जयशीलने मोठ्या सफाईने आपली तलवार म्यान करीत म्हटले, “ऐक, आमचा राजा कनकाक्ष आहे आणि त्याची मुले तुमच्या मायासरोवरच्या राजाने पळवून नेली आहेत. त्या मुलांचे संरक्षण



करण्याची जबाबदारी माझ्यावर आहे. त्यामुळें या दुष्ट कृत्याचा सूड मला घ्यायचा होताच. आत्ता यावेळीं हंसांच्या रथांत तुमचा राजा आम्हाला दिसत नाही आहे हे त्याचं सुदैव आहे असं समज?''

हे उत्तर ऐकून मकरकेतू चकितच झाला आणि देवशर्माला म्हणाला, ''वैद्यदेव! जयशीलच्या मनांत आपल्याविषयी इतका राग असेल याची मला मुळीच कल्पना नव्हती. मायासरोवरेश्वराने राजकुमार व राजकुमारीची किती प्रेमाने काळजी घेतली आहे व त्यांना यत्किंचित त्रास झालेला नाही हे तुम्ही स्वतः पाहिले आहेतच. या मंडळींचा गैरसमज झालेला आहे.''

''जयशील, माझं ऐक प्रथम तुझी तलवार म्यानांतून बाहेर काढ. सरोवरेश्वराचा सूड घेण्याची ही आत्ता वेळ नाही.'' देवशर्माने त्याला समजावले.

जयशीलने लागलीच आपली तलवार म्यानांतून उपसली. त्यावेळी सिद्धसाधकदेखील ''जय महाकाल'' असे ओरडत नरवानरावर स्वार झाला. सर्वजणांनी झपाट्याने मोठ्याने गर्जत नदींत उड्या मारल्या आणि त्यांनी जलवृक राक्षसांच्यावर हल्ला केला.

तोपर्यंत हंसाच्या रथांत असलेला अंगरक्षक जलराक्षसांपासून रथाचे संरक्षण करण्यासाठी रथ इकडे तिकडे वळवूं लागला. मकरकेतु जलग्रह हत्तीवर स्वार झाला होता आणि आपला शूळ हवेंत फिरवत हल्ला करण्यास तयार होताच. त्याला व नरवानरावर स्वार असलेल्या सिद्ध-साधकाला पाहून जलराक्षस घाबरले. पळून जायच्या विचाराने त्यांनी पाण्यांत बुडी मारायचा बेत केला. परंतु मकरकेतूने डिवचल्यामुळें जलग्रह चिडला व आपल्या सोंडेत एकेकाला पकडून नदीच्या कांठावर फेकायला लागला. पाण्यांत तरंगत राहिलेल्या जयशीलने जो शत्रू समोर दिसला त्याला तलवारीने मारायला सुरवात केली.

सिद्धसाधकाच्या नरवानराने एका जलराक्षसाला आपल्या दोन्ही हातांनी पकडून साधकाच्याबरोबर त्यालाही नदीच्या पाण्यांतून बाहेर उचलून आणले. त्याच्या पाठोपाठ मकरकेतु, सर्पनख आणि सर्पस्वर किनाऱ्यावर येऊन पोंचले. पण जयशील हंसांच्या रथावर चढला आणि अंगरक्षकाला तलवारीचे टोंक लावून त्याला धमकावत म्हणाला, ''अरे ओ सरोवरेश्व-राच्या अंगरक्षका, निमूटपणें हा रथ कांठावर घेऊन चल. जर रथाबरोबर तू आकाशांत उडून जायचा



प्रयत्न केलास तर तुझे डोके धडावेगळे होईल हे लक्षांत ठेव! सावधान!''

हे शब्द ऐकताच तो अंगरक्षक संतापाने काळानिळा झाला. डोळे वटारुन तो म्हणाला, ''मी कोण आहे ते तुम्हाला माहीत आहे कां? महान शक्तिशाली मायासरोवरेश्वराचा मी अंगरक्षक आहे. आजपर्यंत कुणीही माझ्याशी इतक्या उद्धटपणे बोलून माझा असा अपमान केलेला नाही!'' ''पण मी तो करतो आहे. पहा, ठेवली ही तलवार मी खाली!'' असं म्हणून जयशीलने आपली तलवार ठेवून डाव्या हाताने अंगरक्षकाची मान घट्ट पकडली व दाबली. अंगरक्षक कळवळला व म्हणाला, ''आपण तर मोठे धाडसी आणि शक्तिवान दिसता आहात. माझी मान जरा सोडा हो!''

आपली पकड सैल करीत जयशील बोलला, ''तू आता हा रथ नदी कांठावर घेऊन चल. तुझ्या मालकांच्याबद्दल बरंच कांही बोलायचं आहे.''

अंगरक्षकाने निमूटपणें हंसांना हांकलत रथ कांठावर नेला. रथ किनाऱ्याला लागल्याबरोबर सिद्धसाधकाने उत्साहाच्या भरांत नरवानराच्या पाठीवरुन उडी मारली. वानराच्या हातांत जखडलेल्या जलराक्षसाचे दोन्ही कान पकडून तो खाली उतरला आणि रथाजवळ जाऊन म्हणाला, ''जयशील! या रथावर बसून नरवानरासह मला हिमालयांत जाऊन तपश्चर्या करायची आहे. हा आम्हाला दोघांना नेऊं शकेल कां?''

जयशीलने हा खवचट प्रश्न ऐकून अंगरक्षका-कडे बघितले. रथाच्या चाकाला त्याने आपले डोके लावून, डोळ्यांना चाकाचा स्पर्श केला, व तो



म्हणाला, ''महाराज, हा रथ अत्यंत प्रभावी व शक्तीमान आहे. याला जोडलेले हंस केवळ याची शोभा वाढावी म्हणून आहेत. जर आमच्या सरोवरेश्वराची इच्छा असेल तर हा चौदा भुवनांची परिक्रमा करुन कांही क्षणांतच परत येऊं शकतो.''

''वा! असं आहे होय? मग असा प्रभावी रथ गिधाडांचा हल्ला झाल्यावर उलटा कसा झाला? त्या वेळेला तुमचे सरोवरेश्वर महाराज तर रथावरच होते ना? उगीच बटबट केलीस तर हा शूळ खुपसून तुला नदींत फेकून देईन.'' असं म्हणून सिद्धसाधकाने अंगरक्षकाच्या दिशेने शूळ उचलला.

पण जयशीलने त्याला चुचकारत शांत होण्याचा आदेश देऊन समजावले, ''सिद्धसाधक! रथांतून फक्त सरोवरेश्वरच नव्हे, तर राजकुमारी कांचनमालादेखील अरण्यांत पडली आहे. ही गोष्ट तू कदापि विसरुं नकोस!''



त्यावर मकरकेतु काळजीच्या स्वरांत म्हणाला, "जयशील! आम्ही सरोवरेश्वर महाराजांना शोधून काढण्यासाठी या हंसांच्या रथावर जाऊन त्यांचे रक्षण करणार आहोत. ते कशा अवस्थेंत असतील कोण जाणे!"

"आम्हीही येत आहोत. आम्हालाही राजकुमारीचा शोध घ्यायचा आहेच. जर तिच्यावर कांही मोठे संकट कोसळले तर त्याची संपूर्ण जबाबदारी तुमच्या राजाची राहील. आणि आम्ही तुमच्या राजाचे मस्तक कनकाक्ष राजाला भेंटस्वरूप देऊं." जयशीलने सांगितलं.

देवशर्मा खाली मान घालून विचार करीत होता. जयशीलचे बोलणें ऐकताच तो झटकन उठून म्हणाला, "जयशील, मी याच्या अगोदरच सांगितले आहे कीं सूड उगवण्याची ही वेळ नाही. आपण इथून लौकर निघून माया सरोवरेश्वर आणि कांचनमालेचा शोध घ्यायला हवा."

"हो, हो, आपण ठीक सांगितलं आहे. माया सरोवरेश्वराचा नाही, पण कांचनमालेचा शोध घेणं हे सिद्धसाधक व माझ्या दृष्टीने अत्यंत जरूर आहे. अरे साधक भाऊ, निघायचं कां आता?" जयशीलने विचारलं.

सिद्धसाधकने एकवार चारी बाजूला नजर फिरवली, आणि शंकेच्या सुरांत विचारलं, "अशा भयंकर अरण्यांत त्यांचा शोध कसा काय घेता येईल?

सिद्धसाधकाचे हे शब्द ऐकताच अंगरक्षक रथावरुन किनाऱ्यावर उतरला, पण सिद्ध-साधकाकडे जाणाऱ्या नरवानराची भेदक दृष्टी पाहिल्यावर जरा थरमला आणि दोनतीन पावले मागे जात म्हणाला, "महोदय, अरण्यांत ज्या ठिकाणीं आमचे महाराज आणि कांचनमाला खाली पडली, तो भाग मला चांगला माहीत आहे. त्या प्रदेशालगतच एक मोठा पहाड आहे आणि एक उंच गगनचुंबी वृक्ष आहे. बाजूलाच मोकळे पठार आहे. तिथें आकाशांत पांढरे धुकें पसरलेले होते."

"असं होय! आम्ही अंगरक्षकाच्या मदतीने तिथे पोंचूं शकूं. आता सारेजण रथांत बसा बघूं." असं म्हणत देवशर्मा रथाकडे निघाला.

"वैद्यदेव! या रथांत सर्वांना जागा कशी होईल? सिद्धसाधक आणि त्याचे वाहन यांचं काय होईल? मकरकेतु त्याच्या वाहनाबरोबर आकाशांत उडत आपल्यापाठोपाठ येईल कां?" जयशीलने विचारलं.

देवशर्माने सर्व लोकांकडे एकवार पाहिले आणि सांगितले, "ज्यांच्याकडे वाहन आहे, त्यांनी आपापल्या वाहनावरुन यावे. काय सिद्धसाधक नि मकरकेतु? ठीक आहे ना हे?"

मकरकेतुने सिद्धसाधकाकडे पाहिले. तो दांतओठ खात, मकरकेतुकडे रोखून बघत म्हणाला, "आम्ही तुमच्याबरोबर त्याच वेगाने त्या ठिकाणीं पोंचूं शकूं, पण रस्त्यांत जर मकरकेतुने मला फसवायचा प्रयत्न केला तर मी त्याला या नरवानराच्या तोंडी देईन मी!"

"सिद्धसाधक! नाराज होऊं नकोस. या घटकेला आपण सारे मित्र आहोत रे!" कसंनुसं हंसत मकरकेतुने त्याला सांगितलं.

"हे मी तुझ्याकडून खूपवेळां ऐकलंय. जोपर्यंत महाराज कनकाक्ष यांची मुले सुरक्षित असलेली आपल्याला दिसत नाहीत, तोपर्यंत मायासरोवरचे लोक आपले शत्रूच राहातील." सिद्धसाधकाने हट्ट सोडला नाही.

त्यानंतर सिद्धसाधक आणि मकरकेतु सोडून बाकी सारे लोक हंसाच्या रथावर स्वार झाले. त्या दोघांना मार्गातल्या खुणा सांगत अंगरक्षक त्यांना म्हणाला, "एक उंच पहाड व एक गगनचुंबी महावृक्ष ध्यानांत ठेवा." हंसाचा रथ आकाशांत उडूं लागला आणि बघताबघता नजरेआड गेला. नरवानराच्या खांद्यावर बसलेल्या सिद्धसाधकाने म्हटले, "मकरकेतु, चल आता, उशीर नको करुंस."

मकरकेतुने मान डोलावीत जलग्रहाच्या पाठीवर बैठक मारली. सिद्धसाधकाच्या हातांत बंदी बनलेला जलवृक राक्षस गयावया करीत म्हणाला, "हे महान वीर, मला आपण आपला एक सेवक म्हणून बरोबर न्यावं. आजपासून मी आपला सेवक आहे."

हे शब्द ऐकून सिद्धसाधकाचा आनंद गगनांत



मावेना. तो म्हणाला, ''अरे जलवृक राक्षसा, तू खूप सांगितलंस तरी तुला माझ्या नरवानराच्या बरोबर त्याच्या वेगाने चालता येईल कां?''

''मालक, मला पंख नसले तरी जमिनीवर देखील मी पक्षांच्या वेगाने पळूं शकेन.''

''वा रे सेवक! तू तर अगदी चांगलीच माहिती सांगितलीस,'' असं म्हणून सिद्धसाधकाने जलराक्षसाच्या खांद्यावर प्रेमाने थोपटले. नरवानराला तो निघायची खूण करणार तेवढ्यांत ठेंगू लोकांचा सेनापती आपल्या कांही अनुचरांसह तिथें पोंचला.

''अहो, सेनापती महोदय, काय बातमी आणली आहेत?'' सिद्धसाधकाने विचारले.

ठेंगूंच्या सेनापतीने नदीच्या किनाऱ्यावर घायाळ होऊन तडफडणाऱ्या जलवृक राक्षसांकडे बोट दाखवून म्हणाला, ''महाराज, इथें जे कांही झालं, ते मी कड्याच्या आड उभे राहून पाहिलं. प्राण्यांची डोकीं असलेल्या या मानवांशी मी कसा वागूं? त्यांच्यावर औषधोपचार न करताच त्यांना तसेंच मरं देणे हे अन्यायाचे नाही कां ठरणार?''

''तू फार महत्वाची गोष्ट सांगितली आहेस. त्या दुष्टांच्यावर औषधोपचार करूनच त्यांना परलोकांत पाठवून दे. पण सावधान! जरा अंगात शक्ती आली कीं हे लोक तुम्हालाच पकडून खाऊन टाकतील.'' सिद्धसाधकाने त्याला धोक्याची इशारा दिला.

सिद्धसाधकाचे बोलणें पूर्ण होण्यापूर्वीच ठेंगूंच्या सेनापतीने नदीच्या पलीकडच्या तीरावरच्या अरण्याकडे बघत म्हटले, ''मालक, जरा तिकडे पाहा तरी! आभाळाला टेंकलेले हे सफेद धुकें कसले आहे? अरण्यांत वणवा तर पेटला नाही ना?''

''अरे, अरण्यांतला वणवा नाही पेटलेला नाही. तो पांढरा धूर येतोय त्याचं कारण मायासरोवर नांवाच्या एका दुष्ट माणसाचं शरीर जळतंय. अरे नरवानरा, त्या धुराच्या दिशेला तू वाऱ्यासारखा पळायला लाग.'' सिद्धसाधकाने नरवानराला पुकारीत म्हटले.

नरवानराने साऱ्या अरण्यांत ऐकूं जाईल अशी भयंकर मोठी गर्जना केली आणि तो पळत निघाला. त्याच्या पाठोपाठ जलवृक राक्षस आणि जलग्रहावर स्वार झालेला मकरकेतुदेखील निघाले.

(अपूर्ण)



वेताळ कथा

# राजगुरुचा सल्ला

निश्चयी विक्रमार्क पुन्हां झाडावर चढला. ते प्रेत खाली उतरवून त्याने आपल्या खांद्यावर घेतले व निमूटपणें स्मशानाकडे जाण्यास सुरवात केली. प्रेतांत लपलेल्या वेताळाने म्हटले, ''राजन, मी तुझा हितचिंतक आहे. तुला समजावयाचा मी अनेकवेळां प्रयत्न केला कीं तू तुझा मूल्यवान वेळ यांत व्यर्थ दवडूं नकोस. राजाची कांही प्रमुख कर्तव्ये नेमलेली असतात. ती पूर्ण करणें हा त्याचा धर्म आहे. पण हे सारं विसरुन तू स्मशानाकडेच वळतो आहेस. हे अयोग्य नाही कां? कधीकधी मंत्र्यांच्या सल्ल्यापेक्षां राजगुरुचा विचार योग्य मानला जातो. पण कांही गुरु, राजाची



विनंती टाळता आली नाही तर कांहीतरी विक्षिप्त सल्ला देऊन टाकतात. मी तुला विक्रमसिंग नांवाच्या राजाची कथा सांगणार आहे; त्याला त्याच्या राजगुरुने एक हास्यास्पद सल्ला दिला. ही गोष्ट ऐकताना तुझा थकवाही दूर होईल." आणि वेताळाने गोष्ट सांगायला सुरवात केली.

"त्या देशाच्या प्रजेचं मत होतं कीं राजा विक्रम सिंग एक कर्तव्यनिष्ठ धर्मात्मा आहे, म्हणून तो प्रजेवर आपल्या पुत्रापेक्षांही जास्त प्रेम करतो. परंतु त्याचा पुत्र अवक्रमसेन, त्याच म्हणणं होतं कीं पिता त्याला दत्तकपुत्राप्रमाणे वागवतो. राजाच्या हृदयांत मुलासाठी एक रतीभर देखील प्रेम नाही. पण याचं एक खास कारण होतं. जरी युवराज सगळ्या शास्त्रांत पारंगत होता, तरीही राजा रोज कांही ना कांही चूक काढून त्याला रागावत असे.

"प्रत्येक माणसाकडून कांहीतरी चूक होता असतेच. आपण फक्त माझ्यांतले दोषच पाहाता, माझे गुण पाहात नाही." युवराजाने राजाला सांगितले.

"तू युवराज आहेस. तुझ्यांत थोडे जरी गुण असले तरी तुझी स्तुतिस्तोत्रें गाणारे अनेकजण तुला भेटतील. मी तुझा पिता आहे म्हणून तुझे दोष दाखवणें हा माझा धर्म आहे. मी तुझे गुण ओळखत नाही असं समजूं नकोस. फक्त मी जे दोष दाखवतो त्यांत खरेपणा आहे कीं नाही तेवढें तू बघ. आणि जर तो दोष खराच असेल तर तो सुधारण्याचा प्रयत्न कर." विक्रमसिंगने मुलाला समजावले.

असेच दिवस जात होते. एके दिवशी विक्रमसिंग अचानक आजारी पडला. राजवैद्यांनी तपासून सांगितले कीं दोन महिन्यांची विश्रांति राजाने घेतली पाहिजे. तेव्हां राजाने युवराजाला बोलावून सांगितले, "पुत्रा, कांही काळ तुला राज्याचा कारभार सांभाळला पाहिजे."

"मी तर रोज कांहीतरी चूक करतो! आपण अशा माणसावर कारभार सोंपवावा, कीं जो कधी चुकत नाही. त्याच्यावरच ही जबाबदारी सोंपवा!" युवराजाने कडवट उत्तर दिले.

"बाळ, राज्याचे शासन सांभाळण्याची क्षमता तुझ्यापेक्षां जास्त इतर कुणांतही नाही. म्हणून मी तुझी निवड करतो आहे. नाहीतरी पुढेमागे हा भार तुलाच सांभाळायला हवा ना?"

विक्रमसिंगाने त्याची समजूत घातली व त्याच्यामधले चांगले गुण व राजलक्षणें यांचाही सविस्तर खुलासा केला, कौतुक केले.



पित्याकडून ही स्तुति ऐकल्यावर युवराज आनंदाने मोहरुन गेला. तो लगेच म्हणाला, "मी जरुर हा कारभार सांभाळीन. या दोन महिन्यांत माझी कुशलता व सामर्थ्य मी सिद्ध करुन दाखवीन. जर या दोन महिन्यांत माझ्याकडून एक चूक झाली, तर मी या देशाचा राजा होणार नाही." अशी प्रतिज्ञा करुन तो तिथून निघून गेला.

राजा बुचकळ्यांत पडला. त्याने राजगुरुला बोलावले. सगळी हकीकत ऐकल्यानंतर राजगुरु म्हणाले, "अवक्रमसेनचे बोलणें व त्याची वृत्ती मला आवडली. राज्याचा कारभार त्याला बिनचूक सांभाळण्याची इच्छा आहे. आपणदेखील युवराजाला त्याच्या चुका दाखवण्याचे थांबवावे."

"गुरुवर्य, जर युवराजाने जाणूनबुजून चुकीचे पाऊल उचलले, तर मला ते कसे सहन करता येईल?" राजाने आपली चिंता व्यक्त केली.

त्यावर राजगुरुंनी हंसून उत्तर दिलं, "पोहायला शिकायचं असेल तर कांठावर बसून कांही होणार नाही. पाण्यांत उतरुनच शिकायला हवं. आपण त्याची प्रतिज्ञा व अट निःसंकोचपणें मान्य करा. आपले मन शांत ठेवावे. देवाचे ध्यान आणि योगविद्या यांत लक्ष घालावें. म्हणजे आपली सहनशक्ती वाढेल."

राजगुरुचे सांगणे मान्य करुन राजाने युवराजावर कारभार सोंपवला. त्या दिवसापासून राजाला युवराज रोज दिवसभरातल्या कामाची माहिती देऊं लागला. त्याच्या सावधपणाची व धोरणी वागण्याची राजाने खूप प्रशंसा केली. असे



दोन महिने उलटले. अवक्रमसेन एक समर्थ राजा आहे हे सर्वांना पटले. राजगुरुचा सल्ला घेऊन राजाने युवराजाला राज्याभिषेक केला.

दोन वर्षे आनंदात गेली. कारभार अतिशय योग्य तऱ्हेने चालला होता. युवराजाची स्तुति न करणारा माणूस एकही नव्हता. परंतु त्याला शंका होती कीं त्याच्याकडून कांही लहानमोठ्या उणीवा राहात असाव्यात आणि त्या त्याच्या लक्षांत येत नाहीत. आपल्या शंकेचं निरसन करण्यासाठी त्याने आपल्या अनुचरांना विचारलं, मंत्र्यांचा सल्ला मागितला, पित्याला विचारलं, पण अवक्रमसेनाच्या राज्याकरण्याच्या पद्धतीमधें किंवा विचारशैलीमधें कांही त्रुटी राहिल्या आहेत, असं कुणीही म्हटलं नाही.

त्याने आपल्या पित्याला, विक्रमसेनला विचारलं, "मला नीट समजलं नव्हतं म्हणून मी



मूर्खासारखी एक आपल्यापुढें प्रतिज्ञा केली आणि एक अट ठेवली. आता मला माझ्या चुका जाणून घ्यायच्या आहेत. म्हणून पूर्वीसारखेच आपण मला माझ्या चुका सांगत जा.''

त्यावर विक्रमसेनने म्हटलं, ''मुला, जेव्हां तुझ्याकडून चुका होत होत्या, तेव्हां मी त्या निःसंकोचपणे सांगितल्या. आता तुझ्यांत दोष राहिलेले नाहीत. जे आहेत ते फक्त गुणच आहेत. तू अट घातलीस म्हणून मी दोष सांगत नाही असं नाही. माझ्यावर विश्वास ठेव.''

अवक्रमसेन या उत्तरावर संतुष्ट झाला नाही. तो आपल्या मातेकडे गेला; महाराज त्याच्या चुका सांगतील असा कांहीतरी उपाय तिने सुचवावा असा हट्ट त्याने धरला. महाराणीने उत्तर दिले, ''पुत्रा, प्रत्येक मनुष्याकडून कधी ना कधी, कांही ना कांही चुका होतातच. तुझे पिताश्री मला नेहमी माझ्या चुका दाखवून देत असत, पण त्यामुळे माझा बराच फायदा होत गेला. पण हल्लीं बरेच दिवस त्यांना माझ्यांतही कांही उणीवा आढळत नाहीत. तेव्हां या संबंधात तू राजगुरूंनाच जाऊन विचार.''

अवक्रमसेनाने राजगुरूंना आपली समस्या सांगितली. थोडा वेळ विचार केल्यानंतर त्यांनी सांगितले, ''जो आपल्या चुका जाणून घेण्यास उत्सुक असतो, त्याचे भविष्य नेहमीच उज्वल असते. आता तुमच्या बुद्धीचा चांगला विकास झालेला आहे. पण जेव्हां तुमचे पिताश्री तुमच्या चुकांकडे बोट दाखवत, तेव्हां ते तुम्हाला सहन होत नव्हतं. म्हणून तुमचे मंत्रीगण व अनुचर तुमच्या चुका दाखवून देण्यास संकोच करीत आहेत. त्याला एक उपाय आहे. तुम्हाला आपल्या पित्याकडूनच आपली चूक जाणून घेतली पाहिजे. आणि जेव्हां तुम्ही त्यांना फार नाराज कराल, तेव्हांच हे शक्य होईल.''

पित्याला नाराज कसे करायचे याबद्दल त्याने आपल्या मातेला विचारले. ती म्हणाली, ''त्यांच्या प्रत्येक बोलण्याचे खंडन कर. देशांत जे कांही वाईट होत असेल, त्याबद्दल त्यांनाच दोषी ठरव.''

अविक्रमसेनाने लागलीच मातेचा सल्ला अंमलात आणला. राजगुरूंची संमति मिळाली म्हणून महाराणी देखील महाराजाला नाखूष करण्याचा प्रयत्न करुं लागली.

एका बाजूने मुलगा व दुसऱ्या बाजूने पत्नी, विक्रमसेनला चिडवायला लागली. आपल्या रागावर नियंत्रण ठेवण्यासाठी महाराजांनी योगनिष्ठाही केली, पण त्याचा उपयोग झाला नाही. अस्वस्थ होऊन राजगुरूंना भेटून महाराजांनी विचारले, ''गुरुवर्य, मी अंतःपुरांत राहातो, तरी माझ्या रागावर नियंत्रण राहात नाही. माझा पुत्र राज्यकारभार समर्थपणे सांभाळतो आहे. म्हणून आता मला वाटतं कीं वानप्रस्थाचा स्वीकार करावा. जवळपास असलेल्या एखाद्या अरण्यांत जाऊन तपस्या करण्याची मला इच्छा होते आहे.''

राजगुरूंनी सुहास्यमुद्रेने सांगितलं, ''राजन्, इतक्या लौकर वानप्रस्थाश्रम स्वीकारण्याची घाई कशाला करायची? आपला राग आटोक्यांत आणण्याची वेगळी योगनिष्ठा करायची आवश्यकता नाही. आपण अंतःपुरांत सुखाने राहावे.''

ही गोष्ट सांगून वेताळाने विचारले, ''राजन्, राजगुरुने विक्रमसेनला दिलेला सल्ला विचित्र नाही कां वाटत? प्रथम त्यांनी महाराजांना आपल्या क्रोधावर नियंत्रण ठेवायला सांगितलं व त्यासाठी योगनिष्ठा करण्यास सांगितलं. आणि नंतर सांगतात कीं क्रोध आवरण्याची कांही एक आवश्यकता नाही म्हणून! या दोन्ही गोष्टी परस्परविरोधी व हास्यास्पद वाटत नाहीत कां? माझ्या या शंकेचं समाधानकारक उत्तर तुला माहिती असेल आणि तरीही तू मौन पत्करलेस तर तुझ्या मस्तकाची शंभर शकले होऊन पडतील.''

विक्रमार्कने उत्तर दिले, ''अहंकाराने भारलेला क्रोध सर्व प्रकारांनी मनुष्याचे नुकसान करतो. परंतु उचित कारणाने जर क्रोध आला असला तर त्यामुळें हानि होत नाही. कधीकधी सहनशक्तीमुळें वाईटपणादेखील चांगुलपणा वाटायला लागतो. आपल्या चुका इतरांकडून ऐकण्याची, जाणून घेण्याची अवक्रमसेनाला मनापासून इच्छा होती. अशा स्थितींत महाराजांनी त्याच्या चुका दाखवल्या असत्या तर त्याचा निश्चितच चांगला उपयोग झाला असता. हे जाणून राजगुरुंनी विक्रमसेनला सल्ला दिला कीं आता त्याची सहनशक्ती वाढवण्यासाठी योगनिष्ठेची आवश्यकता नाही.''

राजाचे मौन भंग झाल्यामुळें वेताळ शवासहित गायब झाला आणि पुन्हां झाडावर जाऊन बसला.

*(सुचित्राच्या रचनेवर आधारीत)*















# तरुण राजासाठी कूटप्रश्न

बाराणसीचा सुज्ञ व दयाळू राजा वारला तेव्हां त्याचा एकुलता एक मुलगा फक्त सात वर्षांचा होता. राजाचा खाजगी सेवक चंदा, याला वाटलं कीं राजाच्या पश्चात कुणीही त्याची काळजी घेणार नाही, राजवाड्यांत त्याला भविष्यकाळांत उज्वल भवितव्य राहाणार नाही, म्हणून तो आपल्या गांवी परत गेला. तिथें त्याचे एक लहानसे घर व शेत होते. शेती करुन त्या खेडेगांवात तो आनंदात राहूं लागला. तो सुस्वभावी होता, व कधीही खोटे बोलत नसे, म्हणून तो गांवकऱ्यांचाही आवडता होता.

एकदा त्याचे दोन्ही बैल आजारी पडले. त्याने आपला शेजारी जगन याच्याकडून बैलांची जोडी उसनी घेतली, आणि त्याच्यासाठी मापभर तांदूळ अगोदरच दिले. सूर्यास्त होण्यापूर्वी बैल परत पोंचवायचं त्याने कबूल केले होते. त्यानुसार संध्याकाळ होण्यापूर्वीच त्याने बैल जगनच्या घरापर्यंत नेले. जगन झोंपला होता. म्हणून त्याने बैल गोठ्यांत नेऊन बांधून ठेवले आणि तो निमूटपणें निघून गेला. एव्हाना जगनला जाग आली होती. त्याने चंदाला बैल अंगणातून नेताना पाहिले होते. पण तो चंदाशी बोलायला कांही उठून बसला नाही.

नेमके त्याच रात्रीं जगनचे बैल कुणीतरी चोरुन नेले. प्रथम जगनला वाटलं कीं राजाकडे ही तक्रार करावी. पण नंतर त्याला वाटलं कीं याची नुकसानभरपाई चंदाकडूनच मागावी. लबाड जगनने चंदाला बैल बांधून परत जाताना पाहिलं होतं, पण चंदाला ते माहीत नव्हतं. म्हणून राजाचे शिपाई बैल शोधून आणीपर्यंत थांबण्यापेक्षां चंदाकडून वसुली करणे सहज शक्य होते.



दुसऱ्या दिवशी चंदा पुन्हां बैलांची जोडी मागायला गेला. जगनने चकित झाल्यासारखे दाखवून विचारले, "तू माझे बैल परत दिले नाहीस! कुठे विकलेस कीं काय? आता मात्र अगदी माहीत नसल्यासारखा चेहरा केला आहेस!"

"मी तुझ्या गोठ्यांत बैल बांधले आणि निघून गेलो. मला तुझी झोंपमोड करायची नव्हती." चंदाने स्पष्टीकरण दिले.

"खोटं सांगू नकोस. तू माझ्याकडून बैल नेलेस ना? मग तू ते मला सांगून पोंचवायला हवे होतेस तू बैल तरी पोंचव किंवा त्यांची किंमत तरी मला देऊन टाक." जगनने सांगितलं.

गांवच्या मुखियाकडे हे प्रकरण गेलं. चंदा खोटं बोलत नाही आहे हे जरी सर्वांना माहीत होतं, तरी त्याने बैल पोंचवले होते हे सांगण्यासाठी कांही पुरावाही नव्हता. त्यामुळें याचा न्यायनिवाडाही लौकर होईना.

गांवप्रमुख शेवटी म्हणाला, "मला निश्चितपणें ठाऊक आहे कीं जरी आपला नवा राजा एक अल्पवयी किशोर असला, तरी तो अत्यंत न्यायी व हुशार आहे. मला वाटतं कीं तुम्ही दोघांनीही त्यांच्याकडे जावं व त्यांनाच न्याय करण्याची विनंती करावी."

दुसऱ्याच दिवसी चंदा व जगन राजधानीला निघाले. वाटेंत त्यांना कांही मुलें शाळेंत जाताना दिसली. जेव्हां हे दोघेजण राजाला भेटायला जात आहेत असे त्यांना कळले, तेव्हां ती मुलें म्हणाली, "आम्ही या राजाच्या बुद्धीचं खूपच कौतुक ऐकलंय. तुम्ही त्यांना आमचे कोडे विचारुन उत्तर घेऊन याल कां? आम्ही रोज सकाळीं लवकर उठून अभ्यास करीत होतो. परंतु गेले सहा महिने,



आम्ही वेगवेगळ्या वेळीं उशीरा उठायला लागलो आहोत. साहजिकच आमचे लक्ष अभ्यासांत नीट लागत नाही. हे असं कां व्हावं?"

"कांहीतरीच काय? असल्या मूर्ख प्रश्नाचं उत्तर राजाला विचारतात कां? ते काय उत्तर देतील?" जगन रागावून बोलला. "मी कधीही राजाला असं विचारणार नाही."

"हरकत नाही. मी विचारुन उत्तर घेऊन येईन बरं!" चंदाने त्या मुलांची समजूत घातली व दोघेही मार्गस्थ झाले.

राजधानीला पोंचल्यानंतर ते राजाला दरबारांत भेटले. त्या छोट्या राजाने आपल्या पित्याच्या विश्वासू सेवकाला, चंदाला ओळखले. राजाला आनंद वाटला. चंदाने जगनला आपली तक्रार राजाला सांगायला विनंती केली. पण आता जगन जरा अस्वस्थ झाला. राजाजवळ त्याला खोटे बोलावे लागणार होते. आणि हा राजा तर फारच निराळा वाटत होता. चंदा निर्दोष आहे व

प्रामाणिक आहे हेही जगनला ठाऊक होतं. तरीदेखील, नाहीसे झालेल्या बैलांच्याबद्दल जेव्हां जगनने राजाला सांगितले, तेव्हां राजा त्याला म्हणाला, "तू इतरांनाही बैल भाड्याने देत होतास होय ना?"

"होय महाराज," जगन म्हणाला.

"आणि जर बैल वेळेवर सूर्यास्तापूर्वी आले नाहीत तर तू स्वतः जाऊन ते बैल परत घेऊन येत होतास, होय ना?"

"होय, महाराज!"

"मग चंदाने जर जनावरांना परत आणून सोडले नाही, तर तू त्याच्याकडे कां गेला नाहीस?"

जगनला कांही उत्तर देता येईना. राजा पुढे म्हणाली, "तू गांवाच्या पंचायतीसमोर खोटे बोलल्याबद्दल, इथें खोटे बोलल्याबद्दल आणि एका निर्दोष माणसाला त्रास दिल्याबद्दल आता मीच तुझ्यावर आरोप करतो आहे. बैल परत आलेले तू पाहिले होतेस आणि तरीही तू पाहिले नाहीस असं सांगतोस, तेव्हां तुझे डोळे निरुपयोगी आहेत. ते फोडून टाकायलाच हवेत." जगनने आपली लबाडी कबूल केली आणि राजाची क्षमा मागितली. चंदाच्या सांगण्यावरुन राजाने त्याला क्षमा केली.

"चंदा, माझ्या पिताश्रींची तू इतक्या निष्ठेने सेवा केली होतीस, त्याबद्दल तुला काय बक्षीस हवे आहे?" त्या लहानवयी राजाने विचारले.

"महाराज, मला कांही विद्यार्थ्यांनी एक प्रश्न विचारला होता, त्याचे उत्तर मला हवे आहे." चंदाने सांगितले, व वाटेंत भेटलेल्या शाळकरी मुलांनी विचारलेला प्रश्न त्याने राजाला कथन केला.

"मला वाटतं कीं पहांटे एक ठराविक कावळ्याचे ओरडणें ऐकून ती मुले जागी होत असावीत. कदाचित तो कावळा तिथून गेला असेल. म्हणून ती उशीरा उठायला लागली असतील. त्यांनी दुसरी कोणतीतरी पद्धत अंमलात आणून लौकर उठायची संवय केली पाहिजे. इच्छाशक्तीच्या बळावर हे सहज साध्य आहे."

हा बुद्धिमान किशोरवयी राजा हा दुसरा तिसरा कुणी नसून बुद्धाचा अवतार मानला जाणारा बोधिसत्व होता.





# वेषधारी राजा

धूमल गरीब होता. त्याला दोन मुलगे होते. थोरला मुलगा वडिलांना कामांत मदत करीत होता. स्वतः मजुरी करुन चार पैसे मिळवीत होता. धाकटा मुलगा राजा मात्र गांवभर उनाडटप्पूपणा करीत असे.

एके दिवशी धूमलने राजाला सांगितले, "आम्ही तुझं नांव मोठ्या प्रेमाने राजा ठेवलंय, पण त्याचा अर्थ तू राजा आहेस असं मात्र नव्हे हं! राजालादेखील प्रजेची कामें करावी लागतात; अर्थात जर प्रजेचं कल्याण करायची त्याची इच्छा असली तरच! तुला जर आमच्याबरोबर राहायचं असेल तर तुला तुझ्या भावासारखं काम करावं लागेल. तसं करायचं नसेल तर या घरांत राहायचा तुला कांहीही अधिकार राहाणार नाही." धूमलने कठोर स्वरांत त्याला सांगितलं.

राजा संतापला व घरांतून चालता झाला. स्वतःशीच बडबडायला लागला कीं मी गरीब आहे; पण म्हणून कांही माझं नांव राजा असूं नये असं थोडंच आहे! विचार करीत तो सरळ रामाच्या मंदिरांत पोंचला.

त्या वेळीं मंदिराच्या कट्ट्यावर एक संन्यासी बसलेला होता. राजाने आपला सारा राग त्या संन्याशावरच काढला. तो त्याला म्हणाला, "माझं नांव राजा आहे. पण माझ्या वडिलांनी हे नांव ठेवून माझी वर टिंगल केली. आता तुम्ही संन्याशाचा वेष धारण केला आहेत, पण वेष धारण केलाय म्हणून तुम्ही कांही खरोखरीचे संन्याशी थोडेच झाला आहात?"

संन्याशाला त्याची बडबड कांही समजेना. त्याला जरा शांत करुन, खरी गोष्ट काय ती जाणून घेण्याच्या उद्देशाने संन्याशी म्हणाला, "बेटा, राजा आपल्या पद्धतीने जगतो आणि संन्याशी आपल्या पद्धतीने! पण जीवनांत माणसाला हवी तृप्ती! जे

आहे त्यांत समाधान मानायला शिकलं पाहिजे. गरीबदेखील सुखी असतात, ते कष्टांना घाबरत नाहीत, संकटांशी हंसत सामना करतात. तू मला दोन दिवसांचा अवधी दे. मी तुझी शंका दूर करीन. मी तुझा हितचिंतक आहे असं समज."

असं म्हणून संन्याशी कट्ट्यावरुन खाली उतरला आणि चालता झाला. राजाही त्याच्या पाठोपाठ जाऊं लागला. थोड्या वेळानंतर दोघेही पुंगनूर गांवात पोंचले. त्यावेळीं त्या गांवातल्या देवीची पूजा चाललेली होती. त्या उत्सवांत कांही लोक नाचत होते तर कांहीजण ढोलकें वाजवून त्या तालावर उड्या मारीत होते.

त्या उत्सवाचे एक खास महत्व होते. त्या दिवशी गांवातली एक व्यक्ती राजाचा वेष धारण करुन हत्तीवर स्वार होऊन गांवात फेरी मारायचा. राजाचा जितका आदर व सन्मान केला जायचा, तितकाच त्या माणसाचा केला जायचा.

हत्तीवर बसलेल्या त्या व्यक्तीला दाखवून संन्याशी राजाला म्हणाला, "हा उत्सव मी यापूर्वी दोन वेळां पाहिलेला आहे. राजाचा वेष धारण केलेल्या माणसाची ऐट तरी जरा पाहा. आपल्या जीवनांत जे मानवाला मिळूं शकत नाही, ते तो दुसऱ्यांच्यामधे पाहून तृप्त होतो. पण थोड्याच वेळानंतर त्याची काय दशा होतेय ते तूच पाहाशील."

शेजारीच एक त्रयस्थ उभा होता. याविषयी जास्त माहिती सांगावी म्हणून त्याने संन्याशाला सांगितलं, "हल्लींच्या राजांच्या पूर्वजांपैकीं एकजण अत्यंत गरीब होता. राजा बनण्याची त्याची तीव्र इच्छा होती. असं सांगतात कीं त्याने एका उत्सवांत राजासारखा पोशाख केला आणि आपल्या जिभेंत लहानसा त्रिशूळ टोंचून घेऊन तो देवीच्यासमोर नाचायला लागला. त्यानंतर तोच राजा झाला. तेव्हांपासून ही जुनी पद्धत चालूं ठेवण्यासाठी आता आम्ही नेहमी जो आपल्या जिभेंत त्रिशूळ टोंचून घेऊन देवीची पूजा करेल







अशा एखाद्या गरीब माणसांचीच निवड करतो."

राजा चटकन म्हणाला, "त्यांत चूक काय आहे? पैसे मिळणार असतील तर त्या सुखासाठी कांहीही करायला हरकत नाही. परंतु जिभेंत त्रिशूळ टोंचून घेऊन राजा होण्याची इच्छा बाळगणे हा शुद्ध मूर्खपणा आहे."

संन्यासी किंचित हंसून म्हणाला, "उत्सवाची समाप्ति झाली की आपण त्या वेषधारी राजाच्या घरी जाऊं आणि त्याच्याकडून खरी माहिती मिळवूं या."

आणि ते त्या वेषधारी राजाच्या पाठोपाठ मंदिरापर्यंत गेले. मंदिरांत पोंचल्यावर तो वेषधारी राजा हत्तीवरुन खाली उतरला, त्याने आपला राजाचा वेष उतरवला आणि थोडा वेळ तो देवीच्यासमोर नाचत राहिला. त्यानंतर मंदिराच्या पुजाऱ्यांनी खऱ्या राजाकडून मिळालेल्या भेटवस्तू त्या वेषधारीकडे सुपूर्द केल्या.

दुसऱ्या दिवशी सकाळींच संन्यासी आणि राजा त्या वेषधारीच्या घरीं गेले. एका लहानशा झोंपडीत तो तरुण, चंपक, राहात होता. त्याने संन्यासी व राजाचे आदराने स्वागत केले.

चंपक तिशीचा होता. त्याला एक मुलगी व एक मुलगा अशी अपत्ये होती. त्याचे आईवडील म्हातारे होते. त्याला एक बहीण होती. आणि तिच्या लग्नाची जबाबदारी त्याच्यावरच होती. चंपक मजुरी करीत असे. आईवडीलदेखील कांही ना कांहीतरी काम करुन थोडंफार कमावत होते. चंपकची पत्नी व बहीण भाजी विकत असत.

चंपकने फार आग्रह केल्यामुळें संन्यासी व राजाने त्यांच्याबरोबर भोजन केले. चंपक आणि त्याचे कुटुंबिय यांच्यात त्या दिवसाच्या कमाईबद्दल आपापसांत बोलणीं सुरुं झाली. सर्वांनी जी मेहनत केली होती आणि त्याचे फळ म्हणून जी रक्कम मिळाली, ती पाहून ते सर्वजण फारच

खूष झालेले दिसत होते. त्यांचे एकमेकांवरचे प्रेम व आपुलकी बघून राजाला आपल्या घराची आठवण आली.

चंपकने त्या दोघांना आपण हा राजाचा वेष कां धारण केला, त्याचे स्पष्टीकरण सांगितले. ''कांही पिढ्यांच्या अगोदर हल्लींच्या राजाचा पूर्वज आमच्या जातींत जन्मलेला होता, मी जशी काल देवीची पूजा केली, तशीच त्यानेही केली होती असं सांगतात. तो नंतर राजा बनला. माझ्याही मनाच्या एका कोंपऱ्यांत राजा होण्याची तीव्र इच्छा बसलेली आहे. जिभेंत त्रिशूळ टोंचून घेण्याची कला शिकण्यासाठी मी अनेक कष्ट, अडचणींशी सामना केला आहे.

त्या दरम्यान मला असं वाटायला लागलं कीं जर मी एखादे उपयुक्त काम शिकलो आणि कमवायला लागलो तर किती चांगले होईल! या गरीब परिस्थितीवरदेखील विजय मिळवता येईल. म्हणून आम्ही सारेजण कांही ना कांही, लहानसहान उद्योग करीत राहातो. म्हणजे आम्हाला गरीबींत कायमचे राहावे लागणार नाही. जिभेंत त्रिशूळ टोंचून घेण्याची ही विद्या मी आपल्या मुलालादेखील शिकवलेली आहे.''

संन्यासी व चंपक यांचे राजाने मनापासून आभार मानले व तो घरी परतला. त्याला पाहून सर्वांनी अतिशय प्रेमाने त्याला सांगितलं, ''अरे, कुठे गेला होतास? याच्यापुढें तू कांहीही काम केले नाहीस तरी चालेल. आम्ही तुला रागावणार नाही. फक्त, असं न सांगता आम्हाला सोडून जाऊं नकोस रे!''

राजाने त्यांना संन्याशी व चंपकच्या परिवाराबद्दल सविस्तर माहिती सांगितली आणि म्हणाला, ''आता मी बरंच कांही शिकलोय. पैसे मिळवल्याखेरीज माणसाला कांहीही करता येत नाही हे मला समजलंय. पैसे मिळवायचे, म्हणजे कष्ट करायला लागतात. हे सत्य मला यापूर्वी कधी कळलं नव्हतं, त्याचा मला आता पश्चाताप होतो आहे.''

त्या दिवसापासून राजा आपला थोरला भाऊ व वडील यांच्याबरोबरीने मजुरी करायला लागला आणि त्याला चांगली कमाई होऊं लागली. जेवढी मिळकत येऊं लागली, त्यांत आनंद मानून तो उद्योगी जीवन जगायला शिकला.







# फाटकी थैली

कृष्णपुरांत रामवर्मा नांवाचा एक पंडित राहात होता. तिथल्या गुरुकुलांत तो शिक्षक होता. तो अतिशय शांत, सरळ स्वभावाचा होता. कधीही, केव्हांही, कशाही परिस्थितींत तो विद्यार्थ्यांना रागवत नसे किंवा कठोर शिक्षा करीत नसे.

एकदा एक शेतकरी आपल्या मुलाला, दिलीपला घेऊन त्यांना भेटायला आला. त्याला आपला मुलगा गुरुकुलांत शिकावा असे वाटत होते. रामशर्माने त्याची बारीकसारीक प्रश्न विचारुन चांचणी घेतली आणि त्याला गुरुकुलांत दाखल केले.

थोड्या दिवसांतच रामशर्माच्या लक्षांत आले कीं दिलीपला लिहिण्यावाचण्यांत विशेष रस नाही. त्याचे वागणेंही इतर विद्यार्थ्यांच्यापेक्षां निराळें होते. वर्गांत त्याचे लक्ष नसे. त्याची अभ्यासाची पुस्तकें तो हरवायचा. त्याने कधी व्यायामशाळेंत डोकावून देखील पाहिले नाही; पण जेवणाच्या वेळीं मात्र तो इतरांच्याआधी भोजनालयांत पोंचायचा. त्याचा आहारही सणसणीत होता. खूप खाण्यामुळें वर्षभरांतच तो जरा लठ्ठंभारती दिसूं लागला. पण त्याची बुद्धिमत्ता मात्र एकाच जागी ठप्प बसून होती.

शिक्षणाचे जीवनांत किती महत्व आहे हे दिलीपला अत्यंत प्रेमळपणें सांगायचा रामशर्माने प्रयत्न केला. अशिक्षित माणूस एखाद्या जनावरासारखा असतो. पण दिलीपवर गुरुजींच्या सांगण्याचा काडीमात्र उपयोग झाला नाही. तेव्हां मात्र रामशर्माला वाटलं कीं दिलीप सुधारण्याची कांही शक्यता दिसत नाही.

रामपूरमध्यें राहणारे रामशर्माचे गुरुजी त्याला भेटायला आले. स्वागतपर व इकडच्या तिकडच्या गप्पा झाल्यानंतर रामशर्माने दिलीपबद्दल सांगताना म्हटले, ''मी याला शिक्षित करुं शकणार नाही. माझे सारे प्रयत्न वाया गेले. आता याला तसाच गांवी परत पाठवण्याखेरीज मला दुसरा कांही मार्ग दिसत नाही.''

तेव्हां त्या जेष्ठ गुरुजींनी सांगितले, ''इतका निराश होऊं नकोस. अशा लोकांना बदलण्याचे

- रामदेव -

लहानसहान उपायही असतात. फक्त मोठ्या, लांबलचक प्रयत्नांनी अशी मठ्ठ माणसं बदलतात, असं नाही. त्याला स्वतःलाच प्रथम त्याच्यांत काय कमी आहे त्याची जाणीव करुन द्यायला हवी. ते जर आपल्याला जमलं नाही, तर त्याचं वागणं आणि अडेलतट्टू विचार याच्यावर त्याचं लक्ष वेधलं पाहिजे. कांहीही झालं तरी पुस्तकी विद्येबरोबरच अनुभवाची विद्यादेखील तितकीच आवश्यक आहे.'' आणि रामशर्माला यासाठी आवश्यक उपायही त्यांनी सुचवले.

दुसऱ्या दिवशी रामशर्माने दिलीपला बोलावून म्हटले, ''काल जे मोठे गुरुजी आले होते, त्यांना तू पाहिलंस कीं नाही? ते रामापूरमधें राहातात. ते गांव इथून फारसे लांब नाही. त्यांच्याजवळ कांही ग्रंथ आहेत, ते आपल्याकडे नाहीत. तू चालत जाऊन त्यांच्या घरीं जाऊन ते ग्रंथ घेऊन ये. रस्त्यांत तुला खायला प्यायला जे पैसे लागतील ते या पिशवींत आहेत.'' असं म्हणून त्याने एक थैली दिलीपला दिली.

खूष होऊन दिलीपने निमूटपणें ती पिशवी खांद्यावर लटकावली आणि रामापूरला जायला निघाला. वाटेंत एका ठिकाणीं बाजार भरला होता. तिथें त्याने एक खाण्याच्या वस्तूंचे दुकान पाहिले. गुरुजींनी त्याला पैसे दिले होतेच. ते काढण्यासाठी त्याने पिशवींत हात घातला. पण पाहिलं तर पिशवीला मोठी भोकं पडली होती आणि त्यांत एकही नाणं नव्हतं. त्याचा चेहरा पार उतरला. दिलीपची ही अवस्था पाहून एका इसमाने म्हटलं, ''अरे, तुझे पैसे रस्त्यांतच पडले असतील. परत जा नि शोध!''

त्या माणसाचा सल्ला दिलीपला आवडला नाही. त्याला परत जायचं नव्हतं. लहपणामुळें



पुन्हां इतकं अंतर चालायची कल्पनाच त्याला सहन करवेना. दुःखी होऊन तो बाजारांतून बाहेर पडला. समोरुन एक भिकारी त्याच्यासमोर आला आणि भिक्षा मागत म्हणाला, ''दादा, फार भूक लागलीय हो! कांहीतरी दान द्या.'' त्याने दोन्ही हात दिलीपसमोर पसरले.

दिलीपने त्याला साफ सांगितलं कीं त्याच्याजवळ देण्यासाठीं कांहीही नाही. आणि तरीदेखील भिकारी त्याच्या पाठोपाठ येत राहिला. शेवटीं कंटाळून तो भिकारी चिडला आणि दिलीपला शिव्या देत परत फिरला. थोड्या दूरवर गेल्यानंतर झाडींतून एक गलेलठ्ठ मिशा असलेला राकट माणूस समोर येऊन उभा ठाकला, आणि सुरा काढून म्हणाला, ''त्या पिशवींतजे कांही आहे ते काढून मला दे.''

भीतीने थरथरत दिलीपने कांपऱ्या स्वरांत उत्तर दिलं, ''भाऊ, या पिशवींत कांहीही नाही हो! ही अगदी रिकामी आहे. ही पिशवी फाटकी आहे बघा!'' दिलीपने चोराला ती पिशवी उलटी करुन दाखवली. चोर जोरजोराने हंसू लागला ''वा रे वा! कसला माणूस आहेस रे तू! फाटकी पिशवी खांद्यावर मिरवत जातो आहेस काय? फारच शहाणा दिसतोस कीं रे!'' असं खिजवून तो झाडींत पुन्हां दिसेनासा झाला.

आणखी थोडा वेळ चालून शेवटी दिलीप एकदाचा रामापूरला पोंचला आणि त्या थोरल्या गुरुजींच्या घरीं पोंचला. ते फाटकापाशी जणू कांही त्याची वाट पाहात उभे होते. त्यांनी दिलीपला नखशिखान्त न्याहाळून विचारलं, ''खूप दमलेला दिसतोस, होय ना? चल आधी घरांत, हातपाय धू आणि अगोदर फराळ कर, म्हणजे थकवा दूर होईल.''



त्यांचे प्रेमळ बोलणें ऐकून दिलीपचे डोळे पाण्याने भरले, आणि त्याच्या डोळ्यांतून अश्रुसरी वाहू लागला. त्याने गुरुजींना त्याच्या खडतर प्रवासाची कथा सांगितली आणि म्हटले, ''माझ्या या साऱ्या त्रासाचं मूळ आहे ही फाटकी पिशवी.''

थोरल्या गुरुजींनी मोठ्या प्रेमाने त्याचा खांदा थोपटून समजावले, ''अरे दिलीप, तुझ्या गुरुजींनी तुला मुद्दामच ही फाटकी पिशवी दिलीय असं मात्र समजू नकोस. त्यांनी तुला सांगितलं होतं कीं यांत पैसे आहेत. पिशवींत किती पैसे आहेत, ते तू तिथेंच मोजून घ्यायला हवे होतेस. तसं केलं असतंस तर ही पिशवी फाटकी आहे हे निथल्या तिथेच समजलं असतं कीं! आता पिशवीला भोकं होती म्हणून पैसे वाटेंत पडलेही असतील. तू परत फिरुन ते शोधायला हवे होतेस.''

"तसा विचार मनांत आला. कुणीतरी तसा सल्लाही दिला. पण मला पायीं चालायची संवयच नाही, त्यामुळें अगोदरच मी इतका दमलो होतो. त्यामुळें परत जायची मला मुळीच इच्छा नव्हती."

"पाहिलंस! व्यायामशाळेंत जाऊन जरा तालीम करायची संवय केली असतीस तर अशी परवड झाली नसती तुझी! त्याने थकवा कमी होतो. निदान आता याच्यापुढें तरी रोज नियमित व्यायाम करीत जा." गुरुजींनी सांगितलं.

"मी नक्की व्यायाम करीन, गुरुजी." दिलीपने खाली मान घालून उत्तर दिले.

त्याच्याकडे पुन्हां टक लावून पाहात थोरले गुरुजी त्याला म्हणाले, "तू वर्षभर गुरुकुलांत राहिलास, पण नीट लिहायला वाचायला देखील तुला अजून येत नाही, निदान साधे व्यवहारज्ञान जरी थोडे फार शिकायचे, पण ते ही नाही तू केलेस! अरे, जेव्हां तुला समजलं कीं ती पिशवी फाटकी आहे, तेव्हां ती तू फेंकून द्यायचीस कीं! म्हणजे भिकाऱ्यानेही तुला सतावलं नसतं किंवा चोरानेही घाबरवलं, धमकावलं नसतं!"

त्यानंतर थोरल्या गुरुजींनी त्याला जवळच्या टेबलावर बसवलं आणि त्याच्यासमोरच्या खुर्चीवर ते बसले नि त्याला पुढे म्हणाले, "आज तुला जितक्या अडचणींशी आणि संकटांशी सामना करायची वेळ आली, त्याचं कारण आहे तुझा मूर्खपणा आणि अडाणीपणा! गुरुकडून विद्या शिकून घेण्याची संवय कर. जे शिक्षण मिळेल, त्याचा उपयोग करण्याची इच्छा आणि संवय तुला असली पाहिजे. म्हणजे नंतर ज्ञान आपोआप मिळत जाते. तुला ठाऊक आहे ना, हनुमान समुद्र पार करण्याचा विचार जेव्हां करीत होता, तेव्हां रामाने कांही त्याला एखादी नाव मिळवून दिलेली नव्हती."

हे सारं ऐकल्यानंतर दिलीपला आपल्या उणीवांची जाणीव झाली. थोरल्या गुरुजींनी दिलेले ग्रंथ घेऊन तो आनंदाने गुरुकुलांत परतला. दिलीपच्या वृत्तींत बदल झाला आहे हे रामशर्माच्या लगेच लक्षांत आले. थोरल्या गुरुजींच्या सल्ल्यानुसार उपयोगांत आणलेली फाटकी पिशवी, भिकारी आणि चोर, यांच्यामुळें हा चमत्कार घडला होता.






## रेशमी रस्ता



रेशमी वस्त्र म्हटलं कीं भारतांतला कोणता भाग आठवतो? कांचीपुरम, म्हैसूर, मुर्शिदाबाद, वाराणसी, कश्मीर....? आता पहा, या सगळ्या गांवातल्या पारंपारिक रेशीम व्यवसायाचे मूळ आहेत गुजरातमधले रेशीम बिणकर! सौराष्ट्रांतले विणकर दक्षिणेंत व उत्तर प्रदेशांत गेल्याचे ऐतिहासिक दाखले आहेत. एका शिलालेखानुसार विणकरांचे तांडे सहकुटुंब गुजरात सोडून इतरत्र स्थायिक झाले. कारण चौदाव्या शतकांत रेशीमधंदा असलेल्या गांवात मोठी आग लागली व अपार नुकसान झाले होते. आठव्या शतकांतही अनेक विणकरांनी भारतांत इतरत्र स्थलांतर केल्याचे पुरावे उपलब्ध आहेत.

## 'धरणें' व 'घेराव'



तुमचे म्हणणें कुणी ऐकत नसले आणि तुमचा मुद्दा तुम्हाला पटवून द्यायचा असेल तर तुम्हाला 'धरणें' धरावे लागते किंवा 'घेराव' घालावा लागतो. तुमची मागणी जे कुणी मान्य करीत नसतील, त्यांच्या दाराशी ते होकार देईपर्यंत बसून राहायचे! हा नवा जबरदस्त प्रभावी पवित्रा आहे, असं मात्र नाही हं! अनेक शतकांपूर्वीपासून हा धरणें धरण्याचा मार्ग आपल्या देशांत अनुसरला जात होता. जुन्या पुराणग्रंथांमधे न्यायशास्त्रांत 'घेराव' चा उल्लेख आहे.

त्याला ते अचरित म्हणत असत. त्या मूळग्रंथांवरून सामान्य जनच नव्हे तर राजे, मंत्री व दरबारीही आपली मागणी मान्य करण्यासाठीं धरणें धरीत. त्यांत बैठक मारणें, उपवास किंवा आत्मदहन यांचाही उल्लेख केलेला आहे.

## बारा वर्षांचा मुलगा एकटा राहिला

नैऋत्य लंडनमधें रुफस पोलॉक हा बारा वर्षांचा मुलगा शाळेंतून घरी आला आणि त्याची आई, ५३ वर्षांची जिल् पार्कर, ही घरांत नव्हती. ती त्या दिवशी आली नाही, दुसऱ्या दिवशीही नाही, पुढचे बारा दिवस ती घरी आलीच नाही. पंधरा दिवस आई येईल या आशेने तो मात्र रोज शाळेंत जात होता. त्याच्या आईच्या ऑफिसमधले सहकारी तिची गैरहजेरी पाहून चौकशीसाठी घरी गेले. तेव्हां सर्वांना कळलं कीं हा मुलगा एकटाच राहात होता. त्याची आई हरवलीय किंवा दिसत नाही, हे त्याच्या लक्षांत आलं नाही, म्हणून त्याने पोलिसांत कळवले नाही. त्याची आई त्यांच्या घराजवळच एका होटेलमधे सांपडली, व तिच्यावर मुलाची हेळसांड केल्याचा आरोप करण्यांत आला.




## तरंगती आगगाडी




शांघाय हे चीनमधलं सर्वांत दाट वस्तीचं शहर आहे. तिथें जर्मन बनावटीची 'मॅगलेव' गाडी ही व्यापार केंद्राच्या पुडाँग भागांतून ३१ कि.मी. अंतरावरच्या विमानतळापर्यंत ताशीं ४०० कि. मी. या वेगाने जाऊन १४ मिनिटांत परत आली. या गाडीत चीनचे पंतप्रधान झु रोंगजी व जर्मन चॅन्सेलर जेरहार्ड शोडर हे प्रवास करीत होते. हा मार्ग लोहचुंबकाच्या तत्वावर बनवलेला असून रुळांच्यावर कांही मिलीमिटर तरंगत राहातो. विमानतळावर जाण्यासाठी टॅक्सीने हे अंतर काटण्यास एक तास लागतो.





# असंतोष हाच आपला शत्रू

मदन नेहमी असंतुष्ट असे. सारेजण त्याला सांगत कीं इतकी नाराजी चांगली नसते, त्यांत त्याचेच नुकसान होऊं शकते, पण तो कुणाचंच ऐकत नसे. आईवडलांनी त्याचे अति लाड केले म्हणून तो बिघडलाय असं सगळे लोक म्हणत. पण यापुढें आता त्याला कडक शिस्तींत वागवायचं असं त्याच्या आईवडलांनी ठरवलं.

त्या दिवशी सकाळीं मदन उठला आणि आईला म्हणाला, "मला खूप भूक लागली आहे. कांहीतरी झटपट खायला करुन दे. गांवाबाहेरच्या ओढ्या-जवळ माझे मित्र माझी वाट पहात असतील."

"इतक्या सकाळीं उठून तिकडे कशाला जाणार आहेस रे? मागीलदारी जाऊन जरा झाडांना पाणी घाल. तरच मी तुला खायला देईन." आईने दटावले.

झालं, मदन रागावला. संतापून तो आईला म्हणाला, "आता दिवसभर मी घरीं कांहीही खाणार नाही." त्याची आई घाबरली, आणि त्याची समजूत घालायला लागली, "अरे, एवढा नाराज कां होतोस रे? आता मी न्याहारीसाठी थालिपीठ लावते. याच्यापुढे मी तुला कोणतंही काम करायला सांगणार नाही बरं!"

पण मदन मात्र आपला हट्ट सोडायला तयार होईना. आईला वाईट वाटले व तिने ही गोष्ट आपल्या नवऱ्याला सांगितली. त्याने चिडून म्हटलं, "तुझ्या या आचरट लाडांनीच तो दिवसें दिवस बिघडत चाललाय. जेव्हां पहावं तेव्हां फक्त खेळत असतो. घरांतलं एकही काम कधीं करत नाही. जोपर्यंत तो झाडांना पाणी घालत नाही, तोपर्यंत त्याला जेवण देऊं नकोस."

मदनने वडिलांचे बोलणें ऐकले. आणि त्याचा असंतोष जास्तच वाढला. तो तडक तिथून निघून गेला. जेव्हां तो ओढ्याच्या कांठावर पोंचला तेव्हां त्याचा एक मित्र तिथें बसला होता आणि तो गुडदाणी खात होता.

मदनने त्याला विचारलं, "मी उपाशी आहे. मलाही थोडी दे ना खायला!"

"हे बघ, मीही उपाशी आहे. एवढंसं हे खाणं

- समीर -



मलाच पुरेसं नाही." असं म्हणून मित्राने त्याला गुळदाणी खायला साफ नकार दिला. मदन नाराजीने त्याला म्हणाला, "जा, जा, यापुढें मी तुझ्याशी बोलणारच नाही."

तेवढ्यांत इतर मित्र आले. ते घरीं न्याहारी करून आले होते. म्हणून त्यांच्याजवळ खायला कांहीच नव्हते.

मदन त्या सर्वांवरच चिडला. तिथून तो निघाला. जवळच एका झाडाखाली एक म्हातारी भजीं तळत बसली होती. तिथें जाऊन त्याने भजीं मागितली. तेव्हां ती म्हणाली, "पैसे दिलेस कीं देईन ना! मी इथें भजी विकायला बसले आहे, फुकट वाटायला नव्हे!" मदनला वाटलं कीं तिच्या टोपलीला लाथ मारावी. पण शेजारीच म्हातारीचा पाळलेला कुत्रा बसला होता, तो भुंकायला लागला. कुत्रा पाहून मदन घाबरला अन् पळायला लागला.

रस्त्यांत एका शेतकऱ्याने त्याला हटकले नि विचारले, "असा कां पळत सुटला आहेस?"

मदनने शेतकऱ्याला आपली रडकथा सांगितली. शेतकऱ्याला त्याची दया आली. तो म्हणाला, "हे बघ, माझ्या शेतांत वांग्याचे ढीग लागले आहेत. त्यांतली लहान वांगी व मोठी वांगी तू वेगवेगळी कर. हे काम केलंस कीं मी तुला पोटभर जेवण देईन."

"मी माझ्याच घरीं कधी काम करत नाही! तुमच्या शेतांत मी थोडाच काम करायला बसलोय? मला काम करायला सांगायची तुझी हिंमतच कशी झाली?" असं म्हणून मदनने एक छोटासा दगड उचलला आणि त्या शेतकऱ्याच्या दिशेने फेकून मदन पुन्हां पळायला लागला.

शेतकऱ्याने थोडा वेळ त्याचा पाठलाग केला. नंतर त्याच्या इतके जोरांत पळता येईना म्हणून तो थांबून परतला. अशा तऱ्हेने मदन दिवसभर प्रत्येकाशी भांडत बसला. आता तो अगदी वैतागला होता आणि त्याला खूप भूकही लागली होती. पण तो काय करणार? चालत चालत तो गांवाबाहेर एका आश्रमांत पोंचला. तो आश्रम श्रीकृष्णानंद स्वामींनी सुरुं केला होता. तिथें रोज गरीब लोकांना अन्नदान केलं जायचं. त्याचप्रमाणें प्रवचनें, उपदेश व सल्ला यांचीही सोय होती.

मदन स्वामीजींच्याजवळ गेला. त्यानी आपली बाजू मांडली आणि जेवण मागितले. स्वामीजींनी त्याच्या खांद्यावर प्रेमाने हात ठेवून म्हटले, "जोपर्यंत अंधार पडलेला नाही, तोपर्यंत अन्नदान सुरुं होणार नाही. त्यापूर्वी मी सांगतोय ते नीट लक्ष देऊन ऐक."

मदन चांगलाच चिडलेला होता, पण आणखी कुठे जायची त्याच्यात शक्ती उरली नव्हती. त्याला खूप थकल्यासारखे वाटत होते. म्हणून तो तिथेंच निमूटपणें बसला आणि स्वामीजींचे प्रवचन ऐकूं लागला. थोड्या वेळांतच भुकेने कासावीस झाल्यामुळें त्याच्या डोळ्यांसमोर अंधारी आली व तो बेशुद्ध पडला.

स्वामीजींच्या शिष्यांनी त्याच्या चेहऱ्यावर पाणी शिंपडले आणि तो शुद्धीवर आल्यानंतर त्याला उठून बसवले. श्रीकृष्णानंद स्वामींनी प्रेमाने त्याची पाठ थोपटली आणि लागलीच त्याला जेवण देण्याची व्यवस्था केली.

मदनला शिष्यांनी जेवणघरांत नेले आणि पोटभर जेवूं घातले. जेव्हां मदन त्यांना आपली कहाणी सांगत होता तेव्हां स्वामीजी तिथे आले आणि त्यांनी विचारलं, "मदन, आता तुझे पोट भरले ना?"

मदनने मोठ्या खुषींत मान डोलावली. तेव्हां स्वामीजींनी त्याला म्हटले, "तुझा असंतोष हाच तुझा शत्रू आहे. कारण नसताना तू आपल्या आईवर चिडलास. त्या चिडचिडीमुळें तुला दिवसभर उपाशी राहावे लागले. त्यामुळेंच तू मित्रांशी भांडलास, इतरांशी तंटा केलास, त्यांचा राग ओढवून घेतलास. या सगळ्याचं मूळ कारण आहे. तुझा असंतोष! असंतुष्ट राहून कुठे जेवायला मिळतं कां? लक्षांत ठेव, तुझ्या स्वभावांतला हा असंतोष दूर करायचा प्रयत्न कर."

मदनने आपली चूक कबूल करत म्हटले, "माझं फार चुकलंय. माझे आईवडील माझी काळजी करीत असतील ना!" आणि त्याला रडूं कोसळले.

स्वामीजींनी त्याला धीर देत म्हटले, "तू इथें आलास, त्यानंतर तू इथें सुखरूप आहेस हा निरोप मी तुझ्या घरीं पाठवला आहे. म्हणून ते विशेष काळजी करणार नाहीत. अजूनही वेळ गेलेली नाही. चिडचिड कमी कर आणि शांत हो. नाहीतर तुझा हा स्वभाव तुझ्या आयुष्याचे वाटोळे करील." स्वामीजींनी एका शिष्याबरोबर त्याला घरी पोंचवले.

दुसऱ्या दिवशी मदन आपल्या मित्रांना भेटला आणि त्यांना घेऊन आश्रमांत प्रवचन ऐकायला गेला. त्या दिवशी विषय होता, 'असंतोष हाच आपला शत्रू'. आणि त्यांनी मदनची गोष्ट सर्वांना खुलवून सांगितली.

"मला वाटलं होतं कीं सगळ्या गोष्टी खोट्या असतात. पण आता समजलं कीं गोष्टी म्हणजे रोजच्या जीवनातलं एक सत्य आहे." मदनने स्वत:ला सांगितलं. त्या दिवसापासून तो रोज आश्रमांत जाऊं लागला. तिथल्या वातावरणांत व संस्कारांत त्याचा स्वभाव बदलला. आता घरांतले व बाहेरचे सारे लोक मनमोकळेपणाने त्याचे कौतुक करायला लागले, "मदन एक चांगला मुलगा आहे!"



# भारताची ओळख

*स्वातंत्र्य मिळाल्यापासून भारताने अनेक क्षेत्रांत प्रगती केलेली आहे आणि कांही बाबतीत नेत्रदीपक कामगिरी केलेली आहे. याविषयीं तुम्हाला दर महिन्याला कांही प्रश्न विचारून आम्ही तुमची चांचणी घेणार आहोत.*

१. भारतांत पहिल्या ॲटॉमिक एनर्जी कमिशनचे प्रमुख कोण होते?
२. दादासाहेब फाळके पुरस्कार केव्हां सुरु झाला? त्याचे पहिले मानकरी कोण होते?
३. अंटार्टिकाला जाणाऱ्या पहिल्या पथकाचे नेतृत्व कुणी केलं होतं? ते त्या बर्फाळ प्रदेशांत केव्हां पोंचले?
४. १९८९ नव्हेंबरमधें, एक भारतीय गिर्यारोहण पथक हिमालयांत गेले होते. या पथकाच्याबद्दल कोणती विशेष बाब होती?
५. १९८९ मधें आशियाई स्नूकर स्पर्धेत कोणता भारतीय खेळाडू प्रथम विजेता ठरला?
६. दोघां प्रसिद्ध निसर्गप्रेमींना 'पक्षीमित्र' व 'सर्पमित्र' या पदव्या मिळाल्या. हे दोघे कोण आहेत?
७. दशमान चलन पद्धती केव्हां अंमलात आली?
८. १९५३ सालीं कोणत्या घटनेमुळें साऱ्या जगाचे लक्ष भारताकडे लागले?
९. भारतात शौर्यासाठी दिला जाणारा सर्वश्रेष्ठ सन्मान कोणता आहे?
१०. १९८८ मधें युनेस्कोकडून एका प्रसिद्ध भारतीय टेनिस खेळाडूला 'मेन फेअर प्ले ट्रॉफी' मिळाली होती. त्याचे नांव सांगा.

## मार्चच्या कोड्याची उत्तरें

१. हनुमान, परशुराम, महाबली, व्यास, बिभीषण, कृप व अश्वत्थामा
२. कुबेर.
३. छाया.
४. आम्रफल
५. शांतनू व भीष्म
६. सर्वदमन
७. शिखंडी
८. हे सर्व सूर्यवंशी होते.
९. कुंती - पार्थ किंवा अर्जुनाची माता.



# गणेश पुराण

वातापिनगराच्या मध्यवर्ती जागी असलेली विघ्नेश्वराच्या आकृतीची ती शिला जगांतले एक अपूर्व शिल्पकलाकौशल्य म्हणून प्रसिद्धीस यावे, अशी एक इच्छा अगस्ती मुनींच्या मनात होती. लोपामुद्राही चित्रकलेत प्रवीण होती. ती त्या जागी आली व तिने ती शिला लक्षपूर्वक पाहिली. त्या शिलेवर गणनायकाचे रूप कसे असावे याची कल्पना करून तिने त्याचे एक चित्र रेखाटले.

परंतु त्या चित्राप्रमाणे विघ्नेश्वराचे रूप शिलेवर कोरणं म्हणजे सामान्य गोष्ट नव्हती. कुणी शिल्पकार ते काम करायला मिळाला नाही. अगस्त्य मुनी चिंतित होऊन त्या शिलेसमोर बसले व ते चित्र आणि शिला बारंबार पहात राहले.

सर्व शिल्पकार चित्र पाहून म्हणाले- "या चित्रांत दाखविल्याप्रमाणें या शिळेला गणपतीचे रूप देणे विश्वकर्मा किंवा मयासुर या दोघां व्यतिरिक्त कोणाला शक्य होईलसे वाटत नाही."

त्यावेळी विश्वकर्म्याची बायको, म्हणजे विष्णूची मानसपुत्री विश्वकला रुसून माहेरी निघून गेली होती. म्हणून विश्वकर्मांची बुद्धी काम करीत नव्हती. राक्षसाचा शिल्पी मयासुर याची बायको, अप्सरा हेमाही परत देवलोकी गेली असल्या कारणाने तो वेड लागल्यासारखा भटकत फिरत होता.

अशा तऱ्हेने अगस्त्य मुनींना त्या महाशिळेला लोपामुद्राने चितारलेल्या गणनायकाचे रूप देणे, म्हणजे एक मोठा प्रश्नच होऊन बसला. म्हणून त्या शिळेसमोर मुनी रात्रंदिवस विघ्नेश्वराचं ध्यान लावून व आहार निद्रा विसरून बसून राहिले. ते विघ्नेश्वराचं स्मरण करून म्हणत होते- "गणेशा! या पुढची सर्व जबाबदारी तुझ्यावरच टाकीत



"आहे!" असे म्हणत प्रतीक्षा करीत मुनी बसून राहिले.

एके दिवशी संध्याकाळच्या सुमारास एक मोठे पोट असलेला गिड्डासा लहान मुलगा डुलत तेथे आला. त्याचे कुरळे लांब केस धुळीने माखलेले व अस्ताव्यस्त होते, वाऱ्याबरोबर उडत कपाळावर आणि डोळ्यांवर येत होते. त्याच्या हातांत छेनीसारखं कांहीतरी होतं आणि विजेसारखं चकाकत होतं. त्याचे स्नायू पुष्ट व कणखर होते, एखाद्या कारागिरासारखे!

अगस्त्य मुनींनी त्याच्या हातांतली वस्तू जास्त लक्ष देऊन पाहिली तर हत्तीच्या दांताचा टोंकाचा तुकडा त्याने मुठीत घट्ट धरला असल्याचे कळले. मुनी आश्चर्यचकित झाले.

तो तरुण शिल्पकार अगस्त्य मुनींच्या जवळ येऊन म्हणाला-"काय हो मुनिवर्य, या महा-शिळेसमोर कांही तरी मंत्र म्हणत बसला आहां वाटतं! कांही काम मिळेल म्हणून मी या बाजूला आलो आहे!"

"चिरंजीव बाळा! ह्या महाशिळेला गणनायकाचे रूप देऊन गणेशाची मूर्त करता आली तर करवून घेऊन तिचे दर्शन घ्यावे, या हेतूने कित्येक दिवसांपासून वाट पहात बसलो आहे." असे म्हणत अगस्त्य मुनींनी त्यांच्याजवळचे गणपतीचे रेखाटलेले चित्र दाखवून विचारले - "बरं पण तू कोण हे नाही सांगितलेस? तू काय काम करतोस?"

"मी जी कामं करतो त्यांतलं सर्वांत पहिलं काम म्हणजे मी खूप खातो. नंतर दगड कोरण्याचे काम. मला बाल शिल्पाचार्य म्हणून हाक मारतात". तो छोटा शिल्पकार म्हणाला.

त्याचे ते बोबडे बोल ऐकून अगस्त्य मुनींना हंसू आले. त्याच्याकडे संदिग्ध दृष्टीने पहात ते म्हणाले-"या महाशिळेला रूप देऊ शकणाऱ्या एका महाशिल्पकाराची मी वाट पहात केव्हां पासून बसलो आहे. तू स्वतःला शिल्पकार म्हणतो आहेस, परंतु तू बालशिल्पकार आहेस. ही शिळा म्हणजे एक महाशिळाच आहे, ही खूप उंच आहे. तू तर गिड्डा आहेस, मग तू हे एवढे मोठे काम कसा काय करशील, हीच एक शंका माझ्या मनात येते आहे!"

तो बालशिल्पी हंसू लागला. म्हणाला "मी बालशिल्पी असलो म्हणून माझ्या हातून थोर शिल्पकलेचे काम होणार नाही, असे समजू नका! नुसतं 'महा' म्हटल्याने 'मोठं' होतं असं समजू नका. माझ्या छेनीला साध्य नाही, असे एकही शिल्प नाही". असं म्हणत त्याने आपली छेनी



दाखविली. ती हिऱ्यासारखी चकाकत होती.

अगस्त्य मुनी पहातच राहिले व त्या बाल शिल्पकाराने आपली छेनी त्या शिळेवर फेंकली. ती शिळेला लागताच विद्युत् प्रकाशापाठोपाठ वीज कडाडल्यासारखा आवाज झाला आणि त्या जागी शिळेला एक भोंक पडले.

"ती बेंबी आहे. मूर्त करायची म्हणजे त्यांत बेंबीच मुख्य असते, म्हणून लंबोदराची ती नाभी आहे! लंबोदरापाठोपाठ शिल्प सुरू होतं! असं तो बालशिल्पी म्हणत असतां त्या शिळेतून "लंबोदर लक्ष्मीकरा" या आवाजापाठोपाठ मायामालव गौड रागाचे स्वर अगस्त्य मुनींना ऐकू येऊ लागले.

"हा आहे काळवत्री दगड, वज्रासारखा टणक आहे, म्हणून खोदकाम करीत असताना विजेसारखी कांती व आवाज प्रगट होतात. म्हणून माझं खोदकाम पुरं होईपर्यंत जवळपास कोणी पशुपक्षी किंवा माणसाने राहतां कामा नये. मोठा कडकडाट होईल. शहरांत राहणारांनी तो ऐकून भयभीत होण्याचं कारण नाही. तेव्हां हे मुनिवर्य, तुम्ही दूर निघून जाणे बरोबर होईल. दूर जाऊन निश्चिंतपणे झोपा कसे! उजाडतांच माझं खोदकाम पुरं होईल!" बालशिल्पी म्हणाला.

अगस्त्य ऋषी आश्चर्यचकित झाले. परंतु त्याहून जास्त कांही करण्यासारखेही त्यांना सुचले नाही. त्यांचा मेंदू त्यावेळी बंद पडल्यासारखा झाला. कांही वेळ थांबून अगस्त्य त्या बालशिल्पकाराला रेखाचित्र देऊ लागले तेव्हां तो म्हणाला-"तुम्ही आत्ता तर थोड्या वेळापूर्वीच दाखविलेत, नाही का ? एकदां पाहिले की पुरे. पुन्हां पुन्हां पहात बसलो तर मोठा



शिल्पकार मी स्वतः कसा म्हणवूं शकेन? हे शिल्प म्हणजे मला खेळासारखे आहे. सर्व झाल्यानंतर चित्र काढले. त्याला येऊन पाहून जा म्हणावे. सांगू दे त्यालाच कीं शिल्प बरोबर आहे की नाही ते! हे चित्र काढवून घ्यायला तू काय दिलेस कोणास ठाऊक? तू मला काय देतोस ते मी पाहणार आहे!" शेवटचे वाक्य ऐकतांच अगस्त्य मुनींना कसंसंच वाटलं.

त्यांची पत्नी लोपामुद्रेच्या अंगाखांद्यावर जे कांही होते त्याशिवाय अगस्त्यांजवळ स्वतःचे असे कांहीही नव्हते. होते ते सर्व त्यांनी वांटून टाकले होते. त्या शिल्पकाराला कांहीतरी दिलं हे पाहिजेच. लोपामुद्रेला सांगून काय विचारायचे? असा मनांत विचार करीत अगस्त्य निघून गेल्यावर लोपामुद्रेच्या तोंडावर एक अत्यंत तेजस्वी कांती विलसू लागली. "काय झालं ग?" या अर्थी मुनी लोपामुद्रेकडे पाहू लागले.



लोपामुद्रा उचंबळून आलेल्या आनंदाने म्हणाली- "अगस्त्य महर्षींनी मला क्षमा करावी! ऋषिपत्नीने ऋषिपत्नीसारखेच रहावे, ही गोष्ट मला लहानपणापासूनच चांगली माहीत आहे. वस्त्रालंकार पाहिजेत म्हणून किंवा धनदौलत घेऊं नका असे मी कां म्हटले, त्याचे माझे मलाच आज आश्चर्य वाटत आहे. कोणते तरी महान कार्य पूर्ण व्हावे यासाठी अनिर्वचनीय अशी कोणती तरी शक्ती माझ्या तोंडी ते बोलून गेली असे वाटते आहे. मला कोणतेही दागदागिने नकोत. रेशमी जरीची वस्त्रे नकोत. धनदौलत नको. माझ्या डोक्यांत त्या वेळेपुरते शिरलेले अज्ञान आत्तां आत्तांच निघून गेले."

ती म्हणाली ते ऐकून अगस्त्य ऋषींना बरे वाटले.

"शिल्पकार मिळाला व काम पुरे होईल, असे वाटते आहे. उजाडण्याच्या सुमारास काम पुरे होईल असे तो म्हणतो आहे". अगस्त्य ऋषी म्हणले.

"काय म्हणतां? उजाडता उजाडता त्या महाशिळेवरचे कोरीव काम संपेल म्हणतां? तो शिल्पकार मनुष्य आहे की देव?" लोपामुद्रेने चकित होऊन विचारले.

"माणूसच आणि लहान पोरगाच आहे. त्याला योग्य मजुरी कशी द्यायची, किती द्यायची, कांही सुचत नाही!" अगस्त्य म्हणाले.

"आणखी उद्यां भाद्रपद शुद्ध चतुर्थी नाही का? गणेश चतुर्थी ना? शिल्पकलेचा ध्यास घेऊन बसलात आणि तिथि मास सुद्धां विसरलात वाटतं!" लोपामुद्रेने विचारले.

"काय म्हणालीस? उद्या गणेशचतुर्थी म्हणतेस! गणेशाची मूर्ती तयार होणार! सर्व विचित्रच दिसतं आहे!" असं अगस्त्य मुनी आश्चर्याने म्हणूं लागले तेव्हां लोपामुद्रा म्हणाली "तो शिल्पकाराचा मुलगा नाही आणि मानवही नाही!".

पत्नी म्हणाली त्यांत सत्याचा कांही अंश असला पाहिजे असे अगस्त्यांना वाटले. बरीच रात्र लोटली होती. त्यांना झोप येत नव्हती. कुतूहल वाढतच होते. काय होणार हे कळत नसल्यामुळे अगस्त्य घराबाहेर पडलेच.

अगस्त्य महाशिळेजवळ पोचेपोचेतो त्यांना महाशिळेजवळ जे दृश्य दिसले, ते पाहून त्यांचे सर्वांग हादरले. जागच्या जागी ते जमिनीवर बेशुद्ध होऊन पडले. शेकडों छेनी आपल्या आपण कोरीव काम करीत होत्या. विविध रंगाची विद्युत कांती लकाकत प्रकाश पाडीत होती. 'खण खण' चा आवाज सतत चालू होता. सर्व छेनी हस्तिदंती होत्या आणि विजेसारख्या चकाकत होत्या. ते एक स्वप्न आहे की खरंच कांही घडत आहे, हे न कळल्यामुळे भ्रम झाल्यासारखं वाटून अगस्त्य अर्धवट बेशुद्धावस्थेत तसेच पडून होते.

अर्धनिद्रावस्थेत पडून राहिलेल्या अगस्त्य ऋषींनी डोळे उघडून पाहिले तर तो शिल्पकार बालक त्यांना दिसला. पूर्वेकडे दिशा फांकू लागल्या होत्या.

"काय हो, महर्षी! येथे झोपेंत स्वप्ने पहात पडलां आहांत? तुम्ही योगविद्येत पारंगत आणि तुम्हांला ही स्वप्नें आणि झोप कशी काय? माझं काम संपलं! चित्रकाराला येऊन पाहून जा म्हणावं, चित्रांत जे रूप आहे तसेच आले आहे की नाही ते पहा म्हणावं!" असं बालक शिल्पकार म्हणत असतां तेथे ताटभर मोदक, पाणी, फुलं वगैरे घेऊन लोपामुद्रा आली.

अगस्त्य ऋषी थक्क होऊन स्फटिकासारखी चकाकणारी ती गणेश मूर्त पहात असतां बालक शिल्पकार त्यांना म्हणाला-बरं तर माझी मजुरी? मला काय द्यायचं असेल ते द्या तर!"

अगस्त्य मुनी अडखळत म्हणाले-"महा शिल्पी! तुला कितीही दिलं तरी पुरणार नाही. तरी चंद्राला सुताचे वस्त्रदान करतात तसं थोडं धन बाजूला काढून ठेवलं आहे, ते आणतो!".

बाल शिल्पकार म्हणाला-"बरं तर प्रथम, चित्र रेखाटलं त्याला काय दिलं हे सांगा पाहूं! दगडावर खोदकाम करणे म्हणजे थोडे त्रासाचे असले तरी मोठी कला नव्हे. शिल्पकलेला मूळ



म्हणजे चित्र रेखाटणें. चित्र काढणे हे फक्त मेधावी कलाकारालाच साध्य असते.''

''अहो बालशिल्पाचार्य! चित्रकाराला निराळे कांही देण्याची गरजच पडली नाही. ते चित्र माझ्या पत्नीनेच काढले आहे!'' असे म्हणत अगस्त्यांनी सूचनार्थ लोपामुद्रेकडे पाहिले. लोपामुद्रा कोणत्यातरी विचारांत त्यावेळी गर्क झालेली होती.

''हे काय म्हणतां मुनिवर्य! मी म्हणाल तर एका शहराच्या निर्मितीला लागणारे धन चित्रकाराला दिले असते. इतके उत्तम रेखाचित्र आहे हे! ते धन यांनाच मिळाले पाहिजे!'' बालक शिल्पकार म्हणाला.

अगस्त्य लगेच चुकून म्हणाले-''खरं तर ते धन मी तिच्याचसाठी काढून बाजूला ठेवले आहे!''.

बालक शिल्पकार चकित होऊन म्हणाला- ''म्हणजे! ते सर्व स्त्रीधनच आहे तर! तुम्ही सांगितलेत म्हणून बरे झाले. तुम्ही दिले व मी घेतले तर किती मोठा अन्याय होणार होता? त्यांतली मला कवडी देखील नको!'' असे म्हणत लोपामुद्रेकडे पहात पुढे म्हणाला-''बाई! तुम्ही आपल्या हाताने मला एक मोदक द्या, मला तोच पुरे! खोदकाम केले त्यांतली माझी मजुरी ब्रह्मदेवाने केव्हांच लिहून ठेवली आहे.''

ते ऐकतांच लोपामुद्रेने मोदकांचे ताटच शिल्पकाराच्या समोर ठेवले आणि बाल शिल्पकाराला साष्टांग नमस्कार घालून त्याचे पाय धरले आणि म्हणाली-''विघ्नेशा, तुझ्या अनुग्रहाने आम्ही मुक्त झालो!'' ती असे म्हणत असतांच तो बाल शिल्पकार अंतर्धान पावला.

अगस्त्य मुनींना झालेला भ्रम व माया नाहींशी झाली. विघ्नेश्वराच्या कला कौशल्यासमोर प्रणाम करून ते म्हणाले-''विघ्नेश्वरा! मी स्वतःला किती योगबल सिद्धीवाला आणि तपस्वी म्हणून मानीत आलो. परंतु तुझ्यासमोर अबोध बालकच ठरलो. कोणी किती मोठा झाला तरी तुझी माया त्याला कळणे शक्यच नाही!'' असे म्हणत ते नमस्कार करीत, थोबाडीत मारून घेत असतां त्या शिल्पातल्या सर्व देवता गाणे गात असल्या- सारख्या भासल्या, ''वातापि गणपतिं भजे!'' आणि त्या स्वरांबरोबर निरनिराळी वाद्येही वाजू लागली.







# अिमानदाराचे वचन

जेव्हां विरूप देशाचा राजा शतानंद राज्य करीत होता, तेव्हां त्याचा खजिनदार जयराज होता. तो आजारी पडला आणि अंथरुणाला खिळला. जेव्हां शतानंद त्याला भेटायला गेला तेव्हां त्याने सांगितलं, ''महाराज, माझे आता जास्त दिवस राहिले नाहीत. आपण जर दुसरा चांगला खजिनदार नेमलात तर बरें होईल.''

''तुमचे कुटुंब देशाची सेवा करण्यासाठी वाहिलेले आहे हे मला ठाऊक आहे. तुमच्यानंतर तुमच्या मुलावरच ही जबाबदारी सोंपवण्याचा मी निश्चय केला आहे.'' शतानंदने ठाम स्वरांत सांगितले.

त्यावर जयराज जरा काळजीने म्हणाला, ''महाराज, माझा मुलगा प्रामाणिक आणि विश्वासू अवश्य आहे, पण राज्याचा खजिना सांभाळण्याची त्याची कुवत नाही. मला एक तसा योग्य तरुण माहीत आहे - समर्थ, सच्चा, विश्वासू आणि ईमानदार आहे तो! गोपालपुरमधें राहातो. त्याचं नांव आहे गोपी. खूप दिवसांपासून आपल्याशी त्याचा परिचय करून द्यावा असं माझ्या मनांत आहे. तो माझा दूरचा नातलग आहे. एक चांगला दिवस पाहून मी त्याला निरोप पाठवीन.''

शतानंदने यावर कांहीच मत दिले नाही आणि तो परत गेला. पण एके दिवशी अकमास्त जयराजचे निधन झाले. त्याच्या मृत्युमुळें राजा फारच दुःखी झाला. त्याने जयराजच्या कुटुंबियांकडे गोपीच्या बाबतीत माहिती विचारली, पण त्यांना त्याबद्दल फारशी माहिती नव्हती. तेव्हां राजाने आपले सेवक गोपालपुरला धाडले. त्यांनी येऊन सांगितले कीं गोपी नांवाचे त्या गांवात तीन तरुण होते. तिघेही हुशार व कामाला योग्य असे होते. ते तिघेही दिवंगत जयराजच्या दूरच्या नात्यांतलेच होते.

- कुलवंत राणा -



आता त्यांतला कोणता गोपी जयराजच्या मनांत होता ते कांही राजाला सांगता येईना. त्याने याविषयी आपल्या मंत्र्यांचा सल्ला घेतला. तेव्हां मंत्र्यानी सांगितलं, "आपणच वेष पालटून गोपालपुरला जाऊं या आणि तिथें शोध घेऊं या."

राजा व मंत्री वेषांतर करुन गोपालपुरला पोंचले, व त्यांनी तिन्ही गोपींच्याविषयी माहिती विचारली. जे कुणी त्या तिघांना ओळखत होते, त्यांनी तिघांच्याबद्दल सारखेच मत दिले. तेव्हां मंत्र्यांनी सांगितले, "महाराज, अशा वेळेला आपल्या लोकांपेक्षां परके लोक जास्त मदत करुं शकतात. चलावं, आपण अपरिचित लोकांनाच माहिती विचारावी."

त्यावेळीं त्यांना धर्मवीर नांवाचा एक म्हातारा वाटेंत दिसला. तो गरीब होताच, शिवाय जरा बावळट व वेंधळा वाटत होता. पोट भरण्यासाठी आणि दैनंदिन आयुष्य कंठण्यासाठीं इतरांच्या दयेवर अवलंबून होता. त्यामुळें गांवातल्या लोकांपैकी कोण दिलदार, उदार आहेत हे त्याला निश्चित माहिती होतं.

मंत्र्याने धर्मवीरला गांवातल्या इतर चारपांच लोकांबद्दल वायफळ माहिती विचारली आणि त्यानंतर म्हटले, "पहा, आता तुझे चांगले दिवस आलेले दिसतात. या गांवात गोपी नांवाचे तिघे तरुण आहेत ना रे? तू त्या प्रत्येकाकडे जाऊन भाकित सांग कीं त्याला राजाच्या दरबारांत नोकरी मिळणार आहे. ते जे कांही तुला बक्षिस देतील, ते घेतलंस कीं तुला उद्याची चिंता उरणार नाही."

धर्मवीरने शंका उपस्थित करीत विचारलं, "आपण कोण आहात हे मला माहीत नाही. आपल्या सांगण्यावरुन मी असं भविष्य वर्तवलं आणि उद्यां त्यांना दरबारांत नोकरी मिळाली नाही, तर ते मला मारुन ते टाकतील कीं! म्हणून त्याच्याकडे जायची मला भिती वाटते".

"राजाच्या दरबारांत त्यांना नोकरी अवश्य मिळेल, हे अगदी नक्की! तुला घाबरायचं कारण नाही, कारण तुझ्यासोबत आम्हीदेखील त्या तिघांकडे येऊं. भविष्य सांगितल्यानंतर तू बक्षीस माग, पण त्यांना सांग कीं भविष्य खरं ठरल्या-नंतरच तू ते बक्षीस घेशील. त्यापायी तुझे उरलेले आयुष्य अगदी आरामांत जाईल."

धर्मवीर आता कबूल झाला. पहिल्या एका गोपीच्या घरी तिघेही बरोबरच गेले. मंत्र्याने त्या गोपीला सांगितलं, "आम्ही शेजारच्या गांवातून आलो आहोत. या धर्मवीरने आम्हाला पाहिल्या-बरोबर आमच्याविषयी बरेच कांही सांगितले आणि ते सारे खरे होते. आमच्याबद्दल कांही भाकिते याने सांगितली आहेत. आता हा खराखुरा ज्योतिषी आहे कीं आपली योगायोगाची गोष्ट आहे, किंवा हा नाटक करतोय ते माहिती नाही. आता हा तुमच्याच गांवातला आहे तेव्हां तुम्ही याला चांगले ओळखत असाल, म्हणून आम्ही याला इथें घेऊन आलो. सांगा, ह्याच्याविषयीं तुमचे काय मत आहे?"

"अरे धर्मवीर, तू आणि ज्योतिषी! शेजारच्या गांवातल्या या लोकांना फसवून पैसे उकळण्यासाठी हा नवा धंदा, काय रे?" गोपीने गंभीर स्वरांत विचारलं. धर्मवीरने निःसंकोचपणें सांगितलं, "मी मुळीच कुणाला फसवत नाही आहे. इथें कांही दिवसापासून माणसें बघितली कीं मला त्यांच्याविषयीं भूत, भविष्य व वर्तमान काळा संबंधी माहिती आपोआप मिळते. म्हणून या विद्येचा मी फायदा करून घेतो आहे. याच्यात कसली आलीय फसवणूक?"

"असं आहे होय? तर मग माझ्याबद्दल सांग बघूं. तुला माझी सगळी माहिती आहेच, तेव्हां फक्त माझं भविष्य तेवढं सांग." गोपीने हंसत हंसत म्हटलं.

"ऐका तर मग! दोन दिवसानंतर तुम्हाला राजाच्या दरबारांत नोकरी मिळणार आहे. आता सांगा, तेव्हां तुम्ही मला काय द्याल?" धर्मवीरने विचारलं.

"राजधानीला जायचंसुद्धां मला अजून कधी जमलं नाही, ते इथें बसल्याबसल्या दरबारांतली नोकरी काय मला शोधत येणार आहे कां? तू एकदम मोठेंच भविष्य सांगितलेस. ठीक आहे, तू सांगितलेलं भविष्य जर खरं ठरलं तर मी तुला दहा हजार रुपये देईन." गोपीने हंसून उत्तर दिलं.

त्याचप्रमाणें दुसऱ्या गोपीने सांगितलं कीं जर त्याचं भविष्य खरं झालं तर तो धर्मवीरला तीन



मजली घर बक्षीस म्हणून देईल. परंतु तिसऱ्या गोपीने मात्र सांगितलं, "जर मला राजाच्या दरबारांत नोकरी मिळाली तर पहिल्या महिन्याच्या पगाराचा निम्मा हिस्सा मी तुला देईन."

त्याचे बोलणें ऐकल्यानंतर धर्मवीर आनंदाने वेडा झाला, आणि "हे गोपालस्वामी!" असं म्हणून धाडकन खाली बेशुद्ध पडला.

राजा, मंत्री व तिसऱ्या गोपीने धर्मवीरच्या चेहऱ्यावर पाणी शिंपडले. तो शुद्धीवर आल्यानंतर त्यांनी त्याला "काय झाले?" म्हणून विचारले.

उठून बसल्यानंतर धर्मवीरने राजा व मंत्री, यांना सांगितले, "महाराज, या तिन्ही गोपींना मी चांगलाच ओळखतो. मी कित्येकवेळां यांच्याकडे मदत मागितलेली आहे. मला यांचा खूप अनुभव आहे. पहिले दोघे गोपी चांगले आहेत पण अिमानदार नाहीत. विचार केल्याशिवाय शब्द देतात, आणि नंतर तो पाळत नाहीत. ज्या गोपीने मला दहा हजार रुपये द्यायचे कबूल केले आहे, तो मोठ्या मुष्किलीने एक रुपाया देईल. तीनमजली घर ज्याने बांधून द्यायची इच्छा सांगितली, तो मला एक वीट बक्षीस देईल आणि म्हणेल कीं 'हेच घर आहे असं समज.'

परंतु हा तिसरा गोपी मात्र अिमानदारीचे दुसरे नांव असेल, असा आहे. जे वचन देईल, ते पूर्ण निभावेल. राजाच्या दरबारांतल्या महिन्याभराच्या पगाराची रक्कम म्हणजे लहानसहान नव्हे. माझ्यासारख्याला ती भरपूर आहे. हे माझे भाग्य पाहून मी अतिशय खूष झालो आणि अत्यानंदामुळें माझी शुद्ध हरपली."

त्यावर मंत्र्याने गोपीला आणि धर्मवीरला आपली खरी ओळख सांगितली, व तो राजाला म्हणाला, "महाराज, जर आपण सरळ प्रश्न विचारला असता, तर धर्मवीरने आपल्याला हे सगळं सांगितलं नसतं. म्हणून मी ज्योतिष सांगण्याचं नाटक करायला लावलं. त्यामुळें आपल्याला ज्या गोपीचा शोध घ्यायचा होता तो अचूक लागला."

राजाने तिसऱ्या गोपीची नेमणूक खजिनदाराच्या जागेवर केली. धर्मवीरलाही योग्य ती मदत दिली. दुसऱ्या दोघा गोपींना दरबारांत त्यांच्या योग्यतेची नोकरी दिली.

विरूप देशांत या गोष्टीचा खूप गवगवा झाला. त्यावेळेपासून तिथले लोक प्रामाणिक व अिमानदार बनण्याचा प्रयत्न करूं लागले. आणि वचन देतानाही विचार केल्यावर शब्द देऊं लागले.







# हडळीची कमाल

जेव्हां विष्णु व लक्ष्मी यांचे लग्न झाले, तेव्हां सर्वांनी त्यांचे खूपच कौतुक केले नि म्हटले, "खरोखर, किती अनुरूप जोडा आहे हा! यांचा संसार अगदी सुखासमाधानाचा होईल!"

पण नंतर जे घडले ते अगदी याच्या विरुद्ध होतं. दोघेही सारखे एकमेकांशी भांडत असत. विष्णुने सांगितलेलं लक्ष्मी ऐकत नसे. आणि जे लक्ष्मी सांगेल ते विष्णु मुळीच करीत नसे.

लक्ष्मीच्या चुलत भावाचे लग्न होते. तेव्हां लक्ष्मीने अत्यंत खवचट स्वरांत विष्णुला विचारले, "शेवटी तुम्ही माझे पती आहात. तुमच्याबरोबर जायची माझी अजिबात इच्छा नाही, पण माझा नाईलाज आहे. तुम्हाला बरोबर नेलं नाही तर माझं जगांत हसं होईल."

"मी कुणा सोम्यागोम्याच्या लग्नाला कशाला जाऊं? मी काय भिकारी आहे कां काय?" विष्णुने नाराज होऊन म्हटले.

"हो कां? बरंच झालं. मी वांचले अगदी! मला वाटलं कीं तुम्ही आता माझ्याबरोबर येणार." आणि लक्ष्मी खुशींत येऊन लग्नाला जायला निघाली.

"थांब, नवरा आहे मी तुझा! तुझ्याबरोबर लग्नाला आलो नाही तर लोक काय म्हणतील मला? कांहीही झालं तरी मला तुझ्याबरोबर यायलाच हवं!" असं म्हणून विष्णुही तिच्या पाठोपाठ निघाला.

ते गांवाच्या वेशीबाहेर पडले तोपर्यंत सूर्य मावळला होता. वाटेंत एक लहानसं जंगल होतं, ते पार करुन त्यांना पलीकडे जायचं होतं. समोरुन एक शेजारच्या गांवातला एक इसम येत होता. या दोघांना पाहून तो म्हणाला, "अरे विष्णु, तू? मी तुमच्याच घरीं यायला निघालो होतो. तुझ्या बहिणीच्या घरीं तुझे वडील सध्यां राहात आहेत ना, ते अचानक आजारी पडले. वैद्यांनी परीक्षा करुन सांगितलंय कीं त्यांचा आजार गंभीर आहे आणि ते वांचणं कठीण आहे. ते तुझी फार आठवण काढताहेत. तू तिथें लौकर चल."

"ऐकलंस कां ग? बाबांची प्रकृति बिघडलीय.

- कामेश -



चल, इथूनच रामापुरला जाऊं." विष्णु म्हणाला.

"वय झालंय त्यांचं, जरा ताप आला तर त्यांत काय मोठंसं? मरतील फार तर! मी लग्नाला गेल्या-शिवाय राहायची नाही. सगळ्या नातेवाईकांना भेटीन. मस्त गप्पा मारीन, चांगल्या मेजवान्या झोडीन की! हे सारं सोडून तिथें सुतकी चेहरा करुन बसायला येऊं कीं काय? छे, शक्यच नाही." लक्ष्मीने उर्मटपणें म्हटले. त्यावर विष्णु अजीजीने म्हणाला, "तू घरांतली सून आहेत. माझं ऐक. इतकी कठोरपणें वागूं नकोस."

"तुम्ही, तुमची आई, तुमचे वडील - तुम्हीच सारेजण कठोर आहात. तुम्हाला जायचं तर तुम्हीच जा!"

दोघेही आवाज चढवून एकमेकांना दुरुत्तरें करुं लागली आणि भांडण अगदी विकोपाला गेले. ते ऐकून तिथें एक हडळ एकदम येऊन टपकली, नि त्यांना दरडावून म्हणाली, "थांबा, काय आचरटपणा चाललाय हा? कशासाठी एवढे भांडता आहात?"

हडळीला बघून दोघेही एकदम गप्प झाले आणि डोळे फाडफाडून तिच्याकडे बघत राहिले.

हडळीने पुन्हां विचारले, "भांडण कशावरुन चाललंय? तुम्हा दोघांमधें कसला असंतोष खदखदतोय?"

"मी ह्यांची बायको आहे. पण म्हणून मी त्यांनी सांगितलेली प्रत्येक गोष्ट करायची कीं काय? ते म्हणतील तसं वागायचं, असं थोडंच आहे?" लक्ष्मीने विष्णुकडे बघत हडळीला विचारलं.

हडळ याला उत्तर देणार पण त्यापूर्वीच विष्णु म्हणाला, "बायकोचं म्हणणं ऐकून तसं वागणारा कांही महान, श्रेष्ठ ठरत नाही. त्याला बायल्याच म्हणतात, होय कीं नाही?" विष्णुने मोठ्या आवेशपूर्ण स्वरांत आपले म्हणणे मांडले.

हडळीला आता पेंच पडला. क्षणभर विचार करुन ती म्हणाली, "सांगा, तुम्हा दोघांच्यात जास्त हुशार कोण आहे?"

ती दोघेही आपणच हुशार आहोत असं सांगत पुन्हां तावातावाने भांडायला लागली.

"गप्प बसा आधी. मी तुमची दोघांची परीक्षा घेते आणि ठरवते कोण हुशार आहे ते! पण मग मात्र त्याचं सांगणं दुसऱ्याने ऐकलं पाहिजे. आहे तुम्हाला कबूल?"

दोघांनीही होकार देत माना डोलावल्या. हडळ लगेच झाडावर जाऊन बसली आणि हातांत दोन पिशव्या घेऊन तिने खाली उडी मारली. तिने त्या नवराबायकोला सांगितलं, "प्रत्येक पिशवींत पन्नास पन्नास सोन्याची नाणी आहेत. बरोबर तीस दिवसानंतर याच झाडाखाली तुम्ही याच वेळेला या. ही रक्कम जो वाढवून दाखवील तो जास्त हुशार ठेल."



विष्णु व लक्ष्मीने मोठ्या अधीरपणाने त्या पिशव्या उचलल्या आणि ते म्हणाले, "तुमच्या परीक्षेसाठी आम्ही तयार आहोत." हडळ पुन्हां आपल्या झाडावर जाऊन बसली, लक्ष्मी लग्नाला गेली आणि विष्णु आजारी पित्याला भेटायला गेला.

ठीक तीस दिवसानंतर दोघेही त्याच वेळी त्याच झाडाजवळ आले. तेवढ्या काळांत काय घडलं, माहिती आहे? लक्ष्मी लग्नघरी गेली, तिथें तिची नाण्यांची पिशवी कुणीतरी चोरली. त्याचप्रमाणें वडिलांना भेटायला गेलेल्या विष्णुची थैली देखील कुणीतरी चोरुन नेली.

दोघेही घाबरुन गेले. आता पिशवी न घेता हडळीला भेटायला कसं जाता येईल? दोघांनी मिळून एक उपाय शोधला. त्या क्षणापासून दोघांनी रात्रंदिवस अपार कष्ट केले आणि पैसे कमावले. त्या पैशांनी त्यांनी त्या पिशव्या नाण्यांनी भरल्या आणि ते हडळीला तीस दिवसानंतर भेटले. दोघांनीही तिला खरी परिस्थिती सांगितली.

त्यांचा प्रामाणिकपणा पाहून हडळ खूष होऊन म्हणाली, "तुम्ही खरं काय घडलं ते सांगितलंत, म्हणून मला आनंद झाला आहे. या प्रश्नाचे उत्तर शोधण्यासाठी तुम्ही दोघांनी आपसांत चर्चा केलीत आणि एक योग्य निर्णय घेतलात. म्हणून तुमचे हरवलेले धन तुम्ही पुन्हां कमावलेत. पण तुमच्या पिशव्या कुणी चोरल्या ते तुम्हाला ठाऊक आहे कां?"

लक्ष्मी नाराजीने म्हणाली, "ठाऊक नाही, पण जर त्या चोराचं नांव कळलं तर गांवच्या पाटलाला सांगून मी नक्की त्याला तुरुंगाची हवा खायला पाठवीन!" त्यावर हडळ मोठ्याने हसली नि म्हणाली, "तुमच्या दोघांची अिमानदारी आणि एकमेकांवर किती प्रेम आहे ते पाहाण्यासाठी मीच ही परीक्षा घेतली. जरा थांब!" हडळ चटकन उडून झाडावर गेली आणि त्या पिशव्या घेऊन पुन्हां जमिनीवर उतरली. दोघांना त्या दोन पिशव्या देत ती म्हणाली, "यांत मी प्रथम घातलेली नाणीं आहेत. आता तुमची धनराशी दुप्पट झाली आहे. ही घ्या आणि चांगला व्यवसाय निवडून व्यापार करा अन् खूपखूप पैसे कमवा!" आणि उडून ती पुन्हां झाडावर जाऊन दिसेनाशी झाली.

प्रत्येक गोष्टीवर सतत भांडणारे विष्णु आणि लक्ष्मी आता इतके प्रेमळ झाले आहेत हे पाहून गांवकरी चकितच झाले. ही सारी त्या हडळीची कमाल आहे हे मात्र त्यांना मुळीच ठाऊक नव्हतं.





# पुण्यकर्म

फार पूर्वी अक्षयपुरांत धर्मपाल नांवाचा एक नगरशेठ राहात होता. त्याच्या पत्नीचे नांव होते सुलक्षणा! त्यांना पांच मुलगे होते. त्याचा फार मोठा व्यापार होता. धर्मपाल व सुलक्षणा नेहमी तुळशी, पिंपळ आणि आवळ्याच्या झाडांची पूजा करीत असत.

रोज एखाद्या निर्धन माणसाला लहानसा सोन्याचा आंवळा दान दिल्यानंतरच ते दोघेजण अन्नग्रहण करीत.

जेव्हां त्यांच्या थोरल्या मुलाचे लग्न झाले त्यानंतर नव्या सुनेने आपल्या सासूबाईंना सांगून रोज सोन्याचा आंवळा दान देण्याचे थांबवावे, असे सुचवले, "सासूबाई, जर आपण रोज असं सोनं देत बसलात तर आमच्यासाठीं काय शिल्लक राहील? आपण त्या ऐवजी चांदीचा आंवळा दिलात तर बरे होईल."

त्या वृद्ध जोडप्याने नव्या पिढीकडून आलेल्या या सूचनेचे स्वागत केले आणि चांदीचा आंवळा रोज द्यायला सुरवात केली.

जेव्हां दुसरी सून घरांत आली तेव्हां तिने चांदीचा आंवळा देण्याबाबत नाराजी व्यक्त केली. ती म्हणाली, "सासूबाई, अशी चांदी देत बसलो, तर घरांत काय शिल्लक राहील? त्याऐवजीं आपण तांब्याचा आंवळा द्यायला सुरवात करावी म्हणजे बरं!"

त्या वृद्ध पतीपत्नींनी वयोमानानुसार आपल्या भावनांवर नियंत्रण ठेवले आणि तांब्याचा आंवळा दान द्यायला सुरवात केली.

जेव्हां तिसरी सून घरांत आली तेव्हां तिला हे ही पसंत पडले नाही. तिने सुचवलं, "आई, घरांतली परिस्थिती पाहिली तर तांब्यासारखा महाग धातू दररोज दान द्यायची जरुर नाही. त्याऐवजी आपण लोखंडाच्या आंवळ्याचे दान देत जा."

शेटजी नि शेटाणीबाई आपले मन मारुन गप्प बसले, आणि त्यांनी लोखंडाचा आंवळा द्यायला सुरवात केली. घरांत व्यापार व्यवसाय नीट चालत नव्हता. सगळे मुलगे आळशी आणि कामचोर होते. घरांतली लक्ष्मी हळूं हळूं नाहीशी होऊं लागली.

जेव्हां चौथी सून आली तेव्हां तिने लोखंडाच्या आंवळ्याचे दान करण्याबाबत कुरकुर केली. ती म्हणाली, "सासूबाई जेवढा धातू आपण दान देता, तितका पैसा जर घरांतल्या व्यापारांत घातला तर घराचा फायदा होईल. तुम्ही तुमचा परलोक सुखाचा होण्यासाठी, आपल्या मुलांचा पृथ्वीवरचा लोक कां नष्ट करायचा? तुम्हाला जर दान द्यायचंच असेल तर रोज कणकेचा एक आंबळा बनवा आणि त्याचं दान करा म्हणजे झालं!"

त्या दोघां पतीपत्नींनी हेही आनंदाने स्वीकारलं. परंतु जेव्हां पांचवी सून घरांत आली, तेव्हां तिने यालाही विरोध केला. वृद्ध सासूसासऱ्यांना फारच वाईट वाटले आणि ती दोघे तीर्थ यात्रेला जाण्याचे निमित्त सांगून घरांतून निघाली.

वास्तविक त्यांचे मुलगे निष्क्रीय बनले होते. त्यांचे शिक्षणही बेताचेच होते आणि उद्योगधंदा करण्यांत त्यांना फारशी रुची कधीही नव्हती. घरांतला भरपूर पैसा बघून ते रिकामटेकडे झाले. कष्ट केल्याशिवाय अन्न खाणें म्हणजे चोरीचे अन्न असे मानले जाते. अशा प्रकारच्या उनाडटप्पूपणामुळें त्यांची सदाचारी वृत्ती राहिली नाही, आणि घरांतली संपत्ती नाहीशी होऊं लागली.

तिकडे तीर्थयात्रेला गेलेले शेटजी व शेटाणी यांनी सरयू नदीच्या कांठावर एका घरांत राहायला सुरवात केली. तिथें जवळच असलेल्या आंवळ्याच्या अनेक वृक्षांपासून त्यांनी आयुर्वेदिक औषधें तयार करायला सुरवात केली. त्यांचा लौकरच



जम बसला आणि त्यांनी पूर्वीसारखा दानधर्म करायला सुरवात केली.

आपल्या कष्टाने मिळवलेल्या पैशामुळे आणि धार्मिक सद्वर्तनाच्या पुण्याईवर ते पुन्हां श्रीमंत झाले. त्यांनी एक मोठे मंदिर व घर बांधायचे ठरवले.

तोपर्यंत त्यांच्या आयतोबा व कामचुकार मुलांनी आणि सुनांनी कांहीही न करता उधळेपणाने व मूर्खपणाने उरलेली संपत्तीही घालवली. ते सर्व आता निष्कांचन झाले व पोट भरण्यासाठीं त्यांना मजुरी करण्याची वेळ आली. जेव्हां सरयू नदीच्या कांठावर प्रियांका नगरींत शेटजींचे मंदिराचे बांधकाम सुरुं झाले, तेव्हां त्यांची मुले तिथे कामाला लागली व सुनांना दगड फोडण्याचे काम मिळाले.

एके दिवशी सुलक्षणा शेटाणीची दासी चांदीचा आंवळा घेऊन शेटाणीच्याच सुनेला देऊं लागली. त्या चांदीच्या लहानशा आंवळ्याला पाहून ती सून रडायला लागली व म्हणाली, "माझ्या सासूबाई देखील अशाच दानी होत्या, त्यांच्या तळहातावर तीळ होता. आम्हा सर्वांच्या वाईट वर्तणुकीमुळें माझे सासूसासरे आम्हाला सोडून निघून गेले. ते आता कुठे असतील देव जाणे!"

दासीने ही बातमी घरांत जाऊन सुलक्षणाला सांगितली. सारी परिस्थिती तिच्या लक्षांत आली. तिने त्या पांची मजुरांना व त्यांच्या बायकांना आपल्या घरांत बोलावले. मुलांचे व्यवस्थित केंस कापून त्यांना आंघोळी करायला लावल्या आणि चांगले कपडे घालायला दिले. सुनांनाही न्हायला घातले, त्यांना जरीच्या साड्या, अलंकार, केंसांत घालायला फुलें देऊन त्यांना दासींनी सजवले.

त्यानंतर आईवडीलांची व परिवाराची भेट झाली. या वेळेला नव्या पिढीला चांगल्या वागणुकीचा असा कांही धडा मिळाला होता, कीं त्यांच्या वागण्यांत पूर्णपणें बदल झाला, व त्यांना आपली चूक सुधारण्याची संधी मिळाली. त्यानंतर ते सारेजण पुन्हां एकत्र राहूं लागले.













# शिल्पसुंदरी

चंद्रशेखर हा देवगिरीचा महाराजा होता. तो एक कुशल राज्यकर्ता तर होताच, त्याशिवाय त्याला कलांमधेंही रस होता. कलावान व्यक्ती त्याला आवडत. कलापूर्ण वस्तू जमवण्याची त्याला आवड होती. अनेक कलावंतांचे त्याने सत्कारसमारंभ केले होते. देशी व विदेशी वस्तू जमवून त्या आपल्या कलामंदिरात नीट जतन करुन ठेवल्या होत्या. त्या पाहाण्यासाठीं दूरदूर प्रांततले लोक येत आणि महाराजाच्या कलासक्त वृत्तीचे गुणगान करीत परत जात असत.

या कलामंदिराच्या विस्तारासाठीं आणि इतर कलाविषयक कार्यक्रमांचे आयोजन करण्यासाठी एक खास कलाकार-अधिकारी नेमावा असे महाराजाच्या मनांत आले. त्याने राज्यांत तशी घोषणा जाहीर केली.

ती ऐकून अनेकजण पुढें आले. राजा त्यांच्या पात्रतेची परीक्षा करीत होता. शेवटी त्याने तिघे कलाकार निवडले - माधव, सागर व आनंद! त्यांच्यापैकीं एकाला नियुक्त करायचे होते.

महाराजाने त्या तिघांना आपल्या कलामंदिरातले एक सुंदरीचे शिल्प दाखवून म्हटले, "जो कुणी याचे जास्त मूल्य देईल, तो या शिल्पाचा मालक होईल." तेव्हां माधवने म्हटले, "महाराज, या शिल्पसुंदरीसाठी मी माझी सारी संपत्ती देईन!"

सागरनेही अशाच प्रकारचे उत्तर दिले. पण आनंदने म्हटलं, "महाराज, कला ही सर्वांना आनंद देण्यासाठी असते. या शिल्पाचा आनंद कोणा एका व्यक्तीपुरताच असू नये. ही शिल्पसुंदरी जर याच कलामंदिरात राहिली, तर रोज येणाऱ्या कलाप्रेमी रसिकांना ती पाहून अतिशय आनंद व समाधान होईल."

महाराजाने खूष होऊन आनंदची पाठ थोपटली व म्हटले, "तू खरा कलावंत आहेस. म्हणून कला अधिकाऱ्याच्या पदासाठी तूच योग्य आहेस!"

- आनंद राव





# भुतांचे पुण्यकर्म

फार पूर्वीची गोष्ट आहे ही. गोपवरम् गांवात माधव नांवाचा एक अठरा वर्षांचा तरुण राहात होता. तो इतका भोळा होता कीं जे कांही पांढरे दिसेल ते त्याला दूधच वाटायचे आणि जे कांही काळे दिसत होते त्याला तो पाणी आहे असंच समजायचा. त्याच्या लहानपणींच त्याचे आईवडील वारले, म्हणून त्याच्या आजीने त्याचे पालनपोषण केले. तीही बिचारी कांही वर्षांनंतर मरण पावली.

आजीच्या मृत्यूनंतर माधव अगदीच पोरका झाला. गांवातल्या श्रीमंत घरांतून तो भरपूर काम करायचा व ते जे कांही खायला देत, ते खाऊन तो भूक भागवत असे. त्यांची गुरें जवळच्या रानांत तो चरायला घेऊन जाई. त्याच्याकडून बिगाऱ्यासारखे चोपून काम करुन घेतले जात आहे, याचं त्याला कधी वाईट वाटलं नाही.

एक दिवस रोजच्याप्रमाणें तो गुरें घेऊन रानांत इकडेतिकडे हिंडताना गाणें गात होता. जवळच्या झाडावर झोपलेल्या एका जुन्या भुताने त्याला बघितले. जवळच एक नवे भूत होते त्याला त्या जुन्या भुताने म्हटले, "ऐकलंस, किती गोड आवाज आहे त्या मुलाचा! त्याचं गाणं ऐकून तर माझं पोटच भरलंय!"

तेव्हां नवे भूत म्हणाले, "तो तर जवळच्या गांवातला माधव आहे. एकटाच आहे बिचारा आणि अगदी चांगल्या स्वभावाचा आहे. त्याच्या भोळेपणाचा अनेकजण फायदा घेत असतात "आणि त्याने जुन्या भुताला माधवबद्दल आणखी माहिती दिली.

जुन्या भुताने ती लक्ष देऊन ऐकली नि म्हटले,

- कुसुम कुमारी -



"तुझी माहिती ऐकून एक चांगला विचार माझ्या मनांत आला आहे. पापें केल्यामुळें आपण भुतांच्या ज़मातींत आलो आहोत. जर या जीवनापासून आपल्याला मुक्ती हवी असेल तर आपण कांहीतरी पुण्यकार्यही करायला हवं."

नव्या भुताने म्हटलं, "आपण माधवला कशी मदत करं शकूं?" जुन्याभुताने उत्साहाने उत्तर दिलं, "मी सांगतो काय ते! चल माझ्याबरोबर." आणि दोघेही झाडावरुन खाली उतरले. जुन्या भुताने सोन्याच्या मोहरांनी भरलेली एक थैली जमिनीवर टाकली. माधव गाणें गातगात त्या बाजूलाच येत होता. त्याने ती थैली उचलली आणि उघडून पाहिली. त्यांतल्या मोहरा बघून तो चकित होऊन ओरडला, "बाप रे, इतक्या सोन्याच्या मोहरा? कुणा बिचाऱ्याची थैली धांदलींत पडली असेल. जर मी ही ग्रामाधिकाऱ्याकडे दिली तर तो ह्या पिशवीचा मालक शोधून काढील." असं म्हणून त्याने ती थैली आपल्या मुंडाशात नीट लपेटून घेतली व कमरेला बांधली.

ते बघून जुनें भूत बोलायला लागले, "हा इतका बावळट असेल असं मला वाटलं नव्हतं. आता तो ही थैली ग्रामाधिकाऱ्याला देऊन टाकणार!"

नवे भूत हंसत म्हणाले, "जेव्हां तू ती थैली तिथें टाकलीस, तेव्हांच मला असं कांहीतरी होणार असं वाटलं होतं!" "पण मग आपण त्याला मदत कशी करायची?" जुन्या भुताने विचारलं.

"माधव कांही लुळापांगळा नाही. त्याचे हातपाय धडधाकट आहेत. तो कामसू आहे. अशा मुलाला सोनेनाणें देणें म्हणजे त्याचा चांगुलपणा त्याच्याकडून हिरावून घेण्यासारखे आहे. हिरेमाणकें निर्जीव असतात. त्याऐवजी जर त्याला आपण एक जिवंत जोडीदार देऊं शकलो, तर त्याचं भलं होईल. तो जोडीदार त्याला सुखांत व दुःखांत ही साथ देईल. त्याचे आयुष्य मार्गाला लावेल व त्याला आत्मसन्मान राखून जगण्याची चांगली वाट दाखवेल. लाख मोहरांपेक्षां हे जास्त योग्य ठरेल!" नवे भूत विचारपूर्वक म्हणाले. त्यावर जुन्या भुताने म्हटलं, "हो तर, ही सगळी नीतीतत्वें मलाही माहिती आहेत, बरं कां! पण आपण त्याला मदत तरी कशी करायची ते अगोदर सांग!

"मी सारं कांही सांगतो, पण त्यापूर्वी तू एका सधन माणसाचे रूप घेऊन त्याच्याजवळ जा, आणि ती तुझीच थैली आहे असं त्याला सांग." नवे भूत म्हणाले.





जुन्या भुताने एका धनवंताचे रुप घेतले व ती थैली तो घेऊन आला. तेव्हां नवे भूत सांगू लागले, "नीट ऐक. माधवच्याच गांवात मणी नांवाची एक सुंदर, सुशील मुलगी आहे. तिच्या वडिलांचा नुकताच मृत्यू झाला आहे. चार दिवसानंतर तिचे लग्न एका जुगारी व दारुड्या मुलाबरोबर होणार आहे. हा मुलगा एक चोर आहे आणि शिपायांची नजर चुकवून इकडे आलाय. त्या मुलाच्या मामाने हे लग्न ठरवले आणि मणीच्याच गांवात विवाहसमारंभ करायचे ठरले. त्या मुलाच्या गांवात लग्न केले आणि शिपायांनी जर त्याला पकडले तर साराच गोंधळ व्हायचा. म्हणून सगळे वऱ्हाड दहा दिवस अगोदरच मणीच्या गांवी येऊन पोंचले आहे. हा चोर या गांवात आलाय हे शिपायांना कळलंय, आणि ते इकडे यायला निघाले आहेत. आता आपण असं करुं या..." आणि नवे भूत जुन्या भुताच्या कानांत कांहीतरी सांगायला लागले.

क्षणार्धात दोन्ही भुतांनी रूप बदलले. एक बनला घोडा आणि दुसरा झाला एक घाबरलेला चोर! दोघेही त्या वाटेवर प्रकट झाले.

तिकडून शिपाई दंडुके फिरवीत आले. त्यांना रस्त्यांतला हा घोडा व चोर दिसला. त्यांना आनंद झाला व ते ओरडूं लागले, "सांपडला चोर! अरे लुच्च्या, भामट्या, दिवाणजींच्या वाड्यांत शिरुन तू चोरी केलीस काय? तुझी हिंमत कशी झाली? थांब तिथेंच." असं ओरडत ते पुढें सरसावले, आणि त्या चोराजवळ आले. घोड्याच्या रुपांत जुनं भूत होतं, त्यावर चोर बनलेले नवे भूत बसले आणि गांवाच्या दिशेने घोडा दौडायला लागला. जिथें लग्नाचा मांडव घातला होता, तिथें घोड्यापाठोपाठ शिपाई येऊन पोंचले.

तोपर्यंत या दोन्ही भुतांनी पुन्हां रुप बदलले. एकजण नवऱ्या मुलाच्या शरीरांत शिरला आणि दुसरा एका वयस्कर स्त्रीच्या शरीरांत शिरला. शिपायांना बघून नवरामुलगा संतापला नि त्यांना म्हणाला, "तुम्ही कोणाचे नातेवाईक आहात म्हणून इथें आला आहात?"

हा उद्धट प्रश्न ऐकून एका सैनिकाने जरा नाराजीच्या स्वरांत उत्तर दिले, "आम्ही शिपाई आहोत. चोर सोडून आम्ही बाकी सगळ्या गांवकऱ्यांचे नातेवाईक आहोत, कळलं कां? तू कोटगिरीच्या कपिलेश्वरचा मुलगा कमलेश आहेस ना? तू दिवाणजींच्या वाड्यांत चोरी केल्याचा आरोपावरुन आम्ही तुला अटक करीत आहोत.

तुला पकडून कैदेंत टाकण्यासाठी तर आम्ही इथें आलो आहोत."

हे ऐकून कमलेशचा पिता कपिलेश्वर म्हणाला, "माझा मुलगा चोर आहे, हे मी मान्य करणार नाही. पण कांहीही असूं दे, प्रथम लग्न पार पडूं दे, नवरीच्या गळ्यांत नवरदेव मंगळसूत्र बांधू दे, नंतर मग आपण त्याबद्दल बोलूं या." कपिलेश्वरने असं समर्थन केल्यावर दोन शिपाई मोठ्याने हंसायला लागले. एकजण म्हणाला, "अरे वा, बाप बेटा नुसती चोरी करुन संतुष्ट झालेले नाहीत कां? त्यांत भर म्हणून एका तरुण मुलीच्या आयुष्याचं नुकसान करायचंय होय?" असं बोलत बोलत त्यांनी बापलेकांना पकडले व त्यांना ढकलतच तिथून ते घेऊन गेले.

घरांत रडारड सुरुं झाली. ज्या वयस्क सुवासिनीच्या शरीरांत नवे भूत शिरले होते, ती स्त्री वधूमायेचं सांत्वन करायला लागली, व म्हणाली, "अग बायो, रडतेस कशासाठी? तुला तर आनंद वाटायला हवा. या बापलेकांचं खरं स्वरूप लग्न होण्यापूर्वीच कळलं हे किती चांगलं झालंय, ते पहा!! आता तुझ्या मुलीसाठी अगदी योग्य असा मुलगा तुला पहावा लागेल, एवढंच ना? माधव तुझ्या माहितीचा आहे. तो श्रीमंत नाही, पण सद्गुणी आहे, आळशी नाही, कामसू आहे. काम न करता पैसे मिळवण्याची हांव बाळगणारा नाही. जर तुझ्या मणीचे लग्न त्याच्याशी केलेस ना, तर तुलाही म्हातारपणीं त्यांचा आधार राहील. तुझी मुलगी नि तू, दोघींना कसली चिंता राहाणार नाही. बघ, विचार कर आणि निर्णय घे."

सगळ्या नातलगांनी या सूचनेला जोरदार पाठिंबा दिला. वधूवेषांतली मणी रडत होती. तिने आपले डोळे पुसले नि म्हणाली, "माधव खूप चांगले आहेत. जर माझ्याशी लग्न करायला त्यांची संमती असली तर मी स्वतःला भाग्यवान समजेन."

त्यावेळीं माधव पाहुण्या मंडळींची सरबराई करण्यांत गुंतला होता. लोकांनी त्याला ही सूचना सांगितली. क्षणभर तो स्तब्ध उभा राहिला, पण नंतर त्याने या प्रस्तावाला संमती दिली. अशा तऱ्हेने मणी व माधवचे लग्न लागले. सर्वांनीच त्यांना मनःपूर्वक आशिर्वाद दिले.

हा लग्नसोहळा पाहताना दोन्ही भुतांना मात्र मनस्वी आनंद झाला होता. त्यांनी एक चांगलं काम करुन थोडीफार पुण्याई मिळवली असं त्यांना वाटले. लग्नसमारंभ संपल्यानंतर मात्र ही दोन्ही भुते तिथून गुपचूप नाहीशी झाली.







# माया सरोवर

## 15

*(जयशील व त्याच्या अनुयायांनी हंसांच्या रथावर हल्ला करणाऱ्या जलवृक राक्षसांचा वध केला. मायासरोवरेश्वर व कांचनमाला रथावरुन ज्या अरण्यांत पडले होते, त्या बाजूला पांढरा धूर निघालेला पाहून सर्व लोक त्या दिशेला गेले. त्यानंतर)*

हंसांचा रथ जेव्हां उलटला, तेव्हां त्यांतून घसरुन मायासरोवरेश्वर, कांचनमाला व रथाचा सारथी - तिघेही निरनिराळ्या जागी पडले. मायासरोवरेश्वराला तर एक विचित्र अनुभव मिळाला.

हंसांच्या रथावरुन मायासरोवरेश्वर जिथें खाली पडला, तिथे नरभक्षक लोक राहात होते. त्यांना एक आठवडाभर शिकारीसाठीं एकही वन्य श्वापद दिसले नव्हते. त्याचं कारण असं होतं कीं वाघांचा एक कळप त्या प्रदेशांत आला होता. त्या कळपाने अरण्यांत मिळालेली सर्व जनावरे मारुन खाल्ली होती. त्या वाघांची डरकाळी ऐकून इतर सर्व जनावरे घाबरुन गेली आणि जवळचा पर्वत ओलांडून दूर पळून गेली होती.

शेरसिंग हा नरभक्षकांचा सरदार होता. आपले कांही अनुयायी ही टोळी सोडून पळून जाण्याचा प्रयत्न करीत आहेत हे त्याला माहीत होतं. त्यांचे पूर्वज अनेक पिढ्यांपासून या प्रदेशांत राहात होते. तेव्हां तो प्रदेश सोडून जाणें म्हणजे महान



पाप आहे, असे त्याला वाटत होते. जर तो प्रदेश हे सारेजण सोडून गेले, तर वडाच्या पारंब्यांमधें वसलेली जी अरण्यदेवता होती, तिला वर्षांतून किमान एकदा तरी नरमांसाचा नैवेद्य दाखवणें आवश्यक होते; तर मग हा नैवेद्य कुणी दाखवायचा? आपल्या देवतेची पूजा-आराधना जर योग्य तऱ्हेने वेळच्यावेळीं झाली नाही, तर त्याचे फळ साऱ्या जमातीला भोगावे लागले असते.

शेरसिंगने विचार करुन निर्णय घेतला कीं कोणत्याही उपायाने आपल्या जातभाईंना तो प्रदेश सोडून जाऊं देता कामा नये. त्यासाठीं आवश्यक ती शक्ती मिळावी म्हणून प्रार्थना करण्यासाठी तो विशाल वटवृक्षाखाली असलेल्या वनदेवतेच्या मंदिराकडे निघाला.

ते मंदिर अतिशय प्राचीन काळांतले होते. त्याला दारें नव्हती. पावसाळ्यांत अरण्यांतली जनावरें पावसापासून बचाव करण्यासाठी या मंदिरात आसरा घेत असत.

त्या दिवशी सूर्योदयाच्यावेळीं शेरसिंह त्या मंदिरात जेव्हां पोंचला तेव्हां त्याने एक अद्‌भुत दृश्य पाहिले. त्या देवतेच्या मूर्तीसमोर एका मोठ्या अजगराने एका लांडग्याला वेढे घालून लपेटले होते. परंतु अजगराचे डोके मात्र लांडग्याच्या तोंडात पकडले गेले होते.

ते दृश्य बघून शेरसिंह भ्यायला. त्याला तिथून पळ काढायचा होता, पण त्याने कसेबसे धैर्य एकवटून देवाच्यासमोर साष्टांग नमस्कार घातला. नंतर तो उठून बोलला, "हे वनदेवा, तुझा महिमा मोठा विचित्र आहे. आम्ही आठवडाभर भुकेने व्याकुळलेले आहोत. आम्ही तुझे भक्त आहोत, परंतु आमच्यावर तुझी कृपादृष्टी नाही. हे अद्‌भुत दृश्य दाखवून, देवा, आपण आम्हाला कोणता आदेश देता आहात?"

कांही क्षणांनंतर उजाड भिंतीमधल्या दगडी चिऱ्यांतून एक रानमांजर आपले डोके वर उचलून जोराने ओरडूं लागले, "म्यॉंऽऽव! म्यॉंऽऽव!"

"हे तर जास्तच गूढ वाटतंय! याचा अर्थ म्हातारा पुजारी गणाचारीच सांगू शकेल." असं म्हणून शेरसिंह आपल्या ज्ञातिबांधवांना हांका मारीत त्यांच्यापर्यंत पोंचला.

त्यावेळेला नरभक्षक जातीतले स्त्रीपुरुष, आबालवृद्ध, मैदानांत एकत्र जमून आपली भूक भागवण्यासाठीं कंदमुळें, फळें खाण्याबाबत कुरकुरत होते. मंदिरातून परत आलेला शेरसिंह धांपा टाकतच तिथें आला व ओरडायला लागला, "वनदेवाने आपल्यावरती कृपा केली आहे. गणाचारी पुजारी कुठे आहे?"

सर्व नरभक्षकांनी एकदम आपल्या सरदाराच्या दिशेने बघितले. त्याच्या शब्दांमधे त्यांना हरणांचे कळप आणि रानडुकरांची टोळी दिसूं लागली. त्यांच्यामधले कांही तरुण उतावीळपणें त्याला विचारुं लागले. "सरदार! वनदेवाच्या मंदिरात हरीणें किंवा रानडुकरें तर पोंचली असतील ना? आम्ही भाले, तलवारी घेऊन येऊं कां? बहुधा आमच्या देवाने आमच्या पोटाची सोय करण्यासाठी या जनावरांना इकडे पाठवले असेल, होय ना?"

शेरसिंहने एकवार चारी बाजूंना नजर फिरवली, आणि त्यांत गणाचारी दिसला नाही म्हणून त्याने भेदक स्वरांत विचारले, "अरे मूर्खांनो! मी काय विचारले नि तुम्ही त्यावर काय बोलता आहात? वृद्ध गणाचारी कुठे आहे? वनदेवतेच्या मंदिरांत जे दृश्य मी पाहिले, त्याचा कांहीतरी गूढ अर्थ आहे. ते रहस्य एकटा गणाचारीच आपल्याला सांगू शकेल. जा, त्याला लौकर बोलावून आणा!"

गणाचारी कांही अंतरावरच्या एका झाडाच्या छायेंत भुकेने कळवळून स्वस्थ बसला होता. जेव्हां शेरसिंहाला मुलांकडून ही बातमी समजली, तेव्हां तोच, गणाचारीकडे गेला. मंदिरांतली घटना त्याला सविस्तर सांगून शेरसिंहाने विचारले, "गणाचारी, त्या दृश्याचे रहस्य काय आहे? वनदेवाची आपल्यावर कृपा आहे आणि आपल्याला लौकरच मुबलक प्रमाणांत जनावरांचे



मांस खायला मिळणार आहे, असा अर्थ नाही कां होत?"

गणाचारीने त्याच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करीत आपल्याच तंद्रीत त्याला विचारले, "पुजाऱ्याचे काम करता माझे केंस पांढरे झालेत! वनदेव कधीही कुठलाही अर्थ उघड सांगत नसतात. मला तर वाटतं कीं आपल्या जातींतल्या लोकांनीदेखील इतर जंगली जातींप्रमाणे जे मिळेल ते खायची संवय केली पाहिजे, तरच ठीक होईल."

वृद्ध गणाचारीचं हे बोलणं पूर्णदेखील झालं नाही, त्यापूर्वी बाजूला उभ्या असलेल्या तरुणाच्या हातांतली काठी खेंचून घेऊन ती उगारुन शेरसिंह त्याला म्हणाला, "अरे बाबा! आपले जातभाई मांसाहाराखेरीज इतर पदार्थांना हातदेखील लावूं शकत नाहीत हे तुला माहित आहे ना?"



काठीचा तडाखा बसलेला गणाचारी उठून उभा राहिला आणि आपले केस झटकीत ओरडला, "अरे वनदेवा रे!" व त्याने शेरसिंहाला विचारले, "अरे शेरसिंहा, आता तू सरळसरळ नीट सांग हा काय प्रकार आहे? तुझ्या काठीच्या तडाख्याने माझी भूक कमी होत गेली आणि माझ्या अंगात एकदम उत्साह संचारला आहे." आणि गणाचारीने उडी मारुन झाडाची एक फांदी पकडली आणि त्यावर तो माकडासारखा लोंबकळूं लागला.

शेरसिंहाच्या आज्ञेनुसार दोघातिघां नरभक्षक तरुणांनी गणाचारीचे पाय पकडून त्याला खेंचले आणि त्याची कंबर धरुन त्याला सरळ उभा केला. तेव्हां शेरसिंहाने पुन्हां एकदा मंदिरातली घटना गणाचारीला सांगितली.

या वेळेला मात्र गणाचारीने नीट लक्ष दिले आणि वर आकाशाकडे बघत टक लावली. नंतर खाली वांकून हातांत थोडीशी माती घेतली आणि कांही मंत्र पुटपुटत ती माती सर्वांच्यावर शिंपडली व म्हटले, "इथें मोकळ्या मैदानावर चूल पेटवून एका भांड्यात पाणी गरम करत ठेवा. तो पर्यंत कांही लोक वनदेवाच्या मंदिरात जाऊन तो लांडगा, अजगर किंवा त्या रानमांजराला इथें घेऊन या."

"ते रानमांजर आत्तापर्यंत तिथें बसून आमची वाट पहात बसलं असेल कां? अजगर आणि लांडग्याने एव्हांना एकमेकांना मारुन टाकलं असेल. तरीही मी त्यांना तिथें असलेच तर आणवून घेतो." शेरसिंह म्हणाला.

"जर रानमांजर तिथें नसले तर निदान ज्या दगडावर बसून ते 'म्यॉंव म्यॉंव' करीत केकाटत होते, तो दगड तरी घेऊन यायला हवा. त्यालाही उकळत्या पाण्याच्या पातेल्यांत घालावं लागले." म्हाताऱ्या गणाचारीने डोळे रोखीत म्हटलं.

"पण वनदेवतेने हे अद्भुत दृश्य मंदिरांत कां दाखवलं? आपल्याला जंगलात लौकर जनावरें दिसणार आहेत कां? शेरसिंहाने विचारले.

हा प्रश्न ऐकून गणाचारी संतापला व आपले केस पिंजारुन ओरडायला लागला, "मी कोण आहे? मी वनदेव आहे! माझी कृपा आहे म्हणून तुम्हाला फक्त जनावरांचंच नव्हे, तर माणसांचं देखील मांस खायला मिळेल. तेव्हां आता चला, उठा!"

त्यानंतर कांहीजणांनी झाडांच्या मधल्या, रिकाम्या जागेंत एका खड्डा खोदला. त्याच्यावर पाण्याचे एक मोठे पातेले ठेवले, खाली सुकी लांकडे पेटवून त्या खड्ड्यांत ते टाकत गेले. थोड्याच





वेळांत साऱ्या आसमंतात पांढरा धूर दिसूं लागला.

त्याच वेळेला मायासरोवरेश्वराच्या हंसांच्या रथावर गिधाडांनी हल्ला केला. रथ इकडेतिकडे फिरत असताना रथ उलटला. फक्त रथाचा एक कठडा पकडून धरल्यामुळें अंगरक्षक पडला नाही, परंतु रथाचा सारथी, कनकाक्ष राजाची मुलगी कांचनमाला आणि मायासरोवरेश्वर वरुन भिरभिरत खाली पडले.

त्यावेळीं जोराचा वारा सुटला होता म्हणून तिघेही निरनिराळ्या जागी भेलकांडत पडले. केंस पिंजारुन घुमत असलेल्या गणाचारीने खाली पडणाऱ्या मायासरोवरेश्वराला पाहिले आणि ओरडून म्हटले, "वा वा! आमची जमात भुकेने तडफडते आहे. म्हणून वनदेवाने हा आमच्यावर अनुग्रह केला आहे. हा बघा! आपल्याला भोजन म्हणून एक माणूसच त्याने धाडला आहे. या पातेल्यांतलं पाणी लौकर तापवा. माणूस अजगर, लांडगा आणि रानमांजर - इतक्या सगळ्या प्राण्यांचे मांस प्रथम वनदेवाला नैवेद्याच्या रुपांत दाखवायला हवे! त्यानंतर आपल्याला अरण्यांतल्या जनावरांचे भरपूर मांस मिळत जाईल."

हंसांचा रथ उलटून खाली पडणें ही बाब मायासरोवरेश्वराच्या दृष्टीने दुर्दैवी होतीच; पण त्यांतली सुदैवाची गोष्ट अशी कीं तो सरळ खाली आला आणि त्या गरम पाण्याच्या पातेल्यांतच पडला. पाण्यांत त्याने एक डुबकी घेतली आणि तो ओरडतच उठला. पातेल्याचा कांठ पकडून त्याने सगळीकडे पाहिले. चारी बाजूंना नरभक्षक उभे होते. त्यांना पाहून तो घाबरला.

म्हाताऱ्या गणाचारीने त्याच्याजवळ जाऊन हंसत म्हटले, "वनदेवाने आमच्यासाठीं मरतुकडा माणूस नव्हे तर चांगला धष्टपुष्ट माणूस पाठवला आहे, आणि आमचे श्रम वांचवण्यासाठीं त्याला सरळ गरम पाण्याच्या पातेल्यांतच टाकलाय!"

गणाचारीचे शब्द ऐकल्यानंतर मायासरोव-रेश्वराला कळून चुकले कीं तो नुसता रानटी लोकांच्या वस्तींत नव्हे, तर नरभक्षकांच्या हातांत सांपडलेला आहे. पातेल्याखालच्या पेटत्या लांकडामुळें त्याच्या शरीराला चटके बसूं लागले.

पातेल्याच्या बाहेर काढण्यासाठी मायासरोवरेश्वर ओरडून सांगू लागला. त्यावर वृद्ध गणाचारी एक जळके लांकूड हातांत नाचवीत त्याला रागवायला लागला, "अरे माणसा, वनदेवाने तुला आमच्या पोटपूजेसाठी पाठवलंय. तू जर पातेल्याच्याबाहेर निघण्याचा प्रयत्न

केलास तर मी तुला लांकडाचे चटके देऊन भाजून काढीन! खबरदार!''

हे ऐकून आपला मृत्यू जवळ आला आहे हे मायासरोवरेश्वराला समजून चुकलं. तरीसुद्धां गरम पाण्यांत भाजून वेदना सहन करीत मरण्यापेक्षां कोणत्याही मार्गाने या पातेल्याच्याबाहेर पडलंच पाहिजे असा त्याने विचार केला. त्याला एक युक्ती सुचली. त्याने गणाचारीला कांहीतरी रहस्य सांगायचे आहे असे खुणेने सांगितले. तो हळू आवाजांत म्हणाला, ''तू वनदेवाचा पुजारी गणाचारी आहेस ना? तर मग हे रहस्य मला तुलाच सांगितलं पाहिजे. तुमच्या वनदेवाने माझ्याबरोबर आणखी तिघाजणांना तुमच्या पोटपूजेसाठी पाठवलं आहे.''

''मग ते तिघेजण आहेत तरी कुठे?'' गणाचारीने आश्चर्यचकित होऊन विचारले.

''मला वाटत ते चुकून दुसरीकडे उतरले असावेत. जर तुम्ही मला बरोबर नेलेत तर मी त्यांना शोधून काढीन व पकडायला मदत करूं शकेन.'' मायासरोवरेश्वर म्हणाला.

गणाचारीला ही सूचना पसंत पडली. त्याने लागलीच कढत पाण्याच्या पातेल्यातून माया-सरोवरेश्वराला बाहेर काढले, आणि ही बातमी वनदेवाच्या मंदिरात गेलेल्या शेरसिंहाला सांगण्याची आज्ञा केली. नंतर चारजणांना बरोबर घेऊन मायासरोवरेश्वरासह तो अरण्याच्या दिशेने जाऊं लागला. त्यांनी अरण्यांत खूप शोध केला. एका झाडाच्या खाली सारथ्याचा चाबूक त्यांना दिसला. ''माझ्या रथाचा सारथी व कांचनमाला या झाडाच्या पर्णराजींत कदाचित अडकलेले असतील'' असा विचार मनांत येऊन माया-सरोवरेश्वराने वर पाहिले. तर वरती हंसांचा रथ उडत होता ती त्याला दिसला.

त्याचवेळीं वर जाणारा पांढरा धूर पाहात सिद्धसाधक व मकरकेतूही नरभक्षकांच्या प्रदेशाच्या दिशेला जात होते. आपल्या वाहनाला - नरवानराला हांकलत सिद्धसाधक ''जय महाकाली'' असं अधूनमधून ओरडत होता. त्याची ही भयंकर गर्जना कानावर पडताच मायासरोवरेश्वर व त्याच्याबरोबर असलेल्या सर्वांचा अंगाचा थरकांप झाला.

(क्रमशः)



वेताळ कथा

# खोट्या पंडिताची कथा

निश्चयी विक्रमार्क पुन्हां झाडाजवळ गेला, त्याने ते शव खाली उतरवले, आपल्या खांद्यावर घेतले आणि तो स्मशानाच्या दिशेने चालायला लागला. तेव्हां प्रेतांत लपलेला वेताळ त्याला म्हणाला, ''राजन्, तू सर्व तऱ्हेच्या सुखांचा उपभोग घेतलेला आहेस, कोणतेही सुख बाकी राहिलेले नाही. असं असताना ते सुखी जीवन नाकारुन तू इतके परिश्रम कां करीत आहेस? प्रेत उचलण्याचे हीन काम कां करतो आहेस? तेही तू निष्ठेने व इतक्या चिकाटीने कशासाठी करतो आहेस? तुझा कुणी एखादा स्पर्धक आहे कां, कीं त्याला हरवण्यासाठीं तूं हे सारं कांही

पंडिताने मदन नांवाच्या एका खोट्या पंडिताशी स्पर्धा केली आणि त्याला अपमानित व्हावे लागले. मी तुला तीच गोष्ट सांगतो. म्हणजे तुला थकवाही जाणवणार नाही'' आणि वेताळ त्या पंडिताची गोष्ट सांगू लागला.

ग्रामाधिकारी पारिजाताला लोकांनी आपल्याला महापंडित म्हणावे अशी तीव्र इच्छा होती. म्हणून तो दररोज आपल्या गांवात सभा भरवून तिथें वेदपुराणांवर प्रवचन वा चर्चा करी. गांवकरी त्याला प्रश्न विचारीत आणि तो त्यांना उत्तरें देई. हा सभेचा रोजचा परिपाठ होता.

एकदा मदन नांवाचा एक तरुण कांहीतरी कामानिमित्त त्या गांवात आला. संध्याकाळी असलेल्या या सभेला तोही उपस्थित राहिला. त्या दिवशी पारिजात गजेंद्रमोक्षाची कथा गांवकऱ्यांना सांगत होता. कथा संपल्यानंतर एकाने प्रश्न विचारला, ''द्रौपदीला पांच पती होते. मग तिला पतिव्रता कसे मानता येईल?''

पारिजातने हंसत उत्तर दिले, ''तुमच्या प्रश्नांतच याचं उत्तर आहे.'' दुसऱ्या एका गांवकऱ्याने विचारले, ''रामाने विनाकारण सीतेला अरण्यांत सोडून दिले. ह्याला आदर्श पती कसा म्हणता येईल?'' ''ही गोष्ट सीतेनें सांगितली ना, मग सीतेनेच याचं उत्तर दिलं पाहिजे.'' पारिजातने समर्थन केलं.

आणखी एकाने शंका व्यक्त केली, ''शिवानेच नृत्याची निर्मिती केली आहे. तरीदेखील या कलेचा पुरुषांपेक्षां स्त्रियाच जास्त अभ्यास करतात. असं कां?'' ''हा तर निसर्गाचा नियम आहे. कमावतो पुरुष पण खर्च करते स्त्री!'' पारिजातने उत्तर दिलं.

असे कितीतरी प्रश्न विचारले गेले. मदनला मात्र आश्चर्य वाटलं कीं कथा होती गजेंद्र-मोक्षाची, पण त्याबद्दल कुणीच कांही विचारलं नाही. पारिजातची असंबद्ध उत्तरें ऐकूनही तो जरा चक्रावला. कारण कोणत्याच प्रश्नाचं सरळ उत्तर दिलेलं नव्हतं. तरीही गांवकरी उत्तरें ऐकून खूष दिसत होते.



वीर मदनचा दूरचा नातेवाईक होता. तो पारिजातपेक्षां जास्त चांगली चर्चा करुं शकत असे. त्याची भाषा सरळ, सोपी व उत्तरेही सुसंगत असत.

मदनला वाटलं कीं वीरला या गांवात बोलावलं तर चांगलं होईल, कारण श्रोते कथा-प्रवचने ऐकायला उत्सुक दिसत होते. त्याने हा प्रस्ताव पारिजात समोर मांडला व म्हणाला, ''महोदय, आपल्या सभा फारच छान होतात. आपली अनुमती असेल तर मी वीरला या गांवात यायचे निमंत्रण देईन. तो माझा दूरचा नातेवाईक आहे आणि तो जरुर येईल. तोही एक मोठा विद्वान आहे.''

''मोठे मोठे विद्वान कोणत्याही सभेत आले कीं सभा चांगलीच होते. तुमचा वीर तेवढ्या ताकदीचा आहे ना?'' मदनने विचारले.

''ते मला सांगता येणार नाही. परंतु त्यालाही एकदा राजसत्कार मिळालेला आहे.'' मदन म्हणाला. वीर खरंच पारिजातपेक्षां हुशार आहे असं कांही त्याला सांगायचं नव्हतं.

''राजसत्कार मिळण्यासाठी विद्वत्तेपेक्षां दरबारांतल्या लोकांशी परिचय व वशिलाच जास्त आवश्यक असतो. पण असल्या लोकांचं खरं स्वरुप कळतं अशा लहानमोठ्या सभांतूनच! त्यांची प्रतिभा इथें दिसून येते. वीरला जरुर बोलवा!'' पारिजातने आश्वासन दिलं.



मदन जेव्हां आपल्या गांवी परत गेला तेव्हां त्याने वीरला ही गोष्ट सांगितले. त्यावर वीर म्हणाला, ''मला खरंच आश्चर्य वाटतं कीं आसपासच्या गांवातून अशा चर्चा, प्रवचने ऐकण्यासाठी लोक खरोखरीच उत्सुक आहेत. मी अवश्य पारिजातला भेटायला जाईन.''

कांही दिवसानंतर मदन आणि वीर पारिजातच्या गांवी गेले. जी पंडित सभा आयोजित केली गेली, त्यांत वीरने गजेंद्रमोक्षाची कथा मोठ्या रंजकतेने सांगितली. पारिजातचे कथाकथन आणि वीरचे कथन यांत कितीतरी फरक आहे हे मदनला स्पष्टपणें कळून चुकले. गांवकऱ्यांपैकीं मात्र कुणीही त्यानंतर प्रश्न विचारले नाहीत.

''म्हणजे याचा अर्थ असा होतो कीं या प्रवचनांत गांवकऱ्यांना कांही शंका उरल्या नाहीत. वीरने सुबोध कथन केले नि त्यांच्या शंकेला जागाच ठेवली नाही.'' मदन पारिजातला म्हणाला.



जाईल, तेव्हांच या समस्येचे निराकरण होऊं शकेल.''

मदनने पारिजातला हे सांगितले नाही व त्याची तोंडभरुन स्तुती केली. नामवर गांवात असेच कथाकथन करण्यासाठी मदनने गोड बोलून पारिजातला राजी केले.

नामवरमधें सभा ठरली आणि बरेच लोक त्या कार्यक्रमाला आले. वीरने कुंतीची कथा सांगितली आणि श्रोत्यांनी ती लक्षपूर्वक ऐकली. पण जेव्हां पारिजातने भक्त प्रल्हादाची कथा सांगितली तेव्हां त्यानंतर श्रोत्यांनी वामनावताराबद्दल प्रश्नांचा भडिमार केला. पहिल्यासारखीच अर्थहीन उत्तरें पारिजातने दिली.

वीरला हे अगदीच विचित्र वाटत होते. त्यानंतर निशापूरमधें आणखी एक कार्यक्रम झाला. तिथेही हाच प्रकार घडला. वीरची कथाकथनाची पद्धत श्रोतृवर्गात उत्साह निर्माण करुं शकली नाही, त्यामुळें वीर जरा निराश झाला. शेवटचा आणखी एक प्रयत्न म्हणून त्याने एक सभा जागृतीपुरांत आयोजित करण्याचे ठरवले.

यापूर्वी जागृतीपुरांत वीरचा भव्य सत्कार झालेला होता. त्या गांवातले जाणकार लोक त्याला पारिजातपेक्षां जास्त श्रेष्ठ पंडित मानतील आणि त्याचा आदर राखतील अशी अशा त्याला वाटत होती. सभेची जुळवाजुळव करण्यासाठीं वीरने मदनला जागृतीपूरला धाडले. जेव्हां मदन तिथल्या ग्रामाधिकाऱ्याला भेटायला गेला, तेव्हां तो अधिकारी नाराजीने म्हणाला, ''आम्ही वीरचा सत्कार केला म्हणून कांही लोकांना वाईट वाटते आहे कां? कीं ही चूक आहे असं वाटतंय? तसं असेल तर वीरने या गांवात येणे हे त्याच्या दृष्टीने ठीक होणार नाही.''

''असं नाही. मी जेव्हां कथाकथन करतो, ते गांवकऱ्याना अगदी चांगलं समजतं. म्हणून तर ते शंका उपस्थित करतात. आता मी त्यांना रुक्मिणी विवाहाची कथा सांगतो. तूच पहा, ते नंतर किती प्रश्न विचारतात ते!'' पारिजात म्हणाला. आणि त्याने गांवकऱ्यांना रुक्मिणीविवाहाची कथा सांगितली. एका पाठोपाठ एक असे गांवकरी उठून आपापल्या शंका विचारुं लागले. पण ते सारे प्रश्न ऋष्यशृंगाबद्दल होते. पारिजातने जी उत्तरें दिली ती पूर्वीप्रमाणेंच अर्थहीन होती.

त्यावर आश्चर्य व्यक्त करुन वीरने मदनला विचारले, ''या लोकांनी कथा ऐकली रुक्मिणी विवाहाची, आणि प्रश्न विचारताहेत ऋष्यशृंगा-बद्दल! हे अगदीच विचित्र वाटतंय. पूर्वीही असंच होत होतं असं तू म्हणाला होतास. तेव्हां मला तरी वाटतं कीं हे गांवकरी आणि पारिजात एकतर पार पोंचलेले असतील, किंवा ठार मूर्ख! जेव्हां खरी पंडित सभा दुसऱ्या एखाद्या गांवी घेतली



''महाशय, वीरच्याबाबतीत आपला कांही-तरी गैरसमज दिसतो आहे. पारिजातने सभा जिंकली असं लोक म्हणतात म्हणून आपण वीरबद्दल अनादर दाखवता आहात. पण त्याचं खरं कारण आहे गांवकऱ्यांचे अज्ञान! त्यांच्या अडाणीपणाची फायदा घेऊन पारिजात आपल्या बुद्धिमत्तेची शेखी मिरवतो. त्याच्या भ्रमाचा भोपळा फक्त जागृतीपुरांतल्या गांवकऱ्यांमधेंच फुटण्यासारखा आहे. पारिजातची खरी परीक्षा करण्यासाठीच ही सभा आम्हाला तुमच्या गांवात करायची इच्छा आहे.'' त्यावर ग्रामाधिकारी चिडून म्हणाला, ''पुन्हां पुन्हां तेच तेच काय सांगता आहात? पारिजात हा कांही विद्वान नाही, हे आम्हाला माहीत आहे, त्याच्यांत नांवापुरती देखील विद्वत्ता नाही. त्याला मात्र स्वतः महापंडित असल्याचा आव आणता येतो. म्हणून तो नेहमी आपलीच आख्याने ठरवतो. तो ग्रामाधिकारी आहे आणि आपल्या अधिकाराच्या जोरावर तो त्याच्या लोकांना मदत करुं शकतो. जे त्याला आवडत नाहीत, त्यांना तो त्रास देऊं शकतो, त्यांचे नुकसान करुं शकतो. म्हणून गांवकरी त्याच्याशी गोडीगुलाबीने वागून त्याची नाटकी स्तुती करतात. असले स्तुतीपाठक लोक त्याच्या सभांना लाचारीने, नाईलाजाने जातात. ज्या गांवात त्याची सभा असते, तिथे हे लोकही बरोबर जातात. आपली उपस्थिती त्याला जाणवून देण्या साठी ते उगीचच प्रश्न विचारतात. पारिजातच्या यशस्वी सभांचं हे खरं कारण आहे.''

हे ऐकून मदन चक्रावला. त्याने ग्रामाधिकाऱ्याला म्हटलं, ''साहेब, हे बरोबर आहे, पण हे लोक पारिजातच्या कथेबद्दल प्रश्न न विचारता इतर अनावश्यक प्रश्न कां विचारत बसतात?''

ग्रामाधिकाऱ्याने जास्तच चिडून उत्तर दिलं, ''अहो, पारिजातच्या कथा ऐकायला आमचे



गांवकरी उत्सुक नसतात. उगीच डोकेदुखी निर्माण होते. म्हणून ते नुसते बसून राहतात. त्याचे आख्यान संपले रे संपले कीं त्यांच्या मनांत इतर जे विषय घोळत असतात, त्याच्याबद्दल ते विचारीत राहातात. आणि खरं पाहिलं तर पारिजातलाही त्या प्रश्नांची उत्तरें ठाऊक नसतात. गांवकऱ्यांनादेखील ठाऊक असतं कीं त्याच्याकडून नीट उत्तर मिळणारच नाही. म्हणून ते प्रत्येक उत्तराला "बा छान" म्हणून माना डोलावतात."

ही गोष्ट सांगून वेताळने आपली शंका व्यक्त करीत विक्रमार्काला विचारले, "राजन्, जागृतीपुरच्या ग्रामाधिकाऱ्याला पारिजातच्या बाबतीत सारी माहिती आहे. आपल्याला पंडित म्हटले जावे म्हणून त्याने काय काय नाटकें केली, थापा मारल्या, हे त्याला ठाऊक आहे. हे माहिती असून देखील त्याने वीरची सभा बोलावण्या-बाबत नकार दर्शवला. हा वीरसारख्या पंडिताचा अपमान नाही कां? ज्या गांवात वीरचा सत्कार झाला, त्याच गांवात वीरची सभा होऊं नये? त्याच्यावर हा राग कशासाठी? ग्रामाधिकाऱ्याची चीड कशापायी आहे? माझ्या या शंकांचं उत्तरं माहीत असूनही जर तू मौन पत्करलेस तर तुझ्या डोक्याची शंभर शकले होतील."

विक्रमार्कानें उत्तर दिले, "जागृतीपुरचा ग्रामाधिकारी वीरचा आदर करणारा आहे. त्याच्या मनांत वीरबद्दल नितांत प्रेम व कौतुक आहे. म्हणूनच त्याला वीरची सभा गांवात घ्यायची नाही आहे. पारिजातबरोबर वीरचेही कथाकथन ठेवणे हा उलट वीरचाच अपमान आहे. त्याचं आणखी एक महत्त्वाचं कारण आहे. वीर हुशार आहे पण त्याला धोरण कमी आहे. नाटकी पंडितांच्या या असल्या चाली त्याला समजत नाहीत. लोकांचा पवित्रा, खोटेपणा हा त्याला अजून नीट ओळखता येत नाही. म्हणूनच त्याने पारिजातच्या सभेंत भाग घेऊन दर वेळी हार मानली. जागृतीपुरच्या ग्रामाधिकाऱ्याला वीरसाठी आणखी एक पराभव नको होता, खोट्या पंडिताशी चुरस नको होती. तसं केल्यामुळें वीरच्या आजपर्यंतच्या कीर्तीला काळिमा लागला असता.

यांत ग्रामाधिकाऱ्याची मुळींच चूक नाही, किंवा त्याने जाणूनबुजून वीरचा अपमानही केलेला नाही. जो कांही विचार त्याने ठरवला. त्यांत वीरची भलाईच होती. कारण कांहीही असो, दुष्ट व खोट्या माणसांपासून लांब राहाणे हे केव्हांही श्रेयस्कर असते."








# सोलाची मऊ खेळणीं

मऊ, गुबगुबीत खेळणीं भारतांत पूर्वी नव्हती कां? हो तर, लहान मुलांना हाताळायला सुलभ व सुरक्षित अशी खेळणीं आपल्याकडे कित्येक शतकांपूर्वीपासून बनली जात आहेत. म्हणजे सध्यांचे लोकप्रिय 'टेडी' किंवा 'बनी' नव्हेत. ही खेळणीं कृत्रिम धाग्यांच्या कापडाची व साहित्यापासून बनवतात.

जुनी भारतीय खेळणीं झाडांच्या सालीपासून, तंतूपासून बनवतात आणि थर्मोकोल इतकी वजनाला हलकी असतात. त्यांची किंमतही फारच कमी, परवडण्याजोगी असते, हे आणखी एक विशेष।

दलदलींत उगवणाऱ्या बांबू गवतांपैकीं सोला हे एक प्रकारचे वांसे गवत पश्चिम बंगालमधें अमाप सांपडते. कुशल बंगाली कलाकार यापासून अनेक निरनिराळ्या वस्तू बनवतात.

या जाड गवताची वरची कठीण साल कोयतीने तासून काढली कीं, आंतला दुधी गाभा दिसतो. याचे आकार कापून खेळणीं, सजावटीसाठीं साहित्य, व शोभेच्या वस्तू तयार करतात.

ब्रिटिश राजवटींत या सोलाच्या टोप्या हिंदुस्तानच्या रणरणत्या उन्हापासून संरक्षण करण्यासाठीं ब्रिटिश अधिकाऱ्यांच्या डोक्यावर असत.

बंगालमधें तुम्ही दुर्गापूजेच्या काळांत गेला असलात तर देवी दुर्गेचे व इतर देवतांची अलंकारमय सजावट पाहिली असेलच. त्या वस्तू सोलापासूनच केल्या जातात.

बंगाली हिंदू नवरदेव डोक्यावर घालतो तो टोपोर आणि वधूच्या डोक्यावर विराजमान असलेला मुकुट हे देखील याच गवतापासून केलेले असतात.





# कर्ज न देणारा

शिवपुरांत आनंद नुकताच राहायला आला होता. या गांवात त्याने चार एकरांचे शेत विकत घेतले होते. दहा दुभत्या गाई खरेदी केल्या होत्या. शेती व दुधाचा धंदा केला तर इथें सुखाने आरामांत राहाता येईल असा त्याचा विचार होता. परंतु त्याच्या मुलीचे अचानक लग्न ठरले. वरपक्षाकडील मंडळींना शक्य तितक्या लौकरचा मुहूर्त हवा होता.

"वर्षभरानंतर लग्न झाले असते तर मला पैशाची तसी अडचण भासली नसती. पैसे जमवण्यासाठी धांवपळ करावी लागली नसती. तावडतोब लग्नाचा खर्च करण्यासाठी माझ्याजवळ तेवढी मोठी रकम शिल्लक नाही. कमीतकमी दोनशे सोन्याच्या मोहरा मला कर्जाऊ घ्याव्या लागतील. या गांवात मी आहे नवखा; इथें मला कोण कर्ज देईल बरं?" आनंदने पत्नीला सांगितले. या चिंतेमुळें दोघेही गंभीर होते.

आनंदची पत्नी राजेश्वरी हिने आजूबाजूला चौकशी केली आणि या गांवात दोन सावकार आहेत ही बातमी आणली. ती आनंदला म्हणाली, "एकाचं नांव पूरण आहे. तो शेत गहाण ठेवून कर्ज देतो. दुसरा सावकार आहे सूरज. तो सोने तारण ठेवून रक्कम उसनी देतो."

पण आनंदला वाटलं कीं दोनशे मोहरा म्हणजे कांही अगदी फार मोठी रक्कम नव्हे. म्हणून त्याच्या शब्दावर विश्वास ठेवणाऱ्याकडून तात्पुरती कर्जाऊ रक्कम मिळाली तर बरं, असं त्याला वाटतं होतं. त्याला शेत गहाण ठेवायचं नव्हतं. बायकांना शुभप्रसंगी दागिने घालायचे असतात, म्हणून सोने गहाण ठेवायचीही त्याची इच्छा नव्हती. त्याऐवजी थोडा जास्त व्याजाचा दर द्यायची त्याची तयारी होती.

आनंदची ही समस्या कळल्यावर त्याचा शेजारी यादवने त्याला सांगितलं, "या गांवात गहाणाशिवाय कुणीही कर्ज देणार नाही. परंतु शेजारच्या गांवातला परंधाम आहे ना, तो अनोळखी लोकांना कर्ज देतो. जर तुला दोनशे मोहरा कर्जाऊ हव्या असतील, तर सहा महिन्यांनंतर चारशे मोहरा परत द्याव्या लागतील. तू तयार असलास तर त्याला जाऊन भेट."

आनंदला काय करावे ते समजेना. तितक्यांत एक तिशीचा तरुण तिथें आला. पांढरे स्वच्छ कपडे, गोरागोमटा दिसणारा तो तरुण यादवला म्हणाला, "यादवजी, काय झालं काय? तुम्ही एका आठवड्यांत परत देतो म्हणून शब्द दिलात आणि दोन महिने झाले तरी अजून तुम्ही शंभर मोहरा परत दिल्या नाहीत. तुम्हाला शोधलं तरी तुम्ही दिसलाच नाहीत. मी कांही ती रक्कम परत मागत नाही. पण तुम्ही नेहमीसारखे घरी येत चला हं!" असं म्हणून तो तरुण निघून गेला.

आनंदने उत्सुकतेने विचारलं, "हे गृहस्थ कोण आहेत?" "त्यांचं नांव वल्लभ आहे. खूप चांगला आहे, श्रीमंत आहे. अडचणींत असलेल्याला मदत करतो, व्याज मागत नाही." यादवने त्या तरुणाची माहिती दिली.

"तुम्ही माझी ओळख करुन दिली असतीत तर बरं झालं असतं." आनंद चटकन म्हणाला. यादव संकोचून त्यावर बोलला, "ओळख झालीच कीं! पण वल्लभचा स्वभाव वेगळा आहे. जे वाटतं, ते तो स्पष्ट बोलतो. मनांत कांहीही लपवत नाही. आमची खूप जुनी ओळख आहे, म्हणून तो कांही बोलला तरी आम्ही गप्प बसतो. परंतु नवीन माणसाला त्याचा झटका बसतो. तो सर्वांनाच कर्ज देत नाही. कर्ज फेडलं तरी किंवा नाही फेडलं तरी, दोन्ही तऱ्हेने मन बेचैन असतं. म्हणून जरी आमची जुनी मैत्री असली तरी त्याच्याकडे कर्ज मागायला जरासा संकोच वाटतो."

"पण मी वायद्याप्रमाणें घेतलेले कर्ज वेळेवर देईन, म्हणून त्यांच्याकडून कर्ज घेताना मला मुळींच संकोच वाटणार नाही. कर्ज दिलं नाही तरी त्यांत वाईट कशाला वाटून घ्यायचं?" आनंदने आश्चर्याच्या सुरांत विचारलं.



"तू एकदा त्या अनुभवांतून गेलास ना कीं मग त्याचा अर्थ तुला नीट कळेल." असं म्हणून यादव निघून गेला. आनंदचा यादवच्या बोलण्यावर विश्वास बसला नाही. त्याने वल्लभकडून मदत घ्यायचा निर्णय घेतला. त्या दिवशी संध्याकाळीं तो वल्लभच्या घरी गेला.

त्यावेळेला वल्लभ आणि त्याचे वडील घराच्या ओटीवर बसून मोठ्याने वाद घालीत होते.

"तुम्हीच तर खरेदी करायचा जोर धरलात, तोही मी विचारल्यानंतर. तुमच्या इच्छेप्रमाणं सगळं व्हावं ही अटदेखील मी मान्य केली. इतकं सारं होऊनदेखील मी म्हशी खरीदल्या, आणि

लक्ष्मण प्रताप



"माझा निर्णय मला ठीक वाटतोय. तुमचं मन मी दुखावलं, त्याबद्दल मला वाईट वाटतंय." वल्लभ पित्याला म्हणत होता.

"बाळ, तू सल्ला मागितलास, मी दिला. मला तुझ्या धोरणी स्वभावाबद्दल खात्री आहे. तू कांहीही कर, मला त्यांत आनंद आहे. उगीच चिंता करुं नकोस." वडील म्हणाले.

आनंदने दोघांची चर्चा ऐकली होती. त्याच्या मनांत आलं, "वल्लभचं मन किती कोमल आहे. अशा चांगल्या माणसाबद्दल यादवने असं कां म्हणावं बरं?"

तेवढ्यांत वल्लभला आनंद दिसला आणि त्याने बोलणे बंद केले. वल्लभने आपली ओळख करुन देताना म्हटले, "मी आपलं नांव ऐकलंय. आज सकाळीं यादवच्याबरोबर पाहिलं होतंच. पण माझी ओळख तेव्हां सांगताना मला संकोच वाटला, म्हणून मी गप्प होतो. राग मानूं नका हं!"

"अहो, त्यांत काय बिघडलं? माझाही स्वभाव तसाच आहे. पण तुम्हाला जरुर पडली असेल, म्हणून स्वत:लाच ओळख सांगायची वेळ आली असेल."

आनंदने आपला परिचय देऊन वल्लभकडे पैशाची मदत मागितली.

वल्लभने लगेच सांगितले, "मी लागलीच उत्तर देतोय, म्हणून राग मानूं नका. मी बराच विचार करुन कांही नियम स्वत:शी ठरवून ठेवले आहेत. त्यानुसार नव्या व्यक्तीशी परिचय होताना कर्जाने सुरवात करायची नाही. तुमची गरज अगदी रास्त आहे. तुमच्या मुलीच्या लग्नांत जर माझी मदत होऊं शकली तर तेही पुण्य मला मिळेलच. पण तुम्हाला मदत करता येणार नाही, त्याचे मला फार वाईट वाटते आहे."

निराश होऊन आनंद घरीं परतला. तोपर्यंत त्याचा थोरला भाऊ विनोद आलेला होता व आनंदची वाटच पहात होता. भावाला बघून विनोद म्हणाला, "अरे, मुलीचं लग्न ठरल्याचं कळलं. मला वाटलं तुला थोडीफार पैशाची जरुर असेल. सध्यां माझी परिस्थिती, धंदा, चांगला चाललाय. म्हणून तुझ्यासाठी हजार मोहरा घेऊन आलोय. तुला जेव्हां शक्य होईल तेव्हां परत दे."

अडचणीचे निवारण झाले म्हणून आनंदला समाधान वाटले. तो भावाच्या पायां पडला आणि सरळ मंदिरात गेला.

मंदिराच्या आवारांत वल्लभ त्याला पुन्हां



भेटला. तो म्हणाला, "तुम्ही देवाच्या दर्शनाला आलात होय? आणि कां यायचं नाही? तुम्हाला कर्ज नाकारताना माझ्या मनाला फार त्रास झाला, मला फार वाईट वाटले. तुम्हालाही वाईट वाटले असेलच. माझ्यापाशीं धन आहे, पण नियमाचे पालन करण्यासाठी मला नाही म्हणणे भाग होते. मन शांत होण्यासाठीं मी मंदिरात आलो. पण ही बोंच माझ्या मनांत कायम टोंचत राहील."

आनंद त्याला म्हणाला, "आपण कां उगाच चिंता करता आहात? एकदम अपरिचित व्यक्तीकडे कर्ज मागणें ही माझीच चूक आहे. आपण कर्ज नाकारलेत हे अगदी योग्य आणि सुसंगत आहे."

"माझ्याकडे कर्ज मागणें ही चूक वाटतेय तुम्हाला! म्हणजे माझ्या व्यवहारामुळें तुमचे मन दुखावले गेले असा अर्थ झाला. म्हणूनच तुम्हीदेखील मंदिरात आलाव. माझा अंदाज बरोबर आहे ना?" वल्लभने विचारले.

आनंद त्याला सांगितले कीं थोरल्या भावाने योग्यवेळीं मदत केली आहे. त्यावर वल्लभ म्हणाला, "चांगुलपणाचे फळ चांगल्या लोकांना मिळतेच. तेव्हां आता तुम्ही एक चांगले गृहस्थ आहात हे सिद्ध झालं. पण वाईट इतकंच वाटतं कीं एका चांगल्या व्यक्तीला मी मदत केली नाही. आता माझी बोंच दुप्पट वाढलीय."

आनंदला वल्लभची समजूत पटवण्यास जरा वेळ लागला, कीं वल्लभच्या व्यवहारामुळें आनंद नाराज मुळींच नव्हता, उलट तो फारच खूष झालेला होता.

दोन दिवसानंतर वल्लभ व आनंदची भेट पुन्हां



कापडाच्या दुकानांत झाली. वल्लभला वाटलं कीं आनंद स्वस्त दरांतले कपडे खरेदी करतोय. म्हणून तो पुन्हां म्हणाला, "तुम्ही मागितल्याबरोबर मी लगेच रक्कम दिली असती तर तुम्ही जास्त चांगले कपडे घेतले असतेत."

जिथें जिथें ते दोघेजण गांवात भेटत, तिथें तिथें वल्लभ आपण कर्ज देऊं शकलो नाही त्याबद्दल खंत प्रकट करीत राहिला.

आनंदने मुलीच्या लग्नासाठी वल्लभला सहकुटुंब बोलावले. तेव्हां वल्लभ म्हणाला, "पैसे असूनदेखील मी तुम्हाला देऊं शकलो नाही. तरीसुद्धां तुम्ही आम्हाला निमंत्रण दिलेत!"

इकडे लग्नविधी चालूं होता तिथेंही वल्लभ आपले हे दुःख पुन्हां पुन्हां सांगत होता. त्याला गप्प करायला आनंदला जितका त्रास पडला

तितका व्याही मंडळींची सरबराई करतानादेखील पडला नव्हता.

त्याचवेळीं आनंदचा मोठा भाऊ विनोद तिथें आला नि म्हणाला, "अरे आनंद, आत्ताच मला कळलं कीं नवऱ्या मुलाची थोरली व धाकटी बहीण व त्यांचे नवरे यांना आपण आणखी मानपान करायला हवेत म्हणे! त्यांच्या घरांतली ही रीत आहे, की कपडे आणि अंगठ्या द्यायच्या. पण तू फक्त सर्वांना साड्या, कपडे दिलेस, पण अंगठ्या राहिल्यात म्हणून जरा नाराजी व गोंधळ झालाय."

"आता काय करायचं रे? माझी तर सारी रक्कम खर्च झालीय." आनंदने आपली चिंता व्यक्त केली.

वल्लभने लगेच म्हटलं, "जेव्हां तुम्ही मागितलेत तेव्हांच जर मी पैसे दिले असते तर ही आत्ताची चिंता उपटली नसती. माझा नियम म्हणून मी मदत केली नाही. तुमच्या साऱ्या काळज्यांचं मूळ कारण मी आहे." असं तो पुन्हा पुन्हां म्हणत राहिला.

तेव्हां विनोदने मधेच तोंड खुपसलं व तो वल्लभला म्हणाला, "कर्ज देताना ओळख असली पाहिजे हाच तुमचा नियम आहे ना? आता तर तुम्ही माझ्या भावाचे चांगले परिचित मित्र आहात. तेव्हां आता शंका कसली? दोनशे मोहरा निर्धोकपणें तुम्ही त्याला आता देऊं शकता कीं! हे तुमच्या नियमाविरुद्ध नाही. लग्नही पार पडेल आणि तुम्हाला त्यामुळें आनंद होईल."

"असं आहे होय? हो, तुम्ही बरोबर बोललात. मी आत्ता आलो." असं म्हणून वल्लभ तिथून निसटला.

आनंद पडेल चेहऱ्याने उभा होता. त्याला विनोद म्हणाला, "अरे, त्याच्यापासून तुझी सुटका करण्यासाठीं मी हे नाटक रचले. आता तो तुझ्यापासून मैलभर दूर राहील. मीच वरपक्षावर हा दोष थोपला होता. घाबरुं नकोस. त्यांनी कांहीच मागितलेलं नाही."

त्यानंतर लग्न समारंभ आनंदात पार पडला. तेव्हांपासून वल्लभ कधी आनंदला भेटायला आला नाही. त्याशिवाय 'मी तुम्हाला मदत करुं शकलो नाही' असं म्हणून इतरांना खिजवण्याची जी खोड वल्लभला जडली होती, तीही सुटली.





भारतीय दंतकथा - १३

# चोरापासून सुटका नाही



महान संतकवी तुलसीदास यांचा वाराणसीमधें एक लहान आश्रम होता. त्याचे कांही एकनिष्ठ सेवक फक्त त्याच्याजवळ राहात होते. तुलसीदासाचा बहुतेक सारा वेळ श्रीरामचरितमानस या अमर महाकाव्याचे लेखन करण्यांतच जात होता. त्याचे काव्य सुमधुर होते. काव्य लिहीत असताना तो त्या ओळी हळू आवाजांत गात असे. जो कुणी त्या मोहक स्वरांतल्या पंक्ती ऐकत बसे, तो तिथून उठतच नसे. त्याच्या मातीच्या झोंपडीबाहेर अनेक भक्तगण अनेक प्रहर झाले तरी ऐकतच बसत.

तुलसीदासाच्या आश्रमापासून कांही अंतरावरच तिमा हा चोर राहात होता. नगराच्या शिपायांनी त्याला त्याच्या गुन्ह्याबद्दल अनेकवेळां पकडून बंदीवासांत टाकले होते. पण एकदा तो बंदीशाळेंतून बाहेर पडला कीं त्याचा हा वाईट धंदा तो पुन्हां चालू करीत असे.

तुलसीदासाच्या आश्रमाचे प्रवेशद्वार रात्रंदिवस उघडेच असे. त्याचप्रमाणें आश्रमाच्या दालनांचे, घरांचे दरवाजेही उघडे असत. त्याची उत्सुकता त्याला स्वस्थ बसूं देईना. एकदा कांही भक्तांचा एक समूह आश्रमांत दर्शनासाठी जात होता; तिमा त्यांच्यापाठोपाठ आंत शिरला. त्या भक्तांपैकीं कांहीजण व्यापारी होते व ते खरेदीसाठीं या नगरींत आले होते. पण ते जेव्हां आश्रमांत विश्राम करण्यासाठीं थांबले, तेव्हां तुलसीदासाचे मनभावन गायन ऐकून ते इतके लुब्ध झाले कीं त्यांना त्यांच्या सामानाची आठवण राहिली नाही. तुलसीदासाच्या झोंपडीतच एका कोंपऱ्यांत त्यांनी आपल्या थैल्यांची गांठोडी ठेवली आणि ते तुलसीदासाचे पठण ऐकत बसले.

तिमा त्यांच्या पाठीमागेंच बसला होता, पण, त्याचे डोळे मात्र त्या व्यापाऱ्यांच्या गांठोड्यांवर



रोखलेले होते. पण त्याचे मनही तुलसीदासाच्या काव्यामधें केव्हां नि कसे गुंतले गेले हे त्यालाही समजले नाही. त्यानी म्हटलेली कवने इतकी सुंदर नि चित्तवेधक होती कीं थोड्याच वेळांत आपण आश्रमांत कोणत्या हेतूने आलो हेदेखील तिमा विसरला.

दुसऱ्या दिवशी पुन्हां तो आश्रमांत आला आणि नंतर तर रोजच येऊं लागला, व आश्रमांत राहाणाऱ्या तापसांच्या परिचयाचा झाला. त्या आश्रमवासीयांचा समज झाला कीं हाही तुलसीदासाप्रमाणे श्रीरामाचा निष्ठावान भक्त आहे, व तुलसीदासाचे काव्य ऐकणारा एक रसिक श्रोता! पण तिमा मात्र कांहीतरी चांगला डल्ला मिळेल म्हणून योग्य संधीची वाट पाहात होता.

एके दिवशी, जवळच्याच सारनाथ गांवातला एक शेट तुलसीदासांकडे आला. त्याला पाहून तिमाला फारच आनंद झाला. आश्रमांतल्या इतर सेवकांच्या बोलण्यावरुन तिमाला समजलं कीं शेटजी कांहीतरी मूल्यवान खरेदी करायला तिथें आले होते. पण त्या रात्रीं शिवमंदिरात मोठा उत्सव होता. तो पाहून रात्रीं आश्रमांत ते मुक्काम करणार होते.

तिमासाठी ही नामी संधी होती. पूर्वी एकदा याच शेटजींच्या हवेलींत चोरी करीत असताना शेटजींच्या नोकरांनी तिमाला पकडला होता. भरपूर मार खाऊनच तिमा परत आला होता. शेटजींनी कांही तिमाला ओळखले नसते. तेव्हां शेटजींचे सामान त्याला रात्रीं गुपचूप पळवता आले असते.

शेटजींच्याबरोबर आश्रमांत राहणारे सगळेच सेवक व भक्त रात्रीं शिवमंदिरात जायला निघाले. आश्रमांत फक्त तिमा आणि तुलसीदास असे दोघेच उरले. तिमाला आपले भाग्यच फळफळले असे वाटले. पण कुणालाही आपल्याबद्दल संशय येऊं नये म्हणून तो कवींच्या झोंपडीसमोर उभा राहिला. त्याच्याकडे पाहून तुलसीदासांनी मंदस्मित केले व त्याला विचारले, "तुला कांही मला सांगायचे आहे कां?"

"नाही, गुरुजी, मी आता घरी जाईन असं म्हणतोय. पण आश्रमांत कुणीच नाही. आपण एकटे आहात." तिमाने चांचरत सांगितले.

"कोण म्हणतोय आश्रमांत कुणीही नाही? तू चिंता करुं नकोस, तू जाऊं शकतोस बाळा!"

"गुरुजी, मी खरंच सांगतोय, आश्रमांत खरोखरच इतर कुणीही नाही आणि सारी दारें अगदी सताड उघडी आहेत." तिमाने ठासून सांगितले.

"कोण म्हणतोय सगळी दारें अगदीं सताड उघडी आहेत म्हणून?" असं म्हणून कवीश्वर पुन्हां काव्याचे लेखन करण्यांत गुंग झाले.



क्षणभर तिमाला मौज वाटली. ती चांदणी रात्र होती. तिमाने हळूंच शेटजींची थैली उचलली आणि तो एका दारांतून बाहेर जाण्यास निघाला.

पण समोरच त्याच्या दृष्टीस काय पडले? तिथें कुणीतरी धनुष्यबाण घेऊन दारासमोर फिरत होते. बहुतेक मंदिरांतल्या उत्सवांतला एखादा नट आपले काम संपवून त्याच वेषांत परत आला असावा व आपल्या सहकाऱ्यांची वाट बघत असावा असे तिमाला वाटले. तिमा दुसऱ्या दाराकडे वळला. तिथेंही तोच पहारा! तो तरुण नट वा पहारेकरी इतक्या डौलांत हळू हळू पाय उचलत होता कीं ते पाहून आगळेच समाधान वाटत होते. तिमाची नजर त्याच्यावर खिळून राहिली. परंतु शेटजी व इतर आश्रमांतली मंडळी परत येण्यापूर्वी त्याला तिथून पिशवी घेऊन पसार व्हायचे होते.

तो तिसऱ्या दाराकडे गेला. पण हा हुशार संरक्षक तिमाचा पवित्रा ओळखून असावा. तिथेंही तो बाहेर उभा होताच. हरकत नाही. चौथ्या बाजूलाही दार आहे, तिमाच्या मनांत आले. तो घाईघाईने तिकडे गेला. तर काय; ती झगमगीत आकृती तिथेंही उभी राहून राखण करीत होतीच.

"तुला काय झालंय? तू प्रत्येक दारापाशीं जाऊन परत कां फिरतो आहेस रे?" तुलसीदासांनी त्याला प्रेमाने विचारले. तिमाच्या अंगावरुन जणूं जादूचे मोरपीसच फिरले! तो बेशुद्ध होऊन धाडकन खाली पडला. तुलसीदासांनी त्याच्यावर पाणी शिंपडले आणि थोड्याच वेळांत तो शुद्धीवर आला.

"गुरुजी, मी कुणाला पाहिलं होतं? तुमच्या आश्रमाचं रक्षण करणारा हा कोण विचित्र शस्त्रधारी होता?"

"विचित्र कसला रे बाळा? तो तर तुझ्यानिकट आहे - तुझ्या मनांतच बसलेला आहे रे तो! तो प्रभुरामचंद्र नव्हे कां?"

तिमा आनंदाने किंचाळला व तुलसीदासाच्या पायांवर त्याने लोटांगण घातले. "मला क्षमा करा, गुरुदेव, या पाप्याला क्षमा करा हो!" आणि तो ढसाढसा रडायला लागला.

त्याचे सांत्वन करीत व तुलसीदास म्हणाले, "अरे माझ्या बाळा, तू आता कुणी दुराचारी, पापी राहिलेला नाहीस. तू तर अत्यंत भाग्यवान लोकांपैकीं एक आहेस. तुला तर प्रभु रामचंद्राचे प्रत्यक्ष दर्शन झाले आहे!!"

त्यानंतर तिमा आश्रमांतच राहिला आणि तुलसीदासांचा आजन्म एकनिष्ठ सेवक बनला.





# तृप्ती

भर दुपारची वेळ नदीच्या किनाऱ्यावर एका झाडाच्या छायेत स्वामीजी ध्यानमग्न होते. त्यावेळीं तिथें एक गरीब तरुण आला. तो फार चिंताग्रस्त वाटत होता.

स्वामीजींच्या ध्यानांत विघ्न आणता कामा नये या भावनेने तो त्यांच्यासमोर गुडघे टेकून थोडा वेळ बसून राहिला. परंतु स्वामीजी कांही डोळे उघडेनात. आणखी जरा वेळ वाट बघून त्याने हळूंच हांक मारली, "स्वामीजी!"

स्वामीजींनी डोळे उघडले आणि तरुणाला न्याहाळून त्यांनी विचारले, "बोल पुत्रा, तुला कसली चिंता आहे?"

"स्वामीजी, माझं नांव धनदास आहे. पण माझ्यापाशीं एक फुटकी कवडीदेखील नाही. गोळाभर अन्नासाठी मला दिवसभर वणवण करावी लागते. माझ्याजवळ धनसंपत्ती कां नसावी? मला तर वाटतं कीं या असल्या दारिद्र्यापेक्षां मरण केव्हांही जास्त चांगले!" उसासा टाकीत तो तरुण म्हणाला.

"तुझं नांव आहे धनदास आणि ते अगदी छान आहे कीं! तुझी काळजी मी सोडवीन. इथें नव्हे, दुसरीकडे! तू माझ्याबरोबर आत्ता चल!" स्वामीजींनी म्हटलं. आणि स्वामीजी व त्यांच्या पाठीमागून धनदास असे तिथून चालत निघाले.

थोडा वेळ चालल्यानंतर ते दोघेजण एका मोठ्या वाड्यापाशी पोंचले. तिथें विवाहाची जेवणावळ चालली होती. त्या घराचा मालक श्रीमंत होता. स्वामीजींना पाहून त्या मालकाने त्यांना नमस्कार केला व आदरपूर्वक आंत नेले. धनदासदेखील त्यांच्या पाठोपाठ आंत गेला.

"स्वामीजी, मी आपला सेवक आहे. आपल्याला जे हवं असेल ते सांगावं. लागलीच आपल्याला वायची व्यवस्था होईल." त्या धनिकाने नम्रतापूर्वक सांगितले.

"ठीक आहे. तू तुझ्या गडबडींत आहेस. मला जे हवे आहे ते मी नोकरांकडून अवश्य मागून घेईन." स्वामीजींनी सांगितले. धनदासला घेऊन स्वामीजी स्वयंपाक घरांत गेले. तिथें भल्या मोठ्या पातेल्यांतून पदार्थ शिजत ठेवलेले होते. अनेक पक्वान्नांनी भरलेल्या पराती होत्या.

धनदासने एक मोठा थाळा घेतला. त्यांत मेवामिठाई व पदार्थ भरले आणि तो बकाबका खाऊ लागला. घटकाभर तो जेवत होता. त्याचे पोट तुडुंब भरले होते. त्याला जास्ती जेवण जाईना.

स्वामीजींनी त्याला प्रेमाने म्हटले, "अरे, थांबलास कां? जेव ना, अगदी पाहिजे तितकं खा!"

"माझ्याच्यानी आता खाववत नाही स्वामीजी. मी इतके जेवलोय. तेच खूप झालंय!" धनदासने दमल्याभागल्या स्वरांत म्हटले.

"अरे, असं काय करतो आहेस? इथें पक्वान्नांच्या राशी लागल्या आहेत. असं भोजन कांही रोज मिळत नाही. याच्यापेक्षां तुला आणखी कांहीतरी हवंय कां? खा, अगदी पोट भर खा!" स्वामीजी त्याला म्हणाले.

"क्षमा करा स्वामीजी, पुष्कळ दिवस खाता येईल इतकं अन्न मी एकाच वेळीं कसं खाऊं? ते कसं शक्य आहे? एका दिवशी जेवढं खायला हवं. ते त्याच दिवशी थोडं थोडं करत सगळं खाता येतं." धनदास त्यांना म्हणाला.

"तू अगदी योग्य सांगितलंस. पण मग धनाच्या बाबतींत तुझा तसा विचार कां होत नाही? तुला धनाचा दास म्हणवून घेणं आवडतं, पण धनाचा मालक म्हणवून घेणं आवडत नाही कां? जमेल तितकी मेहनत करुन कष्ट करुन कमाई सांठवायला नको कां? माणसांत हांव नसावी. अपेक्षांची पूर्ती झाली नाही तर माणूस अशांत, अतृप्त राहातो. त्याला नीट झोंप लागत नाही. जीवन असह्य होतं. ज्याच्या जीवनांत शांती नसते, तो माणूस जगण्यास लायक राहात नाही मनुष्याला आयुष्यांत हवं असतं समाधान, तृप्ती!" स्वामीजींनी त्याला समजावलं.

"स्वामीजी, माझी समस्या कशी सोडवायची त्याचा मार्ग मला आता मिळाला."

असं म्हणून धनदासने वाकून त्यांचे पाय धरले, व त्यांना वंदन केले आणि नंतर तो तिथून चालता झाला.

गोपीनाथ



# भारताची ओळख







१. स्वातंत्र्यापूर्वी ब्रिटिश सरकारची उन्हाळ्याची राजधानी कोणती होती?
अ. श्रीनगर ब. शिमला
क. डेहराडून ड. डलहौसी

२. खाली दिलेल्या नद्यांपैकी कोणत्या नदीच्या सालेरी, प्राणहिता व इंद्रावती या उपनद्या आहेत?
अ. कृष्णा ब. गोदावरी
क. कावेरी सावरमती.



३. या चित्रांत काय विचित्र आहे?



४. हा पूल ओळखता येतोय कां? हा कुठे आहे आणि कोणत्या नदीवर आहे?

५. पंजाब व हरियाणा यांची एकच राजधानी आहे. चंडीगडपूर्वी पंजाबची राजधानी कोणती होती?
अ. जालंदर ब. लुधियाना
क. अमृतसर ड. शिमला

६. जर बंगलोर ही भारताची सिलीकॉन व्हॅली आहे, तर भारताची पोलादी नगरी कोणती आहे?
अ. सेलम ब. राऊरकेला
क. जमशेदपूर ड. भिलाई

## एप्रिलमधल्या कोड्याची उत्तरें

१. डॉ. होमी भाभा
२. १९६४, देविकाराणी रोअरिच
३. डॉ. एस्. झेड. कासीम
४. २१ अंध गिर्यारोहकांची ही पहिली तुकडी होती. त्यांना गिर्यारोहणाचे प्रशिक्षण हिमालयन इन्स्टिट्यूट ऑफ माऊंटनियरिंग या संस्थेत दिले गेले.
५. यासीम मर्चंट
६. डॉ. सलीम अली; रोम्युलस व्हिटेकर
७. एप्रिल १, १९५७
८. तेनसिंग नोर्के व सर एडमंड हिलरी यांनी एव्हरेस्ट वर चढाई केली.
९. परम वीर चक्र
१०. विजय अमृतराज.





# गणेश पुराण

वातापि गणपतीच्या मूर्तीत कोरलेल्या निरनिराळ्या देवतांचे गायन ऐकून अगस्त्य त्यांत तन्मय झाले व म्हणाले - "हे वातापि गणपती! तूच स्वतःच्या मूर्तीतले शिल्प कोरून काढलंस! इतकं सुंदर शिल्प आणखी कोणाला साध्य होईल?"

तेव्हां मूर्तीतून गणनायक म्हणाला - "अगस्त्य महर्षी! मी स्वतःसाठी हे शिल्प कलेचे काम केले नाही. तुझ्या मनाचं समाधान व्हावं, तुझी इच्छा पूर्ण व्हावी यासाठी केलं. ह्यांत जे कलाकौशल्य आहे हे कांही काळच राहील. त्यानंतर ते अदृश्य होईल. द्वापार युगांत धर्मराज युधिष्ठिर अश्वमेध यज्ञ करील. त्या वेळी याच जागी आणखी एका विशाल मूर्तीची स्थापना होईल." असे सांगून धौम्य ऋषी अर्जुनाला म्हणाले - "अर्जुना! तेच हे शिल्प आपण आज पहात आहो!" असे सांगून धौम्य ऋषी थांबले.

अर्जुनाने त्या मूर्तीला प्रदक्षिणा घातल्या, व भक्तीपूर्वक ती मूर्ती लक्ष देऊन पाहिली. ते महाशिल्प गणेशाचेच होते. त्या गणनायकाच्या बरोबरच ब्रह्मदेव, विष्णू व महेश या त्रिमूर्ती, जगदंबा, लक्ष्मी, पार्वती व सरस्वती आणि नवग्रहांपासून इतर सर्व देवीदेवता कोरलेल्या होत्या. गणेशमूर्तीच्या दोन्ही पायाजवळ विघ्न बांधलेले होते. मूषकराजाची शेपटी मूर्तीच्या चारी बाजूला वलयासारखी होती. त्या गणेशाची शोभा पाहाण्यास सहस्रावधी डोळेसुद्धा अपुरे पडतील असे वाटत होते. सर्व बाजूंनी पाहून झाल्यावर अर्जुन धौम्य ऋषींना म्हणाला - "मुनीश्वरा! अशा सुंदर गणेश मूर्तीच्या चारी बाजूला एक मोठे नगर वसले आणि त्याची भरभराट झाली. मग अशी दशा आता कां व्हावी?



वातापि नगराची गाथा ऐकावी, असे कुतूहल मनांत आहे!"

धौम्य मुनी वातापि नगराची कथा त्यांना सांगू लागले:

अगस्त्य ऋषींनी लोपामुद्रेच्या इच्छेप्रमाणे कांही एक बांचविण्याचा विचार मनांत आणू न देतां जवळ असलेले सर्व धन वांटून टाकले आणि एका लोकसत्ताक राज्याची स्थापना केली. नंतर "नागरिक कर्तव्यकर्माचे पालन करीत रहा" असे नागरिकांना सांगून अंगावरच्या वस्त्रानिशी ते लोपामुद्रेला बरोबर घेऊन आपल्या आश्रमांत परतले.

गणनायकाचे कलाकौशल्य हे प्रजेला प्रेरणा देत राहिले. त्या मूर्तीची श्रद्धा भक्तिपूर्वक आराधना करीत प्रजा चिरकाल त्या नगरात सुखासमाधानाने राहिली. कित्येक पिढ्या अशा परिस्थितीत राहिल्या. वातापि नगर हे आदर्श राज्य म्हणून जवळपासच्या राज्यांना मार्गदर्शन करीत राहिले, व देशभर या शहराला प्रसिद्धी मिळाली.

अगस्त्य मुनी आपला वध करतील या भीतीने इल्वल विन्ध्य पर्वतात पळून गेला होता, आणि कोणाला कळणार नाही किंवा संशयही येणार नाही, अशा कानाकोपऱ्यांतल्या जागी स्वत:चा जीव मुठीत घेऊन रहात होता. त्याने वातापि नगराची भरभराट झाल्याचे ऐकले व तेथे अगस्त्य ऋषी रहात नाही या गोष्टीची खात्री करून घेतल्यावर पुन्हां आपला धंदा सुरू करावयाचे ठरवून, परमार्थ साधणाऱ्या साधुपुरुषाचे सोंग करून, वातापि नगरात तो परत येऊन राहू लागला. त्यावेळची नगरांतील परिस्थिति इल्वलला अनुकूल अशीच होती.

हळूंहळू काळ लोटत गेला तशी वातापि नगरातील प्रजेच्या मनांत स्वार्थबुद्धी उत्पन्न होऊन वाढूं लागली. प्रजेचे परस्परांमधील मतभेद वाढत गेले. स्वार्थी व हुषार नागरिक भोळ्या-भावड्या प्रजेला फसवून लुबाडू लागले.

अशा तऱ्हेने वातापि नगर पतनावस्थेकडे झपाट्याने जाऊ लागले. इल्वलच प्रजेचा एक नेता म्हणून वावरूं लागला. इंद्रजाल करून तो एक महापुरुष असल्यासारखा वागू लागला व प्रजेच्या मनावर त्याचा ताबा कायम झाला.

नगराच्या मध्यभागी गणपतीची सुंदर मूर्ती असेपर्यंत, व अगस्त्य मुनींनी घालून दिलेल्या कर्तव्यबुद्धीचा प्रजेच्या मनावर पगडा असेपर्यंत, प्रजा अगस्त्याने घालून दिलेले नीतिधर्माचे नियम मोडणार नाही, हे इल्वलने ओळखले. म्हणून त्याने तांत्रिक विद्या व मद्यपान आदि गोष्टींची चटक प्रजेला लावली. लोकसत्ताक राज्याला आवश्यक अशा नीतिनियमांचे फलक अगस्त्य ऋषींनी जागोजागी लावले होते. ते इल्वलने काढून टाकले, व नवे नियम घालून दिले. चोरी, लबाडी इत्यादीत मिळणारा आनंद प्रजेच्या मनांत उत्पन्न होईल, या दृष्टीने करावयाचे ते सर्व त्याने केले. शांतपणे एका जागी बसून राहणे हे चांगले लक्षण नसल्याचे प्रजेच्या मनावर बिंबविले. सुखप्राप्ती, भोगविलास व चैन हे मानव जीवनाचे ध्येय असल्याचे मनावर कोरले जाऊं लागले. नंतर कांही राक्षस वेष पालटून गांवात येऊन राहू लागले व इल्वलला मदत करू लागले. प्रजासेवकाचे सोंग घेऊन, प्रजेचा पुढारी म्हणून, इल्वल प्रसिद्ध झाला. प्रजेची आपसांत भांडणे व मारामाऱ्या सुरू झाल्या. वातापि नगरात यादवीच माजली. नीतिवान व निरुपद्रवी प्रजा वातापि नगर सोडून जाऊ लागली.

वातापि नगराच्या मध्यभागी गणपतीची मूर्ती होती ती जमिनदोस्त करण्याच्या प्रयत्नाला इल्वल लागला. त्याने शतघ्नी चारी बाजूला गणपतीच्या रोखाने उभ्या केल्या. शिल्पाच्या खाली बुडाजवळ स्फोट होणारा दारुगोळा घातला. फक्त अग्नी लावायचा उरला होता. अशा वेळी अनपेक्षितपणे घडले ते असे, ठिणगी न लागतांच असा बार उडाला की त्याच्या धक्क्याने शतघ्नी इकडच्या तिकडे व तिकडच्या इकडे झाल्या आणि उलटे गोळे आपोआप उडूं लागले. त्यामुळे जितके दुष्ट होते ते सर्व जागच्या जागी ठार झाले. कित्येक विकलांग झाले. त्यांत इल्वलसुद्धा होता. त्याचा एक पाय व एक हात गेला. तो रक्तबंबाळ



होऊन लोळत असता त्याला मूर्तीतून हे शब्द ऐकू आले.

"अरे इल्वला! या विकलांग स्थितीत म्हातारपणी कुजत, रडत, कुंथत, चिरकाल जग! हीच तुला योग्य शिक्षा आहे!" गणपतीने या शब्दांत त्याला शाप दिला.

वातापि नगराचं सर्व वैभव नष्ट झाले. अद्यापि कांही लोक राहतात. परंतु हे नगर एक ओसाड पडलेले पडके व जुनाट शहर झाले आहे." धौम्य मुनींनी या शब्दांत वातापि नगराचे पूर्ववृत्त सांगितले. अर्जुन आश्चर्यचकित होऊन गप्प राहिला. त्याला गणपतीचे ते अपूर्व कलाकौशल्य दिसले नाही.

"अर्जुना! यांत आश्चर्य करण्यासारखं कांहीच नाही! ते कलाकौशल्य नष्ट झाले हे मी पूर्वीच सांगितले नाही का?" असे धौम्य ऋषी म्हणत असतां जवळच्याच एका कांटेरी झुडपांत



एक विकृत रूप असलेला म्हातारा एका हाताने व एका पायाने शरीर फरफटत ओढीत येत मोठ्याने ओरडला. ते अपूर्व कलाकौशल्य होते त्या बाजूला हात करून नमस्कार करीत तो तडफडत तत्काल मरण पावला.

अर्जुनाने त्याच्याकडे पाहून विचारले - ''गुरुदेव! तोच नाही कां हो इल्वल?''

धौम्य म्हणाले - ''होय, दुष्ट क्रूर माणसांचा असाच शेवट होतो.''

अर्जुनाने दूत पाठवून वातापि नगरास येण्याविषयी धर्मराजाकडे निरोप पाठविला.

हस्तिनापुराहून धर्मराज, भीम, नकुल, सहदेव यांच्यासह वातापि नगरी आला.

त्या दिवशी रात्री धर्मराज, गणपतीचे कलाकौशल्य अंतर्धान पावले त्या दिशेला तोंड करून बसला आणि म्हणाला - ''देवा, माझ्या धाकट्या भावाने तुझे अपूर्व रूप पाहिले, मला ते भाग्य मिळणार नाही का? तुझे महाशिल्प आणखी कोणाला साधणार? लवकरच तुझ्या मूर्तीची प्रतिष्ठा करण्याचे भाग्य मला लाभेल असे कर!'' असे म्हणत डोळे मिटून गणपतीचे ध्यान धरून धर्मराजाने प्रार्थना केली.

तेव्हां त्याच्या कानावर हे शब्द पडले - ''धर्मपुत्रा! देवांचा शिल्पकार विश्वकर्मा व दानवांचा शिल्पकार मयासुर हे दोघे मिळून ही मूर्ती कोरतील. मूर्तीची प्रतिष्ठा झाल्याबरोबर तुझा यज्ञाचा घोडा जागचा हालेल आणि पुढे जाईल. तुझा अश्वमेध यज्ञ पूर्ण होईल. वातापि नगराचा पुनरुद्धार कर! तुमच्या पांडवकुलात जन्मास आलेले वंशज चंद्रवंश नामे या नगरींत राज्य करतील!''

धर्मराजाने डोळे उघडतांच त्याला समोर गणपतीचे अपूर्व कलाकौशल्य दृष्टीस पडले, व तत्क्षणी अंतर्धान पावले.

दुसऱ्या दिवशी उजाडतांच एक गोरीपान व एक काळीकुट्ट व्यक्ती त्या जवळच्या झाडाझुडपांत एका स्फटिक शिळेकडे लक्षपूर्वक पहात असलेल्या दिसल्या. ते कोण हे धर्मराजाने ओळखले व त्यांना नमस्कार करून त्यांचा यथोचित सत्कार केला.

ती शिळा जमिनीतून खणून काढीत असतां एक अपूर्व सांठा सापडला. तो इल्वलने आणून पुरून ठेवलेला सोन्याचा सांठा होता. त्याच दगडाजवळ तो मरण समयी खितपत पडला होता. ते सर्व धन खर्च करून धर्मराजाने वातापि नगराचा पुनरुद्धार केला.

त्या दोघां महाशिल्पकारांच्या हस्ते, त्याच जागी एक विशाल देवालय आणि एक मोठा सभामंडप तयार झाला. विश्वकर्मा व मयासुर दोघांनी मिळून जो अद्भुत शिल्पाचा प्रारम्भ केला तो पुढे नवीन शिल्पकलेचा संप्रदाय म्हणून प्रसिद्ध झाला. भरतवंशीयांकडून या शिल्पकलेचे भरणपोषण होत राहल्याने त्याला भारतीय शिल्प हे नांव प्राप्त झाले आणि प्रख्याती मिळाली. काम पुरे होतांच दोघे शिल्पकार जसे आले तसे अंतर्धान पावले.

देवालयांत गणपतीची प्राणप्रतिष्ठा धर्मराजाच्या हातून संपताच घोडा हलला, व जोराने पळू लागला. अर्जुन व भीम सैन्यानिशी त्याच्या पाठोपाठ निघाले.

धर्मराजाने वातापि नगरांत अगस्त्य मुनींनी स्थापिलेली लोकसत्ताक राजवट सुरू करून ती कायम व स्थिर राहील, अशी व्यवस्था केली आणि नकुल व सहदेव यांच्यासह तो हस्तिनापुराला गेला.

लोकसत्तेचे अर्थसूचक पर्यायवाचक नाम म्हणून, व तेथील विशिष्ट पद्धत म्हणत त्या राज्यव्यवस्थेला अगस्त्य राज्य, नगराला अगस्त्य नगर, हेच नांव कांही काळ चालू राहिले. परंतु पुढे वातापि नगर याच नांवाने त्या नगराची ख्याती झाली.

अर्जुनाने दिग्विजय समाप्त केला व हस्तिनापुरास परतला. अश्वमेध यज्ञ झाला. धर्मराजाने यज्ञभाग विशेषकरून विश्वकर्म्याला व मयासुराला अर्पण केला. शिल्पकारांचा व त्यांच्या शिल्पाचा यथायोग्य गौरव केला.

धर्मराजानंतर परीक्षिताने व त्याच्या नंतर जनमेजयाने राज्य केले. जनमेजय व त्याचे वारस वातापि नगराची राज्यव्यवस्था यथाप्रकारे पहात राहिले.

वातापि नगरावर राज्य करणाऱ्या चंद्रवंशीय राजांपैकी शत्रुंजय हा साम्राज्य स्थापनेची



महत्वाकांक्षा असलेला एक राजा होता; त्याने वातापि नगराला आपली राजधानी करून एक विशाल साम्राज्याची स्थापना केली. त्याने प्रजेवर कराचा बोजा वाढविला. आपल्या निरंकुश राजवटीमुळे लोक त्याला दुसरा इल्वल जन्मला, असे म्हणू लागले.

त्याच्या मुलांपैकी शेवटचा चळुक वर्मा हा होता. तो फार गुणी होता. अगस्त्यांनी घालून दिलेले लोकसत्ताक राज्याचे नियम त्याला मान्य होते. तो गणपतीची श्रद्धाभक्तिपूर्वक आराधना करी. विद्या आणि कलेची त्याला आवड होती. त्याच्यात अगस्त्यांचा अंश आहे, असे प्रजेला वाटे. इतका तो प्रजेवर प्रेम करी.

साम्राज्यविस्तार करण्याच्या हेतूने त्याने आपल्या सर्व मुलांना बोलावून त्यांच्यावर कांही जबाबदाऱ्या टाकल्या. चळुक आपल्या वडिलांना म्हणाला - ''परपीडन आणि हिंसा करून मिळविलेला साम्राज्यविस्तार कसाईवृत्तीपेक्षा कसा मोठा होऊ शकेल?'' असे सांगून त्याने आपल्या भावांची मने साम्राज्य विस्ताराविरुद्ध बळविली व स्वाऱ्या करायला जाण्याचे नाकारले.

शत्रुंजय संतापला. म्हणाला - ''कायरे, सिंहाच्या पोटी उंदीर जन्मावा, तसा तू राजवंशात चुकून जन्मलास! तुला योग्य शिक्षा मिळेल!'' त्याने एक उंदिर धरून आणून त्याचे नांव चळुका असे ठेवले व त्याच्याशी चळुकवर्माचे लग्न होणार असल्याचे जाहीर केले.

चळुका उंदराचे खरे नांव कल्याण किंकिणी असे होते. इंद्राच्या शापाने ती अप्सरा उंदीर होऊन जन्मली. बोहोल्यावर चढल्यानंतर पाटांवर राजकुमाराला व वधु स्थानी उंदराला पाहून पाहुणे मंडळी हंसतील व त्यामुळे चळुकवर्माची मान खाली होईल या विचाराने शत्रुंजयने तो विचित्र विवाह समारंभ मांडला होता. परंतु चळुक वर्मा हंसत म्हणाला - ''उंदराला महाराजांची सून करण्याची शक्ति त्या विघ्नेश्वरांत आहे. तर उंदराला एक सुंदर तरुणी करण्याची शक्तीही त्याच्यांत आहे, असे मी म्हटलं, तर तुम्हां सर्वांना खरं वाटणार नाही. तरी माझा त्यावर विश्वास आहे!''





# तांब्याची नाणींवाला

वामनापूरमधें पर्वत व प्रताप हे दोघे शेजारी होते. पर्वत असमाधानी होता व त्याला पैशाचा लोभ होता. त्याने पुष्कळ पैसा मिळवला होता, तरीदेखील जास्त कमावण्याची त्याची तीव्र इच्छा होती. आणखी जास्त पैसे मिळवण्यासाठी तो बाहेरगांवीं जायला निघाला. त्याने सोबत प्रतापलाही बोलावून घेतले.

प्रतापच्या स्वभावांत हांव कमी व संतोष जास्त होता. तो आपल्या गांवात राहून आनंदाने गुजराण करीत होता. पण त्याला पर्वतचा विरस करायचा नव्हता. नाईलाजाने तो पर्वतबरोबर प्रवासाला निघाला.

दोघेही पायीं चालत निघाले. थोड्या अंतरावर रस्त्यांत त्यांनी बेशुद्ध पडलेला एक बैरागी पाहिला. पर्वतच्या मनांत आलं, ''याच्याशी आपला काय संबंध? विनाकारण डोकेदुखी व्हायची, याच्यावर इलाज करण्यांत!'' पण प्रतापच मत निराळं होतं. तो जवळच्या तलावाच्या कांठी गेला आणि त्याने ओंजळींत पाणी आणलं. बैराग्याच्या चेहऱ्यावर ते शिंपडलं. बैरागी हळूहळू शुद्धीवर आला. उठून बसल्यानंतर त्याने या दोघांना विचारले, ''तुम्ही मला फार मदत केली आहे. मलाही तुम्हाला मदत करायची इच्छा आहे. मी काय मदत करूं?''

''तू तर बेशुद्ध होऊन पडला होतास. तू काय मोठी मदत करणार आहेस आम्हाला?'' पर्वतने टवाळखोर स्वरांत विचारले.

''माझ्याकडे दोन जादूच्या लहानशा डब्या आहेत. त्यांतली एक आहे ती रोज एक सोन्याची मोहोर देते. दुसऱ्यांतून रोज तांब्याचे एक नाणें मिळते. नियमाप्रमाणे मी यांचा उपयोग करूं शकत नाही. म्हणून ह्या देण्यासाठी मी योग्य व्यक्तींच्या शोधांत आहे. मी बेशुद्ध पडल्याचे नुसते नाटक केले होते. अनेकजणांनी मला इथें असं पडलेलं बघितलं होतं, पण मला मदत करायला त्यांच्यापैकीं कुणीही पुढें आला नाही. फक्त तुम्ही दोघांजणांनी

- महर्षि -









मला मदत केलीत. तुम्हा दोघांपैकीं ज्याने मला जास्त मदत केली आहे, त्याने यांतली एक डबी प्रथम निवडावी. परंतु, एक गोष्ट मात्र अवश्य लक्षांत ठेवा. तुम्ही जितकी मला मदत केलेली आहेत, त्याप्रमाणांतच त्याचं फळ तुम्हाला मिळेल. त्यापेक्षां जास्त मिळणार नाही.'' बैराग्याने सांगितलं.

पर्वतच्या मनांत धाकधूक होती कीं प्रताप सोन्याची मोहोर देणारी डबी प्रथम उचलेल; पण प्रतापने तसे कांहीच केले नाही. प्रताप म्हणाला, ''आपल्याला मदत करणें हा माझा धर्म आहे. कोणते ही फळ मिळावे अशा आशेने मी तसं केलं नव्हतं. तरीही आपण कांहीतरी देऊं इच्छिता आहात. तेव्हां त्याला नकार देणे हेदेखील योग्य नाही. आम्ही या प्रवासाला निघालो, त्याला कारण पर्वत आहे. म्हणून कोणती डबी निवडायची याचा मान प्रथम त्यालाच मिळूं दे.''

त्याचे [illegible] ऐकून पर्वत खुशालला, आणि त्याने रोज सोन्याची मोहोर देणारी डबी निवडली. ती डबी पर्वतच्या हातांत देत बैरागी त्याला म्हणाला, ''प्रताप तझा सहप्रवासी आहे. तुझ्यामुळें त्याचेही भाग्य उजळले आहे. प्रताप खराच सत्पुरुष आहे. त्याची सोबत कधीही सोडूं नकोस.''

प्रताप व पर्वत बैराग्याचे आशिर्वाद घेऊन पुढें निघाले. तोपर्यंत डबींतून मिळालेली एक मोहोर पर्वतकडे आली व प्रतापच्या डबींतून एक तांब्याचे नाणें काढले. दोन दिवस प्रवास केल्यानंतर जेव्हां ते शहरांत पोंचले तेव्हां पर्वतने प्रतापला सांगितलं, ''आता आपण दोघे निरनिराळ्या मार्गानें जाऊं या. माझ्याजवळ भरपूर मोहरा जमतील. त्या सुरक्षित ठेवण्यासाठी एक चांगले घर व राखणदार याची सोय करायला हवी. तू काय तांब्याची नाणीं बाळगणार; तुला कुठेही पथारी पसरता येईल.



तुझ्यावर कांही संकटांशी सामना करण्याची वेळ येणार नाही. मला जसं आयुष्य हवं होतं, तसं मला मिळालंय. तुला जसं हवं होतं, तसं तुला मिळालं!''

अशा रीतीने, दोघांचे मार्ग वेगळे झाले. तीन वर्षे उलटली. पर्वतने एक सुंदर घर बांधले आणि त्यांत तो थाटांत राहूं लागला. परंतु प्रताप मात्र मेहनत करुन आपले पोट भरीत होता. त्याचे दिवस जरा कष्टमय होते. डबींतून जी तांब्याची नाणीं मिळत होती, ती त्याने मोठ्या सावधपणें जमवून एकत्र केली होती. एका थैलींत ती नाणीं ठेवून ती थैली तो कमरेला बांधून ठेवीत असे. दुसऱ्यांना मदत करायला तो कधीं विसरत नसे आणि तीच त्याची इच्छा होती.

प्रतापच्या कमरेला बांधलेली ती थैली लोकांच्या नजरेंत भरत असे. एकदा एका चोराने ती थैली चोरली आणि त्याच्यामधली तांब्याची नाणीं पाहून तो आश्चर्यचकित झाला. त्या तांब्याच्या नाण्यांवर एका बाजूला ब्रम्हा, विष्णू व महेश्वर यांची चित्रें कोरलेली होती व दुसऱ्या बाजूला सरस्वती, लक्ष्मी व पार्वती यांची चित्रें होती. ती सुबक नाणीं पाहून ती मंतरलेली तर नसतील ना, असे त्याला वाटले. त्याच क्षणीं, ती थैली प्रतापला परत देऊन त्या चोराने प्रतापचे पाय धरून माफी मागितली.

तेव्हां प्रताप त्याला म्हणाला, ''परमेश्वराच्या शापाची तुला भिती वाटली, म्हणून तू ही नाणीं मला परत दिलीस, होय ना? अरे, प्रत्येक प्राण्यांत परमेश्वराचा अंश आहे. त्या ईश्वराची पण तुला भिती वाटूं दे. चोरी करायचा धंदा सोडून दे आणि आपल्या मेहनतीच्या कमाईवर संतुष्ट राहा.''

त्या दिवसापासून चोराचे परिवर्तन झाले. पण प्रतापने लोकांना सांगितलं कीं त्याचा उपदेश ऐकून चोराच्यांत परिवर्तन झालेले नसून, त्या तांब्याच्या



हळूंहळूं प्रतापजवळची नाणी जादूची, मंतरलेली आहेत, अशी बातमी पसरत गेली. बरेच लोक त्याच्याकडे येऊन आपल्या अडचणींचाच पाढा वाचायला लागले. प्रतापच्या कमरेला थैली बांधलेली असे. तिला ते स्पर्श करीत व निघून जात. तसं केल्यामुळें त्यांच्या अडचणी निवारण होत होत्या असं लोकांनीच सांगायला सुरवात केली.

प्रतापजवळच्या नाण्यांवरच्या लोकांचा विश्वास वाढत गेला आता आजारी, रोगीदेखील पिशवीला स्पर्श करण्यासाठीं यायला लागले. प्रतापची आर्थिक परिस्थिती सुधारण्यासाठी व त्याची देखभाल करण्यासाठी, बरेच जण पुढें आले, त्यांत कांही धनवंतही होते.

पर्वत हे सगळं ऐकत होता, बघत होता. तांब्याच्या नाण्यांमुळें प्रतापला जी प्रसिद्धी व लोकप्रियता मिळाली, ती पर्वतला मिळूं शकली नव्हती. त्याच्या









एके दिवशी तो प्रतापला भेटायला आला व बोलला, "तुझी तांब्याची नाणीं खरंच मंतरलेली आहेत कीं नाही ते मला माहीत नाही, पण लोक मात्र तसं समजतात. तुला विचारल्याशिवायच तुला भेटवस्तू देत सुटतात, तुझे गोडवे गात बसतात. ज्या दिवशी लोकांना कळेल कीं तुझी नाणीं साधीच आहेत, त्या दिवशी तेच तुझा सर्वनाश करुन टाकतील. त्यापेक्षां तू दुसरीकडे कुठेतरी निघून जा. म्हणजे तिथल्या लोकांना या नाण्यांबद्दल कांहीही माहिती असणार नाही !"

पर्वतचा हा सल्ला ऐकून प्रतापला आनंद झाला. तो म्हणाला, "लोकांनी माझा सर्वनाश केला तरी त्याला मी भीत नाही. मी कष्टाने पैसे मिळवावे व गुजराण करावी हीच माझी एक साधी इच्छा आहे." आणि त्याच रात्रीं प्रतापने ते नगर सोडले, व तो निघून गेला.

आता प्रताप दुसऱ्या राज्यांत राहायला आला होता. तिथला राजा होता अग्निसेन. त्याची पत्नी ज्वालामुखी बऱ्याच दिवसांपासून आजारी होती. तिच्या रोगाचे निदान होत नव्हते आणि अनेक उपचार केले तरी दुखणें कमी होण्याचे चिन्ह दिसत नव्हते. अनेक वैद्य आले नि गेले, पण उपयोग झाला नाही.

जेव्हां बैरागी त्या राज्यांत फिरत फिरत आला, तेव्हां त्याला ही गोष्ट समजली. त्याने राजाची भेट घेऊन सांगितले, "राजन्, मी तुमच्या पत्नीच्या आजाराबद्दल ऐकलंय. हा रोग बरा करण्यासाठीं मी एक उपाय सुचवतो. दिव्य विभूती व त्यांच्या पत्नींची चित्रें ज्या तांब्याच्या नाण्यांवर कोरलेली आहेत, ती नाणीं एका घंगाळात प्रथम ठेवा. नंतर घंगाळ भरेपर्यंत त्यांत पाणी ओता. त्या पाण्याने राणी साहेबांना स्नान घाला. त्या अगदी लवकर बऱ्या होतील. ही नाणीं प्रताप नांवाच्या एका सत्शील व्यक्तीकडे आहेत. तो उद्यांच इथें येईल." असं सांगून बैरागी तिथून निघून गेला.

परंतु रस्त्यांतच बैराग्याला प्रताप दिसला. त्याने [illegible] कारण सांगितले. बैराग्यानेही त्याला महाराणीच्या आजाराबद्दल सांगितले आणि त्यांच्याकडे प्रतापने जावे असा सल्ला दिला.

त्यानुसार प्रताप राजाला भेटायला गेला. बैराग्याने जसं सांगितलं, त्या पद्धतीनुसारच उपाय केला गेला. नंतर त्याने एक चूल पेटवायला सांगितली व त्या डबीसकट ती नाण्यांची थैली त्याने त्या आगींत टाकली. थोड्याच वेळांत राणीच्या प्रकृतिला आराम पडल्याचे जाणवूं लागले. राजा भलताच खूष झाला नि प्रतापला विचारूं लागला, "सांग, तुला काय हवंय? जे तुला हवे असेल ते द्यायला मी तयार आहे."

त्यावर प्रतापने सांगितले, "महाराज, मला मेहनतीच्या कमाईवर जगायचे आहे. दुसरं मला कांहीही नको. या तांब्याच्या नाण्यांमुळेच मला ही संधी मिळत नाही. म्हणून मी ती डबीही चुलींत टाकली."

प्रतापचे हे स्पष्टीकरण ऐकून राजा थक्कच झाला. प्रतापचे दोन्ही हात हातांत घेऊन राजा प्रेमाने म्हणाला, "तुझ्यासारखा परोपकारी, निस्वार्थी, सुशील पुरुष, मी आजपर्यंत कधीही पाहिला नव्हता. तुझ्यासारखा योग्य माणूस जर एखाद्या नगराचा अधिकारी झाला, तर तिथल्या नागरिकांचे जीवनमान सुधारेल. तू ज्या वामनापुरांत राहात होतास, तिथलाच अधिकारी म्हणून मी तुझी नेमणूक करीत आहे."

अशा प्रकारें ज्या नगरांत प्रतापला तांब्याची नाणींवाला म्हणून लोक ओळखत होते, त्याच नगरांत तो अधिकारी बनून आला. त्याने पर्वतला भेटून आपली कृतज्ञता व्यक्त केली. कारण प्रतापला ठाऊक होतं कीं पर्वतच्यामुळेंच त्याचा भाग्योदय झालेला होता.

त्यावर पर्वत प्रतापला म्हणाला, "अरे, मीच तुझ्याशी कृतज्ञ आहे. माझी परिस्थिती सुधारली, त्याला तुझा उदारपणा कारणीभूत आहे, आणि तुझा भाग्योदय झाला, त्याला तुझा सद्गुणी स्वभाव कारणीभूत आहे. पैसे मिळवले कीं सारं कांही मिळवता येतं अशी माझी खुळी समजूत होती. परंतु चांगुलपणाने, परोपकारी बुद्धिमुळेंच खरे समाधान मिळते. आज माझे डोळे उघडले, व माझा गैरसमज दूर झाला. आजपासून मी देखील तुझ्यासारखे आयुष्य जगण्याचा मनोमन प्रयत्न करीन."











# करोडपती

कांचीनगरींत एक वैश्य राहात होता. त्याने व्यापारांत कोट्यवधी रुपये कमावले. नवा कुबेर या नांवाने तो प्रसिद्ध झाला. त्याला बरींच मुलें व मुली होत्या. त्याने जांवयांना पण आपल्या घरींच ठेवलेले होते. त्यांना कामधंदा शिकवला व आपला व्यापार वाढवला. हे सारं कुटुंब मोठ्या थाटांत राहात होतं.

परंतु हाच कुबेर घराच्या बाहेर मात्र अत्यंत लोभी व कृपण होता. देवधर्म, दानधर्मासाठीं, मंदिरांच्या खर्चासाठी त्याने कधी एखादी फुटकी कवडीदेखील खर्च केली नव्हती.

एकदा एक बैरागी कुबेराच्या घरीं आला. त्याने एक वेळचे भोजन द्यावे अशी मागणी केली. पण कुबेर खेकसला, "अरे, जारे आयतोबा चोरा, तू कुठून येऊन इथें टपकलास रे?"

"अहो, जर मी चोर असतो, तर मी भीक कशाला मागितली असती?" बैराग्याने विचारले.

दोघांच्यात थोडा वेळ उलटसुलट बोलणी झाली. आपण उगीचच वेळ वांया घालवतो आहोत असं कुबेरला वाटलं; म्हणून त्याने नोकरांच्या करवी बैराग्याला बाहेर पाठवलं. तरीसुद्धां बैरागी म्हणूं लागला कीं जोपर्यंत त्याला शिधा दिला जात नाही तोपर्यंत तो त्या जागेवरुन हलणार नाही. संध्याकाळ झाली तरी तो घरासमोर बसलेला होता.

"जरी तू इथें मेलास, तरीसुद्धां मी तुला कांहीही देणार नाही. खुशाल बसून राहा." कुबेरने ठणकावलं. तो बैरागीही तीन दिवस नि तीन रात्रीं, त्या घरासमोर बसलेला होता. कुबेरचे कांही नातलग आले नि म्हणाले कीं बैरागी कदाचित शापबीप देईल! पण कुबेर बधला नाही. त्याने घराचे दार बंद करून टाकले, व तो मागील दाराने येजा करुं लागला. कांही दिवसानंतर त्याने पाहिलं तर बैरागी दिसत नव्हता. आपण फार मोठी लढाई जिंकलीय असं कुबेरला वाटलं, आणि आपल्या या विजयाचा त्याला अभिमान वाटायला लागला. आपण चतुरपणें एक ब्याद टाळलीच म्हणायची! पण जेव्हां त्याने दार उघडले तेव्हां बैरागी पुन्हां येऊन तिथें त्रास देऊं लागला.

"[illegible] मला पिडतो आहे. कशाला आलय ते विचारुन ये" कुबेरने एका नोकराला बैराग्याकडे पाठवले.

"मी तुझ्याकडे कांही मागण्यासाठी आलो नाही. मला तुझ्याशी बोलायचंय कांहीतरी!" बैराग्याने उलट उत्तर धाडले.

त्याला कुबेरने उत्तरादाखल निरोप पाठवला कीं तुला भेटण्यासाठी निदान सहा महिने तरी माझ्याकडे वेळ देता येणार नाही. बैरागी निघून गेला व बरोबर सहा महिन्यानंतर आला. कुबेर पुन्हां त्याला टाळूं लागला. जेव्हां बैरागी येई, तेव्हां कुबेर त्याला टोलवत असे. असे वर्षभर चालले. शेवटी कुबेराला वाटलं कीं आता आपण बैराग्याला भेटून त्याचे बोलणे ऐकायला हवे. म्हणून त्याने त्याला बोलावणें पाठवले.

"वर्षभर मी पाहातोय तुला. पत्नी, पुत्र आणि बांधवांच्या मोहपाशांत तू गुंतला आहेस म्हणून तुझ्या डोळ्यांवर मायेची पट्टी बांधलेली आहे. डोळे नीट उघडून खरी गोष्ट काय आहे ती पहा." बैराग्याने म्हटले.

"माझ्या निकटवर्तीयांचा त्याग मी करावा म्हणून कां तू वर्षभर माझ्यामागे लागला आहेस?" कुबेरने विचारले. "त्यांच्यापैकी तुझा खरा निकटवर्तीय एकजणदेखील नाही. जोपर्यंत तू मिळवतो आहेस, तोपर्यंत हे तुझे साथी आहेत. नाहीतर तू जिवंत आहेस कीं नाहीस याची-देखील कुणी चौकशी करणार नाही. वाटल्यास, ही गोष्ट मी तुला सिद्ध करुन दाखवेन." बैरागी म्हणाला.

हे कुबेरला पटले. त्याला एक कानमंत्र देऊन



बैरागी तिथून निघून गेला.

त्यानंतर कांही दिवसांनी कुबेरने आपण आजारी पडल्याचा बहाणा केला. त्याने बायकोला सांगितलं, "मला वाटतंय आता कीं माझे दिवस संपत आलेले आहेत. मी इतकी वर्षं जगलो, पण कधी पुण्य गोळा करण्याचा मार्ग लागली नाही. जर मला आणखी एखादं वर्ष जगता आलं असतं तर किती बरं झालं असतं!" असं म्हणतानाच त्याचा जीव घाबरा झाला. त्याची पत्नीही घाबरली, व तिने वैद्याला बोलवून घेतले. पण तपासणीनंतर कांही रोगाचे निदान होईना. वैद्य निघून गेला. कुबेरने आपला श्वास बैराग्याने सांगितल्याप्रमाणें रोधून धरला होता.

त्याच्या घरांत जवळजवळ दोनशे मंडळींना रोज भोजन मिळत होते. ते सारेजण त्याच्या-








भोवती जमून रडवा चेहरा करून बसले. मृत्यूपासून कुणीही वाचत नाही असंही कुणीतरी बडबडलं.

नेमका त्याच वेळेला तो बैरागी तिथें आला. त्याने एका लोटींत दूध आणलं होतं. सर्वांना गप्प बसायची खूण करीत तो म्हणाला, "जर तुमच्यापैकीं कुणाला मालकांना जगवण्याची इच्छा असेल तर सांगा. माझ्याकडे हे औषध आहे."

कुबेरची पत्नी व मुलाबाळांनी बैराग्याच्या पायांवर लोटांगण घातले व म्हटले, "त्यांना वांचवा! तुम्ही जे मागाल ते आम्ही देऊं. हे औषध देऊन त्यांना जगवा!"

त्यावर बैरागी म्हणाला, "अरे वेड्यांनो, जेव्हां मृत्यू जवळ येतो, तेव्हां कोणतीच औषधी उपयोगी पडत नाही. हे औषध तुमच्यापैकीं कुणीतरी घ्यायचं आहे. जो घेईल तो लगेच मृत्यू पावेल. पण त्याचे उरलेले आयुष्य यांना मिळेल व ते दीर्घायू होतील. जो आपले आयुष्य यांना देण्यास तयार आहे, त्याने येऊन हे औषध प्यावे!"

सगळे स्तब्ध झाले. निमूटपणें एकमेकांकडे बघत बसले. थोडा वेळ वाट पाहून बैरागी म्हणाला, "यांच्यासाठी कुणीही मरायला तयार नाही?" कुणीही उत्तर दिलं नाही.

"अरेरे, आपल्या या परिवाराला सुखांत ठेवण्यासाठी यांनी रात्रंदिवस कष्ट केले. भल्याबुऱ्या मार्गानें पैसे मिळवण्यांत सारं आयुष्य घालवलं. आणि आता जेव्हां परलोकांत जाण्याची वेळ आली तेव्हां पाहावं तर दानधर्म, पुण्यकर्म यांनी कधी केलं नाही आणि आता यांच्यासाठी एकजणदेखील आपले प्राण देण्यास तयार नाही! आश्चर्य आहे." बैरागी म्हणाला.

"महाराज, माझे डोळे उघडले आहेत." असं म्हणून कुबेर उठून बसला. सारेजण चकित होऊन निमूटपणें गप्प बसले.

त्यानंतर कुबेरने आपल्या रिकामटेकड्या नातलगांना निरोप दिला. आपली संपत्ती त्याने गोरगरीबांना मदत, दानधर्म, मोफत शिक्षणसंस्था व रुग्णालये यांच्यासाठी उपयोगांत आणली. आपल्या मुलांच्यावर धंद्याचा व्याप सोंपवला आणि अध्यात्म व सत्य याच्या अभ्यासांत आपले मन गुंतवले.



# चांगला शेजार

हेलापुरीच्या एका बोळकंडीत पुरुषोत्तम व रघुनाथ हे दोघे शेजारी होते. दोघेही सारखेच सधन होते, तरी सुद्धां आपला बडेजाव मिरवण्याची प्रवृत्ती दोघांच्यामधे पुरेपूर भरलेली होती.

दोन्ही घरांमधल्या भिंतीवरुन त्यांच्यामधे सतत भांडणें होत. एकाच्या घराच्या अंगणातल्या झाडाच्या फांद्या दुसऱ्याच्या अंगणात झुकत होत्या व त्याचा पाचोळा पडायचा. लगेच त्याच्या दोघांचा वितंडवाद सुरुं होई. त्यांचे भांडण वाढले कीं त्यांच्या बायकाही त्यांत भाग घेऊं लागत.

ही भांडणें बरीच वाढायला लागली. पण एकानेही मैत्रीसाठी हात पुढें केला नाही, किंवा भांडण मिटवण्यासाठीं प्रयत्न केले नाहीत. त्याच वेळीं दुसऱ्या मोठ्या आळींत एक घर विकायला होते. जेव्हां हे रघुनाथला कळलं, तेव्हां त्याने आपले घर सुगंधीपुरच्या एका गृहस्थाला गुपचूप विकले व ते मोठ्या आळींतले घर विकत घेतले.

जुने घर सोडून जाताना रघुनाथने कुत्सितपणें पुरुषोत्तमला म्हटले, "आम्ही मोठ्या आळींतले एक मोठे घर घेतले आहे. त्याशिवाय, आता तिथें चांगला शेजारही आहे आम्हाला!"

"फक्त तुम्हालाच नव्हे. आम्हीही चांगला शेजार असलेल्या घरांत राहायला जाणार आहोत." पुरुषोत्तम म्हणाला.

"असं कसं होऊं शकेल? मी घेतले ते एकच घर तर या गांवात विकायला होते. ते तर आम्ही घेतलंय. तू गांव सोडून तर कुठे चालला नाहीस ना?" रघुनाथने पुन्हां तिरकस बोलणें सुरुं केले.

"आम्ही कशाला हे गांव सोडून जाऊं? वाडवडिलांच्या या घरांत आम्ही आरामांत राहूं, तेही चांगल्या शेजाराबरोबर. तुझ्याशिवाय जे कुणी येईल तो निश्चितच चांगला शेजारी असेल!!" पुरुषोत्तमने जोराने हंसून प्रत्युत्तर केले.

-आंजनेय





# खरा कुरुप

जगन्नाथपुरींत जगन राहात होता. त्याला वीर व शूर असे दोन मुलगे होते. लहानपणीं उकळते पाणी तोंडावर सांडल्यामुळें वीरच्या चेहऱ्यावरची कातडी जळली होती. आता तोंडावर काळे डाग फक्त दिसत, त्यामुळें तो थोडा कुरुप दिसूं लागला होता. पण त्याचे मन अत्यंत निर्मळ व साफ होते. धाकट्या शूरचा स्वभाव मात्र वीरपेक्षां निराळा होता. त्याला आपल्या सुंदर रुपाचा फारच अभिमान होता.

एके दिवशी जगनने शेतांमधे बकऱ्या नेल्या व एका जागी उभ्या केल्या. उन्हाळ्याचे दिवस होते. झाडांच्या लहान डहाळ्या तोडून, त्यांची पाने काढून, वीर बकऱ्यांना खाऊं घालत होता. शूरदेखील त्याला मदत करुं लागला.

आपले दोन्ही मुलगे उन्हाच्यावेळीं आपल्या कामांत मदत करीत आहेत हे पाहून जगनला फार आनंद झाला. तो म्हणाला, "वीर, बांधावर ताडाची मुळें आहेत बघ; ती उपटून घेऊन ये. आपण ती भाजून खाऊं या."

थोड्याच वेळांत वीरने ताडाची मुळें उपटली व ती तो घेऊन आला. तोपर्यंत शूरने वाळलेल्या ढलप्या एकत्र करुन ती मुळें त्याने भाजायला घेतली. बापलेक एकत्र बसून ती खाणार तोच गांवाचा पुरोहित धनंजयशास्त्री तिथें येऊन पोंचला.

त्याचे स्वागत करीत जगनने प्रेमाने विचारले, "अगदी योग्य वेळेवर आलात. आणखी थोडी मुळें उपटून आणूं कां? घरी नेता येतील ना?"

"हो तर! माझ्या मनांत हाच विचार होता. पण सांगायला संकोच वाटत होता. पण इतक्या कडक उन्हांत मी दुसऱ्याच कामासाठी आलो होतो." शास्त्रीने सांगितलं.

"बोला, शास्त्रीजी, कोणतं काम काढलं आहेत?" जगनने आदराने विचारलं. "जगन, तुला तर माहीत आहेच कीं या गांवाच्या भरंवशावरच माझा चरितार्थ चालतो. मला एक गाय दान मिळाली आहे. पण तिला खाऊं घालायला गवत तर हवेच कीं! तुझा पुरोहित या



नात्याने मी तुझ्या गवताच्या भाऱ्यांतले गवत माझ्या गाईसाठी मागतो आहे.'' शास्त्रीने सांगितलं.

''जे हवं असेल ते मागायचा आपला अधिकार आहेच. गाईची देखभाल करायला जर त्रास पडत असेल तर माझ्याकडे गाय धाडून द्या. माझ्या इतर गुरांप्रमाणेच मी तिची अगदी चांगली काळजी घेईन. गवताचा भारा माझ्या मुलांपैकी एकजण तुमच्या घरीं घेऊन येईल. चलावं, त्या झाडाच्या सावलींत बसून जरा बोलूं या.'' असं म्हणत जगन त्यांना झाडाकडे घेऊन गेला.

तितक्यांत ताडाची मुळें घेऊन शूरही तिथें आला व म्हणाला, ''शास्त्रीबुवा, राग मानूं नका. पण तुम्हाला ठाऊक आहेच कीं मी एक देखणा तरुण आहे. माझं लग्न केव्हांही होईल, कुणीही आपली मुलगी मला अगदी आनंदाने देईल. वीर माझ्यापेक्षां मोठा आहे. मी असं आता म्हणूं नये कीं तो कुरुप आहे, पण माझा नाईलाज आहे! त्याचं लग्न झाल्याशिवाय माझ्या लग्नाचा विचार कुणी करणार नाही. म्हणून तुम्हीच माझ्या भावासाठी एखादं स्थळ सुचवा! मुलगी कशीही असली तरी चालेल.''

शूरचे हे बोलणें ऐकन वीरला फार वाईट वाटले. जगनही मनांतून शूरवर रागावला होता. पण त्याने आपली नाराजी बोलून दाखवली नाही.

ताडाची मुळें उचलत शास्त्रींनी मात्र त्याला फटकारले, ''शूर, काय बोलतो आहेस तू हे? असं बोलणं अगदी चुकीचं आहे. दुसऱ्याचे मन दुखावणें हे पाप आहे. आणि कुरुपतेपेक्षांही जास्त मोठा दोष आहे.'' आणि वीरच्याकडे वळून बघत त्यांनी म्हटले, ''वीर, सौंदर्यापेक्षांही माणसाचा सद्गुण हा फार मोठा अलंकार आहे. तुझ्या चांगल्या स्वभावावर खूष होऊन तुझ्याशी लग्न करायला तयार होईल अशी गुणवती पत्नी तुला मिळेल ही मला खात्री आहे. तू गोविंदपूरला जा आणि तिथे राहाणाऱ्या गोपीला जाऊन भेट. तुझे भलेंच होईल.''

शास्त्रीजींच्या बोलण्यामुळें वीरच्या मनांत कुतूहल निर्माण झाले. कांही दिवसांनंतर तो गोविंदपूरला गेला. गोपीच्या घराचा पत्ता शोधायला त्याला फारसा त्रास झाला नाही. गोपी फुलांचा व्यापारी होता. त्याच्या शेतींत अनेक जातींची रंगीबेरंगी फुलांची झाडे त्याने लावली होती व त्या फुलांचा तो व्यापार करीत राहिला. त्या गांवात त्याने एक छानसे घर बांधले. आपली पत्नी गंगा आणि एक मुलगी ज्योती यांच्याबरोबर तो आरामशीर आयुष्य कंठीत होता.

वीरला पाहून गोपीला वाटले कीं तो फुलें खरेदी करायला आला असावा. पण जेव्हां त्याला खरे



कारण समजले तेव्हां त्याने त्याचे आनंदाने स्वागत केले. आपली पत्नी व मुलगी यांच्याशी त्याची ओळख करुन दिली.

थोडा वेळ सटरफटर गप्पा झाल्यानंतर गोपीने वीरला सांगितले, ''बेटा, बऱ्याच वर्षांपूर्वी मी चोरी करताना पकडला गेलो आणि मला तुरुंगवास घडला. चोरीचा छाप कपाळावर बसला. तुरुंगातून सुटल्यावर मला मदत करायला कुणी तयार होत नव्हता. मी भुकेने कळवळून जायचो. म्हणून मी पुन्हां चोरी करायचे ठरवले. मी त्याच घरांत चोरी केली नि पुन्हां मी पकडला गेलो. तो घरमालक अतिशय भला माणूस होता, विचारी होता. त्याने मला म्हटलं, ''कुणीही चोर म्हणून जन्माला येत नसतो. परिस्थितीच्या कचाट्यांत सांपडून तू चोरी केली असली पाहिजेस. तुला शिक्षा झाल्यामुळें कांही तुझ्यामधे परिवर्तन येणार नाही. तुला पुन्हां तुरुंगात डांबण्याची चूक मी करणार नाही.'' त्याने मला त्याच्या घरांतच नोकरी दिली. जेव्हां या घटनेला दोन वर्षें होऊन गेली, आणि माझ्यांत सुधारणा झाली आहे अशी त्यांची खात्री पटली तेव्हां त्यांनी आपल्या नोकराची मुलगी गंगा हिच्याशी माझे लग्न लावून दिले. त्यानंतर आता माझी परिस्थिति चांगली सुधारलीय, तरीदेखील माझ्या ज्योतीशी लग्न करायला गांवात कुणी तयार नाही. त्यांचं म्हणणं असं कीं ज्योती ही एका चोराची मुलगी आहे. असं म्हणून वर हे लोक टिंगलटवाळी करीत म्हणतात कीं एखादा चोरच जांवई म्हणून पत्करायला हवा.''

यावर वीरने कांही बोलण्यापूर्वीच गंगा सांगायला लागली, ''माणसांचे गुण पाहायला हवेत, नुसते सौंदर्य नव्हे. तुझ्याबद्दल शास्त्रीजींनी



आम्हाला सगळं कांही सांगितलंय. आमच्या मुलीचं लग्न तुझ्याशी करावं अशी आमची इच्छा आहे. तुला हे मान्य आहे कां?''

वीरने उत्तर दिले, ''मला ठाऊक आहे कीं माझा चेहरा थोडासा कुरुप आहे. तुमच्या परिस्थितीचा फायदा घेऊन मी तुमच्या मुलीचे मन दुखावूं इच्छित नाही. मी तिच्याशी लग्न करुं शकणार नाही. माझा धाकटा भाऊ आहे, तो तुमच्या मुलीसाठी योग्य आहे.'' आणि त्याने आपल्या पित्याला ही बातमी कळवली.

हा निरोप मिळाल्यावर जगन, त्याची पत्नी व शूर, असे तिघेही गोविंदपूरला आले. ज्योतीला पाहिल्यानंतर शूरला ती आवडली. पण जेव्हां त्याला कळलं कीं तिचा बाप पूर्वी एक चोर होता, तेव्हां त्याने स्पष्टच सांगितलं कीं त्याला हे लग्न मान्य नाही. कोणत्याही परिस्थितींत एका चोराच्या मुलीशी लग्न करायची त्याला इच्छा नव्हती.

त्याचे हे बोलणें ज्योती खालमानेने ऐकत होती. पण जेव्हां अगदी असह्य झाले तेव्हां तिने शूरला एकदम ताडकन उत्तर दिले, ''काय बोलता आहात तुम्ही? कावळ्याचे पिलूं आणि कोकिळेचं पिलूं, दिसायला सारखीच असतात. फारसा फरक नसतो. पण कोकिळा आपल्या मंजुळ स्वराने सर्वांचे मन प्रसन्न करते. आत्ताच तुमच्याकडे बघून मला कळलं, कीं माणसांच्यात देखील कावळे असतात. तुमचा गोंडस चेहरा पाहून कोणतीही मुलगी तुमच्याशी लग्न करायला तयार होईल असं मात्र समजूं नका. तुमचे विचार गलिच्छ आहेत, तुमचे बोलणें कडवट आहे. जर तुमचे मोठे भाऊ तयार असतील तर मला त्यांच्याशीच लग्न करायची इच्छा आहे.''

ज्योतीचे बोलणें सर्वांनाच पटले. जगनने शूरला चांगलेच सटकावले, ''अरे, मुलगी पसंत नसली तरी जरा आपले तोंड सांभाळून बोल. उचलली जीभ, लावली टाळ्याला, अशी बडबड करुं नकोस. ज्याला स्वतःवर आवर घालता येत नाही, तोच खरा कुरुप असतो. समजलं कां?'' आणि वीरकडे वळून त्याने विचारलं, ''वीर, ज्योतीला तू पसंत आहेस. तुला ही सोयरिक पसंत आहे ना?''

वीरने होकारार्थी मान डोलावली. तेव्हां ज्योतीच्या व वीरच्या मातापित्यांनी दोघांना आशिर्वाद दिले.

वीर व ज्योतीचा विवाह झाला आणि दोघेही आनंदाने संसारात रमले.







# माया सरोवर

## 16

*(आकाशांत उडण्याच्या हंसांच्या रथांतून घसरलेला मायासरोवरेश्वर अरण्यांतल्या एका जागी नरभक्षक वस्तींत गरम पाण्याच्या मोठ्या हंड्यात पडला. त्याने रथांत त्याच्याबरोबर असलेल्या इतर लोकांची माहिती सांगितली. त्यांना शोधायला सगळेजण निघाले. तेव्हां त्यांना सिद्धसाधकाची आरोळी ऐकूं आली. (त्यानंतर)*

सिद्धसाधकाची 'जय महाकाली' ही गर्जना ऐकताच मायासरोवरेश्वर एकदम थांबला आणि चारी दिशांना नजर फिरवीत घाबरुन थरथरायला लागला. ते पाहून गणाचारी पुजाऱ्याला नवल वाटले. त्याच्या बरोबर आलेले नरभक्षक जातीचे चारी अनुचर त्या आवाजाच्या दिशेने पुढे जाऊं लागले.

त्यावेळीं मायासरोवरेश्वर जरा सावधानीने गणाचारीला बोलला, ''तू आपल्या अनुचरांना परत बोलावून घे, त्यांतच त्यांचे हित आहे. ती गर्जना महाकालीच्या एका भक्ताची आहे. त्यांच्या मंत्रशक्तींच्या पुढे तुमचे भाले निकामी होतील.'' हे शब्द ऐकून गणाचारी मोठ्याने हंसला आणि म्हणाला, ''नरभक्षक लोक असल्या मंत्रतंत्रांना भीत नाहीत. वनदेवाच्या कृपेने आमच्या भोजनासाठी आणखी एक व्यक्ती आम्हाला मिळणार आहे!''

गणाचारीचे बोलणें पुरे होते न होते तोंवर भाले उंच धरुन पुढे जाणारे नरभक्षक लोक आरडाओरडा करीत दौडतच गणाचारीकडे परत



आले आणि कांहीशा भेदरलेल्या आवाजांत म्हणाले, ''पुजारीजी, आपले सर्वांचे जीव संकटांत आहेत. हत्तीएवढ्या नरवानरावर एक यमदूत स्वार होऊन गर्जतच या बाजूला येतो आहे.''

आता मायासरोवरेश्वराबरोबर गणाचारी-देखील घाबरला. थोड्याच अंतरावर गर्द झाडींतून हातांत शूल घेऊन नरवानराला वेगाने पळवत या मंडळींच्या दिशेने येणारा सिद्धसाधक त्यांना दिसला.

''अरे ऐका! आता आपण इथून पळून जाणंच योग्य ठरेल. तुमच्यापैकीं एकजण लगोलग सरदार शेरसिंहाकडे पळत जा आणि हा यमदूत इथें आल्याची माहिती त्याला द्या. जर आपण सर्वजण याच्या हातांत सापडलो तर आपल्या जातीचा सर्वनाश होईल. याच्या तावडीतून वांचण्याचा कांहीतरी उपाय आपण तात्काळ योजला पाहिजे. उशीर केला तर आपले नुकसान होणे कांही टळणार नाही.'' सर्वांना धोक्याची सूचना देऊन म्हातारा गणाचारी पळून जाण्याच्या इराद्याने मागे वळला.

सिद्धसाधकाने 'जय महाकाली' अशी पुन्हां जोराने गर्जना केली आणि पळून जायच्या विचारांत असलेल्या नरभक्षक लोकांच्यासमोर येऊन त्याने त्यांना टोकले, ''तुम्ही जर इथून हललात तर तुम्हाला माझ्या या नरवानराचा आहार बनवून टाकीन सांगा, तुम्ही कोण आहात? आणि इथें काय करीत आहात? कांचनमाला नांवाची राजकुमारी हंसांच्या रथांतून याच भागांत पडली आहे. तुमच्यापैकीं कुणी तिला पाहिलंय कां?''

गणाचारी किंवा त्याचे अनुयायी यांना त्याचे बोलणें कांही समजले नाही. कांहीतरी आठवायचा प्रयत्न करीत गणाचारीने वर बघितले आणि एका झाडांच्या फांदीआड लपणाऱ्या मायासरोवरेश्व-राला सिद्धसाधकाच्या दिशेने खूण करीत तो म्हणाला, ''आमच्या वनदेवाने आमच्या आहारासाठी एक मानव पाठवण्याची मोठीच कृपा केली आहे. हाच तो माणूस आहे! त्याला राजकुमारीबद्दल जास्त माहिती असेल. आपण कृपा करुन त्यालाच विचारुन पाहा!''

तोपर्यंत सिद्धसाधक नरभक्षक लोकांना पळून जाता येऊं नये म्हणून प्रयत्न करीत होता, म्हणून त्याला मायासरोवरेश्वर दिसला नव्हता. पण आता त्याच्याकडे बघत तो दटावून ओरडला, ''अरे, शितरासारखा मुकुट घालणारा तो तूच कां मायासरोवरेश्वर आहेस? मी तर ऐकलं होतं कीं तू मोठा शक्तिशाली आहेस, पण दिसतो आहेस अगदीच घाबरट! जर चोरासारखा पळून जायचा तू प्रयत्न केलास तर हा शूळ खुपसून तुला जमिनीतच गाडून टाकीन, समजलास? तेव्हां खबरदार!''

सिद्धसाधकाचे हे उद्धट बोलणें ऐकून मायासरोवरेश्वर संतापला, त्याचा हातही तलवारीच्या मुठीवरही अभावितपणें वळला; पण त्याने राग आवरुन तिरस्कारयुक्त स्वरांत म्हटले, ''चेहरामोहरा नि बोलण्याची पद्धत पाहून तू एक कापालिक असावास असं वाटतं. तुझ्यासारख्या भेकडांवर मी शस्त्र चालवत नसतो. तुझी वटवट बंद करुन आपल्या वाटेने तू चालूं लाग!''

''मी सिद्धसाधक आहे. महाकालीचा भक्त आहे. तुझ्याइतकाच सामर्थ्यवान शत्रू माझा सेवक बनलेला आहे. राजकुमारीचा शोध घेण्यासाठी मी त्याला पाठवला आहे. त्याच्याशी तुला लढायचं आहे कां? बोलावूं त्याला परत मागे?'' असे विचारुन सिद्धसाधकाने ओरडून हांक दिली, ''अरे जलवृक, तू कुठे आहेस? तुझ्या जमातीचा शत्रू मायासरोवरेश्वर इथे आहे. त्याच्या ताकदीची परीक्षा तूच घे!''

याला प्रत्युत्तर करींत साधकाचा सेवक जलवृक राक्षस दूरवरच्या कांटेरी झुडुपांना उपटून बाजूला फेंकत, पाय आपटत येत म्हणाला, ''कुठे आहे तो दुष्ट मायासरोवरेश्वर? मी या दगडी गदेने आत्ता त्याचा भुगा करतो!''

जलवृक राक्षस असं बोलून जोराने पुढे जाणार होता, तेवढ्यांत एका सालवृक्षाच्या पाठीमागून मकरकेतुने आपल्या जलग्रह हत्तीला पुढे आणले



आणि जलवृकचा मार्ग अडवला. जलग्रहाने एक भीषण किंकाळी मारली व तो बाजूला झाला. विजेच्या चपळाईने त्याने मागे सरुन जलग्रहाच्या गंडस्थळावर आपल्या गदेचा प्रहार केला. मोठ्याने गर्जत मकरकेतुने त्याला धमकावले, ''अरे जलवृक राक्षसा! आत्ताच मी तुला यमलोकी धाडतो बघ!'' आणि त्याला तशी धमकी देऊन त्याच्या गळ्यावर नेम धरुन सुरा फेंकला, पण नेम चुकल्यामुळें राक्षसाच्या खांद्याला सुऱ्याची जखम झाली.

हे दृश्य पाहून नरवानरावर बसलेला सिद्धसाधक संतापून ओरडायला लागला, ''जयशील मला नंतर कांहीही म्हणूं दे, पण मी आत्ताच या मायासरोवरेश्वर आणि मकरकेतूची वाट लावून टाकतो.'' आणि त्याने असं म्हणून नरवानराला हांक मारली.

पुढच्याच क्षणीं चारी बाजूंनी टाळ्या आणि



शिट्ट्या वाजवल्याचे आवाज ऐकूं येऊं लागले. चमकून सिद्धसाधकाने मान वळवून मागे पाहिले. तेव्हां चारी दिशांनी झाडींतून वृक्षांमागून अनेक नरभक्षक तिथें येऊन पोंचले. आपल्या खांद्यावरचा भाला हातांत घेऊन सरदार शेरसिंह पुढें होऊन म्हणाला, "गणाचारी, आपल्या वनदेवाने आपल्या भोजनासाठी कितीजणांना पाठवलंय याचं मला आश्चर्यच वाटतंय. वा वा! आपला देव तर भक्तांची इच्छा पूर्ण करणारा कल्पवृक्ष आहे, नाही कां?"

सिद्धसाधकाने सरदार शेरसिंहाचे शब्द ऐकले. त्याचे अनुयायी मोठ्या उत्साहाने पुढें येऊं लागले होते. आता आपल्या शत्रूंच्याबरोबर आपलाही प्राण संकटात पडेल ही जाणीव त्याला झाली आणि त्याने नरवानराला मकरकेतुच्याजवळ पळवत नेले.

जखमी जलग्रहाच्या डोक्यावर मकरकेतुने हात फिरवला. थोडा वेळ त्याच्या पाठीवर मकरकेतु प्रेमाने थोपटत राहिला. जलग्रह उठून उभा राहिल्यानंतर मकरकेतु त्यावर स्वार होणार होता. परंतु थोड्या अंतरावर उभा असलेल्या मायासरोवरेश्वराला तो म्हणाला, "मायासरोवरेश्वर महाराज, कृपया आपण या जलग्रहावर स्वार व्हावे! हा सिद्धसाधक थोडा उतावळा आहे, पण मनाचा अतिशय दिलदार आहे. वैद्यदेव व जयशील हे दोघेही हंसाच्या रथांतून लवकरच इथें येतील."

नदीच्या कांठावर जे घडलं ते मायासरोवरेश्वराला कांहींच ठाऊक नव्हतं. म्हणून मकरकेतूच्या बोलण्याचा अर्थ त्याला समजला नाही. तरीदेखील जलग्रहावर चढून पोंचला. तेवढ्या अवधींत मकरकेतुच्या हातांतल्या शस्त्राने जखमी झालेला जलवृक राक्षस कण्हतकण्हत झाडाच्या बुंध्याचा आधार घेऊन उठून उभा राहिला. थोडा वेळ गेल्यानंतर त्याने सिद्धसाधकाला नीरस स्वरांत विचारले, "मालक, काय आज्ञा आहे?"

"तुझी जखम फार खोल असेलसं वाटत नाही. प्रथम तू तुझी गदा तर हातांत घे." सिद्धसाधकाने जलवृकाला आज्ञा केली व नंतर मकरकेतुकडे वळून त्याने विचारले, "आणि आता आपल्याला कुणापासून धोका आहे ते तुला माहिती आहे?"

"या नरभक्षकांना उगीचच वाटतंय कीं त्यांच्या वनदेवाने आपल्याला त्यांच्या भोजनासाठी धाडलंय म्हणून! तेव्हां अगोदर आपण या सर्व दुष्टांपासून आपले रक्षण करायला हवे." मकरकेतुने तलवारीची मूठ घट्ट पकडत म्हटले.

"मकरकेतु, तुझ्या हुशारीचे मला खरंच कौतुक वाटते. कनकाक्ष राजाच्या मुलांच्या शोध घेऊन त्यांना राजाच्या स्वाधीन केल्याखेरीज मी किंवा जयशील आम्ही दोघेही या असल्या नरभक्षकांचा आहार बनणें पसंत करणार नाही. त्या रानटी लोकांना समजावून सांगायचा मी प्रयत्न करतो. पण जर त्यांनी माझ्या बोलण्याकडे लक्ष दिले नाही, तर स्त्रिया आणि लहान मुलें सोडून बाकी सगळ्या पुरुषांना मारा व निर्दयपणें त्यांची सर्वांची डोकीं कापा." सिद्धसाधकाने त्वेषाने सांगितले.

इतका वेळ डोळे वटारून पाहात असलेला गणाचारी आता पुढें सरसावला आणि ओरडत म्हणाला, "हे वनदेवा रे, भूक, भूक लागलीय! अरे माणसांनो, आमच्या देवाने तुम्हाला आमच्या साठीच धाडलं आहे. तेव्हां आता तुम्ही अरण्यांतल्या वनदेवाच्या मंदिरात चला. तिथे आम्ही तुमचा नैवेद्य देवाला दाखवूं आणि नंतर आम्ही तो खाऊं!"

जरादेखील न बिचकता सिद्धसाधकाने आपला शूळ उचलून म्हटले, "अरे नरमांसभक्षकां! तुमची कांहीतरी चूक होते आहे. कुणीही आम्हाला तुमच्या भोजनासाठी धाडलेलं नाही. हंसांच्या रथांतून आमची माणसें या अरण्यांत पडली, त्यांना शोधायला आम्ही इथें आलो आहोत. त्यांतला मायासरोवरेश्वर फक्त आमच्या हाती लागला आहे. आता आम्ही आमच्या वाटेने जातो, तुम्ही तुमचा रस्ता पकडा. "आणि आमच्या भुकेचं काय? कित्येक आठवडे मांस न मिळाल्यामुळें आम्ही उपाशी आहोत." असं म्हणून भाला परजीत सरदार शेरसिंह सिद्धसाधकासमोर येऊन उभा राहिला.

सिद्धसाधकाने खूण केल्याबरोबर नरवानराने आपल्या दोन्ही हातांनी सरदार शेरसिंहाला घट्ट पकडून वरती उचलले. तेव्हां मायासरोवरेश्वर स्वार झालेला जलग्रह एका झेपेंत पुढे झाला आणि आपली सोंड पुढे फैलावून त्याने गणाचारीच्या



कमरेला सोंडेने विळखा घातला आणि त्याला तो हवेत फिरवूं लागला,'' आपल्या भोजनासाठी मिळालेल्या या मानवांना सोडूं नका. त्यांना भाले टोंचूनटोंचून बंदी बनवा!''

''जलवृक, पाहातोस काय? या नरभक्षकांचा तुझ्या गदेने चक्काचूर करुन टाक.'' सिद्धसाधकाने जलवृक राक्षसाचा ललकारले.

''सिद्धसाधक महाराज की जय'' असे ओरडत जलवृक राक्षसाने आपली गदा उचलली आणि तो नरभक्षक जमातीवर तुटून पडला. त्यांनीही त्याचा प्रतिकार केला. नरभक्षकांच्या वर जलवृक राक्षस धडाधड गदेचे प्रहार करीत होता. आणि आपल्या भाल्यांनी त्याला घायाळ करण्याचा प्रयत्न नरभक्षक करीत होते व ओरडत होते. या दंगलीचा आवाज या दंगलीचा आवाज साऱ्या अरण्यांत गुंजला.

जलवृक राक्षस आपल्या प्राणांचीही पर्वा न करता लढत होता. ते पाहून सिद्धसाधकाने त्याचे कौतुक करीत म्हटले, ''शाबास, जलवृक! तू हिंमतीचा व मोठा बलदंड आहेस रे! मी हा तुझ्या मदतीला येतो आहे.'' असं म्हणून त्याने शेरसिंहाला दूर फेंकून देण्याचा आदेश दिला, आणि ''महाकाली की जय'' अशी घोषणा करीत त्याने नरवानराला नरभक्षकांच्या दिशेकडे पळवले.

क्षणार्धात दहा घोडेस्वार वेगाने दौडत तिथें येऊन थांबले व जोरांत ओरडले, ''थांबा! ही कनकाक्ष महाराजांची आज्ञा आहे.''

घोडेस्वारांची सूचना ऐकताच सिद्धसाधक व नरभक्षक लोक लढण्याचे थांबवून त्यांच्याकडे आश्चर्याने बघतच राहिले. पण मायासरोवरेश्वर मात्र आपादमस्तक थरथर कांपायला लागला व म्हणाला, ''मकरकेतु, आता आपण अत्यंत लौकर मायासरोवराला पोंचणे योग्य होईल, नाही कां?''

हे बोलणे ऐकून सिद्धसाधक रागाने डोळे वटारुन म्हणाला, ''अरे दुष्ट मायासरोवरेश्वरा! तू कुठेही पळून जाणार नाहीस. जी गोष्ट तुला आपल्या हितावह आहे असं वाटतंय, तीच गोष्ट तुझे अनहित करणारी ठरणार आहे. खबरदार!'' आणि हे बोलून सिद्धसाधकाने आपला शूळ मायासरोवरेश्वराच्या छातीवर टेंकवला.

(क्रमशः)





वेताळ कथा

# स्वास्थ्याचे रहस्य

निश्चयाचा पक्का विक्रमार्क पुन्हां झाडाजवळ गेला, प्रेत उतरवून त्याने ते खांद्यावर घेतले आणि तो स्मशानाकडे चालूं लागला. तेव्हां प्रेतांत लपलेला वेताळ त्याला म्हणूं लागला, ''राजन्, तुझे हे परिश्रम पाहून मला तुझी दया येते आहे.' तू हे स्वतःसाठीच करतो आहेस कीं इतरांसाठी? स्वतःसाठी कठोर परिश्रम करणारे मी अनेक बहादुर व कुशल वीर पाहिले आहेत. परंतु कधीकधी अशा लोकांचं मन पालटतं आणि ते ध्येय सिद्धी न होताच आपले काम अर्धवट सोडून देतात. तुझा हा हट्ट पाहून मला तर वाटतं कीं कुणालातरी दिलेला शब्द पाळण्यासाठी तू इतके कष्ट सोसतो आहेस. कुपात्रीं दिलेलं दान जसं वाईट, तसंच कुमार्गी व्यक्तिला दिलेलं



वचनही तितकंच वाईट! त्याचं उदाहरण म्हणून मी तुला पुष्कर व विलास यांची कथा सांगतो ती लक्ष देऊन ऐक. त्याने तुझा थकवाही कमी होईल.'' आणि वेताळाने ती कहाणी सांगायला सुरवात केली.

पुष्कर दिवसभर ढोरमेहनत करीत होता, पण त्याला पोटापुरते उत्पन्नदेखील मिळत नव्हते. त्याची कमाई तुटपुंजी होती. आपले हे दरिद्री आयुष्य बघून तो नेहमी काळजींत असे. त्याला स्वतःची चीड यायची.

एकदा एका विवाहसमारंभाच्या ठिकाणीं पुष्करला काम मिळाले. विहिरीचे पाणी रहाटाने काढायचे, मोठी पातेली घांसायची, हे काम होते. दिवसभर पाहुणे मंडळी येत होती. येणाऱ्यांचे आगतस्वागत होत होते, स्वादिष्ट पक्वान्नांचे भोजन सर्वांसाठी तयार होत होते. जेवून जाणारा प्रत्येक पाहुणा जेवणाची स्तुती करून, तृप्त होऊनच जात होता. अधूनमधून पुष्करला खायला दिले जात होते. त्यामुळें त्याला सांगितलेली कामें तो मोठ्या उत्साहाने व मन लावून करत होता.

आचाऱ्यांच्या चवदार पदार्थांवर खूष होऊन तो त्यांना म्हणाला, ''तुम्हा लोकांचा स्वयंपाक किती चविष्ट आहे! तुम्हाला रोज कुठे ना कुठे कामें मिळतच असतील ना! तुम्ही मलाही तुमच्याबरोबर घेऊन जाल कां? जे पडेल तें काम मी नीट, मन लावून करीन. मलाही रोज पोटभर, सुग्रास जेवण मिळेल, चालेल कां तुम्हाला?''

ते आचारी हंसायला लागले, ''अरे, तू अगदी भोजनभाऊ दिसतोस कीं रे! आम्ही तुझी ही इच्छा कांही पूर्ण करूं शकणार नाही. कारण आम्हाला इतकी मोठी कामें रोजरोज मिळत नाहीत. जी मिळतात तिथें आमच्यापैकीं एकदोघेजण जाऊन ते काम करतात. आणि वरकामासाठी जी माणसें ठेवतात ना, त्यांची जिम्मेदारी असते नवरा किंवा नवरीच्या आईवडिलांची! असं रोज चारी ठाव जेवण जेवायची तुला इच्छा आहे खरी, पण त्याच्या-साठीं एखाद्या बड्या घरांत तू जन्म घ्यायला हवा होतास!''

जेव्हां पुष्करने प्रथमच ऐकलं की बड्या श्रीमंत घरांतून रोजच असं चमचमीत जेवण असतं, तेव्हां तो आश्चर्याने थक्क झाला. त्याचा आश्चर्यचकित चेहरा पाहून त्या आचाऱ्यांनी विचारले, ''अजूनपर्यंत तू कुणा मोठ्या धनिकाच्या घरीं काम केलंच नाहीस कां? ते लोक घरांतदेखील रेशमी कपडे वापरतात, मऊ मुलायम बिछान्यावर झोंपतात, सारी सुखें त्यांना उपभोगायला मिळतात.'' त्यांनी पुष्करला उदाहरणें देऊन अनेक गोष्टी सांगितल्या.



ती सर्व सुरम्य माहिती ऐकल्यानंतर पुष्करला आपले जीवन निरर्थक आहे असे वाटायला लागले. मोठा श्रीमंत माणूस होण्याची त्याला प्रबळ इच्छा झाली. कांहीही करून श्रीमंत व्हायचंच असे त्याने ठरवलं. गांवाबाहेर असलेल्या मठांत एक नवीन साधू आला होता. पुष्कर त्या साधूला जाऊन भेटला व त्याने आपले दुःख त्याला सांगितले.

त्याच्या बोलण्यावर साधू हंसतहंसत म्हणाला, ''अरे बाळा, प्रत्येक वृक्ष आपल्या ठिकाणीं स्थिर उभा असतो आणि गोड फळें देतो. नदी ही जीवनदात्री आई असते. ती खळाळत साऱ्या देशभर हिंडते आणि लोकांना प्यायला गोड पाणी देते. या सृष्टीमधें प्रत्येकाचा ढंग वेगवेगळा असतो. कमी वा जास्ती असेल. पण तुला जे सुख वाटतंय ना, ते सुख नव्हे! जे तुला कष्ट वाटत आहेत, ते कष्टही नव्हेत. परंतु एक गोष्ट मात्र सत्य आहे. या संसारात कष्टाशिवाय कुणालाही कांहीही मिळत नसतं, आणि त्याचं पोट भरतही नसतं. ही सारी परमेश्वराची लीला आहे.''

परंतु या उपदेशाचा पुष्करवर कांहीच परिणाम झाला नाही. त्याने गयावया करत साधूला विनंती केली कीं त्याला श्रीमंत घरांतच राहायचंय म्हणून पुढचा जन्म श्रीमंताघरी व्हावा.

तेव्हां साधूने त्याला एक औषधी मुळी दिली आणि म्हटले, ''शेजारच्या गांवातच विलास नांवाचा एक धनवंत आहे. दोन वर्षांपूर्वी त्याची पत्नी वारली. त्याचे दोन्ही मुलगा व्यापाराच्या निमित्ताने परदेशी गेले आहेत. त्याची एक नातेवाईक बहीण त्याचे घर सांभाळते. तू त्याच्याकडे जा. तुम्ही दोघांनी एकाच वेळेला ही मुळी हातांत धरलीत आणि एकमेकांच्या



शरीरांत प्रवेश करायची इच्छा धरलीत की तुमची इच्छा पूर्ण होईल. याला परकायाप्रवेश म्हणतात. दोघांच्या शरीराची अदलाबदल होईल.''

''स्वामीजी, आपण म्हणता कीं विलास धनाढ्य आहेत, व भाग्यवान आहेत. माझ्या शरीरांत प्रवेश करायला ते राजी होतील?'' पुष्करने आपली शंका व्यक्त केली.

''जरुर राजी होतील. गेली कांही वर्षें तो तुझ्यासारख्या माणसाच्या शोधांत आहे. पण हे ठरवण्यापूर्वी पूर्णपणें विचार कर. तू तरुण आहेस. तो वयस्कर आहे. या परकाया प्रवेशाचा प्रयोग करायचा म्हणजे तू तुझे वय त्याच्या स्वाधीन करतो आहेस.'' साधूने त्याला सावध करीत म्हटले.

''मला वयापेक्षां सुख जास्ती महत्वाचे आहे. कारण एखाद्या कावळ्यासारखा उभा जन्म घालवण्यापेक्षां मला सहा महिने कां होईना, पण



हंसासारखं ऐटींत जगता येईल.'' पुष्करने निश्चयी स्वरांत उत्तर दिले.

''बाह्यरूपावर जाऊन तू घाईगडबड करुं नकोस. या जगांत कावळ्याकडून आपल्याला काय मिळालं नाही आणि हंसाकडून काय मिळालंय याचा माणसाने पूर्णपणें विचार करूनच कोणताही निर्णय घ्यायला हवा.'' असं म्हणून साधुने पुष्करला पुन्हां एकदा धोक्याची सूचना दिली.

तरी पुष्करवर त्या बोलण्याचा कांहीच परिणाम झाला नाही. दुसऱ्याच दिवशी तो विलासला भेटायला त्याच्या गांवी गेला. त्याला भेटून पुष्करने आपला मनोदय सांगितला.

विलासने खूष होऊन म्हटलं, ''मी तर तुझ्यासारख्या माणसाचीच वाट पहातो आहे. आत्तापासून माझं शरीर हे तुझं आहे आणि तुझं शरीर माझं! जोपर्यंत तुला वाटेल तोपर्यंत आपण असेच राहूं.''

त्यानंतर त्या औषधी मुळीच्या साहाय्याने त्यांनी एकमेकांच्या शरीरांत प्रवेश केला. परकाया प्रवेश झाला. तेव्हांपासून पुष्कर त्या घराचा मालक झाला आणि विलास त्याचा नोकर बनला.

शरीरांत परिवर्तन झाल्यानंतर पुष्करला उत्साहाचे भरते आले. मिठाई खायची तीव्र इच्छा त्याला झाली. त्याने विलासच्या बहिणीला बोलावून सांगितले, ''ताई, आज मिठाई बनवा.''

तिने आचाऱ्यांकडून वीस लाडू बनवले आणि पुष्करमधल्या विलासच्यासमोर ठेवून त्याला म्हटले, ''अरे पुष्कर, ज्या दिवसापासून तू इथें कामाला लागला आहेस, त्या दिवसापासून तुझे नशीब उजळले आहे बघ. तुला जितके लाडू खायचे असतील तितके खा. पण ते मालकांच्यासमोर खायचे हे लक्षांत ठेव. कारण कांही महिने एका आजारामुळें ते बेचैन आहेत. त्या आजाराचे अचाप निदान होत नाही. जे त्यांना खाता येत नाही, ते नोकरांनी त्यांच्यासमोर खाल्लं कीं त्यांना उलट फार आनंद वाटतो.''

पुष्करच्या शरीरांतल्या विलासने चार लाडू खाल्ले आणि तो म्हणायला लागला, ''वा वा, अशी मिठाई कित्येक वर्षांत खाल्ली नव्हती.''

विलासच्या शरीरांतल्या पुष्कर पुटपुटला, ''ज्या शरीरांत मी परकाया प्रवेश केला आहे, ते शरीर भले कितीही रोगांची शिकार असले तरी लाडू खाल्ल्याशिवाय मी कांही राहाणार नाही.'' आणि त्याने दोन लाडू मटकावले.

विलासची बहीण त्याला थांबवत म्हणाली, ''अरे दादा, हे काय केलंस तू? आता झालं ते झालं - आता नदीच्या कांठापर्यंत भराभरा पायी



चालत जाऊन परत ये. वैद्यबुवा नेहमी तुला सांगत असतात कीं सातत्याने व्यायाम करत राहिल्याने जे कांही खायचं असेल ते तुम्ही खाऊं शकाल. पण तू तर एकदम आळशी आहेस. जरासा देखील पायी चालायला नाखूष असतोस. ही असली सुस्ती चांगली नाही.''

दोघेही नदीकिनाऱ्यापर्यंत भराभरा चालत गेले व परतले. त्यावेळीं विलासच्या रोगग्रस्त शरीरांतल्या पुष्करला एकामागून एक कटकटी निर्माण होऊं लागल्या. यापूर्वी भरपूर मेहनत करुनही पोटभरण्याइतके मिळत नव्हते. आता हवे ते खायला मिळण्यासारखे असून ते पचवण्यासाठी त्याच्याजवळ एकमात्र उपाय शिल्लक होता. ते होता व्यायाम. म्हणून तो दररोज निरनिराळ्या प्रकारचे व्यायाम करायला लागला. कांही महिने नियमितपणें व्यायाम केल्यानंतर पुष्करच्या शरीरांतले रोग कमी होऊं लागले.

तिकडे पुष्करच्या शरीरांत राहणाऱ्या विलासलाही अनेक समस्यांशी सामना करावा लागला. शरीरांत ताकद असूनही नोकराचे काम करण्यांत त्याला जराही इच्छा नव्हती. नुसतं बसून खावं असंच त्याला वाटायचं. जसे दिवस जात होते, तसा विलासच्या शरीरांतला पुष्कर विलासवर जास्त काम लादूं लागला व त्याच्याकडून कामें करवून घेऊं लागला. एक दिवस पुष्करमधल्या विलासने कळवळून म्हटले, ''माझ्यामुळें तू मालक झाला आहेस. म्हणून तू कृतज्ञता म्हणून तरी माझ्याशी आदराने वागायला हवंस. घरकामाला आणखी एखादा नोकर ठेव. मला आराम करुं दे कीं!''

पुष्करने त्याची मागणी झिडकारत म्हटले,



''मी जसं सांगीन, तशी कामें करीत राहा. नाहीतर आपण पुन्हां आपल्या शरीरांची अदलाबदल करुन टाकूं आणि हवं तसं जीवन जगूं!''

घरांतली कामें करण्यांत त्रास जरूर होता, पण पुष्करचे शरीर तरुण असल्यामुळें विलासला ते शरीर इतक्या लौकर सोडायची इच्छा नव्हती.

एक वर्ष उलटले. एक दिवस ह्या दोघांना भेटायला तो साधू आला. दोघांनीही त्याला आदराने वंदन केले आणि आपापले अनुभव सांगितले. तेव्हां साधूने पुष्करला म्हटले, ''एक वर्षभर तू विलासच्या शरीरांत राहिलास. संपत्ती जे जे सुख देते, ते सर्व तू अनुभवलंस. आता विलासचं शरीर सोडून दे आणि पुन्हां तुझ्या शरीरांत प्रवेश कर.''

पुष्कर लगेच म्हणाला, ''मी याला तयार आहे. पण माझी एक अट आहे. त्यानंतर मात्र विलासने मला त्याच्या घरीं नोकर म्हणून ठेवलं पाहिजे.''

त्यावर विलासने नाराजीने म्हटलं, "स्वामीजी, मी ह्याला जरुर माझ्याकडे नोकर म्हणून ठेवला असता, पण सध्यां माझ्या शरीरांत असलेला जो पुष्कर आहे, तो कृतघ्न आहे. मी घराचा मालक होतो, तरीसुद्धां ह्याने माझ्याकडून सर्व प्रकारची कामें करवून घेतली, अनेक प्रकारांनी याने मला त्रास दिला आहे. अशा कृतघ्न माणसाला मी कशासाठी माझ्या घरांत ठेवूं? ते न्यायाचं कसं होईल?"

तेव्हां साधू जरा कठोर स्वरांत म्हणाला, "ते अगदी योग्य व उचित न्यायाचं होईल. एकमेकांमुळें तुमच्या शारिरीक व मानसिक दोषांतून तुम्ही मुक्त झाला आहात. पुष्कर मुळींच कृतघ्न नाही." असं म्हणून साधूने त्या औषधी मुळीच्या साहाय्याने त्या दोघांना पुन्हां आपापल्या शरीरांत प्रवेश करुन दिला आणि त्यांना आशिर्वाद देऊन तो निघून गेला.

ही गोष्ट सांगून वेताळ राजाला म्हणाला, "राजन्, साधूच्या बोलण्यामधे ना कांही न्याय, ना कांही नैतिक मूल्य! पुष्करला कृतघ्न नाही म्हणणे हे अयोग्य व चूक नाही कां ठरत? पुष्कर व विलास यांच्यामधे जी खरी समस्या उभी होती, ती सोडून, साधूने आपल्या चतुर वाणीने या समस्येला वेगळेच स्वरुप दिले, आणि निराकरण केले. माझ्या शंकेचे उत्तर माहीत असूनदेखील जर तू मौन पत्करलेस तर तुझ्या डोक्याची अनेक शकले होतील हे लक्षांत ठेव."

विक्रमार्क म्हणाला, "साधू केवळ महान शक्तींचा पूजक होता असे नव्हे, तर मानवी स्वभावाचा उत्तम ज्ञाता ही होता. त्याने पुष्करला कृतघ्न ठरवले नाही, कारण वयस्कर विलासच्या शरीरांत प्रवेश केल्यानंतरच त्याच्या लक्षांत आले कीं ऐषारामी जीवन शैलीमुळें विलास अनेक रोगांची शिकार बनला होता. कोणतेही लहानसे कामदेखील करायची त्याला संवय नव्हती. व्यायामापासून तो कायमच लांब राहिला. हे जेव्हां त्याला समजले तेव्हां त्याचे तरुण शरीर याच रोगाची शिकार होऊं नये म्हणून त्याने विलासला कामाला जुंपले. आपल्या शरीराबद्दल जागरुक राहण्याची व नियमितपणें व्यायाम करण्याची संवय विलासला लावली. अशा तऱ्हेने विलासची प्रकृति सुधारली. अप्रत्यक्षपणें विलासचे पुष्करने भलेच केले. म्हणून त्याला कृतघ्न ठरवणें चूक होते."

राजाचे मौनभंग झाल्यामुळें वेताळ पुन्हां शवासहित गायब झाला आणि झाडावर जाऊन बसला.

**(बैरागी यांच्या रचनेवरुन)**





## भारतीय दंतकथा - १४

# दैवी चमत्कार!



जगन व सुकुमार हे दोघे मित्र शहरांत जायला निघाले. जगनला एका आजारी नातेवाईकाला भेटायचे होते आणि सुकुमारला बाजार करायचा होता. नेहमीचा रस्ता फार लांबलचक होता. म्हणून रानांतल्या पायवाटेने जायचे ठरवले म्हणजे ते लौकर पोंचले असते.

ते रान म्हणजे एके काळच्या किल्ल्याची जागा होती. एका लढाईत किल्ला जमीनदोस्त झाला होता. आंतल्या इमारतींची पडझड झाली होती, त्यांत रान माजले होते आणि झाडें झुडपेंही बरीच वाढलेली होती.

हे दोघे मित्र तिथून जात असताना जोराचा पाऊस पडायला लागला. त्यांनी एका पडक्या इमारतींत आसरा घेतला. अचानक त्यांच्या-समोरच एक मोडका खांब कोसळला. आणि त्यांतून सोन्याच्या विटा भरलेले एक मातीचे भांडे बाहेर आले. दोघेही आनंदित झाले. काय ही देवाची कृपा!

"याला म्हणतात नशीब!" जगनने ते भांडे प्रथम पाहिले तेव्हां म्हटले, "आपण दोघांनी हे वांटून घेऊं आणि आपल्या भरभराटीसाठी व इतरांच्या कल्याणासाठी त्याचा उपयोग करुं."

"हो तर, आपण असंच करुं या," सुकुमारने दुजोरा दिला," पण, दिवसाउजेडी ही दौलत आपल्याला घरी घेऊन जाणें शक्य होणार नाही. हे भांडेही जुने आहे. उचलले तर फुटेल. आपण शहरांत जाऊन येताना एक भक्कम थैली घेऊन येऊं आणि सोने घरीं घेऊन जाऊं." त्याने सुचवले.

जगनला हा प्रस्ताव अगदी रास्त वाटला. त्यांनी ते भांडे एका पोकळींत लपवले. पाऊस थांबला आणि ते दुपारपर्यंत शहरांत पोचले.

आपापली कामें संपवून सूर्यास्ताच्या वेळीं खानावळीपाशी दोघांनी यायचे असे ठरवले. जगन आपल्या नातलगाला भेटायला गेला. पण सुकुमार परत रानांत गेला. त्याने ते सोने एका पोत्यांत लपवले आणि एका खड्ड्यांत लपवून त्यावर दगड रचले. सोन्याच्या ऐवजी त्याने त्या भांड्यात माती भरली आणि तो परत शहरांत गेला. वाटेंत पुन्हां पाऊस सुरुं झाला. ठरलेल्या ठिकाणीं तो जगनला संध्याकाळीं भेटला.

''तू भिजलास कसा इतका?'' सुकुमारला काय उत्तर द्यावं ते सुचेना. त्याने जरा चांचरतच सांगितले कीं त्याला फारच घाम आला होता.

''तुझी सगळी खरेदी झाली कां?'' जगनने भोळेपणाने विचारले.

पुन्हां सुकुमारची पंचाईत झाली व त्याला उत्तर देता येईना. तो घाईने म्हणाला कीं त्याची सगळी खरेदी त्याने एका नातेवाईकाच्या घरीं ठेवली आहे. तरीदेखील सोन्याच्या विटा नेण्यासाठी तो एक मोठी थैली घेऊन आलेला होता.

परतीच्या वाटेवर सुकुमारने खूप उत्साही असल्याचे नाटक केले. ''जगन'' त्याने मित्राला सांगितले, ''तू ते भांडे प्रथम पाहिलेस, तेव्हां तुझा वांटा मोठाच असायला हवा.''

''हा तुझा चांगुलपणा आहे. पण आपण दोघांनी सारखी वांटणी घेऊन या. त्यांतला कांही भाग आपण गांवासाठी खर्च करुं या. शंभर वर्षांपूर्वी गांवासाठी राजाने एक तलाव बांधला होता. तो आता केवळ एक चिखलाचा ढीग झालेला आहे. पण तो पुन्हां खणून पूर्वीच्या तलावाएवढा प्रशस्त करुन टाकूं.'' जगनने सांगितलं.

''छान आहे हं तुझी कल्पना!'' सुकुमार म्हणाला. ते किल्ल्यापाशी आले तोपर्यंत मध्यरात्र झाली होती. तिथें गेल्यावर जगनला काय दिसलं? त्या मडक्यांत कांठोकांठ माती भरलेली होती!

''ह्याला म्हणतात दुर्दैव, जगन! गेल्या जन्मीं आपण कुणाला तरी फसवलं असलं पाहिजे. म्हणून दैवाने आपल्याला असा धडा शिकवला. नियतीने आपल्याला सोने दाखवले आणि आपण



घ्यायला आलो तेव्हां तिने त्या सोन्याची माती केली!'' आपल्या कपाळावर हात मारीत सुकुमारने रडत आपले दुःख व्यक्त केले.

आपल्या मित्राने काय केले आहे हे जगनने ओळखले. पण त्याचा उच्चार न करता उलट सुकुमारचे सांत्वन करीत तो म्हणाला, ''हरकत नाही, ते कांही आपल्या कष्टाने कमवलेलं सोनं नव्हतं. ते एक स्वप्न होतं असं आपण समजूं या. आपलं खरं म्हणजे कांहीही नुकसान झालेलं नाही, कारण ते आपलं नव्हतं!''

लगेच सुकुमारने डोळे पुसले व रडणेंभेकणें थांबवले.

दुसऱ्या दिवशी संध्याकाळीं सुकुमार पुन्हां एकटाच त्या रानांत गेला आणि तो खजिना त्याने गुपचूप घरीं आणला. हळूंहळूं त्याचे राहणीमान सुधारले. व्यापारांत चांगला फायदा होतोय असे त्याने सर्वांना सांगायला सुरवात केले. फक्त जगनला खरी गोष्ट ठाऊक होती. त्या सोन्यांतला आपला हिस्सा कोणत्यातरी उपायाने आपण मिळवायचाच असे त्याने मनाशी ठरवले. त्याने बसलेल्या स्थितींत असा सुकुमारचा एक मातीचा पुतळा केला व तो आपल्या अंगणात ठेवला. जगनला प्राणी आवडत असत. इतर कांही पाळीव प्राण्यांबरोबरच त्याने दोन माकडाची लहान पिलें नुकतीच आणून त्यांना माणसाळवले होते. सुकुमारच्या पुतळ्याच्या मांडीवर, खांद्यावर व डोक्यावर जगन शेंगदाणे, चणे, टांकी व ती पिलें उड्या मारीत ती शोधून काढत होती. हा कार्यक्रम रोजचाच झाला होता.

सुकुमार आणि त्याच्या पत्नीने एक मोठी तीर्थयात्रा करायचे ठरवले. त्यांनी जगनला बरोबर येण्यास सुचवले. पण जगनला ते जमण्यासारखे



नव्हते. तेव्हां सुकुमारने आपले दोन लहान, सहा व आठ वर्षांचे मुलगे जगनच्या घरीं राहूं शकतील कां, असे जगनला विचारले. जगनने आनंदाने होकार दिला. सुकुमारने मुलें जगनजवळ ठेवली, आणि ती दोघे तीर्थयात्रेला निघून गेली.

जगनने मुलांची फारच चांगली काळजी घेतली. त्या मुलांना आंबे फार आवडतात असं त्याला समजलं. ''बाळांनो, माझ्या मामांकडे निरनिराळ्या प्रकारच्या आंब्यांची खूप झाडें आहेत. तुम्ही पंधराएक दिवस तिथें राहायला गेलात ना, तर तुम्हाला मनसोक्त आंबे खाता येतील.'' मुलांना ही कल्पना फारच आवडली. ते जायला कबूल झाले. जगनने त्यांना त्या दूरच्या गांवी धाडले. मुलें दूर असली तरी सुरक्षित होती.

एका आठवड्यानंतर सुकुमार व त्याची पत्नी गांवी परतले. जगनला भेटून सुकुमारने त्याचे मनःपूर्वक आभार मानले आणि 'मुलांना घरी

घेऊन जातो' असे सांगितले. जगनचा चेहरा गंभीर व उदासवाणा झाला. त्याने सुकुमारला आधी खुर्चीवर बसवले नि म्हटले, ''अरे मित्रा, दुर्दैव मागे लागलं कीं किती नुकसान होतं व हाल होतात, हे इतरांपेक्षां आपल्या दोघांनाच जास्त ठाऊक आहे. कारण शुद्ध सोन्याची दुर्दैवानेच शुद्ध माती करुन दाखवली होती. तसंच दोन गोंडस मुलांची दैवाने दोन लहान माकडं बनवली आहेत - पण ती माकडं मात्र आहेत प्रेमळ हं, एवढं नक्की!''

''काय? माझ्या मुलांची माकडें झाली?'' सुकुमार भेदरुन किंचाळलाच.

''होय ना, पण गोड गोजिरवाणी माकडं आहेत रे ती. तुला बघून त्यांना नक्कीच खूप आनंद होईल.'' असं म्हणून जगनने ती माकडाची दोन्ही पिलें सुकुमार बसला होता तिथें आणली.

त्या पिल्लांना सुकुमारच्या पुतळ्यावरुन दाणे खात, उड्या मारायची संवय होतीच. त्यांनी पटकन त्याच्या मांडीवर झेप घेतली. त्याने दाणे द्यावेत म्हणून त्याच्या डोक्यावर व हातांवर ती प्रेमाने बोचकारुं लागली. आणि त्यांचे आवडते खाणें न मिळाल्यामुळें उगीचच ओरडूं लागली.

''बघा, बापावर मुलांचे किती प्रेम आहे!!'' जगन कौतुकाने म्हणूं लागला.

सुकुमार क्षणभर स्तंभित झाला. त्याच्या तोंडातून शब्द फुटेना. थोड्याच वेळांत त्याच्या लक्षांत आलं कीं जगन जरी एक सज्जन मित्र होता, तरी तो मूर्ख नव्हता.

सुकुमार निमूटपणें घरी गेला आणि त्याने सोन्याच्या विटा भरलेली ती गोणी परत जगनकडे आणली. त्यांतल्या सोन्यापैकीं त्याने फारच थोडे सोने खर्च केले होते. त्याने अर्धा वांटा जगनला दिला. जगनही त्याला आपल्या मामाच्या गांवी घेऊन गेला. आंब्याच्या झाडांखालीं दोन्ही मुलें मजेंत खेळत होती. त्यांची प्रकृतिही सुधारली होती. ती नाराज होऊनच वडलांकडे आली. माकडांच्या पिल्लांसारखे प्रेम त्यांनी व्यक्त केले नाही. सुकुमार मुलांना घरीं घेऊन गेला.

समाधानाची गोष्ट एवढीच कीं त्यानंतरही जगन व सुकुमार यांची मैत्री अतूट राहिली. सुकुमारला कांही समस्या निर्माण झाल्या तर जगनलाच तो विचारत असे. कारण त्याला ठाऊक होतं कीं त्याला योग्य मार्गदर्शन मिळेलच.

**(जैन कथासाहित्यावरुन)**






# नाकाला लावायचा नाही हं!

हा रुमाल आगळा आहेत. तो हातांत घेतलात कीं त्याने नाक पुसायची कल्पनादेखील तुमच्या मनांत येणार नाही, किंवा हाताची बोटे साफ करायला तुम्ही हा रुमाल वापरणार नाही. कारण हा आहे चंबा रुमाल, सुंदर भरतकामाचा एक अप्रतिम नमुना - हिमाचल प्रदेशांतल्या चंबा या गांवावरुन हे नांव पडले आहे.

राजघराण्यांतल्या व इतर श्रीमंत स्त्रिया या विशिष्ट भरतकलेंत अतिशय निपुण होत्या. भरगच्च भरतकाम केलेला हा चौकोनी चंबा रुमाल १८व्या व १९ व्या शतकांत फार लोकप्रिय ठरला. या काळांत, अनेक चित्रकार मुघल साम्राज्यांतून निघून चंबा, कांग्रा व बशोली या हिमाचल प्रदेशांतल्या भागांत स्थायिक झाले. सधन घरांतल्या स्त्रिया या चित्रकारांकडून रुमालावर चित्रें काढून घेत व रेशमाच्या लड्यांनी त्यावर किचकट, सुरेख भरतकाम करीत असत.



या चित्रांत महाभारतांतील युद्धाचे देखावे, कृष्ण व गोपी, श्रीगणेश व त्याच्या ऋद्धीसिद्धी या दोन पत्नी, असे विषय असत. सोळाव्या शतकांत गुरु नानक यांची भगिनी बिबी नानकी हिने भरलेला एक रुमाल हा सर्वांत जुना रुमाल आजही सुस्थितींत आहे.

     

# भारताची ओळख

१. भारतांतली पहिली विजेवर चालणारी रेल्वे कल्याण ते पुणें या मार्गावर होती. तिचे नांव
   - अ. कल्याणराणी
   - ब. पुणें एक्स्प्रेस
   - क. डेक्कन क्वीन
   - ड. विंध्यराणी, यांपैकी कोणते होते?

२. 'कुजबुजणारा सज्जा' पाहायला तुम्ही कुठे जाल?
   - अ. गोलघुमट (विजापूर)
   - ब. हवामहल (जयपूर)
   - क. अजिंठा लेणीं (औरंगाबाद)
   - ड. ताजमहाल (आग्रा)

३. फिल्मसिटी कुठे आहे?
   अ. नवी दिल्ली, ब. कानपूर,
   क. हैदराबाद, ड. गुवाहाटी



४. या चित्रांतली व्यक्ती ओळखा. एका भारतीयाबरोबर त्याने एक अजोड कार्य केले आहे, आणि त्याच्या मुलानेही त्याचा कित्ता गिरवला आहे..

५. या चित्रांत कांहीतरी विसंगत वाटतंय ना? सांगा पाहूं.




६. भारतीय रेल्वेचे हे १५०वे वर्ष आहे. या साजऱ्या होणाऱ्या समारंभाचे बोधचिन्ह आहे?
   १. अप्पू, २. भोलू,
   ३. छोटू, ४. भालू

*(उत्तरें पुढील अंकी)*

## 'मे' तल्या कोड्याची उत्तरें

१. शिमला
२. गोदावरी
३. दिल्लींतल्या 'इंडिया गेट'ला समुद्रकिनारा नाही. आधुनिक इमारती व किनारा हे परिचित दृश्य मुंबईच्या 'गेटवे ऑफ इंडिया' चे आहे.
४. गंगेवरचा हावडा ब्रिज
५. शिमला
६. जमशेदपूर



# गणेश पुराण

शत्रुंजयने चलुकवर्माला त्या उंदराबरोबर दूर एका लहानशा घरात रहायला पाठविले व म्हणाला – "तू आमच्या बरोबर राहायला योग्य नाहीस. तुझ्या उंदीर वाहन असलेल्या गणपतीच्या भक्तीला योग्य अशी त्या वाहनाच्या जातीचीच तुला गृहिणी करून दिली आहे. तुझी गृहिणी 'असूर्यपश्या' म्हणजे सूर्याचीही जिच्यावर नजर पडणार नाही अशा अंतःपुरात रहावी या साठी तुझ्या घरात उंदराची बिळे आहेत!" या शब्दांत त्याने हेटाळणी केली.

चलुकवर्मा बाप म्हणाला ते ऐकून घेऊन शांत स्वरात म्हणाला – "वडिलांनी मुलांची लग्नें लावून देणे ही खरोखरच मोठी गोष्ट म्हणावयाची, नाही का? ज्याच्याशी जिचा संबंध व्हायचा असतो, हे म्हणे पूर्वीच लिहून ठेवलेले असते! आपल्या हातांत कांहीच नसते! सर्व त्या विघ्नहर्त्या गणनायकाची इच्छाच असते, नाही कां?"

चलुक उत्तमोत्तम ग्रंथांचे अध्ययन करीत असतां चुलुका जवळ राहून ऐकत असे. चलुक गणेशाची पूजा करी तेव्हां आपल्या तोंडाने ती त्याला फुले देई. चलुकचें पोट भरून जेवणे झाल्यावर तो देई तेच चुलुका खात असे. असा बराच काळ लोटला आणि गणेश चतुर्थी आली.

सर्व आपापल्या घरांना रंगरंगोटी करू लागले आणि धान्ये कांडू लागले. चुलुकानें रात्रीच्या रात्री सर्व उंदरांना बोलाविले. उंदरांनी रंगात शेपट्या भिजवून सर्व भिंती रंगवून काढल्या. आपल्या दातांनी भातावरची टरफले सोलून स्वच्छ तांदूळ तयार करून दिले.

गणेश चतुर्थीच्या दिवशी उजाडताच चलुकच्या सर्व भगिनी सोन्याच्या घागरी घेऊन नदीवरून पाणी घेऊन आल्या. त्यांना पाहून

१८. चलुकवर्माची कथा



चलुकला स्वतःची बायको पाणी आणूं शकणार नाही याबद्दल वाईट वाटले.

चुलुका लगेच एका घागरीत शिरली व ती घणंगळत नदीकांठापर्यंत घेऊन गेली. नंतर बाहेर येऊन तिने नदीकडे पाहिले, डोंगराएवढ्या घागरी भरभरून जणूं कांही ती ओतीत वहात होती. तिला निराशा वाटली व ती मनांत म्हणाली - ''मी घागर तर घेऊन आले, परंतु ती पाण्यांत कशी बुडवणार? आणि ती उचलून कशी घेऊन जाणार? मी किती अविवेकी आहे? किती निरुपयोगी हे जीवन? नको हा जीव! कशाला जगायचे?'' असे मनात म्हणत शेजारच्या एका दगडावर कपाळ आपटूं लागली, तेव्हां विघ्नहर्ता गणनायक प्रगट होऊन तिच्या पाठीवर हळुवारपणे हात फिरवूं लागला. लगेच पापमुक्त होऊन तिचें मूषक रूप गेले व देवकन्या कल्याण किंकिणीचे रूप तिला प्राप्त झाले. ती गणपतीच्या पायां पडली व अनेक प्रकारे तिने त्याचे स्तवन केले. गणपतीने तिला आशीर्वाद दिला आणि अंतर्धान पावला.

कल्याण किंकिणी घागर डोक्यावर घेऊन चालू लागली तर रस्त्यावरचे लोक चित्रासारखे उभे राहून तिच्याकडे पाहू लागले - ''ही कोण स्वर्गसुंदरी बुवा? कोणाच्या घरी चालली आहे!''

चलुकवर्माच्या सर्व वहिनींनी कल्याण किंकिणीला आपल्या सर्वात धाकट्या दिराच्या घरात जातांना पाहिले व त्या परस्परांकडे चकित मुद्रेने पाहू लागल्या.

शत्रुंजय आपल्या अज्ञानामुळे स्वतःच लाजला व चलुकवर्माला त्याच्या बायकोबरोबर राजवाड्यांत घेऊन आला.

चलुकवर्माचे सर्व मोठे भाऊ आपल्या वडिलांना पुनः पुन्हा विचारू लागले - ''आमचे लग्न अशाच एका उंदराशी कां नाही करून दिलेत, बाबा? आम्हालाही अप्सरांना लाजविणारं सौंदर्य असलेली बायको नसती का मिळाली?''

अशा मूर्ख मुलांसाठीच कां मी एवढे मोठे साम्राज्य संपादन केले? अशी एक विरक्ती शत्रुंजयच्या मनात उत्पन्न झाली व तो राज्यकारभार सोडून तपश्चर्या करण्यासाठी जंगलात निघून गेला.

चलुकवर्माचे सर्व मोठे भाऊ परस्पराचा द्वेष करून व परस्परांशी युद्ध करून मरण पावले. चलुकवर्मा 'नको नको' म्हणत असतां त्यालाच प्रजेने आपला राजा केले.

चलुकवर्माने आपली राणी कल्याण किंकिणीच्या नावे कल्याणी नांवाचे मोठे नगर निर्मिले. त्याला कल्याण किंकिणीच्या पोटी चार मुलगे झाले. ते पुढे चालुक्य या नांवे प्रसिद्ध झाले. अशा तऱ्हेने चालुक्य राजवंशाची स्थापना करणाऱ्या चलुकवर्मा याच्या कारकीर्दीत वातापि नगर हे अनेक देवालये असलेले, मोठमोठे प्राकार व तट असलेले सुंदर शहर म्हणून प्रसिद्ध झाले. विविध कलांचे केंद्रस्थान म्हणून विद्वान व पंडित लोकांचे मोठे निवासस्थान आणि पृथ्वीवरची इंद्रपुरी म्हणून प्रसिद्धीस पात्र ठरले. नगराची अधिदेवता म्हणून गणपतीची पूजा होत राहिली. येथील उत्कृष्ट शिल्पकला आणि सुंदर सभामंडप पहायला दूरदूरचे राजेरजवाडे आणि सामान्य प्रजा येऊ लागली.

चालुक्य वंशीयांनी चारी दिशांना आपले राज्य वाढविले आणि त्यांच्या राज्यांत प्रजा सुखी झाली. चालुक्यवंशीय यांच्या शाखा व उपशाखा देशभर पसरल्या आणि चारी दिशांना त्यांचे राज्य विस्तीर्ण होत गेले. वातापि नगरांत राज्य करणारे वातापि चालुक्य या नामे, कल्याणी नगरांत राज्य करणारे कल्याणीचे चालुक्य या नामे, वेंगी येथे राज्य करणारे वेंगीचे चालुक्य नामे, पूर्वीचे चालुक्य, पश्चिमेकडील चालुक्य नामे, सौराष्ट्र चालुक्य नामे, प्रसिद्ध झाले. कांही काळ लोटल्यावर वातापि नगराला बदामी हे नावही प्राप्त झाले.

विघ्नहर्त्याच्या गोड गोष्टी.

वातापि गणपति या नांवे गणपती, क्षेत्र म्हणून वातापि नगर देशभर प्रसिद्ध झाले, त्याकाळची ही गोष्ट आहे. पावनमिश्र नावाचे एक विद्वान पंडित वातापि गणपतीच्या



देवालयांतल्या मंडपात, मुलांना रोज गणपतीच्या कथा सांगत असत. लहानथोर सर्व मंडळी त्या कथा ऐकून आनंदाने रहात असत.

सभामंडपाच्या भिंतींवर गणपतीच्या चरित्रांतील उत्तमोत्तम कथांवर आधारित चित्रे काढलेली होती. त्या चित्रांपैकी एक चित्र दाखवून एका मुलाने गुरुवर्यांना त्या चित्राची कथा सांगायची विनंती केली.

तेव्हां पावनमिश्राने ती कथा सांगायला सुरवात केली.

एका गांवी सत्यशर्मा व लोभगुप्त नावाचे दोघेजण शेजारी रहात असत. लोभगुप्ताचे खरं नांव लाभगुप्त असे होते. परंतु तो स्वभावाने इतका लोभी होता की गांवकऱ्यांनी त्याला लोभगुप्त या नांवानेच हांक मारायला सुरवात केली.

सत्यशर्मा व लोभगुप्त दोघे दररोज शंकराच्या देवळांत दर्शनाला जात असत. सत्यशर्मा



गर्भगृहात जाण्याच्या वाटेवर गणेशमूर्तीला नमस्कार करून गणपति स्तोत्र म्हणे आणि नंतर सांबाचे दर्शन घेऊन परते.

लोभगुप्त गर्भगृहात प्रवेश करतांच शंकराला सांकडे घाली, 'कोटी रुपयांचा लाभ करून दे.'

एकदां सत्यशर्मा दर्शन करुन परत जात असतां आणि लोभगुप्त येत असतां नंदी गणपतीला म्हणाला - "विघ्नहर्त्या! तुझा भक्त सत्यशर्मा याला पुष्कळ पैशांची गरज आहे. त्याला कांही देणं योग्य होईल!"

"होय रे नंदी! आज संध्याकाळी त्याच्या कडे एक हजार वराह पोचते करतो." विघ्नहर्ता गणनायक म्हणाला.

दगडाच्या मूर्ती परस्परांशी बोलत असलेल्या ऐकून चकित होऊन लोभगुप्त लगेच उठला आणि सत्यशर्माच्या घरी जाऊन म्हणाला - "शर्मा, तुला पैशाची फार गरज आहे, म्हणे! पांचशे वराह देतो, घे." असे सांगून पांचशे रुपये देऊ लागला.

सत्यशर्मा त्याला म्हणाला - "अहो सावकार! कालच तुम्ही नाही कां म्हणालात की व्याजासकट तुम्ही दिलेले कर्ज फेडलं नाही तर मी घर रिकामं करुन तुम्हाला दिलं पाहिजे म्हणून? मग आणखी हे पांचशे कसे काय फेडायचे?"

लोभगुप्त म्हणाला - "तुझ्या मनांत ती शंका आहे का? तू हे पांचशे घे आणि आज संध्याकाळी तुला जी रक्कम मिळेल ती सर्व मला दे म्हणजे झालं!"

सत्यशर्मा काय उत्तर द्यावं म्हणून घुटमळत असतां त्याची बायको म्हणाली - "पहिल्याने ती रक्कम तर घ्या! तिकडे होणारी व्याही मंडळी बराच वेळ वाट पहात बसली आहेत.

सत्यशर्माच्या मुलीचे लग्न नुकतेच ठरलं होते. नवरदेवाच्या आईवडिलांनी पांचशे वराह किंमतीचे दागिने मुलीच्या अंगावर घातले पहिजेत असा हट्ट धरला होता.

सत्यशर्मा लोभगुप्ताला म्हणाला - "सायंकाळी मला जी रक्कम मिळेल द्यायला मला कोणत्याही प्रकारे हरकत नाही. परंतु मिळण्याची चिन्हे मुळीच नाहीत..." असे म्हणत मागे पुढे करीत असतां लोभगुप्त म्हणाला - "ते सर्व सोड! आपण शेजारी, मी आतां देतो आहे, तू नंतर दे! एवढ्यासाठी इतके आढेवेढे घेण्याची गरज नाही." असे म्हणत त्याने पांचशे वराहांचं बोचकं सत्यशर्माच्या हातात ठेवलं.

सत्यशर्मा सत्यप्रतिज्ञ असल्याची लोभशर्माला खात्री होती.

संध्याकाळ व्हायची वेळ झाली, परंतु सत्यशर्माला कोठून व कसे, किती वराह मिळणार आहेत याची कल्पनाही नव्हती. लोभगुप्त घाबरून देवळांत गेला आणि गणपतीची सोंड धरून ओढीत म्हणाला - "कायरे विघ्नहर्त्या! सत्यशर्माला एक हजार वराह दे की जाऊन!" असं तो म्हणत असतां त्याचा हात सोंडेच्या सांधीत अडकला आणि काढण्याचा यत्न केला तरी निघेना, उलट जास्तच घट्ट अडकला.

हात दुखूं लागल्यामुळे लोभगुप्त कण्हूं लागल्यावर विघ्नहर्त्याची मूर्ती म्हणाली - "तू सत्यशर्माला एक हजार वराह जितक्या लवकर देवविशील तितक्या लवकर तुझी सुटका होईल."

लोभगुप्त दुसऱ्या हाताने कपाळ फोडीत ओरडला - "देवा! हा अन्याय आहे! पांचशे मी पहिल्यानेच दिले आहेत ना!"

"अस्सं! म्हणजे पांचशे देऊन एक हजार काढण्याचा तुझा विचार होता तर! फुकटांत पांचशे वराह मिळविण्यासाठी, होय ना? या पापाचं प्रायश्चित म्हणून तू या पांचशे वराहांव्यतिरिक्त सत्यशर्माला पांचशे वराह दे आणि त्याच्या मुलीचे लग्न तू स्वतःच्या घरचे समजून त्याला लागणारा सर्व खर्च दे!" असा गंभीर स्वर मूर्तीतून लोभगुप्ताला ऐकू आला.

लोभगुप्ताने आपल्या घरच्या लोकांना बोलाविले आणि सत्यशर्माला बाकीचे पांचशे वराह देवविले. नंतर कर्ज फिटल्याचे सांगून सत्यशर्माच्या मुलीचे लग्न करून देण्याचे वचन दिले. एवढे झाल्यावर त्याचा हात सुटला.

लोभी माणसाला चांगली शिक्षा झाली, म्हणून गांवभर चर्चा झाली.

लोभगुप्तने सत्यशर्माच्या मुलीचे लग्न स्वतःच्या मुलीच्या लग्नासारखे थाटामाटाने करून दिले.



तेव्हांपासून लोभगुप्तने आपली लोभी वृत्ती सोडली आणि अन्यायाने संपादिलेली मिळकत धर्मकार्यासाठी खर्च केली. तो विघ्नहर्त्या गणपतीचा भक्त झाला आणि सदाचारी म्हणून प्रसिद्ध झाला.

ही गोष्ट सांगून पावनमिश्रने गणपतीचा प्रसाद आणून सर्व मुलांना वाटला. मुलांनी प्रसाद तोंडात टाकला आणि हंसत खेळत ती घरी निघून गेली.

आणखी एके दिवशी सायंकाळी एका मुलीने आणखी एक चित्र दाखवून त्याची गोष्ट सांगायला विनंती केली. पावनमिश्र गोष्ट सांगू लागले.

कल्याणी नगरींत कलहकंठी नांवाची एक श्रीमंत बाई रहात असे. सुनेने माहेरून सोन्याचे पुष्कळ दागिने आणले नाहीत, म्हणून ती सुनेला वेळींअवेळी टोंचून बोले आणि शेवटी तिला निर्दयपणे तिने माहेरी पाठवून दिले.

कलहकंठी हे तिला नांव मिळाले असूनही त्या श्रीमंत कलहकंठी सासूची सून सौदामिनी दुःखाचा डोंगर डोक्यावर घेऊन आपल्या माहेरी निघाली. परंतु वाट चुकून ती एका जंगलात गेली. भुकेने तिचा जीव कासावीस झाला आणि बेशुद्ध होऊन ती एका कवठाच्या झाडाखाली पडली.

आपण माहेरी गेली तरी फायदा नाही. कारण तिच्या लग्नासाठीच तिच्या वडिलांनी फार मोठे कर्ज करून ठेवले होते. मग आणखी दागिने कोठून आणणार? म्हणून त्या अरण्यांतच मरण आलेले पत्करले, असा विचार ती मनांत करीत असतां झाडावरून एक कवठ गळून पडले, आणि ही पडली होती तेथपर्यंत तिचा हात पोचेल अशा जागी येऊन थांबले. ते घेऊन सौदामिनी उठून बसली असतां जमीन हादरली आणि एक हत्ती अंगावर धावून येत असलेला तिला दिसला.

सौदामिनीच्या मनांत लहानपणापासूनच गणपतीवर फार भक्ती होती. गणपतीचे मनांत स्मरण करून हत्तीच्या पायाखाली स्वतःला देऊन ती आत्महत्येला ती तयार झाली. ती हत्तीला सामोरी गेली, परंतु तो एकदम जागच्या जागी थांबला.

हत्तीने सौदामिनीच्या हातांतले कवठ सोंडेने घेतले व तोंडात घालून आशीर्वाद देत असल्यासारखी सोंड डोक्यावर ठेवून तिचा हात पकडला व तिला सरळ एका मोठ्या गुहेंत तो घेऊन गेला.







# राजाची कृपा

कनकगिरीचा राजा कमलाकर कलागुणांचा अतिशय भोक्ता होता. त्याच्या दरबारांत रोज संगीताच्या मैफली होत, विद्वांनाची चर्चासत्रें, प्रवचनें होत असत. कधीकधी वेष पालटून राजा राजधानीजवळच्या जंगलात फिरायला जात असे. पक्षांची मधुर किलबिल व वनराईचे सौंदर्य बघण्यांत तो दंग होई.

त्या जंगलाच्या झाडींतून पुढें गेल्यानंतर एक लहानसे घर होते. जेव्हां कमलाकर त्या बाटेने पुढे जाई, तेव्हां त्या घरांतून नेहमी मसालेदार वांग्याच्या भाजीचा घमघमाट त्याला जाणवत असे. तिथें जाऊन ती भाजी खावी असा त्याला मोह होत असे. पण आपली इच्छा आवरून तो राजधानीला परत जाई.

वास्तविक राजाच्या मुदपाकखान्यांत रोज स्वादिष्ट भोजन शिजत होतंच. त्याला हवा तो पदार्थ केव्हांही मिळण्याची सोय होती. पण त्या घरांतल्या भाजीसारखा घमघमाट सुटलेला त्याला कधी आपल्या बाड्यांत अनुभवायला मिळाला नाही. कमलाकरला मनांत नेहमी वाटायचं, कीं एकदा तरी त्या छोट्या घरांत जाऊन जेवायला बसलं पाहिजे.

एके दिवशी त्याने दुपारींच वेष पालटून त्या घरीं जायचे ठरवले. तिथें जाऊन त्याने दार ठाठावले. लगेचच एका तरुण सुवासिनीने दार उघडले आणि विचारले, "आपण कोण आहात?"

राजाने बेधडक उत्तर दिले, "मी परदेशी आहे. भुकेने कळवळलो आहे. कांहीतरी खायला मिळेल कां?"

"आत्ताच आमची जेवणें उरकली. पण हरकत नाही. तुम्ही भुकेले आहात, तेव्हां कांही तरी द्यायला तर हवंच ना जेवायला! तुम्ही अगोदर आंत तर या." त्या स्त्रीने सांगितले. तिचे नांव रत्ना होते.

राजा आंत गेला व तिथल्या एका जुनाट खुर्चीवर जाऊन बसला. बाजूलाच एका चटईवर रत्नाचा नवरा परमेश झोंपला होता. रत्नाने त्याला उठवलं आणि म्हटलं, "हे पाहा, कुणी परदेशी आलेला आहे; त्यांना खूप भूक लागलीय. थोडी

किशोर राठी



बांग्याची भाजी करा नि चारपांच ज्वारीच्या गरम भाकरी पण करायला हव्यात.''

परमेशने बसल्या जागेवरुनच राजाकडे एकदा नीट पाहिले आणि मागील दारच्या अंगणातून चार वांगी त्याने तोडून आणली व चूल पेटवली.

''आमच्या राजाची कृपा आहे म्हणून माझे पतीच स्वयंपाकाचं काम सांभाळतात.'' रत्नाने हंसून सांगितले. तिचा नवरा जर स्वयंपाक करणारा असेल तर त्यांत राजाची कसली कृपा होती हे कांही राजाला समजलं नाही.

थोड्याच वेळांत वांग्याची भाजी व भाकरीचे जेवण तयार झाले. रत्नाने राजाला म्हटले, ''चला जेवायला; आमच्या राजाच्या कृपेने पाहुण्याला हातपाय धुवायला पाणी देणेदेखील आम्हाला शक्य नाही.'' असं म्हणून पुन्हां ती तोंडभर हंसली.

राजा पानावर बसला तेव्हां तिने त्याला भाजी व भाकरी वाढताना म्हटले, ''आमच्या राजाच्या कृपेने हे जेवण मी आपल्याला वाढते आहे.''

राजा पोटभर जेवला आणि अंगणात जाऊन त्याने हात धुतले. परत आल्यावर त्याने रत्नाला विचारले, ''दर वेळेला पहावं तर तुम्ही आपल्या राजाचे नांव घेता आहात. तुमच्या राजनिष्ठेचं हे जिवंत उदाहरण कौतुकास्पद आहे.''

यावर रत्नाला हंसू कोसळले. ती हंसत सुटलेली पाहून राजा चकितच झाला. त्याने तिला प्रश्न केला, ''तुम्हाला तुमचा राजा चांगला वाटत नाही कां? त्याच्याबद्दल तुमच्या मनांत आदर किंवा श्रद्धा नाही कां?'' त्याचा स्वर जरा रागीट वाटला.

रत्नाने उत्तर दिले, ''मी काय सांगते ते लक्ष देऊन ऐका. आमच्या राजाला आपल्या राज्यांत लाखों नागरिक अगदी सामान्य परिस्थितींत राहात आहेत हे ठाऊकच नाही. त्यांना कवी, गायक व कलावंत यांच्याखेरीज कुणीच दिसत नाहीत. माझे पती शिकलेले आहेत, पण काय उपयोग? लायक लोकांसाठी राज्यांत योग्य त्या नोकऱ्या नाहीत. आमच्या लग्नाच्यावेळीं माझ्या आईवडलांनी हुंडा म्हणून थोडी रक्कम दिली होती, त्याच्या व्याजावरच आम्ही कसेबसे भागवतो. मी उगीच पदार्थांची



नासधूस करेन, म्हणून माझे पती स्वतःच काटकसरीने स्वयंपाक करतात. ते नोकरी करत नाहीत ही राजाचीच कृपा आहे.''

राजा विचारांत पडला. रत्ना पुढें सांगू लागली, ''नगराच्या बाजूने वाहाणारी नदी पुढे समुद्राला मिळते. पण त्या नदीच्या पाण्याचा जनतेला काय उपयोग होतोय? हे पाणी वापरांत आणावं आणि नागरिकांना गरजेपुरतं तरी पाणी मिळावं असं कांही आमच्या राजाच्या लक्षांत येत नाही. म्हणूनच मी म्हटलं तसं राजाच्या कृपेने अतिथीला हातपायतोंड धुवायलादेखील पाणी मिळत नाही आम्हाला. त्यासाठीच मी तुम्हाला सरळ स्वयंपाकघरांत घेऊन गेले.''

तिचे बोलणें राजा लक्षपूर्वक ऐकत होता. जेव्हां ती गप्प झाली, तेव्हां राजानेच विचारले, ''ठीक आहे, तुमच्या राजाची आणखी कांही कृपा असेल तर तीही सांगून टाक.''

रत्नाच्या मनांत आलं कीं हा तर परदेशी प्रवासी आहे; आमच्या राजाबद्दल इतकी उत्सुकता वाटायचं ह्याला काय कारण? तरीदेखील तिने पुढे बोलायला सुरवात केली, ''लोकांच्या किमान गरजा आहेत अन्न, वस्त्र व निवारा! पण आमचा राजा कांही या गोष्टींबद्दल विचार करीत नाही. ते बिचारे संगीत व नृत्यांतच गुंग असतात. म्हणून या महत्वाच्या गंभीर गोष्टींबद्दल विचार करायला त्यांना फुरसत होत नसेल. दुरुन आलेल्या परदेशी पांथस्थाला मला केवळ भाजीभाकरी एवढंच जेवण देता यावं याचं मला वाईट वाटतं. पण माझा नाईलाज आहे हो! माफ करा!''

आजपर्यंत आपल्या हातून किती मोठी चूक होत आली हे राजाला कळून चुकलं. आपण कोण आहोत ते खरं सांगून राजा म्हणाला, ''तुझ्या पतीच्या हाताला खरंच सुंदर चव आहे. फार स्वादिष्ट जेवण त्याने मला दिलंन! राजवाड्यांतल्या स्वयंपाक्यांना स्वयंपाक शिकवायला हवा त्याने! आता राहिली तुझी सोय! माझ्या राणीची तू मैत्रीण म्हणून राजवाड्यांत राहा आणि आम्हाला अशाच चांगल्या सूचना देत जा. कोणत्याही प्रकारचा संकोच न बाळगता तू राणीला व मला सल्ला देत राहायचं. यापुढें मी माझे विचार सुधारीन आणि प्रजेच्या कल्याणासाठी झटत राहीन. तेव्हां आता विलंब नको. तुम्ही दोघे उद्यांच राजवाड्यावर या.''

दुसऱ्या दिवशी आपल्या पतीबरोबर राजाच्या अंतःपुरांत शिरताना रत्ना स्वतःशीच बडबडली, ''ही सारी राजाची कृपा!''





# देवचा प्रश्न

प्रशांतनगर फारच टुमदार गांव आहे. चारी बाजूंनी डोंगर व गांवाबाहेर खळखळ करीत वाहणारी एक सुंदर नदी आहे. त्या नदीच्या किनाऱ्यावर एका झोंपडीत एक वेदांती मौनयोगी राहात होता. तो फक्त महिन्यांतून एकदा पौर्णिमेच्या दिवशी भक्तांना दर्शन देई. भक्तांच्या प्रश्नांची उत्तरें देत असे, त्यांच्या शंकांचे समाधान करी आणि बाकीचे दिवस ध्यानांत गुंग असे.

एका पौर्णिमेला भक्तगणांनी त्याचे दर्शन घेतले, त्याचे प्रवचन ऐकले व त्याची अनुमती घेऊन ते तिथून निघून गेले. देव नांवाचा एक माणूस मात्र खाली मान घालून योगीसमोर बसून राहिला. त्याचे वय पन्नासपेक्षां जास्तच असेल. "बोल, कांही विचारायचे आहे कां?" योगीने विचारले.

क्षणभर गोंधळून जाऊन देवने योगीला विचारले, "महाराज, गेले कांही दिवस या सृष्टीचा कर्ता भगवान याचा विचार करताना माझ्या मनामधे तऱ्हेतऱ्हेचे प्रश्न येत आहेत. त्यांचे समाधानकारक उत्तर मिळावे म्हणून मी आपल्याकडे आलो आहे."

"अवश्य विचार," योगीने सांगितलं.

"महाराज, सर्वजण असं मानतात व म्हणतात कीं जीवसृष्टी या भगवानानेच केली. परंतु उत्तम सृष्टी म्हणणाऱ्या मनुष्यांमधेच इतके भेदभाव कां आहेत? माणसामाणसांमधे शत्रुत्व आहे, प्रतिकार आहे, द्वेष आहे, युद्धें होत राहातात, हत्या होतात, एकमेकांचा विश्वासघात होताना दिसतो. शेवटी हे सारं कां? कशासाठी होत असतं? सृष्टिकर्ता भगवान हे सर्व निमूटपणें बघत असतो ते कां? त्यानेच निर्माण केलेल्या या सृष्टीची ही दुर्दशा त्याला सुधारता येणार नाही कां? या प्रश्नांमुळें मी अतिशय अस्वस्थ झालो आहे." देवने गंभीर स्वरांत विचारले.

योग्याने त्याला हंसतच विचारले, "तुला किती मुलेंबाळें आहेत?"

- सुचित्रा -

"चार, महाराज! दोन मुलगे नि दोन मुली."

"सर्वांचे पालनपोषण तू मोठ्या प्रेमाने केले आहेस ना?"

"होय महाराज, माझ्या मुलांना मी चांगल्या-प्रकारें वाढवले आहे." देवने सांगितले.

"चांगलं केलं आहेस. आता ते सगळेजण कसे आहेत? कुठेकुठे असतात?" योगीने विचारले.

"काय नि कसं सांगूं, महाराज? आम्ही दोघांनी व माझ्या आईवडिलांनी मोठ्या प्रेमाने आणि अत्यंत लाडांत माझ्या थोरल्या मुलाला वाढवले. पण अतिलाडामुळें तो फारसा शिकला नाही. त्याला वाईट संगत लागली. सोळाव्या वर्षीच तो घर सोडून एका चोरांच्या टोळींत सामील झाला. एका सावकाराचा खून करुन आता माझा हा मुलगा कुठेतरी परागंदा झालेला आहे." देवने केविलवाण्या सुरांत सांगितलं.

"दुसरा मुलगा?" योगीने विचारलं.

"महाराज, तो चांगला शिकला. त्याला शहरांत नोकरीही मिळाली. सुरवातीला दरमहा थोडेथोडे पैसे तो आम्हाला घरीं पाठवत होता. पण आम्हाला न सांगताच त्याने एका श्रीमंत घरांतल्या मुलीशी लग्न केले. तेव्हांपासून त्याची वृत्ती बदलली. आता वर्षांतून एकदा कधीतरी तो आम्हाला भेटायला येतो." देवने मनांतली व्यथा प्रकट केली.

"ठीक आहे, पण तुझ्या मुलींच्याबद्दल तू अजून कांहीच सांगितलं नाहीस!" योगीने विचारलं.

"आमच्या थोरल्या मुलीने चांगलं शिक्षण घ्यावं म्हणून आम्ही खूप प्रयत्न केले. पण तिला मुळीं अभ्यासांत गति नव्हती. सतराव्या वर्षी ती एकदम आजारी पडली. तिला वांचवण्याचा आम्ही खूप प्रयत्न केला, पण यश आले नाही. त्या दुखण्यांतच ती वारली." डोळ्यांतले पाणी पुसत देवने दुःखी स्वरांत सांगितले.



थोडा वेळ योगी स्तब्ध राहिला आणि नंतर त्याने देवला विचारलं, "आणि तुझ्या दुसऱ्या मुलीचं काय झालं?"

या प्रश्नावर जरा खुलून जाऊन देवने सांगितलं, "महाराज, केवळ तिच्यामुळें माझी पत्नी व मी जरा आनंदात आहोत. माझी धाकटी मुलगी फार छान गाते. शेजारपाजारच्या मुलांना ती संगीत शिकवते, आणि आमची दोघांची देखभाल करते."

हे उत्तर ऐकून योगीने खुषींत मान डोलावली, व देवला म्हटले, "हे बघ, तुम्ही चार मुलांना जन्म दिलात. सर्वांचे संगोपन सारख्याच प्रेमाने केलेत व त्यांना वाढवलेत. पण ती चौघेजण चार प्रकारची निघाली. यांत तुझी जेवढी जबाबदारी आहे,तेवढीच जबाबदारी कोट्यावधी माणसें निर्माण करणाऱ्या सृष्टिकर्त्याची आहे."

योगीच्या खुलाशाने देवचे कांही समाधान झालेले दिसत नाही, हे पाहून योगी पुढें म्हणाला, "तू प्रथम जी शंका प्रकट केलीस, तिचे सविस्तर उत्तर मी देतो ते ऐक. आपल्या आयुष्यांत ज्या सुखदु:खांतून आपण जातो, जयपराजय होत राहातो, त्याची अनेक कारणें असतात. जेव्हां माणसाला वाटतं कीं त्याच्या विजयाचं संपूर्ण श्रेय त्याचं एकट्याचं आहे, तसंच जेव्हां त्याचा पराजय होतो तेव्हां त्या पराजयाचं श्रेयदेखील त्याचंच असायला हवं कीं नाही? भगवान माणसांमधला भेदभाव, द्वेष, असूया बघून गप्प बसतो असं मानणं हे चूक आहे. माणसांनी केलेल्या भल्याबुऱ्या कर्मांचं फळ तो या जय वा पराजयाच्या स्वरुपांत आपल्याला परत देतो. कांही कर्मांचं फळ लगेच मिळतं, कांही कर्मांचं फळ भोगायला बराच काळ जावा लागतो. भगवानाची अमाप शक्ती किती खोल आहे ते समजून घेतलं पाहिजे, त्यांत उणीवा काढून भगवानावर दोषारोप करणं हे योग्य नाही."

हे स्पष्टीकरण ऐकून मात्र देवचे समाधान झाले. त्याने मोठ्या भक्तीभावाने योगीच्या पायांना स्पर्श करुन प्रणाम केला. योगीनेही त्याला आशिर्वाद दिला व तो आपल्या ध्यानमंदिराकडे निघून गेला.







# परोपकार

अरुणपुरांत वीरमल्ल नांवाचा एक चोर राहात होता. घरफोडी करुन व वाटसरुंना लुटून तो आपले पोट भरीत होता. पण त्याने आजपर्यंत कधीही एखादे पुण्यकर्म केलेले नव्हते.

एका रात्रीं त्याने एका घरांत चोरी करायची हे ठरवले. तो त्या घराजवळ गेला, तेव्हां घरांतले लोक जागे होते. त्यांचे बोलणें बाहेर ऐकायला येत होते. वीरमल्लने ते ऐकले. एक तरुण आपल्या आईला सांगत होता, "आई, उद्यां मला शेजारच्या गांवी जायचे आहे. म्हणून मला माझ्या वांटणीचा भात आणि मातीच्या वांटणीचा, अशा भाताच्या दोन पोटळ्या करुन दे."

आई म्हणाली, "ठीक आहे, बाळ! देईन मी." आणि मायलेक दोघेही झोंपी गेले.

हा संवाद ऐकल्यानंतर वीरमल्ल चोरी करणार होता त्याबद्दल विसरुन गेला. त्याचे मन या संवादाभोंवती घुटमळत होते. कारण त्याचा अर्थ कांही त्याला कळला नाही. पण तो समजून घेण्याची तीव्र इच्छा त्याच्या मनांत निर्माण झाली. म्हणून सकाळ होईपर्यंत तो तिथेंच थांबला. पहाटे ही मायलेक जागी झाली. मुलाने आपल्या प्रवासाची तयारी केली आणि आईने दोन गठुळीं त्याच्या हातांत दिली.

ती गठुळीं घेऊन तो तरुण आईचा निरोप घेऊन निघाला. त्याच्यामागून हा चोर वीरमल्लदेखील जाऊं लागला. चालता चालता दुपारची वेळ झाली. एका झाडाच्या सांवलीत तो तरुण बसला. वीरमल्लदेखील त्याच झाडाखाली येऊन बसला.

तरुणाने वीरमल्लला बघितले, व त्याने जवळची दोन्ही गठुळीं उघडली. एक आपल्यासमोर ठेवले आणि दुसरे वीरमल्लच्या पुढ्यांत ठेवले.

२५ वर्षांपूर्वी 'चांदोबा'त प्रसिद्ध झालेली गोष्ट

त्याचे हे वागणें पाहून वीरमल्लु आश्चर्यचकित झाला. त्या तरुणाला तो मुळींच ओळखत नव्हता, तरीदेखील कांहीएक न विचारता त्या तरुणाने वीरमल्लुच्या पुढ्यांत जेवण ठेवून दिले होते. वीरमल्लुने आयुष्यांत कधी कुणावर असा उपकार केलेला नव्हता, म्हणून त्याला ही गोष्ट फारच विचित्र वाटली.

वीरमल्लुने त्या तरुणाला विचारलं, "अरे भाऊसाहेब, माझी एक शंका आहे. ती तू दूर केलीस तरच मी तू दिलेलं हे जेवण जेवूं शकेन."

"विचारा!" त्या तरुणाने उत्तर दिलं.

"माझा आहे चोरीचा धंदा! काल रात्रीं मी तुमच्या घरांतच चोरी करायला आलो होतो. तू तुझ्या आईला रात्रीं जे सांगितलंस ते मी ऐकलं. पण त्याचा अर्थ समजावून घेण्यासाठी मी तुझ्यामागोमाग इथपर्यंत आलो आहे." चोराने सांगितलं.

हे ऐकून तो तरुण हंसतच म्हणाला, "हे पहा, मी जे जेवण जेवणार आहे, तो आहे या मातीच्या वांटणीचा भात. आणि हा तुला जो देतो आहे, तो आहे माझ्या वांट्याचा भात!"

"मला कांही हे तुझं गूढ बोलणं समजलं नाही बाबा! तू जे जेवणार आहेस ते तुझ्या वांटणीचं आहे, पण मी जे खाईन ते तुझ्या वांट्याचं कसं होईल?" वीरमल्लुने विचारले.

"मी जे कांही खातो, ते सर्व पचून जाऊन मातींत मिळतं. पण मी जे जेवण तुला दिलंय, ते पुण्यकार्याच्या रुपांत नेहमीच माझ्या पदरांत शिल्लक राहातं. तू चोऱ्या करुन पोट भरतोस ना, ते सारं खर्च होऊन जातं. पण तू दुसऱ्यांसाठी काय करतोस? स्वत:साठी तू काय राखून ठेवलं आहेस? निदान आता तरी परोपकार करायला सुरवात कर." तरुणाने त्याला समजावून सांगितले.

हे ऐकून वीरमल्लुचे डोळे उघडले. त्याने चोरीचा धंदा सोडून दिला. त्या दिवसापासून तो मेहनत करुन आपले पोट भरुं लागला. त्याखेरीज आपल्या कष्टाच्या कमाईतून इतरांना थोडीफार मदतही करुं लागला. अशा रीतीने तो आनंदाने परोपकारी जीवन जगायला शिकला.



# उतावळा

कोदंड हेलापूरचा रहिवासी होता. तो पट्टीचा पोहणारा, आणि सारं कांही झटपट करण्याचा त्याचा स्वभाव होता.

कोदंडाच्या मुलीचं लग्न झालं होतं आणि ती आता आपल्या पतीबरोबर सुगंधीपुरला सुखाने संसार करीत होती. आता कांही गोष्टी अशा होत्या कीं त्या फक्त हेलापुरीमधेच मिळत. त्या गोष्टींपैकी कांही थोड्या वस्तू खरेदी करून मुलीकडे पोंचवायच्या होत्या. कोदंडाने सर्व गोष्टी एकत्र करुन त्यांचे एक गाठोडे बांधले. आणि सुगंधीपुरला जाण्यासाठी तो नदीकिनाऱ्यावर गेला. तिथें पोंचल्यानंतर त्याला दिसलं कीं नावेंत लोक दाटीवाटीने बसले आहेत आणि नाव बरीच दूर गेली आहे.

जर त्याने त्या नावेपर्यंत जायचे ठरवले तर त्या वस्तूंपैकी कांहीही खराब झाल्या नसत्या. त्याने ठरवलं कीं कसंही करुन त्या नावेपर्यंत पोहत जायचं आणि त्यांत चढून पुढे सुगंधीपुरला जायचं. त्याने आपले धोतर व सदरा पागोट्यांत गुंडाळला, ते गाठोडे आपल्या डोक्यावर घेतले आणि तो नदींत उतरला. झपाट्याने पोहत पोहत तो नावेपर्यंत पोंचला.

त्याचा अंदाज ठीक होता तो नावेंत चढला. त्याच्यासमोरच शरद बसला होता त्याने चकित होऊन विचारले, ''अरे, नावेपर्यंत यायला तू इतका उतावळेपणा कशाला केलास? नाव तर नदीकांठाला येणारच होती. किनाऱ्यावर तर आत्ता प्रवाशांची गर्दी नसते. सुगंधीपुरला जायला तुला नक्की जागा मिळाली असती कीं!''

तेव्हां कोदंडाला समजलं कीं नाव सुगंधीपुराहून परत हेलापूरला येत होती. आणि ती नंतर पुन्हां सुगंधीपुरला जाणार होती.

- धनीराम







# माया सरोवर

## 17

*(जेव्हां मायासरोवरेश्वर नरभक्षक लोकांच्या हातांत पडतो, तेव्हां सिद्धसाधक तिथे पोंचतो. आपल्या मालकाचे रक्षण करताना सिद्धसाधकाचे सेवक जलवृक राक्षसाला जखमी करतात. नरभक्षक लोक जेव्हां त्यांना पकडतात, त्यावेळीं कांही घोडेस्वार तिथे पोंचतात. त्यानंतर ...)*

जसा सिद्धसाधकाने आपला शूळ माया-सरोवरेश्वराच्या छातीवर टेकवला, तसा तो भीतीने थरथर कांपत उठला नि म्हणाला, ''हा तर अधर्म आहे. कोणताही वीर आपल्या शत्रूला बेसावध पाहून त्याला मारण्याचा प्रयत्न कधीही करीत नसतो.''

दुसऱ्याच क्षणीं सिद्धसाधकाने आपला शूळ भूमीवर टेकवला आणि तो म्हणाला, ''मी एक सामान्य वीर नाही, मी महावीर आहे. तू तुझी तलवार बाहेर काढ. मला तुझा पराक्रम पाहायचा आहे.''

यावर मायासरोवरेश्वराने आपला अनुचर मकरकेतू, याच्याकडे बघितले. तितक्यांत घोडेस्वारांचा नायक त्यांच्यासमोर येऊन घोड्यावरुन खाली उतरला.

सिद्धसाधक संतापून उठला नि त्याच्याकडे बघत गरजत म्हणाला, ''कोण आहेस तूं? आमच्या भांडणांत तू उगीच कां मधें पडतो आहेस?''

उत्तरादाखल तो नायक उपहासाने हंसला, परंतु नरवानर आणि जलग्रहाला पाहून तोही



भांबावला. त्याने नरमाईच्या सुरांत म्हटले, "यापूर्वी मी तुला सूचना दिली होतीच, तेव्हां मला वाटलं कीं मी कोण आहे आणि मला कुणी पाठवलंय हे तुला समजलंच असेल."

"तुझी सूचना मला नीट ऐकू आली नाही. माझा शत्रू मायासरोवरेश्वर हा पळून जाऊं नये या प्रयत्नांत मी होतो. आता सांग, या घोड्यांच्यावर नि खेचरांवर स्वार झालेले तुम्ही कोण आहात?" सिद्धसाधकाने विचारले.

घोडदळाच्या नायकाने सिद्धसाधकाला आपादमस्तक न्याहाळले, व म्हटले, "अरे, तू होय? तू सिद्धसाधक ना? कांही दिवसांपूर्वीच तर तू हिरण्यपुरांत स्मशानाच्या पहारेकऱ्याचा शिरच्छेद केला होतास ना? त्या अपराधाबद्दल तू व आणखी एकजण आमच्या राजासमोर आणले गेले होते? बरोबर आहे ना?"

"तू तर मला ओळखतोस. पण मला कांही तुझं नांव आठवत नाही." सिद्धसाधक म्हणाला.

"माझं नांव वीरसेन आहे. पण आधी मला सांग कीं कनकाक्ष महाराजांच्या मुलांच्या शोधांत तुमच्याबरोबर होता, तो तरुण जयशील आहे तरी कुठे?" वीरसेनने विचारलं.

"हंसाच्या रथांत बसून तो आकाशांत कुठेतरी विहरत असेल. ठीक आहे. तू जरा बाजूला हो. वीरासारख्या बढाया मारणाऱ्या या जलमानवाला मला नष्ट करायचे आहे." असं म्हणून सिद्धसाधकाने पुन्हां आपला शूळ वर उचलला.

"मला इथें खून-मारामारी चालणार नाही" या शब्दांबरोबरच वीरसेनने आपल्या घोडेस्वारांना खूण केली.

ते तलवारी घेऊन सिद्धसाधकाच्या दिशेने पुढें सरसावले. तेवढ्यांत सिद्धसाधकाने चारी बाजूंना एकवार नजर टाकली व वीरसेनला म्हटले, "आमच्या चारी बाजूंना अनेक दिवस उपासमार झालेले नरभक्षक लोक विखुरलेले आहेत. त्यांच्या मनांत आलं तर ते तुम्हा सर्वांना केव्हांही मारुन टाकतील. त्यांत त्यांना फायदा आहे आणि आपले नुकसान आहे."

"मला ते कांही एक सांगू नकोस. इथून थोड्याच अंतरावर कनकाक्ष राजाचा तळ आहे. तुम्ही सर्वजण तिथें या. तिथें काय तो निर्णय घेता येईल." वीरसेनने सांगितलं.

सिद्धसाधक वीरसेनकडे रागाने बघत



म्हणाला, "ही तुझी आज्ञा समजायची कीं विनंती? मी महांकाल सोडून इतर कुणाचीच आज्ञा पाळत नसतो."

आपला मालक घोडदळाच्या नायकावर नाराज झाला आहे हे जलवृक राक्षसाच्या लक्षांत आलं. त्याने आपली गदा खांद्यावर घेतली आणि जमिनीवर पाय आपटत मोठ्याने आरोळी ठोकली. नरवानराने पाठोपाठ जोरदार किंकाळी मारली, त्याने सारे अरण्य थरारले. त्या विकृत आकृतीवाल्यांना पाहून व त्यांचा आवाज ऐकून एक घोडा बिथरला. आणि आपल्या मागल्या दोन पायावर उभा राहिला. त्यामुळें त्याचा स्वार खाली पडला आणि घोडा उधळून दूर लांब पळाला.

हे पाहून वीरसेन घाबरुन सिद्धसाधकाला आदरपूर्वक म्हणाला, "महाराज, आपणदेखील माझ्याप्रमाणेच हिरण्यपुरचे नागरिक आहात. आपण महाराजांचे दर्शन घ्यायला कां चलत नाही?"

सिद्धसाधकाला फारच आनंद वाटला व तो म्हणाला, "तू सांगितलंस ते अगदी योग्य आहे. चला, मीही महाराजांकडे येतो. पण आमच्या बरोबर या नरभक्षकांना आणि सरोवराच्या दुष्टांनादेखील आपण न्यायला हवं." परंतु मायासरोवरेश्वर आणि मकरकेतु तिथें आसपास दिसेनात. त्याने गोंधळून जाउन विचारले, "हे दुष्ट लोक कुठे पळाले?"

त्याबरोबर सारे नरभक्षक एकदम हंसायला लागले. त्यांचा नायक शेरसिंह आणि म्हातारा



पुजारी गणाचारी पुढें येऊन सिद्धसाधकास म्हणाले, "जेव्हां तुम्ही आणि हे घोडेस्वार भांडत होतात, तेव्हां संधी साधून ते दोघे मुकाट्याने अरण्यांत घुसले. त्यांना पकडायला आमचे कांही जातभाई त्यांचा पाठलाग करीत गेले आहेत."

"ते पळून जात होते तेव्हां तुम्ही मला सांगितलं कसं नाहीत? ते सांपडेपर्यंत तुम्ही दोघे आमच्या ताब्यांत कैदी राहाल, समजलं?" असं म्हणून सिद्धसाधकाने जलवृक राक्षसाला आदेश दिला, "जलवृक! या दोघांना घेऊन जा आणि एका घोड्यावर दोरीने बांधून टाक."

विजेच्या चपळाईने जलवृकने शेरसिंह आणि गणाचारी यांना पकडले. घोड्यावरचा एक स्वार खाली उतरण्यापूर्वीच त्याने त्याला मागच्यामागे पकडून दूर फेकले आणि या दोघांना घोड्याच्या पाठीवर बांधून टाकले.



त्यानंतर सिद्धसाधक वीरसेनला म्हणाला, "तुम्ही पुढें होऊन आम्हाला मार्ग दाखवा. आपण सारेजण कनकाक्ष महाराजांचे दर्शन घेऊं" असं म्हणून साधकाने नरवानराला पुकारले.

घोडदळाच्या नायकाने आपल्या साथीदारांना राजाच्या तळावर जायचा आदेश दिला. त्यांच्यामागून नरवानरावर स्वार झालेला सिद्धसाधक चालूं लागला. त्याच वेळीं अरण्यांतल्या दुसऱ्या एका जागी हंसाच्या रथांत बसून जाणाऱ्या जयशील व त्याच्या मित्रांना भीतीने पळणारी एक तरुणी दिसली. एका वाघापासून आपला प्राण वांचवण्यासाठीं ती झाडांच्या फांद्यांनी धरुन वर चढण्याचा प्रयत्न ती करीत होती.

हंसाच्या रथांत बसलेल्या वैद्यदेव देवशर्माने ते दृश्य सर्वांच्या आधी पाहिले. क्षणभर त्याचाही भीतीने थरकांप झाला. शेजारीच बसलेल्या जयशीलचा खांदा पकडून त्याला हालवत तो म्हणाला, "जयशील! वाघ मागे लागलाय बघ त्या तरुण मुलीच्या! तीच कांचनमाला आहे. मायासरोवरेश्वराच्या सेवकांनी अपहरण केलेली हीच कनकाक्ष राजाची मुलगी! आता काय करायचं ते सांग!"

तो प्रदेश उभा राहून जयशील नीट न्याहाळूं लागला व सारथ्याला म्हणाला, "हे बघ, रथ चटकन खाली उतरव!"

अंगरक्षकाने खाली वांकून बघितले. तिथले विशाल वृक्ष पाहात तो उद्गारला, "छे, छे, महाराज! इथें रथ उतरवणें अशक्य आहे. जरा पुढे जाऊन मग मोकळ्या मैदानांत रथ खाली उतरवतो."

जयशील चिडून त्याला म्हणाला, "अरे मूर्खा, रथ सुरक्षित जागी नेऊन उतरवायचा हे म्हणणं ठीक आहे. पण तोपर्यंत राजकुमारी वाघाच्या तोंडी सांपडेल. चटकन रथ थोडा खाली वळव. मी झाडांच्या फांद्यांत उडी मारतो आणि राजकन्येला वांचवण्याचा प्रयत्न करतो."

जयशीलचा आदेश पाळण्यासाठीं अंगरक्षकाने हंसांच्या गळ्यांत बांधलेली दोरी किंचित खेचली आणि रथ खाली वळवला. झाडांच्या शेंड्याजवळ हंसांनी रथ खाली आणला. जयशीलने वेळ न घालवता रथांतून उडी मारली आणि दोन्ही हातांनी एक उंच फांदी घट्ट पकडली. पण त्याच्या वजनाने ती फांदी काडकन् तुटली व खाली पडली.

झाडाची फांदी जमिनीला टेकताच जयशीलने आपले हातपाय फांदीखाली अडकून तुटूं नयेत म्हणून कोलांटी उडी मारुन त्याने आपले रक्षण केले. कांचनमालेचा पाठलाग करणारा वाघदेखील त्या आवाजाने बिचकला आणि त्याने मागे वळून पाहिले. त्या संधीचा फायदा घेऊन कांचनमालेने जवळचीच एक फांदी पकडली आणि त्यावर ती झोके घेऊं लागली. तेवढ्यांत वाघाने एक डरकाळी ठोकली व तिच्या दिशेने तो जाऊं लागला. तलवार उपसण्याइतका जयशीलला वेळ नव्हता, म्हणून त्याने जोराने पळत जाऊन त्या वाघाचे मागचे दोन पाय पकडले आणि त्याने जोर करुन ओढत त्या वाघाला दूर फेंकून दिले.

ज्या झाडावर कांचनमाला चढली होती, ती फांदी आता वाऱ्याने झुलायला लागली. जयशीलला पाहून ती म्हणाली, "महाराज, आपण वेळेवर येऊन मला वाचवलंत, मी आपले आभार कोणत्या शब्दांत मानूं?"

तिचे सौंदर्य पाहून जयशील मंत्रमुग्ध झाला. इतक्या संकटांशी सामना करीत इतके दिवस झाल्यानंतर कां असे ना, पण शेवटी त्याने कांचनमालेला शोधून काढले; पण तिचा भाऊ कांचनवर्मा कुठे आहे? त्याला प्रश्न पडला.

जयशीलने तिला विचारले, "तुझं नांव कांचनमाला आहे हे मला माहीत आहे. तू कुठल्या देशाची राजकन्या आहेस हेही मला ठाऊक आहे.



पण तुझा भाऊ कांचनवर्मा कुठे आहे? हंसांच्या रथांतून खाली पडून तू आपले प्राण कसे वांचवलेस?"

जयशील तिच्याशी बोलत होता तितक्यांत ती झाडाच्या फांदीवरुन झुलत खाली उतरली. या साहसी आणि सुंदर तरुणाला माझी माहिती कशी मिळाली असावी याबद्दल तिला आश्चर्य वाटले. ती हळूं आवाजांत म्हणाली, "महाराज, सुदैवाने मी रथांतून जेव्हां खाली पडले तेव्हां एका ओढ्यांत पडले म्हणून वांचले. माझ्याबरोबर रथांत असलेला मायासरोवरेश्वर व त्याचा सारथी याच जंगलात कुठेतरी असतील. माझा भाऊ मात्र सध्यां मायासरोवरेश्वराच्या महालांत कैदी आहे."

त्यावर जयशील म्हणाला, "मायासरोवरेश्व-राच्या बाबतींत मला थोडीफार माहिती आहे.








त्याचे सेवक सर्पनख आणि सर्पस्वर यांच्या शिवाय आणखी एका प्रमुख व्यक्तीबरोबरदेखील माझा परिचय झाला आहे. आता तुझ्या भावाला मला मायासरोवरांतून मुक्त केलं पाहिजे. तिथें जाण्याचा मार्ग तुला कदाचित माहिती असेलही, पण प्रथम आपण इथेंच आजूबाजूला कुठेतरी असणारा माझा मित्र सिद्धसाधक याला भेटलं पाहिजे.''

हे ऐकून कांचनमाला जयशीलच्याबरोबर जायला तयार झाली. जयशीलने फेंकल्यामुळें वाघाची कंबर दुखावली होती व तो थोडा वेळ बेशुद्ध पडला होता, तो आता शुद्धीवर आला. तो उठला आणि दांत विचकून त्याने जोराने डरकाळी फोडली. पण उठण्याच्या प्रयत्नांत तो पुन्हां धबकन खाली पडला.

जयशीलने तलवार उपसली आणि वाघाच्या दिशेने जात तो कांचनमालेला म्हणाला, ''कितीही भयंकर जनावर असले तरी त्याला जखमी अवस्थेंत तसेच तडफडत सोडून जाणें योग्य नसते. मी आत्ताच याचे मस्तक छाटतो.''

''किती भयंकर वाघ आहे हा! तुम्हाला यायला थोडा जरी उशीर झाला असता तर याने मला मारुन खाल्ले असते.'' कांचनमाला असं बोलत जयशीलच्या पाठोपाठ वाघाजवळ आली.

जवळच्या घनदाट अरण्यांत लपलेला आणि जलग्रहावर बसलेला मायासरोवरेश्वर, जवळच घोड्यावर स्वार झालेल्या मकरकेतुला म्हणाला, ''जयशीलला बंदी बनवण्यासाठी ही एक उत्तम संधी आहे. तू लगेच कमळांच्या देंठाच्या दोरीचा फांस त्याच्या गळ्यांत पडेल असा फेंक.''

''महाराज, हा जयशील एक महा चतुर वीर आहे. त्याच्याशी वैर धरणं आपल्याला महागांत पडेल.'' मकरकेतूने समजावलं आणि त्याचा चेहरा रडवा दिसूं लागला.

''छी! मित्रा कुठला!'' असं रागावून म्हणत मायासरोवरेश्वराने मकरकेतूच्या हातांतून एक बळकट दोरी ओढून घेतली, जलग्रहाला त्याने पुढे काढले, आणि त्या दोरीचा फांस करुन दोनतीन वेळा हवेंत फिरवला आणि जयशीलच्या मानेच्या दिशेने फेंकला. (क्रमशः)



वेताळ कथा

# विद्यावान

निश्चयी विक्रमार्क पुन्हां झाडाजवळ आला. त्याने प्रेत खाली उतरवून आपल्या खांद्यावर घेतले. आणि निमूटपणें तो स्मशानाच्या दिशेने चालूं लागला, तेव्हां प्रेतांत लपलेला वेताळ म्हणाला, ''राजन्, तुझ्या धैर्याची कमाल आहे. मला कौतुक वाटतं, पण तू हे सारं कशासाठी करतो आहेस? मध्यरात्रीं या भयंकर अरण्यांत तू हे साहस कां करतो आहेस? तुला सावध करण्यासाठी मी आत्तापर्यंत अनेक घटना, कहाण्या तुला सांगितल्या, पण तुझा हट्ट कायमच आहे.

आज मी तुला गोविंदची कहाणी सांगतो. त्याच्यांत कर्तव्यतत्परता मुळींच नव्हती. गुरुजींची सेवासुश्रूषा करुन विद्या शिकावी तर त्याला सहनशक्ती नव्हती. मात्र तो जन्मतःच बुद्धिवान,



झाली तरी तो घाबरुन जाई, त्याचे हातून समस्येचे निराकरण नीट होत नसे. तुझ्या हातूनदेखील अशीच चूक होईल कीं काय ही मला भीती वाटते. या गोष्टींतून तू बोध घे व स्वतःमधे सुधारणा कर. म्हणून ही गोष्ट लक्षपूर्वक ऐक'' आणि वेताळाने पुढील गोष्ट सांगितली.

गंगेच्या कांठी कपिलपुरांत गोविंद नांवाचा एक तरुण मुलगा राहात होता. तो मोठा तरतरीत व प्रफुल्लित असे. सर्व लोकांना वाटायचं कीं कोणतीही विद्या हा चटकन आत्मसात करील. जोरांत न पळतादेखील तो कित्येक कोस चालत जाऊं शकत असे, त्याचा नेम अचूक होता, बाण मारण्यांत तो कुशल होता. नदीला पूर आला असला तरी तो धिटाईने पैलतीरीं जायचे धाडस करीत असे. हे सारं करीत असताना तो शेतांत वडिलांना व घरकामांत आईलाही भरपूर मदत करीत असे. ''हा मुलगा फारच चलाख आहे. त्याला राजवरच्या राजशेखरकडे पाठवलं तर त्याची बुद्धि आणखीनच चतुरस्त्र होईल.'' गोविंदच्या वडिलांना गांवांतल्या कांही मान्यवर मंडळींनी सांगितलं.

''ते कलाविद्यांत पारंगत आहेत, एक महान पंडित आहेत. त्यांच्या विद्यार्थी शिकून तयार झाला कीं राजा बनण्याच्या योग्यतेचा होतो.'' वडिलांनी उत्तर दिलं. ''जर ते इतके ज्ञानी व कलानिपुण आहेत तर ते स्वतःच राजा कां बनत नाहीत?'' गोविंदने बेतालपणे प्रश्न केला. ''असं बोलूं नकोस. राजशेखरांना हवं असतं तर ते केव्हांच राज्य कारभार हाती घेऊं शकले असते. त्यांचं म्हणणं असं कीं विद्यादान हा त्यांचा धर्म आहे आणि ते तो निष्ठापूर्वक पाळतात. त्याचबरोबर नित्यनव्या गोष्टी शिकायला ते सदैव तयार असतात. त्यांच्या तोडीचा माणूस दुसरा झाला नाही असं लोकांचं म्हणणं आहे. कांही काळ तू त्यांचा शिष्य होऊन त्यांच्याकडून शिक्षण घ्यावंस असं माझं मत आहे.'' गोविंदच्या पित्याने त्याला समजावीत म्हटले.

पण गोविंदला ते पटले नाही. तो म्हणाला, ''कांही विद्यांचे शिक्षण घेणे हे आयुष्याचे ध्येय असते. आरामांत जीवन कंठायला पैसा जवळ हवा! जमेल तितकी इतरांना मदत करायला हवी. जन्मभर शिकत बसण्याची मला कांही हौस नाही.''

''ज्याला शिकण्याची शक्ती व सामर्थ्य आहे तो जन्मभर शिकत राहिला तरी त्यांत कांही चूक नाही. ती शक्ती व सामर्थ्य तुझ्यांत आहे कीं नाही ते तूच ठरव आणि निर्णय घे.'' एवढं बोलून गोविंदचा पिता गप्प बसला.

गोविंदच्या उत्साहाला भरते आले व स्वतःबद्दलचा त्याचा अहंकार जागृत झाला. राजशेखरपेक्षां तो कोणत्याही विद्येत कमी नाही असा त्याचा ठाम समज होता. तर मग आपण राजशेखरचा शिष्य कशासाठी व्हायचं?

गोविंदला वाटलं कीं राजशेखरला न येणारी एखादी विद्या जर आपण शिकली तरच आपले श्रेष्ठत्व नागरिक मान्य करतील. म्हणून तो नव्या कलाविद्यांचा शोध घेऊं लागला. आसपास सावध नजरेने निरीक्षण करुं लागला. त्यावेळीं एक विचित्र घटना घडली.

गोविंदच्या गांवालगत एक मोठी आमराई होती. त्या बागेच्या मध्यावर आंब्याच्या झाडासारखे दिसणारे एक झाड होते. पण त्याची फळें दिसायला बोरासारखी आणि चवीला कारल्यासारखी कडूजहर होती. ते झाड कित्येक वर्षे तिथें होते.

एके दिवशी गोविंदने एक माकड आमराईत शिरताना पाहिलं. गोविंदने त्याचा पाठलाग केला. त्या मधल्या झाडाजवळ माकड येऊन धांपा टाकीत तिथेंच थांबलं. त्याने त्या झाडाचं एक फळ खाल्लं. झालं, त्याचा उत्साह दुणावला, आणि भराभर झाडांवर उड्या मारीत ते नजरेआड झालं. तोपर्यंत बागेचा रक्षकही तिथें आला होता. हे दृश्य पाहून त्याला तर वाटलं कीं हे साधंसुधं माकड नसून प्रत्यक्ष हनुमानच आहे. त्याने डोळे मिटून भक्तीभावाने वंदन केले.

पण गोविंदाने मात्र तसं केलं नाही. त्याने हे तर्काच्या कसोटीवर पारखून घेतलं. त्या झाडांत नक्कीच कांहीतरी वेगळी शक्ती आहे. कडू होतं तरीदेखील त्याने ते फळ खाल्लं. त्याच्या शरीरांत कांहीतरी वेगळी शक्ती त्याला जाणवूं लागली. परंतु प्रयत्न करुनदेखील त्याला उंचावर उडता येईना. तरीही तो निराश झाला नाही. त्याचा आपला प्रयत्न





त्याने तसाच चालू ठेवला. तो दमला नि धांपा टाकूं लागला.

एकाएकीं गोविंदला आठवलं कीं माकड दमून जेव्हां धांपा टाकीत होतं, तेव्हांच त्याने एक फळ खाल्लं, आणि एकदम उड्या मारीत ते नाहीसं झालं. गोविंदने लगेच आणखी एक फळ तोडलं नि खाल्लं. दुसऱ्याच क्षणीं त्याला आपले शरीर हलके होते आहे असं लक्षांत आलं. त्याने उडण्याचा प्रयत्न केला आणि कांही प्रमाणांत तो सफलदेखील झाला. आजपर्यंत तो इतक्या उंचावर कधीं उडला नव्हता किंवा कधीं इतक्या लांबवर उडीही त्याने मारलेली नव्हती.

गोविंदला अत्यानंद झाला. माकडापेक्षां जास्त लांब उडी आता माणूस शिकला होता. त्याला वाटलं कीं रामायणकाळांत हनुमानाने असलेच फळ खाल्ले असेल आणि समुद्र पार केला असेल.

आपल्या या नव्या विद्येचं प्रदर्शन गोविंद गांवामधे करुं लागला. मात्र आमराईतल्या त्या झाडाबद्दलचं रहस्य मात्र त्याने कुणालाही सांगितलं नाही. त्याला उडताना व लांब उडी मारताना पाहून लोक आनंदाने टाळ्या वाजवीत असत. गांवांत त्याची भरपूर प्रसिद्धी झाली आणि हे अद्‌भुत प्रदर्शन पाहायला बाहेरगांवांतूनदेखील लोक येऊं लागले.

एकदा गोविंद आपल्या वडिलांना म्हणाला, "मी इतक्या कमी वेळांत ही नवी विद्या शिकली आहे. राजशेखरला बहुतेक ही विद्या माहीत नसावी! म्हणून आता याच्यापुढें त्यांचा शिष्य मी बनावे हा आग्रह तुम्ही धरुं नका."

या नव्या कलेचा गोविंदला फार आनंद झाला होता. पण त्यापेक्षांही राजशेखरला माहीत नसलेली ही कला आपल्याला येते आहे याचाच गर्व अधिक होता. एक दिवस एक वडीलधारे गृहस्थ गोविंदची चौकशी करीत त्या गांवी आले.

गोविंदने स्वतःच आपला परिचय करुन दिला व विचारले, "आपण कोण ते मला कृपया सांगाल कां?"

"माझं नांव राजशेखर. आपण ज्या विद्येचे प्रयोग करता त्याबद्दल मी बरंच ऐकलं आहे. ही विद्या शिकण्यासाठी व आपला शिष्य बनण्यासाठीं मी इथें आलो आहे."

गोविंदने चकित होऊन त्यांना विचारले, "आपण राजशेखर आहात? आपण तर साऱ्या कलाविद्यांमधे पारंगत आहात असं सर्वजण म्हणतात. आपल्याला येत नाही अशी कोणतीही विद्या नाही. आणि ही एक विद्या शिकायला आपण माझ्याकडे आलात? इतक्या विद्यांमधे निपुण



असताना ही नवी विद्या शिकण्याची काय गरज आहे?

कीं मला येत नाही अशी कोणतीही विद्या नाही हे जाहीर करायला आणि आपला अहंकार कुरवाळण्यासाठी म्हणून तुम्ही आला आहात?"

"बाळ, माझ्यांत अहंकार असता तर मी तुमचा शिष्य होण्यासाठीं कशाला आलो असतो?" राजशेखर म्हणाले.

पण या उत्तराने गोविंदचे समाधान झाले नाही. तो म्हणाला, "मग नवी विद्या कशासाठी शिकणार? आपल्यालाही लोकांचे मनोरंजन करुन या विद्येतून पैसे मिळवायचे आहेत कां?"

"विद्यावानाला पैशाचा मोह नसतो व नसावाही! मी या विद्या स्वतःसाठी शिकलो नाही. आपली ज्ञानसंपदा भावी काळांतल्या पिढ्यांपर्यंत पोंचवावी, या हेतूने मी या विद्यांची, कलांची माहिती देणारा ग्रंथ लिहीतो आहे. आपले ज्ञान आपल्याबरोबर संपू नये, म्हणून मी हे संकलन करतो आहे." राजशेखर म्हणाले.

यावर गोविंदने कुत्सितपणें टोमणा मारीत म्हटले, "हे पहा, माझ्या या विद्येमुळें मानवदेखील माकडासारखा उड्या मारीत दूर जाऊं शकतो. या विद्येचा अंत जरी माझ्याबरोबरच झाला तरी या जगाचे त्यामुळें कोणते असे नुकसान होणार आहे?"

"आहे तर! मासा पाण्यांत पोहतो, पण जमिनीवर आल्यावर तो तडफडून मरुन जातो. हिमालयांतली अस्वलें, वाळवंटात क्षणभरदेखील राहूं शकणार नाहीत. पण मानवाचं तसं नाही. त्याला पाण्यांत पोहायला शिकलं पाहिजे, हवेंत



उडता आलं पाहिजे. वातावरणांतल्या अनेक प्रकारच्या संकटांशी त्याला लढायची वेळ येते, अनेक अडचणींना समोरं जावं लागतं, सोसावं लागतं! म्हणून तर परमेश्वराने मानवाला बुद्धिमत्ता दिली. आता आपल्याच नव्या विद्येबद्दल पहा. या विद्येच्या मदतीने नदी ओलांडता येईल, आगीच्या ज्वाळांत अडकलं तर आपले संरक्षण करता येईल. प्रत्येक विद्येचं कांहीतरी प्रयोजन असतं. आवश्यकता असेल तिथे तिचा उपयोग मानव करुं शकतो. या विद्या ग्रंथरुपांत जतन करणें, त्यांचा प्रचार करणें हे विद्यावंतांचे कर्तव्य आहे." राजशेखरने गोविंदला सविस्तर सांगून समजावले.

राजशेखरचे हे स्पष्टीकरण ऐकल्यावर गोविंदने दोन्ही हात जोडून त्यांना वंदन केले व म्हटले, "आपण मला क्षमा करा. मी आपल्या बरोबर येईन, आपला शिष्य बनेन व स्वतःचे ज्ञान वाढवीन.

आणि नंतर ही जी विद्या मला येते आहे, ती मी गुरुदक्षिणा म्हणून आपल्याला अर्पण करीन. मला आपला शिष्य मानून माझ्यावर कृपा करा.''

वेताळाने ही गोष्ट सांगितल्यानंतर विक्रमार्काला विचारलं, ''राजन्, गोविंद कोणत्याही गुरुचा आजवर शिष्य नव्हता. गुरुशिवाय त्याने आपली बुद्धि, कौशल्य व चिकाटी यामुळे एक असाधारण विद्या शिकली. त्या विद्येचे महत्व त्याला राजशेखरने समजावून सांगितले, तिची उपयुक्तता त्याला पटवून दिली. तरीदेखील गोविंदने आपले वैशिष्ट्य विसरुन राजशेखरची माफी मागितली व आपल्याला शिष्य म्हणून स्वीकारावे यासाठी त्यांची विनवणी केली. हे सगळं अनुचित, असंगत, अनावश्यक व अविचारी वाटतं, नाही कां? त्याने शिकलेल्या नवीन विद्येमुळें गोविंद राजशेखरच्या बरोबरीचा आहे व देशांतल्या विद्यावंतांमधे त्याचंही एक उच्च स्थान आहे, हे तो सिद्ध करुं शकला असता! हातांत आलेली ही सोन्याची संधी त्याने घालवली. माझ्या या शंकांचं उत्तर माहीत असूनही जर तू मौन पत्करलेस तर लक्षांत ठेव, तुझ्या मस्तकाची शकलें होतील.''

विक्रमार्क म्हणाला, ''गोविंद अहंकारी आहे हे त्याने वडिलांना सुरवातीला जी उत्तरें दिली त्यावरुन स्पष्टच दिसून येतं. त्याच्या वागण्याची पद्धत ही जरा उद्धट आहे; परंतु राजशेखरने त्याच्या प्रश्नांना दिलेली उत्तरें ऐकून त्याच्या लक्षांत आलं कीं तो फक्त त्या एका नव्या कलेंत निपुण आहे. तो हुशार व तरतरीत आहे, व कुशाग्र बुद्धीचा आहे, हे खरं! म्हणूनच त्याच्या लगेच लक्षांत आलं कीं त्याच्यांत अहंकाराचे प्रमाण जरुरीपेक्षां जास्त आहे. त्याला येत असलेली विद्या हीच त्याच्या दृष्टीकोनांतून महत्वाची होती.

राजशेखर त्या श्रेणींतला नव्हते. ते विद्यावान व पंडितांच्यापेक्षांही वरच्या श्रेष्ठ पातळींतले होते. ते ज्ञानी व योगी आहेत. हे ध्यानांत आल्याबरोबर गोविंदने त्यांची क्षमा मागितली. म्हणून हे मुळींच अवास्तव किंवा असंगत नाही.''

राजाचे मौन भंग करण्यांत सफल झालेला वेताळ शवासहित गायब झाला आणि पुन्हां झाडावर जाऊन बसला.

***(कल्पना राव यांची रचना)***





# खरी गोष्ट तर ही आहे!

लक्ष्मीपती आणि गौरीपती शेजारी होते. लक्ष्मीपती खूप श्रीमंत होता. त्याला कसलीही चिंता नव्हती. त्याचे आयुष्य आरामशीरपणें चाललेले होते. पण गौरीपतीची स्थिति अगदी उलट होती. तो गरीब होता. कुटुंबही बरेच मोठे होते. तो नेहमी चिंताग्रस्त असायचा. पण इतक्या अडचणी व काळज्यांचा डोंगर असतानादेखील तो दरवर्षी आपला वाढदिवस मोठ्या हौसेने साजरा करायचा, ओळखीच्या लोकांना मिठाई देखील वांटायचा.

एकदा गौरीपती आपल्या वाढदिवसाची मिठाई जेव्हां वांटायला लागला, तेव्हां त्याच गल्लींत राहात असलेल्या रामनाथने म्हटले, ''गौरीपती, माझी एक छोटीशी शंका आहे. मी विचारलं तर तू रागावणार नाहीस ना?''

गौरीपती म्हणाला, ''विचार कीं! मी कशाला रागवेन?''

''तुझा शेजारी लक्ष्मीपती सधन आहे आणि आरामांत राहातो. पण तो कधी स्वतःचा वाढदिवस साजरा करताना आपण पाहिलं नाही, ऐकलं नाही. तुझ्या घरांत अनंत अडचणी आहेत, तरीदेखील तू किती आनंदाने तुझा वाढदिवस दरवर्षी उत्साहाने साजरा करतोस; हे मला थोडं विचित्र वाटतं बघ!'' रामनाथने विचारलं.

त्याच्या या बोलण्यावर गौरीपतीने हंसत हंसत उत्तर दिले, ''यांत विचित्र काय असायचं? लक्ष्मीपती आपला वाढदिवस कधी साजरा करीत नाही, कारण आरामांत चाललेल्या त्याच्या जीवनांतलं एक वर्ष संपलं याचं त्याला दुःख होतं! आता माझे बघ! माझं आयुष्य अडथळ्यांची एक शर्यतच आहे. अशा कठीण जीवनांतलं एक वर्ष कमी झालं याचा मला खूप आनंद होतो. म्हणून मी दरवर्षी माझा वाढदिवस हौसेने साजरा करतो. खरी गोष्ट ही अशी आहे!''

*– करुणाकर*





# मायलेक

विजय दोन वर्षांचा असताना त्याचे वडील वारले. त्याच्या आईने, सरस्वतीने त्याला खूप लाडाकोडांत वाढवले होते. तो पांच वर्षांचा झाला तेव्हां गांवातले महापंडित विष्णुशर्मा यांच्याकडे त्याला विद्याभ्यासासाठीं पाठवले. त्यांच्याकडे विजयने पांच वर्षे शिक्षण घेतले. त्याला आता अभ्यासाचा कंटाळा येऊं लागला. तो आईला म्हणाला, "तू इतके कष्ट करतेस ते मला पाहावत नाहीत. मी कुठेतरी काम धरीन आणि थोडेफार पैसे कमावीन."

आई म्हणाली, "बाळा, तुझं हे वय आता अभ्यास करण्याचं, शिकण्याचं आहे. तुला दुसरं आणखी कांही शिकायची इच्छा असेल तरी एखाद्या व्यवसायाचं शिक्षण घे. माझी चिंता करुं नकोस. आत्तापासून जर तुझं लक्ष पैसे मिळवण्याकडे लागलं तर आयुष्यांत तुला दुसरं कांही मिळवता येणार नाही. आणि तसं केलंस तर मला फार वाईट वाटेल."

आईचे मत विजय टाळूं शकला नाही. त्याने इतर कांही कुशल कलावंतांची मदत घेतली व त्यांचे शिष्यत्व पत्करले. त्यांच्या घरी राहून त्याने त्या कलांचे शिक्षण घेतले. एकीकडे गुरुजींची सेवासुश्रूषादेखील केली पांच वर्षांच्या काळांत त्याने खूपच प्रगती केली. त्याची बुद्धिमत्ता व कला पाहून एका शिल्पकाराने सांगितलं, "तू शिल्पी कां होत नाहीस? माझा एक मित्र इथून जरा दूरवर राहातो. त्याच्याकडे शिकलास तर पुढे संपत्ती व कीर्ती, दोन्हीही मिळतील!"

विजयने हे आईला सांगून म्हटलं, "ही एक नामी संधी आलीय. तुला एकटीला सोडून जाणं माझ्या जिवावर आलंय, पण दुसरा उपाय नाही."

सरस्वतीने मुलाला समजावले, "तू माझ्याजवळच राहावंस असं मला वाटतं. मला पैशाचा लोभ नाही. हे गांव सोडून जायचा विचार सोडून दे! तुझ्यांत गुण आहेत, कौशल्य आहे, तेव्हां संधी पुन्हां तुझ्या दारांत येऊन उभी राहील बघ!"

विजयला आईचे ऐकावे लागले. आणखी पांच वर्षे त्याने व्यावसायिक शिक्षण घेतले, भरपूर मेहनत केली व तो आता एक कुशल तंत्रज्ञ झाला. पण कधीकधी त्याला ती चांगली संधी गमावल्याचे दुःख होत असे.

त्यावेळीं त्या गांवात धनवर्मा व्यापारी शेंगदाणे खरेदी करायला आला. योगायोगाने त्याची विजयशी भेट झाली. त्याला बुद्धिमान व तरतरीत विजय आवडला. धनवर्माने त्याला विचारले, "हे बघ विजय, मला तूं आवडला आहेस. माझी मुलगी स्वर्णमुखी हिच्यासाठी मी चांगला मुलगा शोधतो आहे. तुझी संमती असेल तर मी तुझ्याशी तिचे लग्न लावून देईन व माझा व्यापारधंदा तुझ्या हवाली करीन."

हा प्रस्ताव ऐकून विजय गोंधळून गेला. त्याला वाटले कीं असं झालं तर आपलं जीवन बदलून जाईल आणि आरामांत आयुष्य जगता येईल. विजयच्या मनांत आशा पालवली. हा विवाह झाला तर तो श्रीमंत तर झाला असताच, त्याशिवाय पुढील आयुष्य निश्चिंत मनाने, कोणतीही काळजी वा कष्ट न करता जगणें शक्य झाले असते. असे विचार मनांत घोळवत



तो धनवर्माबरोबर त्याच्या गांवी गेला. स्वर्णमुखीला पाहून तो अवाक झाला. ती अत्यंत कुरुप व बेढब होती. परंतु धनवर्मा मात्र विजयच्या अंदाजापेक्षां खूपच श्रीमंत होता.

"माझी मुलगी तुला आवडली असली तर पहिला मुहूर्त धरता येईल." धनवर्मा म्हणाला.

विजयने घाबरट स्वरांत म्हटले, "माझे वडील लहानपणींच गेले. आईने काबाडकष्ट करुन मला वाढवले आहे. तिला जे योग्यवाटेल तसंच मी करतो. कोणत्याही परिस्थितींत मी तिचे मन कधी दुखवत नाही. तिला बिचारल्याशिवाय मी निर्णय घेऊं शकणार नाही."

"हे बघ, माझ्या मुलीशी लग्न केलंस तर तुझी आईही इथें सुखांत राहील. त्यांचा

- लक्ष्मण सूरि -



आदरपूर्वक मान ठेवला जाईल. त्यांना हे सविस्तर सांग.''

घरीं परतल्यावर विजयने आईला सारी माहिती सांगून म्हटले, ''आई, ती मुलगी फारच कुरुप आहे गं! आणि व्यापार हे लबाडीचंच दुसरं रुप असं मला वाटतं! मला व्यापार आवडत नाही, तरीही तुला सुखांत राहाता येईल म्हणून मी या लग्नाला तयार आहे. तुझी जर संमति असली तर मला खूप आनंद होईल. पण जर तू नकार द्यायचे ठरवलेस तर त्याचे मला जरुर वाईट वाटेल.''

सरस्वतीने त्याला म्हटलं, ''तुला हवं ते कर, पण मला सुंदर, सुशील सून हवी होती. मला हे स्थळ पसंत नाही.''

कांही महिन्यांनंतर विजयचे लग्न राधाशी ठरले. ती गरीब घरांतली होती पण गुणवती व सुंदर होती. त्याचे मन द्विधा झाले तेव्हां आईने त्याला समजावले व लग्न पार पडले.

विजय आता जरा आरामांत राहूं लागला. राधाला पैशाची हांव होती. रेशमी साड्या, दागिने खरेदी करावेत म्हणून ती विजयला सारखे सांगू लागली. विजयने आईपाशी तक्रार केली. तो म्हणाला, ''मी श्रीमंताच्या मुलीशी लग्न करायचा विचार केला, तेव्हां तू मला स्पष्ट नकार द्यायला सांगितलास. आता तुझ्या पसंतीच्या मुलीशी मी लग्न केलं आहे. पण ही मुलगी तर माझा पैशासाठी सारखा जीव खाते. कपडे, दागिने घ्यायला सारखे पैसे मागते. आता मी काय करुं ते तूच सांग.''

जेव्हां सरस्वती राधाशी याबद्दल बोलली तेव्हां राधाने उत्तर दिले, ''माणसाने तृप्त असावे पण म्हणून निष्क्रिय बनूं नये. तुमचा मुलगा किती हुशार आहे, कुशल आहे. शहरांत जाऊन त्यांना चांगली नोकरी मिळेल. त्यांची विद्या व कौशल्य यांचा उपयोग व्हावा म्हणून मी त्यांना चिडवत राहाते. त्यांनी यावर विचार करावा म्हणून मी दडपण आणते.''

सरस्वतीला राधाचे म्हणणे पटले. दोघांनी शहरांत जावे म्हणून तिनेही जोर धरला. त्या दोघांच्याबरोबर तिने शहरांत राहायला जावे म्हणून विजय व राधाने हट्ट धरला. पण सरस्वतीने त्यांच्या हट्टापुढें मान तुकवली नाही. ती म्हणाली, ''अजून माझ्या अंगात धमक आहे. ''तुम्ही तिथें जाऊन जरा स्थिरस्थावर झालात, तुमच्या मनाप्रमाणें झाले कीं मी येईन. तोपर्यंत मी इथल्या कामांत गुंतले आहे ते ठीक आहे.''

मनांत नव्हतं तरी विजय पत्नीसह शहरांत गेला. अनेक प्रयत्न केले तरी त्याला तिथें कांही कामधंदा मिळाला नाही. तो निराशेने म्हणाला, ''काय करायचं ते तूच सांग. मी त्याप्रमाणे करीन.''

''मी पडले बाईमाणूस. मी काय सांगणार? तुम्ही जे मिळवाल, त्यांत मी घर चालवीन. नाहीतर सासूबाईंकडे परत जाऊं. आईच्या आश्रयाने राहिलं तरी त्यांत कांही गैर नाही.'' तिने कडवटपणे म्हटलं.

दोघेही गांवी जाण्यास तयार झाले, तेवढ्यांत विजय आजारी पडला. वैद्याने औषध दिले, पण त्याचा ताप हटला नाही. गांवी जायचे लांबणीवर पडले. वैद्याने औषधाबरोबर पथ्यपाणी सांभाळायला सांगितलेले होते. पण कांही फरक पडला नाही, व प्रकृतीही सुधारली नाही.

''तुम्ही नीट औषधें घेत नसाल. वैद्याने सांगितलं तरी ऐकलं पाहिजे ना! केव्हां तुमच्या आजाराला उतार पडेल, देव जाणे! अंगात सारखा ताप असला तर आपण गांवीदेखील जाऊं शकणार नाही. इतका लांबाचा खडतर प्रवास तुम्हाला झेंपणार नाही.'' राधा नाराजीने त्याला म्हणाली.

विजय म्हणाला, ''आपण आईकडे जाऊं या. तिथें मी बरा होईन.''



राधाने वैद्याला सांगितल्यावर वैद्यराज म्हणाले, ''हे बघ, मुलांच्या प्रकृतिविषयीं वैद्यापेक्षांदेखील आईला जास्त माहिती असते. माझ्या औषधांचा कांही उपयोग झाला नाही. ताप असताना गांवी जाणेंही ठीक नाही. त्याच्या आईलाच इथें बोलावून घे.''

सरस्वती आल्यावर विजयचे डोळे भरुन आले. ''आई, तुझ्याशिवाय मला चैन पडत नव्हते. आता तूच मला बरा कर. मी बरा झालो कीं माझ्यासाठी उडदाचे वडे एकदा करायचे, बरं कां! तुझ्या हातचे वडे मला फार आवडतात.''

चारपांच दिवसांतच विजयची प्रकृति सुधारली. तिने वैद्यांना त्याच्या पथ्यपाण्याविषयीं

विचारले. वैद्यांनी सांगितले, "महिनाभर तरी त्याला तळकट. तेलकट कांही देऊं नका! त्याची प्रकृति खराब होऊं द्यायची असेल तर द्या त्याला वडेबिडे!" हे खवचट बोलणें विजयनेही ऐकले.

पण सरस्वतीने मात्र वडे बनवले व विजयपुढे ठेवले. तो चिडला व आईला म्हणाला, "वैद्य-राजांनी काय सांगितलंय ते तुला नीट माहीत आहे ना? आणि तरी तू वडे केलेस कां? तुला मी जिवंत राहाला हवा आहे कीं नको?"

सरस्वतीने त्याच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करीत म्हटले, "हे बघ, तुला काय सोसतं आणि मानवतं हे मला चांगलं ठाऊक आहे बरं! तुझी प्रकृति बिघडेल असं मी कधीतरी करीन कां? दोन लहानसे वडे ठेवलेत ते खा निमूटपणे!"

पण तिने त्याला समजावून दोन लहान वडे खाऊं घातले. राधाही जरा घाबरली होती, पण बघताबघता विजयही प्रकृति सुधारली. राधा सरस्वतीला म्हणाली, "सासूबाई, वैद्य नको म्हणाले तरी तुम्ही वडे केलेत, ह्यांनी खाल्ले, आणि प्रकृति सुधारते आहे. हे कसं काय?"

सरस्वती हंसून म्हणाली, "मग, मी माझ्या मुलाला चांगला ओळखते. त्याला जे हवं असतं, ते तो माझ्या तोंडून वदवून घेतो. आणि त्यांत समाधानी होतो. आणि समाधान हे औषधापेक्षां जास्त प्रभावी असतं."

राधाचे डोळे उघडले. ती म्हणाली, "आता मला कळलंय कीं जेव्हां त्यांच्या स्वभावांतल्या उणीवांना मी स्वतःला जबाबदार ठरवीन, तेव्हांच त्यांचा आत्मविश्वास वाढेल. त्यांच्यावर रागावण्याऐवजी प्रेमाने त्यांना समजावीन - तुमच्याप्रमाणें! यापुढें मी तुमच्यासारखी वागेन. तुम्ही मात्र आता नेहमी आमच्याजवळ राहिलं पाहिजे नि मला मार्गदर्शन केलं पाहिजे."

सुनेने मनःपूर्वक केलेल्या विनंतीला सरस्वती नकार देऊं शकली नाही. ज्या घरांत पती-पत्नींमधे मतैक्य असते, एकमेकांबद्दल आदरयुक्त प्रेम असते, तो परिवार सदैव सुखी असतो.









चन्दामामाची भेट



# बदललेले भाग्य

हेलापूरमधें बलभद्र व बलराम हे दोघे तरुण लहानपणापासूनचे सवंगडी होते. दोघेही मध्यमवर्गीय कुटुंबातले होते. बलभद्र शांत स्वभावाचा व सरल, सुशील होता. पण बलरामचा स्वभाव मात्र अगदी याच्या उलट होता. ओळखीच्या किंवा अनोळखी लोकांची टिंगल करणे, त्यांची टर उडवणे यांत त्याला खूप आनंद होत असे.

त्यावर्षी राजाचा जन्मदिन मोठ्या थाटामाटांत साजरा करायचा असे राजधानींत ठरले होते. हे दोघे मित्र हा उत्सव पाहायला जाण्यासाठीं निघाले. निघण्यापूर्वी बलरामने बलभद्रला म्हटलं, "हे बघ, आपण बऱ्याच दिवसानंतर राजधानीला जातो आहोत. रस्त्यांत कोण भेटेल, काय दिसेल हे कांहीही आत्ता सांगता येणार नाही. कांही कां असेंना, आपण कोण आहोत हे आपण कुणालाच सांगायचं नाही. काय, लक्षांत राहील ना?"

त्याच्या या निर्णयामुळें बलभद्र चकित झाला होता. पण त्याने होकारार्थी मान डोलावली. दोघेही चालत निघाले. दुपार होता होता ते सुगंधीपुरच्या वेशीजवळ आले. त्यांना खूप भूक लागली होती. जवळच एक झोंपडी दिसली. ते तिथें गेले. झोंपडीत एक म्हातारी राहात होती. एकटीच होती बिचारी!

बलभद्रने तिला विचारलं, "आजी, आम्ही राजधानीला महाराजांचा जन्मोत्सव पाहायला जातो आहोत. खूप भूक लागलीय. जेवण मिळेल कां? आम्ही थोडेफार त्याचे पैसे देऊं!"

"कां नाही मिळणार? बाळांनो, थोडा वेळ जरा आराम तर करा "असं म्हणून म्हातारीने चूल पेटवली आणि ती स्वयंपाकाला लागली. थोड्या वेळानंतर तिने दोघांना जेवण वाढले.

- लक्षमण सूरि -

दोघेजण हातपाय धुऊन जेवायला बसले. तिने झटपट बनवलेलं भोजन फारच स्वादिष्ट होतं. दोघांनी त्यावर ताव मारला.

तिथून निघण्यापूर्वी बलभद्रने म्हातारीच्या हातांत कांही रुपये ठेवत प्रेमळपणें म्हटले, "फार छान जेवण दिलंत तुम्ही. तुम्हाला कितीही पैसे दिले तरी ते कमीच आहेत. पण आम्ही थोडंफार मूल्य देतो आहोत."

त्यावर म्हातारी म्हणाली, "भुकेल्या जिवाला अन्न देण्यासारखे दुसरे पुण्यकर्म नाही. जाऊं द्या, खूप दिवसांपासून मला एक चिंता आहे."

"सांग आजी, कसली चिंता आहे?" बलभद्रने विचारलं.

"हल्लीं बरेच दिवस माझी कंबर सारखी दुखत असते. आणि त्याचा मला फारच त्रास होतो. कुणा वैद्याकडून तपासावं तर तो खर्च मला झेंपणार नाही. या कमरदुखीवर कांही उपाय ठाऊक असेल तर तो मात्र मला सांग." तिने खुलासेवार सांगितलं.

आता तिची गंमत करण्याची बलरामला सुरसुरी आली. तो तिला सांगू लागला, "मला एक यावरचा फार नामी उपाय ठाऊक आहे. तुमच्या झोंपडीच्या मागें जे भलेथोरले चिंचेचे झाड आहे ना, त्या झाडाच्या एका फांदीला एक जाड दोरखंड बांधा. त्याचे दुसरें टोंक तुमच्या कमरेला बांधून ठेवा. दहाबारा वेळा त्या दोरावर तुम्ही झोका घेतल्याप्रमाणें करुन बघा. कंबर दुखायची थांबेल. असं करुनदेखील जर दुखायची थांबली नाही तर त्यावर आणखी एक उपाय



आठवला. त्या झाडाजवळच एक खड्डा खणा. त्यांत तुम्ही उतरा. गळ्यापर्यंत येईल इतकी माती त्यांत भरा आणि चार तास त्या स्थितींत उभ्या राहा. याने तर शंभर टक्के गुण यायलाच हवा आजी!"

"बाळ, हा तुझा उपाय अगदी नामी दिसतोय रे! कमरेचं दुखणं कमी झालं तर तुझंच नांव घेऊन आशिर्वाद देईन. सांग तरी बाबा, तुझं नांव काय ते!"

बलरामने न गांगरता ठोकून दिलं, "माझं नांव बलभद्र आहे. आम्ही हेलापुरीचे आहोत. शिवशास्त्री तलावाजवळच माझं घर आहे.

बलरामची ही गंमत बलभद्रला कांही आवडली नाही. पण त्याला वाटलं कीं म्हातारी कांही बलरामचा उपाय करणार नाही, नुसतं ऐकून सोडून देईल किंवा विसरुन जाईल.



दोघेही नंतर राजधानीला गेले आणि राजाच्या जन्मोत्सवाचा थाटमाट व रोषणाई पाहून ते हेलापुरला परत आले.

बघताबघता दहा वर्षे उलटली. एके दिवशी बलभद्र व बलराम गांवातल्या मध्यावर असलेल्या पारावर गप्पा मारत बसले होते. त्यावेळीं तिथें आणखीही कांही लोक आजूबाजूला बसले होते. तिथें एक नवा इसम येऊन या मंडळींना विचारायला लागला, "या गांवातल्या बलभद्रचं घर कुठे आहे ते जरा सांगता कां?" "मीच बलभद्र! आपण कोण? आणि काय काम आहे?" बलभद्रने विचारलं.

तो इसम सुगंधीपुराहून आला होता. "त्या गांवांत राहाणाऱ्या एका वृद्धेने आपली सारी संपत्ती - वीस हजार सोन्याच्या मोहरा, पांच एकरांचे शेत, एक पक्क्या बांधणीचे घर - हे सारं शिवशास्त्री तलावाजवळ राहाणाऱ्या बलभद्रच्या नांवाने केलेलं आहे. सुगंधीपुरच्या ग्रामाधिकाऱ्याने या गृहस्थांना हे पत्र देऊन त्यांनी सुगंधीपुरला यावे आणि ही संपत्ती आपल्या ताब्यांत घ्यावी असे सांगितले आहे."

बलभद्र व बलराम हे ऐकून थक्क झाले. त्यांना ती म्हातारी लगेच आठवली. त्या गरीब वृद्धेला ही एवढी संपत्ती कुठून मिळाली असावी याची कल्पना या दोघा मित्रांना येईना.

ते लगेच सुगंधीपुरला जाऊन ग्रामाधिकाऱ्याला भेटले. तेव्हां त्यांना सारा उलगडा समझाला. म्हातारीला बलरामने जो उपाय सुचवला त्यानुसार तिने चिंचेच्या फांदीला दोरखंड बांधले, टोंक आपल्या कमरेला बांधले आणि ती झोंका घेऊं लागली. त्या वाळलेल्या फांदीच्या बुंध्यात एक ढोली होती व त्यांत सोन्याच्या मोहरा होत्या. म्हातारीच्या झुलण्यामुळें त्या मोहरा खणखणत खाली पडल्या. म्हातारीच्या पूर्वजांनी बहुधा त्यांची संपत्ती लपवून ठेवलेली होती. पण म्हातारीची कंबर कांही दुखायची थांबली नाही. म्हणून तिने दुसरा उपाय करुन बघायचे ठरवले. त्याप्रमाणें ती जमिनींत मोठा खड्डा खणायला लागली. तर तिथें जमिनींत एक तांब्याचा घडा तिला मिळाला. त्यांतही मोहरा भरलेल्या होत्या.

आता म्हातारी सधन झाली होती आणि तिने एका चांगल्या वैद्याकडून आपल्या दुखण्यावर उपचार करुन घेतले. नंतर तिने घर बांधले, शेत विकत घेतले व नोकरचाकरही ठेवले. कांही दिवस ती आरामांत राहिली. नुकतेच तिचे निधन झाले होते. तिला कुणीही वारस नव्हता, म्हणून तिने आपली सारी मालमत्ता बलभद्रच्या नांवावर करुन ठेवली होती. कारण तिला वाटलं कीं या सगळ्या बदलाला बलभद्रचा उपाय हाच कारणीभूत आहे.

बलरामने तिची गंमत करावी म्हणून आपले नांव बलभद्र आहे असे सांगितले होते. आता बलभद्रचे नशीब उजळले होते.

पण बलभद्रला मात्र वाटलं कीं या संपत्तीचा खरा वारस बलरामच आहे. त्याने ग्रामाधिकाऱ्याला खरी कहाणी सविस्तर सांगितली व ही संपत्ती बलरामकडे सोंपवावी असेही सांगितले.

ग्रामाधिकाऱ्याने तसे करण्यास नकार दिला व तो पुढें म्हणाला, "मृत्यूपत्रांत जे लिहीलेले असते, त्यांत बदल होऊं शकत नाही. तसं करणं हे कायद्याच्याविरुद्ध आहे." आणि त्याने कायद्याप्रमाणें ती सारी संपत्ती बलभद्रच्या ताब्यांत दिली.

बलराम हे सारं गंभीरपणें बघत होता. तेव्हां बलभद्र त्याला दिलासा देत म्हणाला, "काळजी करं नकोस. तुझ्या चेष्टेखोर स्वभावामुळें चांगले आणि वाईट, दोन्हीही झाले आहे. शेवटले कांही महिने कां होईना, म्हातारी आनंदात, सुखांत राहिली. हे आपलं सद्भाग्य आहे. यापुढेंही तू सर्वांशी प्रेमाने वाग, त्यांचा आदर ठेवीत जा." असं म्हणून त्याने त्या अचानक लाभलेल्या संपत्तीचा अर्धा वांटा बलरामच्या नांवाने करुन दिला.



# भारताची ओळख

१. हिंदु पुराणांत देवांचा गुरु कोण होता?
अ. शुक्राचार्य,
ब. द्रोणाचार्य
क. बृहस्पती,
ड. वेदव्यास.

२. आधुनिक गणितांतल्या 'पाय' या संज्ञेचा शोध कोणत्या भारतीय विद्वानाने लावला आहे असं मानतात?
अ. आर्यभट्ट
ब. भवभूती,
क. वराहमिहीर,
ड. भास्कराचार्य.

३. 'पुसा इन्स्टिटयूट' या प्रसिद्ध व लोकप्रिय संस्थेशी कोणत्या विषयाचे नांव जोडले जाते?
अ. खगोलशास्त्र,
ब. गणितशास्त्र,
क. शेतकीशास्त्र,
ड. संख्याशास्त्र.



४. उत्तर भारतांतल्या एका प्रसिद्ध विद्यापीठाच्या संस्थापकांचे हे चित्र आहे. त्यांचे नांव काय? ते विद्यापीठ कोणते आहे?

५. पूर्वीचे "थॉमसन कॉलेज ऑफ एंजिनियरींग" आता एक लोकमान्य विद्यापीठ झाले आहे. ते कोणते?
अ. अण्णा युनिव्हर्सिटी,
ब. जाधवपूर युनिव्हर्सिटी,
क. रुरकी युनिव्हर्सिटी,
ड. काकतीय युनिव्हर्सिटी.

६. भारतांत मानववंशशास्त्राशी तुम्ही यातले कोणते नांव जोडाल?
अ. डॉ.ओ. लक्ष्मणस्वामी मुदलियार,
ब. डॉ.के. अनंतकृष्ण अय्यर,
क. डॉ. अमर्त्य सेन,
ड. डॉ. आशुतोष मुखर्जी.

*(उत्तरें पुढील अंकी)*

## जूनच्या प्रश्नावलीची उत्तरें

१. डेक्कन क्वीन
२. गोलघुमट
३. हैदराबाद
४. २९ मे १९५३ रोजीं सर अेडमंड हिलरी यांनी तेनसिंग नोरकेबरोबर एव्हरेस्टच्या शिखरावर प्रथम पाऊल ठेवले.
५. मेट्टुपलायम व उटी (उदकमंडलम) यांमधे धावणारी छोटी रेलगाडी. ही चित्रांत दाखवल्याप्रमाणे डिझेल वा इलेक्ट्रिक अेंजिनवर चालत नसून हिला लोको अेंजिन्स असतात.





# गणेश पुराण

गुहेच्या दारावर झांकण म्हणून ठेवलेला मोठा दगड गजराजाने आपल्या सोंडेने एखाद्या खड्यासारखा उचलून बाजूला टाकला, आणि तो गुहेंत शिरला. त्यानंतर थोड्याच वेळाने रत्नाभूषणांची गांठोडी आपल्या सोंडेने उचलून घेऊन आला. त्याने ती रत्नेंभूषणे सौदामिनी समोर टाकली. चंद्रहार आणि माळा तिच्या गळ्यांत घातल्या. त्यानंतर आपली सोंड तिच्या पाठीवर, बाप मुलीच्या पाठीवर प्रेमाने हात फिरवितो तशी फिरवली. सर्व दागिने घालून बाकी उरलेले दागिने घरी घेऊन जायला हत्तीने सौदामिनीला सुचविले. सौदामिनी दागिने घालून तयार झाल्यावर हत्तीने तिला जंगलापलीकडे कल्याणी नगराजवळ पोंचविले. सोन्याच्या दागिन्यांनी मढलेल्या आपल्या सुनेला पाहून कलहकंठी चकित झाली. नंतर स्वतःला सावरून तिने दागिने कसे मिळाले हे सौदामिनीकडून तोंडी काढून घेऊन मनांतल्या मनांत पुटपुटली - "अस्सं! म्हणजे हत्तीला कवठाचं फळ इतकं आवडतं का?" मग ती लगेच बाजारांत गेली व एक पिशवी भरून कवठे विकत घेऊन आली.

दागिने भरून आणायला कलहकंठी एक पिशवी बरोबर खांद्यावर घेऊन निघाली. तिच्या एका हातांत कवठे भरलेली पिशवी होती. जंगलात पाऊल टाकल्यावर तिने सर्व प्रदेश चाळून काढला. परंतु तिला कोठेही कवठाचे झाड आढळले नाही. शेवटी एका चिंचेच्या झाडाखाली ती बसली. तिने पिशवीतून खायला एक कवठ काढले. ते हातांत घेऊन ती आपला कंठ मोकळा करून घेऊन भजन म्हणू लागली.

येरे हत्ती, इकडे ये,
कवठ आणिले, खाऊन घे,

११. कलहकंठी व कलहकंठीची कथा



आण दागिने, सोन्याचे,
पुरवि लाड, मन्मनाचे,
येरे हत्ती, इकडे ये,
सुवर्णभूषण, मजला दे ॥

कलहकंठी बराच वेळ आळवून आळवून गात राहिली, परंतु हत्ती आला नाही. एक आवाज ऐकू आला. आकाश दुमदुमू लागले. कलहकंठीला वाटले की तो हत्तीचाच हुंकार असावा. तिने मान वर करून उभी राहून दूरवर पाहिले, एक वाघ उड्या मारीत येत होता.

आपल्या खांद्यावरची पिशवी न फेकता ती घाबरून पळूं लागली आणि खाली पडली. ती पडली ती गुहेसमोरच पडली. नशिबाचे आभार मानून आनंदाने तिने गुहेंत प्रवेश केला. गुहेंत दागिन्यांचे ढीगच्या ढीग पडलेले पाहून ती वेड्यासारखी दागिने घालीत गेली. दागिन्यांनी पिशवी भरून घेतली. ती उचलून गुहेच्या दारापर्यंत कशीबशी आली. परंतु तिच्या दुर्दैवाने गुहेचे दार बंद झाले होते. समोर तिला एक ब्रह्म राक्षसीण लाल डोळे करून उभी असलेली दिसली. ती हंसत होती. तिचे ते हंसणे भयंकरच होते.

ती राक्षसीण मोठ्याने ओरडली - "ए कलहकंठी, तू आपल्या सुनेला त्रास देणारी सासू आहेस, तर मी सासूला गिळंकृत करणारी सून आहे. मी सांगते ते ऐक!" असे म्हणत त्या ब्रह्मराक्षसिणीने आपला जन्म वृतांत सांगायला सुरवात केली.

"मी पूर्वी एक फार सुंदर स्त्री होते. आईवडिलांनी माझे नाव कलहंसी ठेविले. परंतु सासरी गेल्यावर मी आपल्या वाचाळपणामुळे त्या पेठेत कलहदुंदुमी म्हणून प्रसिद्ध झाले.

कलहकंठी, तू जितकी क्रूर आहेस, तितकीच माझी सासू साध्या स्वभावाची होती.

"मी सासरी गेल्यानंतर एका वर्षाच्या आंत माझे यजमान घर सोडून देशाटनाला निघाले. मी दागिन्यांवर जीव टाकी. सोन्यासारखी पिकं काढणारी शेते विकून मी सोन्याचे दागिने करविले. माझ्या सासूने मला नाकांतल्या सुंकल्यापासून कंबरपट्ट्यापर्यंत सर्व दागिने दिले.

अशा चांगल्या स्वभावाच्या सासूला मी एक वेळ सुखाने खाऊं दिलं नाही. कामाला लावून मी तिच्याकडून घरांतली सर्व लहानमोठी कामे करवून घेऊं लागले.

शेवटी माझी सासूसासरे माझ्या अशा वागण्याला कंटाळून गेले. वातापि नगरींत जाऊन त्यांनी गणपतीचे दर्शन घेतल्यावर तेथेच आपला देह



ठेवायचाही ठरविले. सासूच्या हातांत एक लहानसे गांठोडे पाहून मी ते हिसकावून घेतले. त्या धक्क्याने माझी सासू जमिनीवर पडली आणि तिने कायमचे डोळे मिटले.

माझे सासरे सोशिक स्वभावाचे. त्यांनी ते स्वत:च्या डोळ्यांनी पाहिले असूनही एक चकार शब्द काढला नाही. तरी त्या दिवशी संध्याकाळी अत्यंत दु:खाने संतापून ते म्हणाले - "हे पापिणी! तू माझी सून आहेस, नाहीतर मी तुला तत्काळ शाप दिला असता. आम्ही दोघं असा विचार करून सर्व कष्ट सहन करीत आलो की आमचा एकुलता एक मुलगा कधी तरी परत येईलच आणि तू त्याच्याबरोबर सुखाने संसार करशील. आता माझं तुझ्याजवळ एकच मागणं आहे की पुढे कधी काळी माझा मुलगा परतला तर निदान त्याला तरी सुखी ठेव." असे सांगून माझ्या सासऱ्याने अत्यंत दु:खावेगाने शेवटचा श्वास घेतला आणि आपल्या साध्वी स्त्री बरोबर जणू कांही सहगमनच केले. ते थोर निष्ठावान व तपस्वी पुरुष होते.

त्याच वेळी तेथे एक संन्यासी आला. तो माझ्या सासूसासऱ्यांच्या देहावर पडून रडूं लागला. त्या संन्याश्याने माझ्याकडे संतप्त नजरेने पाहिले व म्हणाला - "तू एक ब्रह्मराक्षसी होऊनच जन्माला यायला पाहिजे होतीस." त्यानंतर त्या वृद्ध जोडप्याचा अंत्येष्टी विधी उरकून तो संन्यासी तेथून निघून गेला. तो संन्यासी दुसरा तिसरा कोणी नव्हता. माझ्या रूपावर भाळून माझ्याशी लग्न करणारा माझा पतीच होता." अशा तऱ्हेने आपली जन्मकथा सांगून ती राक्षसी थोडा वेळ



थांबली. नंतर पुढील कथा सांगू लागली - "दागिन्यांचा मोह आणि लोभ असल्या कारणाने मी आणखी एक पाऊल पुढे टाकून कांही चोरांना व लुटेऱ्यांना आश्रय दिला. मी दरोडेखोरांची राणी म्हणून ओळखली जाऊं लागले. याच गुहेत दरोडेखोर दागिने आणून जमा करीत. त्या सर्व संपत्तीची मालकी मिळावी यासाठी मी सर्व दरोडेखोरांना विष घालून अन्न वाढले. मरणापूर्वी सूड घेण्याच्या हेतूने त्यांनी मला या गुहेतच ठेवले आणि गुहेच्या दारावर एक मोठी धोंड आणून ठेवली.

कलहकंठी, मी याच गुहेत हे दागिने व वैभव पहात उपाशी व तहानेली राहून शेवटी तडफडून मेले. आणि आता एक ब्रह्मराक्षसीण होऊन येथे राहते आहे. गुहेंत प्रवेश करणाऱ्या हत्तीने मला सांगितले की तुझे डोळे उघडल्यावर मी या पिशाचिनीच्या जीवितातून मुक्त होईन."



हत्तीने तुझ्या सुनेला जे दागिने दिले होते ते सर्व खऱ्या सोन्याचे होते. परंतु तू जे अंगावर घातले आहेस ते खऱ्या सोन्याचे आहेत कीं नकली, हे जरा नीट पाहून घे." ब्रह्मराक्षसीण म्हणाली.

मध्यंतरी पिशवीचे तोंड उघडले व तिच्यांतून सापविंचू बाहेर येऊन गुहेंत चालूं लागले. आपल्या अंगावर साप व विंचू चालत असलेले पाहून कलहकंठी किंकाळी फोडून ओरडू लागली. ब्रह्म राक्षसी आपल्या अक्राळविक्राळ तोंडाने हंसू लागली. ती म्हणाली - "तू आपल्या सुनेवर अत्याचार करणारी कलहकंठी आहेस. मी सासूसासऱ्यांना सूनवास देणारी कलहदुंदुभी आहे. आपल्या सारख्या लोभी बायकांमुळेच सर्व नारी जातीला कलंक लागला आहे. उत्तम स्वभावाच्या आपल्या सुनेबरोबर तू चांगली वागलीस तर तुझं कांही वाईट होणार नाही. नाहीतर या गुहेंत माझ्यासारखी ब्रह्मराक्षसीण होऊन या गुहेंत तुला रहावे लागेल. आता तुझी पाळी आहे. कलहकंठी, कान उघडे ठेवून ऐकते आहेस ना?" कलहदुंदुभीने विचारले.

तेव्हां कलहकंठीने आपले कान धरले. राक्षसिणीच्या पायां पडून म्हणाली - "माझे डोके ठिकाणावर आलें आहे. मी सुनेबरोबर नीट वागेन. मला मुक्त करून या जंगलापलीकडे पोंचती कर!"

ब्रह्मराक्षसिणीने कलहकंठीला जंगलापलीकडे कल्याणी नगराच्या वेशीवर पोंचविले आणि तिला बजावून सांगितले - "ऐक! तू दिलेले वचनभंग केलेस तर तूही माझ्यासारखी ब्रह्मराक्षसीण होऊन या गुहेंत येऊन कायमची राहशील. खबरदार, बजावून ठेवते!" असे सांगून ती जागच्या जागी जळून भस्म झाली.

कलहकंठी धावत घरी गेली आणि सौदामिनी-समोर गुडघे टेकून म्हणाली - "मुली सौदामिनी! तू मला माफ कर. मुलाला व सुनेला पोपट व मैनेसारखी सुखाने रहात असलेली पाहून जो आनंद होतो, त्याच्यासमोर जगांतले सर्व वैभव फुकट!"

सौदामिनीला वाटले की गणपतीच्या कृपेनेच सासूच्या स्वभावांत हा बदल झाला. तिला अत्यानंद झाला.

त्यानंतर पुढे कलहकंठी पुन्हा कलकंठी या नावेच ओळखू जाऊ लागली.

पावनमिश्राने आपली गोष्ट येथवर संपवून विचारले - "मुलांनो, तो हत्ती कोण होता बरं?" तेव्हां मुलंच नव्हेत तर मोठी माणसंही उत्साहाने म्हणाली - "गणपती, आपला वातापि



गणपती!" असे म्हणत व प्रसाद घेऊन सर्व आपापल्या घरी निघून गेलीं.

पावनमिश्र दररोज देवळाच्या भिंतीवर काढलेलीं, किंवा कोरलेली चित्रें दाखवून त्यांची आख्याने सांगत असे. अशातऱ्हेने आबाल-वृद्धांच्या मनांत गणपतीवरची श्रद्धा व भक्ती वाढू लागली.

एके दिवशी एका संगीतप्रेमी व्यक्तीने एका भिंतीवरचे चित्र दाखविले. त्या चित्रांत एक गायक तंबोरा घेऊन गाणे म्हणत होता आणि गणपती निरनिराळे हावभाव करून नृत्य करीत होता. त्या संगीतप्रेमीव्यक्तीने त्या चित्राची कथा सांगावयास विनंती केली.

पावनमिश्र कथा सांगू लागले, - "वातापि नगर सर्व कलांचे आगर होते. तेथे कवी, पंडित, गायक आणि इतर कलांत प्रवीण लोक रहात असत.

गजानन पंडित हा त्या नगरातला सर्वात श्रेष्ठ पंडित होता. त्याला विविध कलांची पण चांगली माहिती होती. त्याचा कंठ फार गोड होता व त्यांत एका तऱ्हेची भुलवून सोडणारी शक्ती होती. तो वातापि गणपतीची स्तुती करून अनेक भक्तिगीते लिहून म्हणे. त्याचा नातू बाल गणेश भट डोलत ताल देई.

गजानन पंडित गोड आवाजात 'धिमिकिट धिमिकिट, तांडव नृत्य करी गजानन' नांवाचे गीत निरनिराळ्या रागांत गुंफून म्हणे. तेव्हां नृत्य गणपती इंद्रधनुष्याच्या सातही रंगात आपले रूप बदलून नाचे आणि श्रोता व दर्शकांना मुग्ध करी.

गणपती हंसध्वजी रागांत पांढऱ्या शुभ्र



राजहंसासारखा, मायामालव रागात (भैरव रागात) प्रातःकाळच्या रविबिंबासारखा, भैरवी रागांत लाल कमळासारखा, हिंदोळ रागांत निळ्या आकाशासारखा, नीलांबरी रागांत निळ्या कुमुदासारखा, आनंद भैरवी रागात पांढऱ्या कुमुदावर चकाकणाऱ्या पौर्णिमेच्या चांदणी-सारखा दिसत होता.

तसा गजानन पंडितांना मानमरातब व सत्कार करवून घेण्याचा नाद नव्हता. तरी दरवर्षी गणेशाची सुवर्णमूर्ति देऊन त्यांचा सत्कार करण्यात येई. त्या मूर्तींनी त्यांचे सर्व घर भरून गेले होते.

देशांतले थोर पंडित व विद्वान गजानन पंडिताचा आदर करीत आणि त्याला गुरु मानून त्यांना मान देत. परंतु वातापि नगराचे कांही विद्वान गजानन पंडिताचा हेवा करू लागले. त्यांचा नायक स्वरकेसरी होता. स्वरकेसरी सर्वदा आपल्या विद्वत्तेचे प्रदर्शन करण्यासाठी हावरटपणा करीत असे. तो गाऊं लागे त्याबरोबर सिंहगर्जना झाल्यासारखे किंवा वाघाने डरकाळी फोडल्यासारखे वाटे. तो गाऊं लागला की मृदंग वाजवणारा घाबरून जाई. परंतु गजानन पंडिताच्या मनांत विद्वत्तेचे प्रदर्शन करण्याची इच्छा कधी उपजली नाही. तो गणपतीवरच्या श्रद्धा व भक्तीमुळेच गाई. तो तन्मय होऊन गात असे आणि गातां गातां त्याचा कंठावरोध होई. अशा वेळी गजानन पंडिताची थट्टा उडवायला स्वरकेसरी व इतर पंडितांना खूप फावे.

ते म्हणात की गजानन पंडिताला शास्त्राचे ज्ञान थोडेदेखील नाही. त्याचं संगीत म्हणजे संयोगाने संगीत म्हटले जाऊं लागले आहे. अशा शब्दांत ते मनाचे समाधान करून घेत. परंतु गजाननाला त्या गोष्टीची कधी फिकीर नसे. आपल्या हृदयांत वसवलेल्या गणेशाच्या मूर्तीचे स्मरण करून, तन्मय होऊन, तो एकांतात बसून आपल्या इष्ट दैवताशी बोलेही. त्याच्या गाण्यांत एका तऱ्हेची अवर्णनीय अशी शक्ती होती. तिच्यामुळे श्रोता मंत्रमुग्ध झाल्यासारखे स्वर्गीय सुखाचा अनुभव करीत.

त्या वर्षी कोणत्याही परिस्थिती स्वर्णमूर्ती गजानन पंडितच्या घरी पोहोचता कामा नये असा विचार करून स्वरकेसरीने एक डाव टाकला.








# राक्षसिणीचा पाळीव पोपट

वीरबाहू एक बावळट माणूस होता. त्याचं नुकसान होणार आहे हे माहीत असूनदेखील तो त्याला विरोध करीत नसे. गप्प बसून राही. तो दूध विकून गुजराण करीत असे.

त्याच्या झोंपडीशेजारी एक जुनाट खोपटे होते. त्या घरांत विष्णू व लक्ष्मी नांवाचे एक जोडपें नुकतेच राहायला आले होते. ती दोघेही अतिशय चतुर होती. गोड बोलून इतरांकडून काम करून घेण्यांत पटाईत होती. दोनतीन दिवसांतच त्यांना अंदाज आला कीं वीरबाहू अगदीच भोळसट आहे. ती दोघे त्याला आपली कामे सांगायला लागली. शहरांत जाऊन दुधाची विक्री केल्यानंतर वीरबाहूला घरासाठी आवश्यक ते सामान आणावं लागे. घरीं आल्यावर अंगणाची झाडलोट करावी लागे. कधीकधीं विहीरीतले पाणी काढून हंडे, कळशा भराव्या लागत.

त्या दिवसांत वीरबाहूच्या मुलीचे लग्न ठरले. बनारसला सुंदर रेशमी साड्या मिळतात, म्हणून साड्या खरेदी करण्यासाठीं तो बनारसला जायला निघाला.

बाहेर ओट्यावर बसलेल्या विष्णूने त्याला म्हटलं, "माझ्या बायकोसाठीदेखील एक चांगली साडी घेऊन ये. तू परत आल्यानंतर मी पैसे देईन."

बनारसमधें वीरबाहूने लक्ष्मीसाठीदेखील एक साडी घेतली. तो जेव्हां परत आला तेव्हां तो घरांत शिरण्यापूर्वीच विष्णूने एक चांगलीशी साडी उचलली व म्हणाला, "आज शुक्रवार आहे. माझी पत्नी आज कपाटांतून पैसे काढत नाही. उद्यां पैसे घेऊन जा."

पण चार दिवस झाले तरी विष्णूने त्याला कांही पैसे दिले नाहीत. मुलीसाठी बांगड्या करायला टाकायच्या होत्या. नाईलाजाने वीरबाहूने विष्णूचे दार खटखटवले. दार उघडल्यावर त्याने विष्णूला म्हटले, "मला पैशाची फार जरुरी आहे. त्या रेशमी

- भवानी प्रसाद -



साडीचे ते पांचशे रुपये कृपा करुन मला लगेच दे.'' हात चोळत वीरबाहू म्हणाला.

विष्णू रागाने आंत गेला आणि साडी घेऊन आला. ती साडी त्याने जमिनीवर फेंकून म्हटले, ''तुला नि तुझ्या साडीला नमस्कार! माझ्या बायकोला ही साडी मुळींच आवडली नाही. घेऊन जा ती!''

वीरबाहूच्या बायकोला जेव्हां हे कळलं, तेव्हां ती म्हणाली, ''आता आपण तरी काय करणार? पैसे तर लगेच हवेतच. दुकानदार आपल्या ओळखीचा आहे; तुम्ही जा आणि साडी परत देऊन पैसे घेऊन या.''

वीरबाहू लगेच पुन्हां बनारसला जायला निघाला. पण या वेळेला नेहमीच्या राजमार्गाने न जाता तो जंगलातल्या वाटेने जाऊं लागला. म्हणजे त्याला घरीं लौकर परत येता आले असते.

जंगलाच्या मध्यावर एक जुने वडाचे झाड होते. त्याच्या फांद्यामधे एक राक्षसीण राहात होती. तिच्या मुलीच्या लग्नाची ती तयारी करीत होती.

वीरबाहूला पाहून ती कर्कशपणें ओरडली, ''अरे कळिकाळा, माझ्यासारख्या ब्रम्हराक्षसीच्या घरी तू अगदी दिवसाढवळ्या येतो आहेस? एवढी तुझी हिंमत?''

तिला पाहून वीरबाहू थरथर कांपायला लागला. त्याने हात जोडून तिला म्हटले, ''राक्षसीमाते, माझं कांही बरंवाईट करं नकोस. माझ्या एकुलत्या एक मुलीच्या लग्नासाठी मी तयारी करतो आहे.'' त्यानंतर जे घडलं ते त्याने तिला सविस्तर सांगितलं आणि तो पुढे सांगू लागला, ''रेशमी साडी परत करुन पैसे आणायला मी बनारसला जातो आहे. लौकर पोंचावं म्हणून मी ही जंगलातून जाणारी वाट धरली.''

राक्षसीण त्याला कांही बोलणार होती तेवढ्यांत वधूवेषांत सजलेली तिची मुलगी झाडावरुन धाडकन उडी मारुन खाली उतरली. वीरबाहूच्या हातांतली पिशवी तिने हिसकावून घेतली आणि त्यांतली साडी बाहेर काढली. आपल्या आईला ती साडी दाखवत ती म्हणाली, ''आई, बघ तरी ही साडी. किती सुंदर आहे ग! बारशिंग्याच्या कातड्याच्या कपड्यापेक्षां जर ही साडी मी विवाहमंडपात नेसून गेले तर लोक माझ्याकडे टकामका बघत राहातील. ह्याला ह्या साडीचे पैसे देऊन ही विकत घेऊं या.''

मुलीच्या म्हणण्याप्रमाणें साडीची किंमत राक्षसीने वीरबाहूला दिली. पैसे घेऊन जेव्हां तो परत जायला निघाला तेव्हां नवरी राक्षसीमुलगी



एक पिंजऱ्यांत ठेवलेला पोपट घेऊन आली व त्याला तो पिंजरा देत म्हणाली, ''याला मी बोलायला शिकवलंय. मला हा खरा माझ्या प्राणांपेक्षां अधिक प्रिय आहे. याची बढाई अशी आहे कीं माझ्या होणाऱ्या सासूबाईंनी पाळलेले पोपट, चिमण्या व पतंग ह्याच्या हाती लागले कीं हा त्यांना मारुन टाकील. आता या पोपटामुळें माझ्या सासूबाईंशी भांडण होण्यापेक्षां, या बोलक्या पोपटाला तू घेऊन जा.''

पोपटाचा पिंजरा घेऊन वीरबाहू घरी परतला. जेव्हां तो घरी पोंचला, तेव्हां अंगण झाडीत असलेली शेजारची लक्ष्मी तिथे होती. तिने त्या पोपटाचा पिंजरा पाहिला आणि वीरबाहूकडून सर्व हकीकत काढून घेतली. नंतर ती म्हणाली, ''म्हणजे याचा अर्थ असा झाला कीं तुला साडीचे पैसे मिळाले. ती साडी मला आवडली नव्हती म्हणून तुला बनारसला जायचे होते. आणि त्यामुळेच तुला हा बोलका पोपट मिळाला. म्हणजे याचा अर्थ असा झाला कीं माझ्यामुळेंच तुला मिळालेला हा पोपट माझ्या मालकीचा होतो.'' असं म्हणत तिने तो पिंजरा त्याच्या हातांतून काढून घेतला.

लक्ष्मी जेव्हां पिंजरा घेऊन आपल्या घरांत शिरली, तेव्हां आश्चर्यचकित नजरेने तिच्याकडे पाहात विष्णूने विचारलं, ''हा पोपट कां आणला आहेस तूं? काय करायला निघाली आहेस?''

''तुम्ही बघतच रहाल आता! या पोपटामुळें आपले नशीब फळफळणार आहे.'' लक्ष्मीने गर्वाने म्हटलं. ''पोपट कधी नशीब बदलूं शकेल कां?'' विष्णूने शंकित स्वरांत म्हटलं.

''तर मग ऐका! परवां आपल्या राजाच्या



मुलाचा पांचवा वाढदिवस आहे. मोठ्या थाटांत समारंभ होणार आहे. त्यावेळीं पांचव्या वाढदिवसाच्या निमित्ताने या बोलक्या पोपटाची भेट मी राजपुत्राला जर दिली तर राजा खूष होऊन आपल्याला इतके सोनेनाणें देईल कीं आपल्याला ते उचलायला देखील कष्ट पडतील.'' लक्ष्मीने मोठ्या दिमाखांत म्हटलं.

लक्ष्मीचे बोलणें पुरें होते न होते तोंच आपले पंख फडफडवत पोपटाने गोड स्वरांत म्हटलं, ''वा वा, काय हे माझं भाग्य!''

दुसऱ्याच दिवशी विष्णु व लक्ष्मी राक्षसिणीच्या त्या पाळलेल्या पोपटासह राजधानीला पोंचले. राजवाड्यावर युवराजाच्या वाढदिवसाची अगदी थाटांत तयारी चालली होती. लक्ष्मीने राजाला वंदन करुन विनयाने म्हटले, ''महाराज, ज्या दिवशीं युवराजांचा जन्म झाला त्याच दिवशी मोठ्या

कष्टाने मी हा पोपट पकडलाय आणि तेव्हांपासून मी याला मोठ्या प्रेमाने सांभाळलाय. याला मी प्रेमाने बोलायलादेखील शिकवलं आहे. युवराजांच्या वाढदिवसाला आमच्यातर्फे हा बोलणारा पोपट आम्ही भेट देतो आहोत त्याचा स्वीकार व्हावा."

लक्ष्मीचे बोलणें व ही भेट राजाराणीला फारच आवडली. त्यांना खूप आनंद झाला. युवराजाने तो पोपट लडिवाळपणे हातांत घेतला आणि, 'अे, आता तू माझ्याशी बोल हं!'' असं म्हणत पोपटाची पापी घेतली.

राक्षसिणीच्या मुलीचे बोलणें ऐकून ऐकून पोपट बोलायला शिकला होता. त्याने म्हटलं, "वा वा, मी किती भाग्यवान! माझ्या भाग्याबद्दल काय बोलायचं? या जीवनांत तू लोण्यासारखा स्नेहशील दिसतो आहेस, चमकतो आहेस. मरशील तेव्हां कढवलेल्या तुपासारखा तुझा सुगंध सगळीकडे पसरेल. तुला बघून तर मला असं वाटतं कीं इथल्या इथेंच तुला चावून चावून खावं!'' असं बोलत त्याने राजपुत्राच्या हाताला व गालाला कडकडून चावा घेतला.

छोटा राजपुत्र मोठ्याने रडायला लागला आणि त्याने पोपटाला सोडून दिले. दुसऱ्याच क्षणीं पोपट उडून गेला. राजपुत्राच्या गालावरुन रक्ताचे थेंब ओघळूं लागले. ते दृश्य पाहून राजाराणीच्या संतापाला पारावार राहिला नाही.

ताबडतोब राजवैद्य आले व त्यानी राजपुत्राला औषधोपचार केले. मंत्री म्हणायला लागले, "महाराज, हा शेजारच्या राज्याचा कट दिसतोय. राजपुत्राच्या वाढदिवसाच्या वेळीच मुद्दाम असे अशुभ शब्द पोपटाला शिकवून ते बोलायला त्यांनी लावले आहेत.''

विष्णु व लक्ष्मीला फटक्यांची शिक्षा करुन त्यांना नंतर तुरुंगात धाडण्याची आज्ञा राजाने लागलीच दिली. आपण निर्दोष आहोत हे सिद्ध करण्यासाठी विष्णू व लक्ष्मीला सहा महिने लागले. नंतर त्यांना पुन्हां त्याच गांवात राहायला जायची लाज वाटूं लागली. म्हणून त्यांनी दुसऱ्या गांवात जाऊन बिऱ्हाड थाटले.

राक्षसिणीच्या मुलीच्या पोपटामुळें विष्णू व लक्ष्मीच्या त्रासांतून वीरबाहूची सुटका झाली. आता तो आपल्या पत्नीबरोबर सुखाने व शांतपणें राहूं लागला.







# चुकीची जाणीव

**सीताराम** एक सामान्य व्यापारी होता. नुकतेच त्याचे लग्न सीताशी झाले होते. सीता सासरीं राहायला येऊन महिनादेखील झाला नाही तेवढ्यांत तिने सासूबाई सारख्या भांडणतंटा करीत असतात या सबबीवर त्यांना तिने नणंदेच्या घरीं पाठवून दिले. आता सीताराम व सीता ही दोघेच घरीं राहूं लागली.

त्यांच्या घराच्या एका बाजूला राजारामचे बिऱ्हाड होते, आणि दुसऱ्या बाजूला सोमनाथचा संसार होता. हे दोघेही श्रीमंत नव्हते. साहजिकच राजारामची पत्नी रमा आणि सोमनाथची पत्नी सत्या यांनी सीताशी मैत्री केली. वेळोवेळीं त्या दोघी तिच्याकडे डाळ, साखर वगैरे सामान उसने मागायला जायच्या. पण सीता महावस्ताद होती. ती त्यांच्याशी गोडगोड बोलायची, पण त्यांना हवे असलेले सामान कांही द्यायची नाही.

थोड्याच दिवसांत सीताराम व सीता यांच्यात लहानसहान भांडणें होऊं लागली. सीता अगदी आळशी होती. दुपारींच ती दोन्ही वेळचा स्वयंपाक उरकत असे आणि दिवसभराचे काम संपले म्हणून खुषींत असे. सीताराम रात्रीं दुकानांतून उशीरा येई. घरी आल्यानंतर तो जेव्हां पानावर बसे, तेव्हां वाढलेले पदार्थ पाहून त्याचा राग अनावर होई. "हे सगळं दुपारचंच अन्न आहे. रात्रीं ताजा भात टाकायला काय झालं? माझ्या आईने कधीही मला शिळें अन्न वाढले नव्हते.'' तो एकदा म्हणाला.

त्याची तक्रार ऐकून सीताही चिडली. आवाज चढवून ती टिंगलखोरपणें म्हणाली, "हो तर, जमीनदारांचंच घराणं तुमचं! तुमच्या कमाईवर तर मी आरामांत राहाते आहे कीं! माझ्या मावशीचा जांवई फक्त तीन अेकर जमिनीचा मालक आहे. तरी पण त्यांनी लग्नांत सहा तोळे सोने तिच्या अंगावर घातले. आणि लग्नानंतर तीन महिन्यांच्या आंतच तीन तोळे सोन्याचा हार बनवला. तुम्ही रात्रंदिवस व्यापारांत गुंतलेले

- रामपाल -



असता ना? मग तुम्हाला नि तुमच्या आईला असं कधी नाही वाटलं कीं घरांतल्या सुनेलाही एक सोन्याचा हार बनवावा म्हणून! आपलं लग्न होऊन सहा महिने झाले, माझ्यासाठीं तुम्ही कधी कांही आणलंत कां?''

झालं, बोलण्याने बोलणं वाढलं आणि दोघेही एकमेकांना दोष देऊं लागले. सीतारामने संतापाच्या भरांत म्हटलं, ''तुझ्यासारख्या कर्कश बायकोबरोबर संसार करणं मला अगदी अशक्य आहे. मी एकटा राहिलो तर जास्त बरं होईल. तुला जिथें जायचं असेल तिकडे निघून जा.'' आणि त्याने तिचा हात पकडून तिला दरवाज्याच्या-बाहेर ढकललं.

सीताही चिडली. आंत जाऊन तिने चारपांच साड्या पेटींत ठेवल्या आणि म्हणाली, ''ही मी चालले बघा! तुम्ही कसेही राहा, माझा त्याच्याशी काडीमात्र संबंध नाही. हवं तसं वागा! जोपर्यंत तुम्ही मला न्यायला येणार नाही, तोपर्यंत मी या घरांत पाऊल ठेवणार नाही.'' असं म्हणून ती रागारागाने निघून गेली.

''मी आणि तुला न्यायला येणार? वाट बघ. तू नसलीस कीं मी राजासारखा थाटांत राहीन आणि मग मला तुझी आठवणसुद्धां कधी येणार नाही.'' त्याने ओरडून तिला सांगितले आणि धाडकन दार बंद केले.

थोड्या वेळांतच ही बातमी शेजारपाजारीं पसरली. तासाभरांतच रमाने ताटलींत गरमगरम भजीं आणली, आणि सीतारामसमोर ठेवून ती म्हणाली, ''भाऊ, तुम्हाला पाहून माझं मन कासावीस झालं. तुम्ही एकटे कसे हो राहाल आता? तुम्हाला भूक लागली असेल असं वाटलं म्हणून ही थोडीशी भजीं तळून आणलीत बघा! गरम आहेत तंवरच खाऊन घ्या!'' भजीं पाहून सीतारामच्या तोंडाला पाणी सुटले. त्याने लागलीच एक भजें तोंडात टाकले.

खूष होऊन रमाने त्याला विचारले, ''भाऊ, एक लहानशीच गोष्ट विचारते. राग मानूं नका हं! तुमच्या भाचीचा म्हणजे माझ्या मुलीला आता पाहायला येणार आहेत. आणि आमच्या घरांत तर अर्धा तोळादेखील सोने नाही. अशा परिस्थितींत मी त्या नवऱ्यामुलाकडच्या लोकांना काय सांगणार नि दाखवणार? एकवार सीताचा



हार मला मुलीसाठी द्या. ती मंडळी परत गेली कीं तुमचा हार लगेच परत करीन. आणि ते लोक येतील तेव्हां तुम्हीपण आलं पाहिजे हं; तुम्ही तर मला माझ्या भावासारखे आहात!''

रमाच्या साखरपेरणीमुळें सीतारामला जरा बरे वाटले त्यांतून तो सीतावर चिडलेला होता, म्हणून तो ताबडतोब आंत गेला आणि सीताचा हार घेऊन आला. रमाच्या हातांत हार देत तो म्हणाला, ''घेऊन जा हा ताई. घाबरायचं कांही कारण नाही. सावकाश परत करा.''

रमा पुन्हां त्याचे कौतुक उगाळणार आणि हार घेऊन जाणार होती, तितक्यांत एक वयस्कर गृहस्थ तिथें आले. त्यांनी सीतारामला विचारले, ''कोण रे ही बाई आणि सावकाश काय परत द्यायचं बोलतो आहेस? सांग ना, काय प्रकार आहे?''

अचानक आलेल्या विक्रमकाकांना पाहून सीतारामला आनंद झाला, पण रमा मात्र घाबरली.

सारी हकीगत समजल्यानंतर ते रमाकडे वळून म्हणाले, ''तो हार कांही सीताचा नाही, माझ्या मुलीचा आहे. लग्नाच्या वेळेला सुनेला घालण्यासाठी आमच्या बहिनींनी तो उसना मागितला होता. आता माझ्या मुलींच लग्न ठरलंय, म्हणून हा हार मी घेऊन जायला आलो आहे.''

काका खोटं बोलत आहेत हे सीतारामला माहीत होते. त्याचं त्याला खूप आश्चर्य वाटलं. काय उत्तर द्यावे ते त्याला सुचेना. पण तेवढ्यांत रमाने तो हार आणून काकांच्या हातांत ठेवला.



रमा दाराबाहेर पडत होती तितक्यांत सत्या एक रिकामी थाळी घेऊन आंत आली. समोरच उभे असलेल्या काकांना पाहून ती चमकली.

''कोण तुम्ही? काय हवंय तुम्हाला?'' विक्रमने विचारलं. त्याचे प्रश्न ऐकून सत्या आणखीनच भेदरली व घाबरत म्हणाली, ''घरांत तांदळाचा दाणा नाही. मुलें भुकेजली आहेत. म्हणून ....'' तिचे बोलणें पुरे व्हायच्या आंतच सीता वादळासारखी घरांत शिरली व तिने म्हटले, ''सारं कांही खोटं आहे. काल संध्याकाळीच तर तुझ्या मुलाने तांदळाचे पोते उघडले होते! पुढे ती सीतारामला म्हणाली, ''बराच वेळ मी आणि काकासाहेब खिडकीच्या बाजूला उभे राहून गंमत बघत होतो. मी नाही असं बघून पाहा या शेजारणी

तुम्हाला कशा फसवत आहेत ते!''

सीता अशी अचानक आलेली पाहून सीताराम व सत्या स्तंभित झाले होते. सत्या घरी परतल्यानंतर विक्रमनी या नवराबायकोला सांगितलं, ''बघा, तुमच्या दोघांची आपसांत वादावादी झाली त्याचं काय फळ मिळालं? तुम्ही तर दोघांनी समजुतीने राहिलं पाहिजे. जेव्हां नवराबायको भांडतात, तेव्हां स्वार्थी शेजारी आपला फायदा करुन घेतात.''

विक्रमकाका पुढें म्हणाले, ''वहिनी जरी सध्यां आपल्या नणंदेच्या घरीं राहात असल्या, तरी सारा वेळ तुमची काळजी करीत असतात. हेच सांगायला मी इथें आलो होतो. बरं झालं, मी वेळेवरच आलो ते, नाहीतर जास्त गोंधळ झाला असता.'' एवढं म्हणून त्यांनी तो हार सीताला दिला.

''बरं झालं, मी तुम्हाला रस्त्यांतच भेटले ते; आमचं दोघांचं नशीब चांगलं होतं.'' असं म्हणताना सीताचे डोळे भरुन आले.

''आमच्या वहिनींनी कष्टाने पैसापैसा जमवला आणि हा हार बनवला होता. मागचा-पुढचा कांही एक विचार न करता तुम्ही माझ्या वहिनींना घरांतून बाहेर काढलंत. निदान आता तरी तुम्हाला कळलं असेल कीं वडिलधारी माणसं घरांत असली कीं किती आधार असतो ते! त्यांचा मान ठेवणं, त्यांची काळजी घेणं हे तुमचं कर्तव्य आहे. आणि हे तुम्हाला फायद्याचंच आहे.''

त्यांच्या या बोलण्यावर सीताने शरमेने मान खाली घातली. ती म्हणाली, ''माझं चुकलं त्याची मला जाणीव झाली आहे. हा अनुभव मी जन्मांत विसरणार नाही.'' सीतारामकडे पाहात ती पुढें म्हणाली, ''आजच तुम्ही जाऊन सासूबाईंना आपल्या घरीं घेऊन या.''

पत्नीचे हे बोलणे ऐकून सीतारामचा चेहरा उजळला. पतीचा प्रसन्न चेहरा पाहून सीता विक्रमकाकांना म्हणाली, ''सासूबाई येईपर्यंत मी आपल्याला जाऊं देणार नाही. त्या परत आल्यानंतर निदान दोनतीन दिवस तरी आपण इथें राहलं पाहिजेच!''







# आर्य

## अज्ञान राजपुत्राची विचित्र शौर्यकथा

त्याचे किशोरवय होते, तोपर्यंत तो वन्य श्वापदांबरोबर राहात होता आणि एक नियमित निश्चित आयुष्यक्रम सुरुं होता. तरुणवयांत त्याने माणसांच्या जगांत प्रवेश केला. तिथें पावलोंपावलीं अडचणी येत राहिल्या. त्याच्या जिवाला घोर उत्पन्न झाला. ज्या चिंता निर्माण झाल्या, त्या अरण्यांतल्या हिंस्र जनावरांच्यामुळें झालेल्या नव्हत्या, उलट त्या माणसांच्यातल्या जनावरांमुळें झाल्या होत्या.

तो बलदंड आहे, धाडसी आहे. शत्रूशी सामना करुन त्याचा नायनाट करण्यांत तो कधी मागे हटत नाही. तो असामान्य शूर वीर आहे. हा आर्य कोण आहे? एक अज्ञात विचित्र राजपुत्र! चांदोबाच्या आगस्टच्या अंकापासून ही शूरकथा चित्ररुपांत आपल्या भेटीला येत आहे. ती वाचा नि प्रसन्न व्हा.

आपल्याजवळच्या विक्रेत्याकडून आजच आपली प्रत राखून ठेवा.

S. Gandhi Ayyar

# प्रकाश व

भूपती एक कापडाचा प्रसिद्ध व्यापारी होता. त्याने व्यापारांत भरपूर अनुभव घेतला होता. त्याचबरोबर भरपूर पैसा व मानसन्मानही मिळवले होते. इतका श्रीमंत असूनही तो साधे सुती कपडे वापरत असे व साधे भोजन घेत असे. पण तो कंजूष नव्हता. अडीनडीला गरीबांना पैशाची मदत तो नेहमी करीत असे.

भूपतीच्या घरी अनेक वर्षांपासून रंगा काम करीत होता. तो कधीकधी भूपतीला विचारीत असे, ''मालक, आपल्यापाशी अपार संपत्ती आहे. आपण आरामांत दिवस घालवूं शकाल. पण आपण असं कां करीत नाही?''

पण यावर भूपती याचे कांही उत्तर देत नसे. फक्त हंसून तो गप्प बसे.

एकदा भूपतीला धंद्यात प्रचंड नुकसान झाले, व त्याचे सर्वस्व गमावले. आपल्या मालकावर आलेली ही वाईट परिस्थिती पाहून रंगाने त्याला विचारले, ''मालक, हे काय असं झालं? एके काळीं आपण धनाढ्य होता, पण आज आपण निर्धन झालात. आपण अशा परिस्थितींत कसे काय राहूं शकाल?'' त्यावर भूपतीने हंसून म्हटले, ''रंगा, मी मालक होतो तेव्हांही मी सामान्य माणसासारखा राहात होतो. सुख हे क्षणभंगुर असतं. कष्ट मात्र सदैव करायला लागतात. जीवन हे प्रकार व अंधार यांचे मिश्रण आहे. मालक असताना जर मी चैनींत आयुष्य घालवलं असतं तर गरीबींत मला जीवन नरकासारखं वाटलं असतं. मी चांगल्या स्थितींत होतो तेव्हां दुःखी लोकांना मी मदत केली होती. त्यांच्यापैकी कांहीजण आता मला मदत करत आहेत.''

त्यानंतर हळूंहळूं भूपतीची सांपत्तिक स्थिती चांगली सुधारली, पण जीवनाबद्दलचा त्याचा दृष्टीकोण मात्र पूर्वीसारखाच राहिला.

*- प्रभुराम आर.*





# महादेवाचा आशिर्वाद

शिवपुरचा ग्रामाधिकारी नागेश गांवकऱ्यांना फार त्रास देत असे. कांही लोकांनी विचार केला कीं नागेशच्या अत्याचारांबद्दल राजाला जाऊन प्रत्यक्षच सांगावं! पण दरवर्षी नागेश राणीला किंमती भेटी देत असे. म्हणून गांवकऱ्यांना वाटलं कीं कदाचित राजा त्यावर कांहीच कारवाई करणार नाही व उलट गांवकऱ्यांनाच दोषी ठरवेल.

त्या गांवांतल्या एका शेतकऱ्याच्या घरी भद्र नांवाचा एक पाहुणा आला. त्याने गांवातली दुर्दशा पाहून लोकांना सल्ला दिला. तो म्हणाला, ''नगरांत महादेव नांवाची एक ज्ञानी व्यक्ती आहे. ते उत्तम व आदर्श नागरिक आहेत. त्यांच्या वाणींत कांही निराळीच शक्ती आहे. त्यांना तुमच्या गांवात येण्यासाठी आमंत्रण द्या. तुमचे कल्याण होईल.''

सर्व गांवकऱ्यांनी मिळून चित्राक्ष नांवाच्या एका इसमास महादेवांकडे धाडले. त्याने गांवकऱ्यांच्या कष्टाबद्दल सविस्तर माहिती दिली आणि त्यांना विनवून तो त्यांना शिवपुरला घेऊन आला. महादेव चित्राक्षच्या घरींच राहायला लागले.

संध्याकाळच्या वेळीं ते गांवकऱ्यांना पुराणांतल्या कथा वाचून दाखवीत, त्यांना उपदेश करीत आणि भलेपणाबद्दल, चांगुलपणाबद्दल, समजावून देण्याचा प्रयत्न करीत. ते सांगत होते, ''आता समजा, जे फळ आपण झाडांवरुन तोडलंय, त्याचा एक भाग सडलेला आहे; जर तो सडका भाग आपण खाल्ला तर आपली प्रकृती बिघडेल. पण फळाचा उरलेला चांगला भाग खाऊन आपण आपली भूक भागवतो आणि आपली प्रकृति चांगली ठेवतो. दुसऱ्या व्यक्तीलाही आपण याच दृष्टीकोनांतून पाहायला हवं. त्याचा चांगुलपणा, स्वभावांतले गुण आपण लक्षांत ठेवले पाहिजेत आणि त्याच्या स्वभावांतल्या दोषांकडे दुर्लक्ष करायला हवे.''

त्यांनी सांगितलेल्या गोष्टींमुळे गांवकरी प्रभावित झाले. ते एकमेकांना मदत करुं लागले, एकमेकांशी प्रेमाने वागायला लागले. नागेशच्या जुलमी, कठोर कारवायांबद्दल ते कमी बोलायला लागले. अशा तऱ्हेने महादेव यांचे आगमन हे नागेशच्यादेखील फायद्याचे ठरले.



एके दिवशीं चित्राक्षची गाय नागेशच्या शेतांत चरण्यासाठीं घुसली. नागेशच्या नोकरांनी गाय पकडली आणि गोठ्यांत बांधली. नागेशने चित्राक्षला ही बातमी कळवली व सांगितले कीं या गुन्ह्याबद्दल त्याला शंभर मोहरा दंड मोहरा भरावा लागेल.

चित्राक्ष नागेशला भेटायला स्वतःच गेला आणि त्याने विनंती केली, ''मी एवढी मोठी रक्कम कुठून भरूं शकणार? गाईची किंमतदेखील तितकी होत नाही. मी चाऱ्यासाठी पैसे भरायला तयार आहे.'' पण नागेशने त्याचे मुळींच ऐकले नाही व म्हटले, ''दोन दिवसांत जर तू हा दंड भरला नाहीस तर तुला दररोज दहा फटक्यांची शिक्षा होईल. आणि हे ही मान्य नसेल तर तू हे गांव सोडून निघून जा.''

चित्राक्ष नागेशच्यासमोर रडला - भेकला, पण कांही उपयोग झाला नाही. जेव्हां ही गोष्ट महादेवाला कळली तेव्हां त्यांनी चित्राक्षला समजावून सांगत म्हटले, ''तू दुःखी होऊं नकोस. जर तुझी बाजू न्यायाची असेल तर भगवान तुला धन देऊन तुला मदत करतील.''

त्याच दिवशी संध्याकाळीं चित्राक्ष घराच्या मागच्या बाजूला रोपें लावण्यासाठी जमीन खणत होता, तेव्हां एकदम खण्‌खण्‌ असा आवाज आला. त्याने जास्ती खोदलं तर तिथें त्याला तांब्याचा एक घडा दिसला. घड्यांत सोन्याच्या मोहरा होत्या. त्यांतल्या त्याने शंभर मोहरा काढल्या आणि दंड भरला. त्याने गाय घरी परत आणली.

नागेशने तपास केला व चित्राक्षने एवढ्या मोहरा कुठून मिळवल्या ते समजल्यानंतर, चित्राक्षला निरोप पाठवला, ''जे धन तुला मिळाले आहे, ते तुझे नसून राजाच्या मालकीचे आहे. राजाचे धन त्याच्या प्रतिनिधीकडे, म्हणजे ग्रामाधिकाऱ्याकडे सोंपवणे हे तुझे कर्तव्य आहे. जर त्यांतली कांही रक्कम तू खर्च केली असलीस तर व्याजासहित ती द्यायला हवीस.''

हे कळल्यानंतर महादेव चित्राक्षला म्हणाले, ''घाबरूं नकोस. ग्रामाधिकाऱ्याला सांग कीं तुला त्या तांब्याच्या घड्यांत मोहरा नाहीत पण काळे विंचू मिळाले आहेत. परमेश्वराची कृपा असेल तर त्यांत त्याला काळे विंचूच मिळतील.'' चित्राक्षने तसं केलं आणि झालं ही अगदी तसंच!

एके दिवशी चित्राक्षचा शेजारी रतन हा एका अडचणींत सांपडला. त्याची बहीण फार सुरेख होती. नागेशने आग्रह धरला कीं तिचा विवाह नागेशच्या मुलाशी व्हावा. नागेशचा मुलगा कुरुप होता आणि आपल्या वडिलांपेक्षांही जास्त दुष्ट व पापी होता. काय करावं ते रतनला समजेना, म्हणून



तो महादेवांकडे आला. त्यांनी त्याला म्हटले, ''अरे, काळजी करूं नकोस. तुझ्या बहिणीचे लग्न एका चांगल्या सुशील तरुणाशी होईल.''

दुसऱ्याच दिवशी राजदरबारांत काम करणाऱ्या चंद्रचा विवाह रतनच्या बहिणीशी व्हावा असा प्रस्ताव घेऊन कांही मंडळी राजधानीहून आली आणि चंद्र राजाच्या मर्जीतला विश्वासू कर्मचारी होता. म्हणून नागेशने त्यांत जास्त ढवळाढवळ केली नाही. पण महादेवांची वाणी खरी ठरते असा साऱ्या गांवभर मात्र चांगलाच प्रचार झाला. गांवकरी त्यांच्या अडचणी घेऊन येत होते आणि महादेवांचा आशिर्वाद घेऊन ती मंडळी चिंतेतून मुक्त होत होती.

नागेशला हे समजलं तेव्हां तोही त्यांना भेटायला आला व म्हणाला, ''आपल्या आगमनाने गांव पावन झाला आहे. माझी विनंती आहे कीं आपण मलाही आशिर्वाद द्यावा.''

महादेवने गंभीर स्वरांत म्हटलं, ''कुणी मागितलाय म्हणून मी आशिर्वाद देत नाही. परमेश्वराच्या सांगण्यानुसारच मी वागतो. मी असहाय्य आहे. मी तुला आशिर्वाद देऊं शकत नाही.''

''मला वाटतं, मला आशिर्वाद द्यायची आपलीच इच्छा नाही. मी परमेश्वराकडे शब्द टाकूं शकणार नाही, पण देवासारखाच देशाचा राजा, त्याच्याकडे शब्द टाकूं शकतो. तुम्ही कसं काय तेव्हां टाळणार, ते मग पाहातो ना मी!'' असं म्हणून रागाने नागेश तिथून निघून गेला.

जेव्हां शिवापुरच्या गांवकऱ्यांना ही गोष्ट समजली, तेव्हां ते सगळेजण एकत्र होऊन महादेव



यांना भेटायला आले, व म्हणाले, ''महाराज, राजाला इथें बोलावून घेण्याइतकी शक्ती नागेशमध्यें आहे. आपला आशिर्वाद मिळाला कीं नागेश जास्तच जुलमी होईल व लोकांना त्रास देईल. आपल्या वाणींत अद्भुत शक्ती आहे. त्याला आपण आशिर्वाद नका देऊं, शाप द्या!''

त्यावर महादेवांनी हंसतच सांगितले, ''माझ्या वाणीचा उपयोग मी फक्त आशिर्वाद देण्यासाठींच करतो, शाप देण्यासाठी नव्हे! परंतु अयोग्य व्यक्तीला दिला जाणारा आशिर्वाद, आपोआप शाप बनतो.''

महादेव यांच्याबद्दलची माहिती राजाच्या कानावर गेली. महादेव आपल्याला कोणता आशिर्वाद देतील हे जाणण्यासाठी राजालाही उत्सुकता वाटली. त्याने शिवपुरला जाण्याचा विचार केला आणि तसा निरोप नागेशला पाठवला.

त्यानंतर दोन दिवसांनी शिवपुरांत राजाच्या आगमनानिमित्त गांवकऱ्यांची एक सभा भरली. त्यावेळीं नागेशने महादेवांचा जाहीर सत्कार केला व म्हटले, "महात्मन्, आपला आशिर्वाद खरा होतो. म्हणून आता आपण राजेसाहेबांना व मला आशिर्वाद द्यावा."

महादेवांनी राजाला सादर वंदन केले व म्हटले, "दुसऱ्यांचे भले करणाऱ्यांना आशिर्वाद द्यायची जरुर नसते किंवा आशिर्वाद मागण्याचीही आवश्यकता नसते. खरं बघायला गेलं तर मोठ्या लोकांचे सत्कार्य हेच आशिर्वाद बनतात."

राजा नाराज होऊन म्हणाला, "आम्ही आपल्याकडे आशिर्वाद मागतो आहोत. आपण तो देणार किंवा नाही ते स्वच्छ, स्पष्ट, सांगावं!"

महादेवने नम्रपणें सांगितलं, "माझ्या आशिर्वादावर आपला अपार विश्वास आहे, पण कधीकधी, कांही लोकांसाठी आशिर्वादाचे शाप बनतात. त्यासाठी नागेशची तयारी असेल तर त्याला आशीर्वाद देण्यांत मला कांहीही अडचण नाही."

नागेश म्हणाला, "हो, मी तयार आहे." "तर मग ऐका, नागेशने गांवकऱ्यांशी जसे वर्तन केले आहे, त्याची दामदुप्पट त्यालाही सोसावी लागेल. हा माझा आशिर्वाद आहे." महादेवांनी सांगितलं.

ते ऐकल्याबरोबर नागेशचा चेहरा उतरला. महादेवांचे शब्द खोटे ठरत नाहीत हे त्याला ठाऊक होतं. तो राजाचे पाय धरुन अजीजीने म्हणाला, "महाराज, मला क्षमा करावी. मला महादेवांचा आशिर्वाद नको आहे. त्यांचा आशिर्वाद परत घ्यावा असे आपणच त्यांना सांगावे."

नागेश काय लायकीचा इसम आहे हे राजाने तावडतोब ओळखले. त्याने त्याचक्षणीं नागेशला त्याच्या जागेवरुन पदच्युत केले आणि राजा महादेवांना नम्रपणें म्हणाला, "असल्या नालायक माणसाला मीच ग्रामाधिकारीपद दिलं होतं. म्हणून आपण मला दिलेला आशिर्वाद आहे, त्याचा शाप बनण्याची शक्यता आहे. म्हणून मी आपल्याकडे आशिर्वाद मागण्याचे धाडस करणार नाही. आता याच्यापुढें शिवपुरचा ग्रामाधिकारी म्हणून आपणच राहावे व जनतेला मार्गदर्शन करावे व आशिर्वाद द्यावेत."







# मायासरोवर

## 18

*(शेरसिंह व गणाचारीला बंदी बनवून सिद्धसाधक हिरण्यपुरच्या राजा कनकाक्षला भेटायला गेला. हंसांच्या रथांतून जयशीलला अरण्यांत एके ठिकाणीं वाघाच्या जवळजवळ तोंडी पडणारी कांचनमाला दिसली. जयशीलने कांचनमालाचे रक्षण केले. त्यावेळीं एका झाडाच्या आडून मायासरोवरेश्वरने जयशीलच्या गळ्याच्याभोंवती पडेल असा एक फांस फेकला. त्यानंतर...)*

आपल्या गळ्यांत पडलेला फांस पाहून जयशील क्षणभर चक्रावला. त्याने वळून पाहिले. त्याला जलग्रहावरचा मायासरोवरेश्वर आणि त्याच्या शेजारी एका घोड्यावर मकरकेतु दिसले. जयशीलने स्वतःला सांवरले. आपल्या गळ्यांतल्या फांसाची दोरी तलवारीने कापावी असे त्याला वाटले, पण त्याने थांबून सरोवरेश्वराच्या दिशेने बघितले.

आपल्या हातांतल्या दोरीला जरा खेंचत मायासरोवरेश्वर म्हणाला, "जयशील नांवाचा महावीर तूंच ना? तू दोरी कापणार होतास, मग थांबलास कां?"

"अरे हो, आत्ता मी समजलो; तुम्ही मायासरोवरेश्वर आहात ना? तुम्ही माझ्या गळ्यांत दोरीचा फांस फेकलात, पण फांसाची दोरी ओढून तुम्ही माझे प्राण घ्यायला हवे होते, पण तुम्ही तसं कां केलं नाहीत? सांगा तरी त्याचं कारण!" जयशीलने विचारलं.

"मी एका सरोवराचा राजा आहे. कुणा महान



महासत्त्व मानवांच्या प्रश्नांची उत्तरे देण्याची मला आवश्यकता नाही.'' मायासरोवरेश्वरने म्हटलं.

संतापलेला जयशील कांही उलट उत्तर देणार, तेवढ्यांत हे सारे दृश्य भयचकित डोळ्यांनी बघणारी कांचनमाला पुढे होऊन म्हणाली, ''मामाजी, हंसांच्या रथांतून खाली पडूनदेखील तुम्ही सुरक्षित आहात, हे पाहून मला फार आनंद झालाय. पण यांचे, जयशीलचे मात्र तुम्ही कांहीही नुकसान करुं नका, कारण ह्यांनीच मला वाघाच्या तावडीतून सोडवलं आहे.''

''पोरी कांचना! मी तो सारा प्रसंग स्वतःच पाहिला आहे. मला ह्याला मारायचे नाही. मला ह्याला जिवंतपणींच मायासरोवरला न्यायची इच्छा आहे. म्हणून मी याला ठार केले नाही.''

मायासरोवरेश्वरने उत्तर दिले. जयशीलकडे वळून कांचनमालाने त्याला सांगितलं, ''माझे मामाजी आपल्याला कांहीही करणार नाहीत. आपण स्वेच्छेने आमच्याबरोबर मायासरोवरला कां येत नाही?''

''कांचना, यांत माझ्या इच्छेला वाव आहेच कुठे? या मायासरोवरेश्वरांना वाटतंय कीं मला पकडून बंदी म्हणून ते मला घेऊन जात आहेत! जर माझ्या मनांत आलं तर मी एका क्षणांत ही दोरी माझ्या तलवारीने कापूं शकतो.'' जयशीलने उत्तर दिले.

हे शब्द ऐकल्यावर मायासरोवरेश्वर मकरकेतुला म्हणाला, ''मकरकेतु, या जयशीलला पळून जाऊं देऊं नकोस. हा फांस मी जरा आवळतो म्हणजे जबरदस्तीने मृत्यु कसा होतो ते याला समजेल.''

मकरकेतूच्या चेहऱ्यावरची अनिच्छा स्पष्टपणे समजत होती. पण आपल्या राजाच्या आज्ञेचं पालन तर अवश्य करायला हवं, म्हणून त्याने आपला घोडा जयशीलच्याजवळ नेण्यासाठी पुढे नेला. ते पाहून भीतीने कांचनमाला किंचाळली जयशीलच्या गळ्यांत लटकलेली दोरी तिने दोन्ही हातांनी पकडली व ती म्हणाली, ''मामाजी, तुम्ही ही दोरी ओढून ह्यांच्या गळ्याला फांस लावलात तर मला ते सहन होणार नाही. मी सुद्धां याच दोरीच्या फांसांत आपली मान अडकवून मरुन जाईन.''

''छे! कांही तरीच! इतक्या थोड्या वेळांत गोष्ट इथवर आली होय?'' असं मनांत म्हणून दोनचार क्षण मायासरोवरेश्वर खाली मान घालून विचार करीत होता; नंतर त्याच्या मनांत आले, ''प्रयत्न करुन पाहाण्यांत कसली आलीय चूक?'' आणि मान वरती करुन तो बोलला, ''जयशील, तू ही दोरी जरुर कापून टाकशील, पण या जलग्रहापासून



तू कसा स्वतःचा बचाव करशील? हा तुला पायदळीं तुडवेल आणि आपल्या मोठ्या दांतानी भोसकून तुझा नाश करील?''

''फारच छान! प्रयत्न करुन तरी पहा कीं!'' असं बोलून जयशील तलवार उपसणार, तेवढ्यांत मकरकेतु खालच्या आवाजांत गंभीरपणे बोलला, ''जयशील, घाई करुं नकोस. तुला मायासरोवरला नेण्यांत मायासरोवरेश्वराचा कांही हेतू आहे, त्यांत एक रहस्य लपलेले आहे. तुलाही सरोवरला जायचे आहे ना? मग या संधीचा नीट लाभ उठव कीं!''

मकरकेतु हे आपल्या भल्यासाठींच सांगतो आहे असं जयशीलला वाटले. आत्तापर्यंत कनकाक्ष राजाच्या मुलांपैकी कांचनमालाच सांपडली होती. परंतु राजकुमार कांचनवर्मा मात्र अजून मायासरोवरांतच बंदी होता. पण कांचनमाला तर आपल्याला पळवून नेणाऱ्या मायासरोवरेश्वराला मामाजी म्हणून त्यांना आदराने संबोधित होती. यामुळें जयशीलला आश्चर्य तर वाटलेच, पण त्याबरोबर मनांत शंकाही उत्पन्न झाली.

त्यानुसार जयशीलने विचारले, ''ठीक आहे, मायासरोवरेश्वर! तुम्ही माझ्यापेक्षां जास्त बलवान आहात, मी तुमच्या ताब्यांत आहे. परंतु मला सांगा कीं आता तुम्ही माझ्याशी कसा व्यवहार करणार आहात?''

''आपली हार तू मान्य करतो आहेस, पण यांत कांही तुझा वेगळा हेतू तर नाही ना?'' जयशीलच्या तोंडाकडे निरखून पाहात मायासरोवरेश्वराने उलट विचारले.

''जे दुर्बल असतात, त्यांना दुटप्पीपणे वागावे लागते. पण मी कोणत्या प्रकारचा माणूस आहे हे



एव्हांना मकरकेतुला समजलं असेलच. काय मकरकेतु, मी बरोबर बोलतो आहे ना?'' जयशील म्हणाला. ''मी यापूर्वींच महाराजांना सांगितलंय कीं आपण महान सत्त्वशील श्रेणींतले आहात!'' मकरकेतुने उत्तर दिले.

''जयशील, तुझी सत्त्वपरीक्षा मी सरोवरला पोंचल्यानंतर करीनच. पण आत्ता यावेळीं तू आमच्याबरोबर येतो आहेस ना?'' असं म्हणून मायासरोवरेश्वराने मकरकेतुकडे एकवार पाहिले व विचारले, ''हे बघ, यापूर्वी आपण एक जलवृक राक्षस पाहिला होता. तो दुष्ट तिथें आणखी कांही वाईट करीत असेल ते सांगता येणार नाही.''

''आधी हे सांगा, याक्षणीं माझ्या गळ्यांत जो दोरीचा फांस आहे, त्याचा हेतू काय आहे?'' जयशीलने विचारले, मायासरोवरेश्वराकडून कांही उत्तर मिळण्यापूर्वींच कांचनमालाने हंसत हंसत जयशीलच्या गळ्यांतला फांस काढला आणि



आपल्या मंजुळ आवाजांत ती म्हणाली, "हा गळफांस नाही, माझ्या मामाजींनी आपल्या गळ्यांत घातलेली ही कमळदेठाची माळ आहे."

"कहाणी लौकरच संपणार असं दिसतंय. ही सुंदरी बिचारी सर्वतोपरी कमनशिबी आहे. जलवृक राजाचा अंत करण्यांत या व्यक्तीने जर मला मदत केली तर फार उपकार होतील." मायासरोवरेश्वराने मनोमन विचार केला.

"महाराज, आज्ञा करावी. आता मी काय करायचे आहे?" मकरकेतुने सरोवरेश्वरास विचारले.

"आपण सगळेजण सरोवरांत जाणार आहोत, तेव्हां तू मार्ग दाखव." मायासरोवरेश्वरने सांगितलं.

"जयशील आपल्या मागोमाग पायीं चालत कां येणार आहे?" जयशीलकडे पाहात मकरकेतुने विचारलं.

"कांचना माझ्याबरोबर जलग्रहवर स्वार होऊन येईल. जयशील व तू घोड्यावर बसून या." मायासरोवरने सुचवलं.

कांचनमालेला पुन्हां सरोवरांतच नेणार हे ऐकून जयशील गोंधळून गेला. तो मकरकेतुला म्हणाला, "मकरकेतु! कांचनमालेने पुन्हां सरोवरांत जावं हे मला आवडणार नाही, पळवून नेलेल्या दोन्ही मुलांना मी सोडवून आणीत व कनकाक्षराजाच्या स्वाधीन करीन असं मी त्यांना वचन दिलंय."

मायासरोवराने रागीट नजरेने जयशीलकडे पाहिलं. कांचनमालानेही नाराजाने जयशीलकडे बघत चढ्या आवाजांत म्हटले, "मला नि माझ्या भावाला अरण्यांतून पळवून नेले आहे हे जरी खरे असले, तरी आम्ही कुणाचेही बंदी नाही. मी माझ्या भावाला बरोबर घेतल्याखेरीज मातापित्याकडे परत कशी जाऊं शकेन? तुम्हाला शक्य झालं तर माझ्या भावाची मुक्तता करा." आणि ती वेगांत जलग्रहाजवळ गेली, आणि मायासरोवरेश्वराच्या हाताचा आधार घेऊन ती जलग्रहावर चढून बसली.

जयशीलने स्तिमित होऊन विचारले, "अरे मकरकेतु, हे सगळं मला कांही निराळंच दिसतंय. राजाच्या मुलांचे अपहरण, मायासरोवर या गोष्टी खोट्या तर नाहीत ना?"

"यावेळीं आपण घोड्यावर स्वार तर व्हा; बाकी सार्‍या गोष्टी सरोवरांत पोंचल्यावर आपोआप आपल्याला समजतील." मकरकेतुने उत्तर दिले.

जयशील मुकाट्याने मकरकेतुच्या घोड्यावर त्याच्यामागे बसला. मायासरोवरेश्वराने जलग्रहाला खूण केली. त्याबरोबर तो वेगाने पुढे जाऊं लागला. त्याच्यामागून मकरकेतुने आपला घोडा नेला. त्या वेळीं जयशीलला एकदम सिद्धसाधकाची आठवण आली. "सिद्धसाधकाने माझ्याबरोबर अरण्यांत खूप कष्ट सोसले आहेत. मी अचानक जर नाहीसा झालो तर त्याला काय वाटेल बरं? मी मेलो आहे असं तर त्याला वाटणार नाही ना?" जयशीलच्या मनांत विचार उचंबळले.

जयशील इकडे याच विचारांत गुंगला होता; तर तिकडे घोडदळाचा नेता वीरसेन याने सिद्धसाधकास राजा कनकाक्षाच्या अरण्यांतल्या तंबूवर नेले. राजाने त्याला ओळखले व विचारले, "अरे, तुझ्याबरोबर मुलांना शोधायला निघालेला तो तरुण जयशील कुठे आहे? तुम्ही सारे इतक्या दिवसांत परत आला नाहीत. म्हणून मी मंत्र्यांच्यावर राज्यकारभार सोंपवला, आणि माझी मुलें शोधण्यासाठी मी स्वतः अरण्यांत आलो आहे."

"महाराज, राजपुत्र व राजकुमारीचे अपहरण करणारे लोक मायासरोवर नांवाच्या स्थानांत राहणारी विचित्र माणसें आहेत. ती पाण्यांत व पाण्याबाहेर जिवंत राहू शकतात. त्यांच्या कांही लोकांना आम्ही बंदी बनवलेले आहे. त्यांचा राजा मायासरोवरेश्वर प्रथम नरभक्षक लोकांच्या हातांत पडला होता. नंतर माझ्याही हातांत सांपडला होता, पण तो वांचला आणि पळून गेला. तरीही काळजी करूं नये. त्या मायासरोवरात राहणारा आणखी एक जलवृक राक्षस आता माझा दास बनला आहे. ते सरोवर कुठे आहे त्याचा



ठावठिकाणा आपल्याला त्याच्याकडून काढता येईल."

"अस्सं! अशी गोष्ट आहे तर!" असं म्हणून राजा कनकाक्षने आपली दगडी गदा खांद्यावर ठेवली आणि सिद्धसाधकाच्या पाठीमागे उभा असलेल्या जलवृकला पाहून विचारले, "सांग, जयशील कुठे आहे?"

"जयशील मायासरोवरच्या दोन राजसेवकां-बरोबर हंसाच्या रथावर स्वार झाला व अरण्यांत त्या राजाचाच शोध घेत होता. पण मायासरोवरचा राजा आमच्या हाती लागल्यानंतर पळून गेला हे त्याला माहीत नाही." सिद्धसाधकाने उत्तर दिले. "हंसांचा रथ?" हे शब्द ऐकून कनकाक्ष व त्याचे सेवक आश्चर्यचकित झाले.

त्याच वेळीं, थोड्या दूर अंतरावर झाडांच्या सांवलीत कांहीतरी गडबड सुरुं झाली. तिथल्या दोन सैनिकांशी नरभक्षक बोलत होते. त्यांना

कांहीतरी गुप्त गोष्ट माहीत आहे असं ते सांगत होते. म्हणून त्यांना नरवानरावर स्वार होऊन हिंडत असलेल्या भुतांच्या नेत्याकडे घेऊन जावे अशी त्यांची मागणी होती.

शिपायांनी त्यांना सहज प्रश्न केला, "तुम्ही कोण आहात? कुठून आलात?"

सिद्धसाधकाने एका राजसेवकाला आदेश दिला. "तिथें कसली गडबड चाललीय ते पहा, आणि त्या दोघांना माझ्याकडे घेऊन ये."

थोड्याच वेळांत ते नरभक्षक सिद्धसाधका-जवळ पोंचले आणि त्याच्या पायावर लोटांगण घालून म्हणाले, "महोदय! आपण आमचा नेता आणि पुजारी गणाचारी यांना मुक्त केलंत तर आम्ही आपल्याला एक रहस्य सांगू."

सिद्धसाधकाच्या मनांत संदेह निर्माण झाला कीं या लोकांना एखादे जबरदस्त रहस्य ठाऊक असले पाहिजे. म्हणून त्याने जलवृक राक्षसाला आज्ञा केली कीं घोड्यांना बांधलेल्या दोन नरभक्षकांना मुक्त करुन साधकासमोर घेऊन यावे. जलवृकने जाऊन शेरसिंह आणि गणाचारी यांना बंधनमुक्त केले, त्या दोघांना दोन हातांत पकडून, त्यांना उचलून तो घेऊन आला आणि सिद्धसाधकाच्यासमोर आणून उभे केले. सिद्धसाधकाने नरभक्षकांना विचारले, "सांगा, कोणते रहस्य तुम्ही आम्हाला सांगणार आहात?"

"भुतांचे पुढाऱ्यांनो! आपल्या हातून वांचलेले व पळून जाणारे मगरीच्या चेहऱ्याचे, आणि विचित्र हत्तीवर स्वार होऊन येणारे लोक आम्ही शोधत होतो, तेव्हां त्या लोकांनी आपल्यासारखा एक मनुष्य व एका मुलीला पाहिले. आमच्या लोकांच्या मनांत शंका आली कीं त्यांच्यावर हल्ला केला तर ते धोक्याचं ठरेल. म्हणून आम्ही झाडांच्या बुंध्यांमागे लपून बसलो होतो. त्यावेळीं तो विचित्र हत्तीवाला त्या दोघांना आपल्या वाहनांत बसवून पर्वतांच्या दिशेने पळून गेला. आणखी एक गोष्ट - हंसांच्या रथांतून उतरणारे कांही लोक पूर्वदिशेला इथून पांच कोस अंतरावर कुणाला तरी शोधत आहेत असं कळलं." नरभक्षकांनी माहिती दिली.

(क्रमशः)



वेताळ कथा

# दोन मोर

निश्चयाचा पक्का विक्रमार्क पुन्हां झाडाजवळ गेला, त्याने झाडावरुन प्रेत खाली उतरवले व आपल्या खांद्यावर घेऊन तो स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतांत लपलेला वेताळ त्याला म्हणाला, "राजन्, किती भयानक अंधार आहे, स्मशानाजवळ हिंस्र जनावरे आहेत. तुझा जीव धोक्यांत आहे. कुणीही केव्हांही हल्ला करील. तरीही तू निर्धास्तपणें पुढें चालतो आहेस. किती रे हट्टी आहेस तू।

पण निसर्गाच्या सान्निध्यांत राहणाऱ्या वनवासी गिरिजनांच्या माहितीत आणि पंडित व ज्ञानी यांच्या विचारांत खूप वेळां फरक आढळतो. उदाहरण म्हणून मी तुला चंद्रशर्मा नांवाच्या एका चित्रकाराची



कथा सांगतो. लक्ष देऊन ऐकलीस तर तुझा शीण दूर होईल.'' आणि वेताळ पुढील गोष्ट सांगू लागला.

''महाराज सुवर्णदेव, सुवर्णदेशचा राजा होता. तो अत्यंत दयाळू व विचारी होता. आपल्या देशाची निसर्गसंपत्ती वाढावी यासाठी तो सातत्याने प्रयत्न करीत असे. वन्य प्राणी, पशुपक्षी यांचे संरक्षण करण्यासाठी त्याने खूप चांगले नियम केले होते व ते पाळले जातील याबद्दल तो जागरूक होता. प्रत्येक वर्षी दिवाळीच्या दिवसांत बैलांची शर्यत त्या राज्यांत होत असे. जे बैल चांगले धष्टपुष्ट व निरोगी दिसत, त्यांना राजा विशेष बक्षीसे देत असे. मनमोहक निसर्गचित्रे रंगवणाऱ्या चित्रकारांनाही पारितोषिके देऊन त्यांचा सत्कार करीत असे.

राजधानीजवळच्या गांवात चंद्रशर्मा राहात होता. तो एक चांगला चित्रकार होता. जर कुणी आपले चित्र रेखाटायला त्याला सांगितले, तर थोड्याच वेळांत तो त्यांचे चांगले चित्र काढून देत असे. म्हणून कित्येक रसिक धनवंतांनी त्याच्याकडून आपली चित्रें रंगवून घेतली होती.

त्यावर्षी दिवाळीच्या उत्सवांत चित्रकारां-साठी जी स्पर्धा ठेवील जाईल त्यांत भाग घ्यायचा चंद्रवर्माने निश्चय केला. म्हणून त्याने दोन हात लांब व एक हात रुंदीच्या जाड कापडी फलकावर दोन सुंदर मोरांचे चित्र काढले. ते मोर पाहिल्यानंतर असे वाटत होते, कीं ते जणूं कांही आपले पिसारे फुलवून, एकमेकांसमोर खुषींत नाचत आहेत.

ते चित्र पाहून एक जाणकार म्हणाला, ''वा, वा, किती देखणे चित्र आहे हे! आपल्यासमोरच हे मोर जणूं कांही नाचत आहेत असं वाटतंय. घराच्या प्रवेशद्वारावर जर हे चित्र लावलं तर घराची शोभा द्विगुणित होईल.''

दुसरा एक तज्ञ चित्रकार म्हणाला, ''मोराच्या कंठाचे रंग फारच सुरेख मिसळले गेले आहेत. या रंगात इतक्या नाजूक छटा दाखवणं अतिशय कठीण आहे. आणि त्यांत अशी तकाकी व झळाळी कधी पाहिली नव्हती. महाराजांनी जर हे चित्र पाहिलं तर शंभर मोहरांचे बक्षीस ते लगेच देतील.''

चंद्रशर्मा या स्तुतीमुळें हुरळून गेला. त्याला हे बोलणें फार आवडले. आपल्या बोटांतली जादू





अप्रतिम आहे याचा त्याला अभिमान वाटला. जे रसिक त्याच्या मोरांची प्रशंसा करीत होते, त्यांच्यापैकीं प्रत्येकाला तो विचारीत होता, ''खरंच कां हे मोर इतके देखणे आहेत?'' इतरांकडून स्तुतिस्तोत्रें ऐकण्यासाठीच तो असं विचारीत होता. त्यानंतर ते चित्र त्याने एका मलमलीच्या मऊ चौघडींत गुंडाळून एका पेटींत जपून ठेवले.

दिवाळीच्या दिवशी आपल्या एका मित्राला घेऊन चंद्रशर्मा बैलगाडींतून स्पर्धेत भाग घेण्यासाठी राजधानीला निघाला. स्पर्धेत भाग घेणाऱ्यांची अगोदर चांचणी होणार होती. चंद्रशर्माचे चित्र पाहून सारे अधिकारी मंत्रमुग्ध झाले.

महाराजांना चित्र आवडले व कौतुकाने ते म्हणाले, ''हेच चित्र बक्षीसपात्र आहे.'' इतरांनी होकारार्थी माना डोलावल्या, व त्या चित्राचे भरपूर कौतुक केले. तिथें बैलांच्या शर्यतींत भाग घेणाऱ्या शेतकऱ्याबरोबर एक आदिवासी आला होता. ही स्तुतीसुमने ऐकून तो खुदकन हंसला. महाराज व इतर सरदारांनी त्याच्याकडे जळजळीत नजरेने पहिले. तो घाबरला व तिथून मागच्यामागे जायचा प्रयत्न करूं लागला. पण महाराजांनी म्हटले, ''थांब, हे चित्र पाहून तू कां हंसलास ते सांग. घाबरुं नकोस. तू वनांत राहणारा आहेस, त्यामुळें तुला मोरांची चांगलीच माहिती असेल, होय ना?''

त्या आदिवासी तरुणाने महाराजांकडे व चंद्रवर्माकडे ओशाळवाण्या नजरेने पाहिले व तो म्हणाला, ''महाराज, या चित्रांत फार मोठी चूक झालीय!''

''अस्सं! आम्हाला जी चूक कळली नाही ती तुला कळलीय होय? सांग पाहूं काय ते.'' महाराजांनी चढ्या स्वरांत सांगितले.

''महाराज, फक्त पुरुष मोरच पिसारा फैलावतो. लांडोर ही कोंबडीसारखी असते. ती नाचूं शकत नाही. तिला आकर्षित करण्यासाठीच मोर पिसारा उभारुन नाचतो. एक पुरुष मोर कधीही दुसऱ्या नरासमोर पिसारा फैलावत नाही. जर भांडण असेल तरच तो दुसऱ्या मोराजवळ येतो.''

त्या आदिवासीचे बोलणें ऐकून सारेच चकित झाले व त्यांना रागही आला. परंतु चंद्रशर्माने मात्र

एकदा त्याच्याकडे पाहिले, मान खाली घातली आणि आपले चित्र पुन्हां त्या मलमलींत गुंडाळले. महाराजांना वंदन करुन तो निमूटपणें तिथून चालता झाला."

ही गोष्ट सांगून वेताळाने राजाला म्हटले, "राजन्, चंद्रशर्माने काढलेल्या चित्राची प्रशंसा तिथें असलेल्या सर्वांनी व महाराजांनी देखील केली होती. ते सर्व विद्वान, जाणकार अधिकारी होते. त्यांच्यासमोर एका माणसाने हे चित्र चुकीचे आहे असं सांगणे हे त्याचा मूर्खपणा दाखवणे आहे, नाही कां? त्याच्या या टीकेवर न रागवता चंद्रशर्मा मुकाट्याने सभेंतून निघून गेला. हा त्याचाही असमंजसपणा प्रदर्शित झाला. नव्हे कां? माझ्या या शंकांची उत्तरे ठाऊक असूनही जर तू गप्प राहिलास तर तुझ्या मस्तकाची शंभर शकले होऊन पडतील."

त्यावर विक्रमार्कने उत्तर दिले, "तो आदिवासी निसर्गाच्या सान्निध्यांत, शुद्ध मोकळ्या हवेंत राहाणारा होता. साहजिकच अरण्यांतल्या पशुपक्षांविषयी त्याला खूप माहिती होती. चंद्रशर्माने जे मोरांचे चित्र रंगवले होते, ते खरं म्हणजे त्या पक्ष्यांच्या नैसर्गिक स्वभावाविरुद्ध होते. त्याकारणाने त्या चित्रांत ही चूक राहिली. हे त्या आदिवासी तरुणाचे अज्ञान नव्हे; उलट त्याच्या सूक्ष्म अवलोकनाचे हे उत्तम उदाहरण आहे. आता चंद्रशर्माबद्दल सांगायचं तर तो चित्रकलेत पारंगत होताच, पण त्याचे चित्र सत्यपरिस्थितीला धरुन नव्हते. त्याने मिसळलेल्या रंगांचे अद्भुत चित्रण पाहून महाराजांसकट बघणारे सारे मोहित झाले होते. म्हणून त्यांनी ते चित्र पुरस्कारास पात्र ठरवले. परंतु त्या आदिवासीच्या बोलण्यांतले निखळ सत्य आणि वस्तुस्थिती ही दोन्ही निर्विवाद होती, योग्य होती. चंद्रशर्मा प्रामाणिक होता आणि त्याचे निसर्ग सृष्टीचे ज्ञान कमी होते हे त्याच्या लक्षांत आले व त्याला आपल्या चित्रांतली चूक मान्य होती, म्हणून तो निमूटपणे तिथून गेला."

राजाचे मौन भंग करण्यांत सफल झालेला वेताळ पुन्हां शवासहित गायब झाला आणि झाडावर जाऊन बसला.

*(आधार : सुचित्राची रचना)*





# शुभशकुनी हार

शंभूप्रसाद हा कृष्णराजपुरचा जमीदार होता. त्याचा व त्याच्या कुटुंबियांचा लोक आदर करीत असत. शंभूप्रसादच्या निधनानंतर त्याची पत्नी रत्नाही जमीनदारीचा सारा व्याप सांभाळूं लागली. त्यांचे चारी मुलगे आईच्या देखरेखीखाली काम करुं लागले आणि जमिनदारीच्या कारभार समर्थपणें पाहात होते. त्या चौघांच्यात कधी मतभेद झाला नाही. भाऊ असावे तर असे, असं लोक म्हणत. पण हे मात्र खरं, कीं जरी भावांच्यात एकी होती तरी या मोठ्या परिवारांतल्या सुनांमधे कधीकधी लहानमोठी भांडणे होत होती. पण सासू रत्नावली याबाबतींत इतकी हुशार होती कीं या भांडणांची बातमी कधी घराच्याबाहेर गेली नाही.

ज्या दिवशी त्यांच्या घरांतल्या नोकराची, शिवची पत्नी गौरी लग्न होऊन त्या गांवांत राहायला आली, त्याच दिवशी रामराजाला, सर्वांत धाकट्या मुलाला मुलगा झाला. गौरी दिसायला चांगली होती व नीटनेटकी होती. घरांतले सारे काम ती मोठ्या हुशारीने करायला लागली. तिची ही कामाची पद्धत पाहून रत्नावली तिच्यावर खूष होती. दोन महिन्यांतच दोघींना एकमेकींचे स्वभाव समजले आणि रत्नावलीची गौरीवर माया जडली. गौरीच्याशिवाय घरांतली कामें चटकन उरकणार नाहीत, असं वाटून रत्नावली तिला भरपूर पगार देऊं लागली. ही गोष्ट सगळ्या सुनांना आवडली नाही.

अशी तीन वर्षे उलटली. रामराजाच्या पत्नीला यावेळीं मुलगी झाली. तोपर्यंत घरांतली सारी माणसें रामराजाच्या छोट्या मुलाचे खूप लाड करीत असत. त्याला प्रेमाने बाळराजा म्हणून हांक मारीत, त्याला जवळ घेऊन खाऊ देत, पापा घेत किंवा त्याला घेऊन बाहेर जात होते. त्याच्यासाठी शहरांतून खेळणी आणली जात असत. परंतु जेव्हां ही छोटी बाळी जन्मली, तेव्हां सगळेजण तिचेच कौतुक करुं लागले. तिला पाळण्यांत झोंपवताना अंगाई-गीत म्हणणें, तिला मांडीवर थोपटून झोंपवणे, यांत आईवडील व इतर मंडळी खूष असत. पण त्या छोट्या दादाला मात्र हा आकस्मिक बदल पाहून वाईट वाटले. त्याला ही बहीण आवडेनाशी झाली. तिला हात लावायला म्हणून जवळ गेला तर तो तिला बोचकारत असे. साहजिकच ती रडायची! हा राग वाढतच चालला,

पद्मलता राठोड



तेव्हां सर्वांना वाटलं कीं कांही दिवस या मुलाला शहरांत त्याच्या मामाकडे, आजोळीं राहायला पाठवावं.

हे जेव्हां त्याला सांगितलं गेलं, तेव्हां आईला सोडून जाण्यास त्याने साफ नकार दिला व भोकाड पसरले. कांहीही झालं तरी मामाच्या घरी जायचं नाही असा हट्ट तो करुं लागला. तेव्हां गौरीने प्रेमळपणे त्याची समजूत घातली आणि त्याला सांगितले कीं ती देखील त्याच्याबरोबर मामांच्या घरी येईल. गौरी सोबत येते आहे हे कळल्यावर तो कबूल झाला. गौरीचं माहेरही त्याच शहरांत होतं. आणि दुसऱ्या दिवशी गौरीबरोबर बाळराजे गेले.

त्याच दिवशी थोरली सून चंद्रमती हिच्या गळ्यांतला चपलाहार नाहीसा झाला. ती रोज तो गळ्यांत घालत असे. त्यादिवशीं आंघोळीच्या आधी तो हार तिने देवघरांत ठेवला होता. आंघोळीनंतर पूजाअर्चा व इतर कामांच्या धांदलीत ती तो हार गळ्यांत घालायला विसरली.

दुपारची जेवणे झाली आणि त्यानंतर हार ठेवलेल्या जागेवर दिसत नाही हे तिच्या लक्षांत आले. ती खूप घाबरली. तो हार चार पिढ्यांतल्या थोरल्या सुनांच्या गळ्यांत नेहमी असे. तसा रिवाजच होता. तो शुभशकुनी, लाभलेला हार आहे असा रत्नावलीचा गाढ विश्वास होता. तोच हार अचानक नाहीसा कसा झाला याबाबतीत सर्वांनाच आश्चर्य वाटले. बरं, जर चोर घरांत शिरला असेल, तर तो एकच हार फक्त घेऊन कसा जाईल? कुणाचाही तर्क चालेना.

"नुकतंच मला समजलं कीं थोरल्या भावजींचे दिवटे चिरंजीव; अभ्यासाच्या नांवाखाली शहरांत राहातो आणि नुसत्या उनाडक्या करतो. पैसे सगळे उडवले असतील आणि म्हणूनच त्याने चंद्रमतीचा हार चोरला असेल." दुसरी सून कामेश्वरीने आपल्या पतीला सांगितलं.

"कोणत्या बिळांत कोणता सांप लपलेला असतो ते कुणाला ठाऊक! आपल्या धाकट्या भावाची मुलगी आहे चांगली; सगळ्यांशी अगदी गोड गोड बोलते, पण ती मात्र चांगलीच लबाड आहे. दोन दिवसांपूर्वी माझ्या चंद्रकोरी कानांत घालून शाळेंत गेली. बरं झालं, संध्याकाळीं मी तिला पहिल्यावर लगेच माझी कर्णफुलं मागून घेतली. आता बहुतेक तिला हा चपलाहार गळ्यांत घालून शाळेंत जायची इच्छा झाली असेल आणि तिने तो घातला असेल. काय सांगावं, हरवला देखील असेल तिने!" तिसरी सून राजलक्ष्मीने आपल्या पतीच्या कानांत फुसफुस केली.

"सासूबाई, आपण कांहीतरी सांगा हो. आजकाल नोकरांच्यावर इतका विश्वास नाही ठेवता येत. ते जिथें असतात, तिथेंच त्यांना राहू द्यावं! आता ही गौरी पाहा, जेव्हां पाहावं तेव्हां साऱ्या घरभर मोकळेपणीं हिंडतफिरत असते. मला तर तिचाच संशय येतोय." चौथ्या सूनबाईंनी आपली शंका व्यक्त केली.

"बाळराजाच्याबरोबर ती अगदी उत्साहाने शहरांत गेली. त्याच्यामागे तिचा कांहीतरी नक्की हेतू असणार. तो हार आपल्या आईजवळ द्यायचा बेत करून तिने हे सगळं ठरवलं असेल." थोरल्या सूनबाईंनी धाकटीची री ओढली.

पण गौरीविषयी रत्नावलीच्या मनांत यत्किंचित ही संशय नव्हता. पण त्याक्षणीं परिस्थिती इतकी विचित्र झाली होती कीं रत्नावलीला कुणाचाही संशय घेणे अशक्य होते. तिने याच्यावर कांहीच मत दिले नाही. गप्प बसणें हा सर्वांत उत्तम मार्ग होता.

दोन महिने उलटले, तरी हाराबद्दल पुढे कांहीच कळलं नाही. गौरी बाळराजाला घेऊन घरी परत आली. त्या दिवशी संध्याकाळीं थोरल्या मुलाने, सूर्यनारायणाने, शिवला बोलावून त्याला विचारले, "हे बघ, मी तुला आपल्या घरांतला नोकर कधी मानला नाही. नेहमी आपला भाऊ मानला आहे. घरांतल्या सगळ्याजणांना तुझ्याविषयीं आपुलकी आहे. एका बाबतीत तू मला मदत करायला हवीस. कांहीही असो, तुझी पत्नीगौरी लहान आहे, अल्लड आहे. तूच तिला विचार कीं तो हार तिने घेतला होता कां? आणि जर घेतला असला तर आता तो हार कुठे आहे?"

त्या रात्रीं शिवने आपल्या पत्नीला याबद्दल विचारले. कांहीही उत्तर न देता गौरी सरळ रत्नावलीच्या खोलींत गेली व म्हणाली, "बाईसाहेब, आपण माझ्या आजीसारख्या मला वाटता. म्हणून तर आपल्याकडून खूप सारं कामकाज मला शिकता आलं. चोरी म्हणजे काय असतं, मला ते कांही माहित नाही. कुणाचीही शपथ घेऊन मी हे सांगायला तयार आहे." असं रडतरडत ती म्हणूं लागली.

रत्नावलीने तिला समजावलं, चुचकारलं आणि परत तिच्या खोलींत पाठवलं. पण हाराच्या चोरीचा कांही



तपास लागेना. दिवसेंदिवस गौरीची चिंता वाढतच होती. लौकरच उन्हाळा सुरुं झाला. एक दिवस शिवने थोरला भाऊ सूर्यनारायण यास विचारले, ''मालक, मागल्या अंगणांतली विहिर पारच आटलीय. ती एकदा उपसायला हवी आहे. हे काम करुन घ्यायचं कां?''

पाण्याची टंचाई होतीच, म्हणून सूर्यनारायणने होकार दिला. विहीरींतला गाळ उपसण्याचे काम सुरुं झाले. चारपांच मजूर या कामासाठी आले होते. घरांतली सगळी मंडळी विहिरीजवळ जमली. विहिरींतून बादल्या, टोपल्या भरुन चिखल, गाळ बाहेर काढला जात होता. चारपांच टोपल्याभरुन गाळ त्यांनी कांठावरती बाजूलाच फेंकलेला होता. त्यानंतर विहिरींतून थाळ्या, पेले, अशा एकेक वस्तू बाहेर येऊं लागल्या. चिखलांत लडबडलेला खेळण्यांतला हत्ती विहिरीतून बाहेर काढला, आणि आजीच्या मांडीवर बसलेले छोटा बाळराजा उठून उभा राहिला व म्हणाला, ''मीच हा हत्ती इथें फेंकला होता. माझा हत्ती, माझा हत्ती, मला द्या.''

''देतो ना बाळा, पण तू सांग तू आणखी काय काय फेंकलंस विहिरींत?'' आजीने मोठ्या प्रेमाने बाळराजाला विचारले.

''फक्त हत्तीच नाही कांही, मी खूप वस्तू आंत टाकून दिल्या.'' बाळराजाने सांगितलं. मजुरांनी आणखी गाळ उपसला, त्यांत तो चपलाहार चमकत होता तो दिसला. हे काम बाळराजाचंच आहे हे लगेच सर्वांच्या लक्षांत आले. कारण मनांत राजा आपल्या बहिणीवर चिडला होता. तिच्या जन्मानंतर त्याच्याकडे कुणी फारसे लक्ष देत नव्हते. त्याच्या छोट्या बहिणीला नुसता त्याने हात लावला तर रागावत होते. आता तो मोठा भाऊ होता म्हणून त्याचेच कांहीतरी चुकत होते! पण त्यावेळेला बाळराजाच्या नाराजीकडे इतरांनी सरळ दुर्लक्ष केले.

आपल्या नातवाच्या मस्तकावरुन प्रेमाने हात फिरवीत रत्नावलीआजी म्हणाली, ''आमच्या छोट्या बाळराजांच्या या कामामुळें कितीतरी संशयी विचार मनांत येत राहिले. पण एक मात्र खरी गोष्ट – मागचा पुढचा विचार न करता कुणावरही आळ घेणे हे अतिशय चूक आहे. हा अधीरपणा चांगला नाही. पुरावा नसताना कुणावरही संशय घेणे हे त्या माणसाचा अपमान करण्यासारखे आहे. म्हणून इतके दिवस मी निमूटपणे सगळं ऐकत होते. पण आता तुमचे सर्वांचे संशय फिटले. आपल्या घरांतला पिढीजात दागिना, हा चपलाहार आपल्याला परत तर मिळाला आहे. तो शुभशकुनी हार आहे.'' गप्प उभे असलेल्या शिव व गौरीला व आपल्या सुनांना व मुलांना उद्देशून रत्नावली म्हणाली.



भारतीय दंतकथा - १६

# चौधरींची अहिंसा

देवीचा उत्सव वर्षांतून एकदा येतो तसा आला. जमीनदाराच्या प्रशस्त वाड्याच्या भव्य दालनांत कालीमातेची मृत्तिकेची मूर्ती कुशल कलावंतांनी बनवलेली होती. देवीची साग्रसंगीत पूजा मोठ्या थाटांत चालली होती. सनई चौघड्यांचे सूर सकाळपासूनच सतत कानावर पडत होते. पुरोहितांचे मंत्रपठण एकीकडे चाललेच होते. पूजाविधी चालूं होता तिथें शेंकडो स्त्रिया व पुरुष जमले होते. निमंत्रितांची रीघ लागलेली होती. जमीनदार चौधरी सर्वांचे स्वागत मोठ्या प्रेमाने व हंसतमुखाने करीत होते.

त्यानंतर उत्सवांतला सर्वांत गंभीर व भयानक प्रकार होता. त्यावेळीं अनेक बोकडांचा बळी दिला जात असे. कांहीजण तिकडे पहाण्याचे टाळत, कांहीजण भेदरुन जात, पण तरीसुद्धां ते तिथून हलत नसत. अर्थात, कांही थोड्या मंडळींना या क्रूर गोष्टींत आनंद मिळत होता.

पण ज्याची लोक उत्सुकतेने वाट पाहात बसत, तो सर्वांत जास्त लोकप्रिय कार्यक्रम म्हणजे त्यानंतरची जेवणावळ! बळी दिलेली जनावरें कापून त्यांच्या मांसाचे निरनिराळे पदार्थ बनवले जात. व प्रसाद मानून, त्याचा मनसोक्त आस्वाद सारे निमंत्रित व घरांतली मंडळी घेत असत.





# दोन घागरींवर पाय

रविवर्मा भुवनगिरीचा राजा होता. त्याच्या राज्यांत रंगनाथ नांवाचा एक वैद्य राहात होता. वैद्यकी बरोबरच चित्रकलेंतही तो तरबेज होता. कोणत्याही माणसाला त्याने एकदा पाहिले कीं त्याचे हुबेहूब चित्र तो काढू शकत असे.

एके रात्री दोन व्यक्तींनी त्याचे दार मध्यरात्रीं ठोठावले. रंगनाथने दार उघडतानाच त्यांना विचारले, "कोण आहात तुम्ही?"

त्यांच्यापैकी एकाने रंगनाथला उत्तर दिले, "आम्ही शेजारच्या गांवात राहाणारे आहोत. व्यापाराच्या कामासाठी इथें आलो होतो. पण चोरांनी आमचं सगळं कांही लुटलं. आता आम्ही पायीपायी परत जात होतो. अंधार पडला होता म्हणून रस्ता नीट दिसत नव्हता. ह्याने चुकून कुत्र्याच्या शेपटीवर पाय दिला आणि तो कुत्रा चिडून ह्याला चावला. आपण एक निष्णात वैद्य आहात हे आम्हाला ऐकून माहीत आहे, म्हणून आम्ही तुमच्याकडे अशा अवेळीं आलो. याच्या जखमेवर कृपा करुन मलमपट्टी कराल कां?"

रंगनाथने पाहिलं तर खरोखरच त्या दुसऱ्या माणसाच्या गुडघ्याखाली रक्ताचे ओघळ दिसत होते.

त्याने ती जखम स्वच्छ करुन त्यावर मलम लावले आणि पट्टी बांधली. त्या दोघांनी कृतज्ञता व्यक्त करुन ते तिथून निघून गेले.

औषधोपचार करीत असताना रंगनाथ त्यांना नीट न्याहाळून बघत होता. त्यांचे चेहरे अतिशय अस्वस्थ व भेदरलेले दिसत होते हे त्याला जाणवले. क्षणभर रंगनाथला वाटलं कीं हेच दोघे तर चोर नसतील? हा विचार मनांत येताच ते दोघे गेल्यानंतर त्याने त्यांची चित्रें काढली.

दुसऱ्या दिवशी सैनिकांच्या घोषणेवरुन रंगनाथला कळलं कीं आदल्या रात्रीं राजा रविवर्माची हत्या करण्याचा प्रयत्न झाला होता. अर्ध्या रात्रीं दोन व्यक्ती सुरे घेऊन राजाच्या अंतःपुरांत शिरले होते, पण संरक्षक शिपायांचा ओरडा ऐकून ते तिथून पळाले. सैनिकांनी त्यांचा पाठलाग केला, पण अंधाराचा फायदा घेऊन ते निसटले व दिसेनासे झाले.

रंगनाथची शंका बरोबर होती. त्याने काढलेली चित्रें घेऊन तो नगराध्यक्षाकडे गेला, आणि त्या रात्रींची घटना त्याने त्यांना सविस्तर वर्णन करुन सांगितली. त्या चित्रांच्या मदतीने नगराध्यक्षाने त्या दोन्ही चोरांना पकडले.

राजाने त्या दोघांना फांशीची शिक्षा दिली. रंगनाथचा आदरपूर्वक सत्कार केला. त्या चित्रांमुळे अपराधी पकडले गेले म्हणून रंगनाथला एक मूल्यवान वस्तू भेटीदाखल दिली गेली.

या सत्कारामुळें रंगनाथची साऱ्या राज्यांत वाखाणणी झाली व त्याला खूप प्रसिद्धी मिळाली. त्यामुळें त्याला चित्रकलेंत जास्त रस निर्माण झाला. तो चित्रें काढण्यांतच जास्त वेळ घालवू लागला. वैद्यकीच्या व्यवसायांत त्याला गोडी वाटेनाशी झाली. कधीकधी आजारी रुग्ण त्याच्याकडे आले तर तो नीट चिकित्सा करीत नसे. हळूहळू लोकांचा त्याच्यावरचा विश्वास उडाला. उपचार करुन घेणाऱ्या लोकांची संख्या कमी होत गेली.

त्याचवेळीं आजूबाजूच्या प्रदेशांत दुष्काळ पडला. भुवनगिरी राज्यांतून एक चांगली नदी वाहात होती, त्यामुळें जरी पाऊस नव्हता, तरी या राज्यांतल्या लोकांचे हाल झाले नाहीत. शेजारच्या राज्यांतून इथें लोक वस्ती करण्यासाठी येऊं लागले.

स्थलांतर करणाऱ्या अशा लोकांमधें विश्वकेतु नांवाचा एक मध्यमवयीन गृहस्थ होता.



तो वैद्यकी शिकलेला होता. व पूर्वी एकदा त्याची रंगनाथशी भेटही झालेली होती. रंगनाथ एक उत्तम वैद्य आहे हे विश्वकेतुला ठाऊक होतं. सध्यां रंगनाथला फक्त चित्रकलेंतच रुची आहे व वैद्यकीच्या व्यवसायाकडे त्याचे दुर्लक्ष होते आहे, ही बातमी त्याला लोकांकडून समजली. आता रंगनाथकडे फारसे रुग्ण जात नव्हते असं लोकांनी सांगितलं होतं.

विश्वकेतुने शहराच्या बाहेरच्या बाजूला एक मोठे घर भाड्याने घेतले आणि त्याने तिथे वैद्यकीचा व्यवसाय सुरुं केला. रंगनाथच्या बेपर्वाईला कंटाळलेले लोक आता विश्वकेतुकडे औषधांसाठी जाऊं लागले.

इकडे रंगनाथची मिळकत बंद झाली होती. जे सांठवलेले होते ते संपत आले. रोजचा खर्च

परशुराम गुप्ता



भागवणे त्याला कठीण जाऊं लागले. यापुढें काय करावे हे त्याला समजेना. याविषयी सल्ला घ्यावा म्हणून तो आपल्या मामाच्या गांवी जायला निघाला. मामा दुसऱ्या जवळच्या गांवात राहात होता.

जेव्हां रंगनाथ गांवाबाहेर पडला तेव्हां त्याला एक मोठे जुने कौलारु घर दिसले. रंगनाथनेही लोकांकडून विश्वकेतुबद्दल ऐकले होते. हे त्याचेच घर असावे हे रंगनाथने चटकन ताडले. त्यावेळीं विश्वकेतु घराच्या ओसरीवर बसून सनई वाजवीत होता.

रंगनाथला आपल्याकडे येताना पाहून विश्वकेतु उठून उभा राहिला. त्याने आश्चर्याने विचारले, "आपण आणि इकडे?" असं म्हणून त्याने रंगनाथला आदरपूर्वक प्रणाम केला, आणि त्याला बसायची विनंती करुन तो पुढे म्हणाला, "रंगनाथराव, मी आपल्याला ओळखतो. पण मला आपण कांही ओळखत नसणार! माझं नांव विश्वकेतु आहे. आमच्या राज्यांत पाऊस पडला नाही व दुष्काळ पडला. म्हणून मी आता इथें राहायला आलो आहे."

त्याच्या स्नेहशील बोलण्यामुळें रंगनाथ खूष होउन त्याला म्हणाला, "तुम्ही सनई फारच छान वाजवता हं!"

विश्वकेतुने हंसून म्हटले, "लहानपणापासून मी हे वाद्य वाजवायला शिकलोय खरा, पण माझा मुख्य व्यवसाय वैद्यकीचा आहे. सनईवादनावर मी भरपूर पैसा कमावला. त्याकाळीं माझं नांवही गाजत होतं. राज्यपुरस्कारदेखील मिळाला. माझं सारं लक्ष संगीतात होतं. वैद्यकीकडे माझं लक्ष लागेना. साहजिकच माझ्याकडे रोगी येण्याचे बंद झाले. तेव्हां माझ्या लक्षांत आलं कीं सनईवादनामुळें पोटाला पुरेसं मिळतंच असं नाही. पण हे जरा उशीरां लक्षांत आलं!"

"हरकत नाही. पण त्यानंतर तुम्ही काय केलंत?" रंगनाथने आतुरतेने विचारलं.

"आपला निर्वाह चालवण्यासाठी मी एक व्यवसाय स्वीकारला आणि स्वत:च्या आत्मतृप्तीसाठीं दुसऱ्या व्यवसायाची निवड केली. अनवधानाने मी आत्मसंतोष हेच सर्वस्व मानले, आणि त्यांत बुडालो. ही माझी चूक महागांत पडली. आता मी या नव्या शहरांत आलो आहे. इथें मला कुणीही ओळखत नाही. म्हणून लोक माझ्या औषधोपचारांवर विश्वास ठेवतील असं वाटतं. कधीकधी स्वत:च्या मनोरंजनासाठी मी सनई बाहेर काढून वाजवतो." विश्वकेतुने आपली परिस्थिति कथन केली.

ह्याची कर्मकहाणी आपल्यासारखीच आहे, हे पाहून रंगनाथ थक्क झाला व थोडा वेळ स्तब्ध राहिला. नंतर भानावर येत त्याने म्हटलं, "तुम्ही माझ्यापेक्षां वयाने लहान आहात, पण जीवनाचे मर्म तुम्ही फार लवकर ओळखलेत. स्वानुभवाच्या आधाराने तुम्ही योग्य मार्ग पत्करला आहेत. दोन घागरींवर पाय ठेवून उभा राहाण्याचा प्रयत्न केला तर धोका जास्त आहे. एक तर पुढें जाता येत नाही, कीं नीट उभे राहाता येत नाही, आणि जिवाला धोकाच अधिक! मीही हीच चूक केली. म्हणून माझी अशी दैना झाली आहे. मीदेखील तुमच्याप्रमाणेच दुसऱ्या एखाद्या राज्यांत जाऊन स्थायिक होतो."

"अहो, एक निष्णात वैद्य म्हणून आपली कीर्ती जुनीच आहे. इथल्या लोकांची आत्ता कुठे मला वैद्य म्हणून मान्यता मिळते आहे. आपण दोघेही या शहरांत आनंदाने आपला व्यवसाय चालू ठेवूं शकतो. तसं झालं तर दुधांत साखर! आपण हे गांव सोडून जाण्याची जरुर भारुणारच नाही." विश्वकेतुने सांगितलं.

रंगनाथला त्याची विचारसरणी पटली. त्यानंतर दोघांनीही आपली वैद्यकी निष्ठेने आणि प्रामाणिकपणें चालूं ठेवली. साहजिकच लोकांचा विश्वास व आदर संपादन करुन दोघेही लोकप्रिय झाले.



# भारताची ओळख - प्रश्नावली

१. संक्रांतिचा सण प्रत्येक राज्यांत वेगळ्या पद्धतीने साजरा केला जातो. त्यानुसार खालच्या जोड्या जमवा.

| | |
|---|---|
| अ.पतंग उडवणें | १.तमिळनाड |
| ब.भात शिजवणें | २. केरळ |
| क.पर्वतावरच्या मंदिरात जाणे | ३. गुजरात |

२. पुराणकथेतला एक राजा आपल्या राज्यांत परत आला म्हणून दहा दिवस आनंदोत्सव केला गेला. हा राजा कोण?

१. युधिष्ठिर
२. रामचंद्र
३. महाबळी



३. या चित्रांतल्या नेत्याने एका धार्मिक उत्सवाला सामाजिक नवे परिमाण दिले व राष्ट्रीय भावना त्यामुळें चेतवली गेली. हे कुणाचे चित्र आहे व हा उत्सव कोणता?

४. या चित्रांतली मंडळी आनंदी दिसतात, पण चित्रांत कांहीतरी गडबड झालीय असं वाटतं. काय आहे बरं?



५. महमद पैगंबराचा मुलगा हुसेन याचा हुतात्मा दिवस मुसलमान धर्माचे लोक पाळतात. हा कोणता दिवस आहे?

अ. रमजान
ब. मोहरम क. इद-उल्-फित्र

*(उत्तरें पुढील महिन्यांत)*

## जुलैच्या कोड्याची उत्तरें

१. बृहस्पती
२. आर्यभट्ट
३. शेती/शेतकी
४. मदनमोहन मालवीय/बनारस हिंदू विद्यापीठ
५. रुरकी विद्यापीठ
६. डॉ. एल्.के. अनंतकृष्ण अय्यर.





# गणेश पुराण

**ग**जानन पंडिताच्या घरी कामधेनूसारखी एक दुभती गाय होती. नंद नांवाचा एक माणूस त्या गाईला चारा पाणी घालून तिचे दूध काढी व गजानन पंडिताला निर्भेळ दाट दूध आणून देई. स्वरकेसरीने नंदला लाभ देऊन त्याने काय करावयाचे ते त्याला चांगले पढवून ठेवले.

गणेश चतुर्थी पासून अनंतचतुर्दशी पर्यंतचा गणेशोत्सव सुरू झाला. त्या उत्सवाला मुलगी, जांवई व नातूगणेशभट्ट सर्वांना जवळच्या कल्याणी नगरीत घेऊन यायला गजाननाची बायको गेली होती. त्यांना यायला उशीर झाला.

गजानन पंडितांचे गायन ऐकण्यासाठी व भक्तिरसपान करण्यासाठी दुरुन रसिक श्रोते वातापी नगरीत येऊ लागले होते. त्या दिवशीच उत्सव प्रारंभ होणार होता. गजानन पंडिताचें गायन चतुर्थीला सुरूं होणार होते. नंदने स्वरकेसरीने सांगितल्याप्रमाणे पेल्यांतल्या पाण्यांत ताजे आणलेले दूध ओतून तो गजानन पंडिताला दिले.

गजानन पंडिताने पेल्यातले पाणी मिसळलेले दूध पाहिले व आश्चर्यचकित होऊन विचारले - ''नंदा, हे काय रे? आजपर्यंत तू दुधांत कधी पाणी घातले नाहीस.'' गजानन पंडिताने विचारतांच नंद ओरडून म्हणाला - ''तो गणपती साक्षी आहे. मी दुधांत पाणी घालून आणले नाही. मी शपथ घेऊन सांगतो.''

गजानन पंडिताशी नम्रपणे बोलणारा नंद त्या दिवशी असा निर्भयपणे ओरडत असलेला पाहून त्या वाटेने जाणारे लोक थक्क होऊन जागच्या जागी थबकले. त्याच वाटेने स्वरकेसरी जात होता. तो थोडा दूर उभा राहिला आणि मनांत गुदगुल्या



झाल्यासारखा पाहू लागला. गजानन पंडिताने थोड्याशा रागानेच डोळे वटारून नंदाला विचारले - ''तू शपथ घ्यायलाही तयार झालास काय? घे तरी कोणाची शपथ घेतोस ते? पाहू दे तरी!''

शपथच घ्यावी लागणार हे कळतांच नंद मागेपुढे करू लागलेला पाहून गजानन पंडिताने दरडावून विचारले - ''असं काय पहातो आहेस? शपथ कां नाही घेत?'' नंदा घाबरल्यासारखा झाला.

दूर उभा असलेला स्वरकेसरी शिष्टासारखा पुढे येऊन म्हणाला - ''एवढा राग काढतां का त्याच्यावर? घे रे शपथ, सांगितलेले सरळ बोल, समोरचा दिवा विझवून घे शपथ! भिण्याचं कारण काय?'' असे म्हणत त्याची समजूत घालीत असल्याचे त्याने सोंग केले.

नंदा स्वतःला सावरण्याचा प्रयत्न करीत धीर करून समोरच्या खोलीत सोन्याच्या गणेशमूर्तीसमोर जळत असलेल्या दिव्यासमोर जाऊन उभा राहिला. कांपऱ्या आवाजात म्हणाला, - ''मी जर दुधांत पाणी घालून आणलं असेल तर माझे दोन्ही हात गळून पडूं देत, नाही तर तसं म्हटलं असेल तर माझा गळा पडू दे!'' असे म्हणत त्याने दिवा विझविला आणि डोळे घट्ट बंद करून घेतले.

गजानन पंडित थक्क होऊन पहात राहला. त्याचा कंठावरोध झाला. त्याच्या तोंडावाटे शब्दच फुटेचनात.

''ओ हो, येथवर गोष्ट आली होती वाटतं!'' असं चार माणसं बोलत असतां स्वरकेसरी म्हणाला - ''शपथ घे म्हणून म्हणायचं म्हणजे थट्टा का हो?'' नंदाने स्वरकेसरीचा आवाज ओळखून डोळे उघडले आणि आपले हात जागच्या जागी असल्याचे पाहून घाईघाईने स्वरकेसरी होते तिकडे धावला.

त्याच वेळी बालगणेश भट्ट धांवत तेथे आला व म्हणाला - ''आजोबा, मी गाडीतून उतरून धावत पुढे आलो. आजी वगैरे गाडीतून येत आहेत.'' असे म्हणत त्याने आजोबांकडे पाहिले व निश्चेष्ट उभा राहिला. तेथे जमलेल्या लोकांनी सांगितलेले ऐकल्यावर ओठ घट्ट दाबून आणि कंबरेवर दोन्ही हात ठेवून ताठ उभा राहून म्हणाला - ''नंदा, थांब!''

स्वरकेसरी बरोबर निघालेला नंदा मंत्रमुग्ध झाल्यासारखा जागच्या जागी थांबला आणि खोलीत दिवा अजून तसाच तेवत असलेला पाहून घाबरला.



बाल गणेशभट्ट म्हणाला - ''तू दिवा चांगला मालवलेला नव्हतास असं वाटतं. म्हणून पुन्हां शपथ घे पाहू!''

''कांही भ्यायचे कारण नाही, जा पुन्हा शपथ घे रे,'' नंदाच्या पाठीला खूण करून स्वरकेसरीने जायला सांगितले.

बाल गणेशभट्ट त्याला म्हणाला - ''नंदा, मी म्हणतो ते बरोबर ऐक. तू असे म्हण. मी जर पाण्यांत दूध घालून दिले असेल तर माझे दोन्ही हात गळून पडू देत! असे म्हणून दिवा मालव.''

नंदाला त्याच्या डोक्यावर घागरभर पाणी ओतल्यासारखं झालं. तो थरथर कांपत कांपऱ्या आवाजात म्हणाला - ''दादा, मी नाही शपथ घेत! या स्वरकेसरींनी मला सांगितल्यासारखं मी पाण्यांत दूध घालून आणलं होते. दुधांत पाणी घालून आणलं नव्हतं अशी मी शपथ घेतली होती. माफ करा, मी चुकलो!'' असे म्हणत घाईघाईने जाऊन चांगल्या दुधाचा तांब्या घेऊन आला व तो बाल गणेशभट्टच्या समोर ठेवून गुडघे टेकून उभा राहिला.

तेथे जमलेले सर्व लोक हसू लागलेले पाहून स्वरकेसरी सर्वांची नजर चुकवून तेथून निसटला; कित्येक जण त्याच्या शोधार्थ धावले, तेव्हां बाल गणेशभट्ट जमलेल्या सर्व लोकांकडे पाहून म्हणाला - ''पाहिलांत! या शपथा घेणारे आणि घेवविणारे सर्व लबाड आहेत! भोळ्याभावड्या लोकांना फसविणारे फसवे लोक आहेत!''

''होय रे बाबा! तू लहान आहेस, परंतु तू म्हणालास ते बरोबर आहे, सर्वांचे डोळे उघडले!'' या शब्दांत मुलाची प्रशंसा करीत आणि गजानन



पंडिताचा अवरोधलेला कंठ मोकळा झाल्याबद्दल आनंद मानीत सर्व लोक तेथून निघून गेले.

गणेशभट्ट म्हणाला - ''आजोबा! तुम्ही इतके मोठे विद्वान आहात; तरी भोळ्या भावड्या लोकांसारखे या आणाशपथांवर कसा काय हो विश्वास करता? आश्चर्यच आहे बुवा!''

गजानन पंडिताने बाल गणेशभट्टला पोटाशी घट्ट आवळून धरले व म्हणाले - ''होय, बाबा गणेशा!'' असे म्हणत असता रस्त्यावर गाडी येऊन थांबली.

गजानन पंडिताने डोळे उघडून पाहिले, पण बाल गणेश गाडीतून उडी मारुन बाहेर येत असलेला दिसला.

गजानन पंडिताच्या चेहऱ्यावर आनंदाबरोबर एक ज्योती झळकली. ''गणेशा!'' असे म्हणत अत्यंत आनंदाने आनंदभैरवीचे स्वर काढीत असल्यासारखे ओरडले.



गोष्ट संपवीत पावन मिश्र म्हणाले - "मुलांनो, तर आतां सांगा प्रथम बाल गणेश भट्ट म्हणून आला होता तो कोण रे? सांगा पाहू!" असे त्यांनी म्हणतांच मुले म्हणाली - "आणखी कोण? आपला गणपतीच, वातापी गणपतीच!" त्यांच्या स्वरांत मोठ्यांनीही आपला स्वर मिळविला, पावन मिश्र पुन्हां सांगू लागले -

"आजोबा!" असे म्हणत गणेश भट्ट हात पुढे करुन येत असता - "गणेशा!" म्हणत गजानन भट्टने नातवाला उचलून घेतले व नातवाला म्हणाले - "गणेशा! गणपतीने आमच्यावर अनुग्रह करून तुझे रूप घेऊन आला आणि आपले घर पवित्र केले. हे गजाननचे देऊळ आहे!" असे म्हणत साठी उलटलेल्या त्या म्हाताऱ्याने लहान मुलांसारख्या उड्या मारायला सुरवात केली आणि "तांडव नृत्य करी गजानन, धिमिकिट..." म्हणत आनंदभैरवी राग म्हणायला सुरवात केली. त्यांच्या त्या गायनाचा प्रतिध्वनी घंटेचा आवाज होतो तसा सर्व गावभर दुमदुमला.

गांवभर पसरलेल्या त्या आनंदभैरवीच्या स्वरांत मग्न होऊन स्वरकेसरी धावत येऊन गजानन पंडिताचे पाय धरून म्हणाला - "गुरुदेव! आपण क्षमा केली असे म्हणेपर्यंत मी हे पाय सोडणार नाही."

गजानन पंडिताने चट्टदिशी खाली वाकून स्वरकेसरीला दोन्ही हात धरून उभे केलं व म्हणाले - "स्वरकेसरी! आपण निमित्त मात्र असतो. ही सर्व त्या गणपतीची लीला आहे! तुम्ही संगीत शास्त्राचे मंथन केलेले आहे. मी भक्ति व प्रेम यांना महत्त्व देऊन भक्तिरसात निमग्न होऊन गाणे म्हटले तरच संगीत उच्च दशेला पोचले असें मानतो, एवढेच. आता यापुढे सोन्याच्या गणेशमूर्ती सर्व तुझ्याच. हे सर्व सत्कार मला नकोसे वाटू लागले आहेत, या पुढे मी संगीत सभांतून कधी गाणे म्हणणार नाही." असे म्हणतांच बाल गणेश भट्ट म्हणाला - "आजोबा! तुम्ही घरांत बसून स्वतःच्या हौसेखातर गाऊं लागलात तर ते नाही चालणार."

गजानन पंडिताने हात जोडून गणपतीचे नमन केले व म्हणाले - "हे विघ्नहर्त्या गणनायका! तू माझ्या नातवाच्या तोंडी उपदेश केलास. आजपर्यंत मी तुझ्या इच्छेप्रमाणेच गायन करीत राहलो. यापुढे तुझे स्तवन करण्यासाठीच गायन करीन. ऐकणाऱ्याच्या हृदयांत तू वास कर. सत्कार समारंभांपासून मात्र मला वांचव."



तेव्हां स्वरकेसरी म्हणाला - "गुरुदेव! आपण रचिलेली भक्ति गीते आपण म्हणतां त्या पद्धतीने गाणाऱ्या व्यक्तीसच सुवर्ण मूर्ती लाभेल. अशा तऱ्हेने तरी आमच्या हृदयांत तुमच्यासारखीच भक्तिभावना उत्पन्न होवो असा आशीर्वाद द्यावा!" असे म्हणत स्वरकेसरीने ओंजळ पुढे केली.

गजानन पंडिताची षष्ठ्यब्दी पूर्ती आली. त्या संदर्भात ते नकोनको म्हणत असतांही त्यादिवशी संध्याकाळी वातापि गणपतीच्या समोरच्या पटांगणात एक मोठी सभा झाली. पुष्पमालांनी सजविलेल्या व्यासपीठावर षष्ठ्यब्दी पूर्ती उत्सव समारंभ थाटामाटाने पार पडला.

गजानन पंडित हात जोडून म्हणाले - "कित्येक थोर पुरुषांनी संगीत आणि कविता भक्तीलाच अर्पण केली, आणि तोच सन्मार्ग म्हणून मानले. त्या सर्वांना मी नमन करतो. माझाही तसाच विश्वास आहे. त्याहून जास्त माझ्यात स्वतःचं विशेष असे कांही नाही." असे सांगून अनेक राग गुंफून गणपतीचे कीर्तिगान करीत गजानन पंडिताने रागगुच्छ प्रस्तुत केले. ते गायन ऐकत असतां नृत्य गणपतीचे जे स्वरूप श्रोत्यांच्या अंतरपटलावर अंकित झाले ते सर्वकाळ राहून गेले.

वातापि नगराच्या इतिहासात गजानन पंडिताचे चरित्र सुवर्णाक्षरांनी लिहिले गेले आहे, असे सांगून पावन मित्राने गजानन पंडिताची कथा संपविली.

एके दिवशी बरीचशी मुलं व त्यांच्या पाठीमागे गर्दीकरून उभे राहलेले मोठे लोक एका



चित्रकाराला लक्षपूर्वक पहात होते व ते चित्र काय असावे या विषयी परस्परांना विचारीत होते. त्या चित्रांत एक विचित्र हरिणाचे चित्र होते, ते हरिणाचे भूत असावेसे भासे. त्याच वेळी पावन मिश्रांनी सभा मंडपात पाऊल टाकले व मुले उत्सुकतेने व कुतूहलाने हरिणाचे चित्र पहात असल्याचे ओळखले व म्हणाले - "मुलांनो! या बसा, ती कथा मी सांगतो, ऐका!" असे सांगून ते गोष्ट सांगू लागले:

इंद्राने सगर चक्रवर्ती राजाच्या यज्ञासाठी म्हणून सोडलेला घोडा धरला आणि बांधून ठेवला. वृद्ध राजाचा यज्ञ निर्विघ्न पार पडला नाही. इंद्राने घोडा चोरून नेला.

वृद्ध महाराजांच्या अभिनंदन नांवाच्या मुलाने इंद्राला त्याचा भाग न देता यज्ञाचा आरंभ केला. इंद्राला भयंकर राग आला व त्याने कालाला पोटभर खायला प्यायला घालून अभिनंदनाचा यज्ञ उध्वस्त कर अशी विनंती केली.

काल हा वेळेचा अधिपती. प्राणिमात्राच्या जीवन मरणाचे मूळ कारण. कालाला यम धर्मराज असे ही म्हणतात.

कालाने यज्ञपुरुषाचे आवाहन केले व अभिनंदनाच्या यज्ञाच्या होमकुंडातून एक महाभयंकर असे प्राणिस्वरूप भूत निर्माण केले. तसे भूत पूर्वी कधीकोणी पाहिले किंवा ऐकलेही नव्हते, कीं त्याच्याविषयी कांही माहीतही नव्हते. म्हणून ऋत्विज अध्वर्यू वगैरे सर्व त्याला पाहून धावरून पळाले. यज्ञवेदिका नष्ट झाली.

अभिनंदन हा गणेशभक्त होता. त्याचे गुरु वशिष्ठ म्हणाले - "राजा, मध्ये असे विघ्न येईल असे समजूनच होमकुंडासमोर मोठे स्वस्तिकपीठ तयार करविले होते. स्वस्तिक हे विघ्न दूर करील." राजाने तसे केले.

रांगोळीने काढलेल्या त्या स्वस्तिक केंद्रातून एका अद्भुत नादाचे कंपन बाहेर आले व त्या महाभयंकर भुताला जणूं कांही गिळून टाकले. रांगोळीचे कण मोठ्या उंदरासारखे बदलले, कित्येक राक्षसी मुंग्या त्या भुताच्या सर्वांगावर चढल्या आणि त्याचा चावा घेऊ लागल्या. ते भयंकर भूत जमिनीवर गडबडा लोळूं लागले आणि क्षणार्धांत अदृश्य झाले.

*(क्रमशः)*







# राजकन्येचा चांदोबा

फार पूर्वीची गोष्ट आहे ही. राजस्थानमधें एका राज्यांत लीलावती नांवाची एक आठ वर्षांची चिमुरडी राजकन्या होती. एकदा तिने खूपखूप मिठाई खाल्ली आणि तिची प्रकृति एकदम बिघडली.

राजवैद्यांनी तिला तपासले. आणि नंतर महाराजांना बोलावणे पाठवले. दालनांत पाऊल टाकताच राजाने लेकीला जवळ घेतले व घाबरलेल्या स्वरांत तिला विचारले, "बाळे, तुझी काय इच्छा आहे?"

"पिताजी, मला लगेच आत्ताच्या आत्ता चांदोबा हवा आहे. तो मिळाला कीं मी बरी होईन. या पलंगावरुन उठून हिंडायला फिरायला लागेन?" लीलावतीने मलूल स्वरांत म्हटलं.

त्याकाळचे बरेच राजेरजवाडे अहंकारी असत. त्यांतले कांही तिरसटदेखील असत. मुलीने चंद्रासाठी मागणी केली आणि राजाने लागलीच भंपकपणे म्हटलं, "या लहानशा गोष्टीसाठी तू आजारी पडलीस काय? तुझ्या हातांत चांदोबा आलाच आहे असं समज." आणि त्याने सेनापतीला निरोप धाडला.

सेनापती आल्याबरोबर राजाने म्हटलं, "राजकन्या लीलावती चांदोबा मागते आहे. तो मिळाला कीं तिची प्रकृती ठीक होईल. कोणत्याही परिस्थितींत उद्यां इथें चंद्र यायला हवा. ही माझी आज्ञा आहे."

"चांदोबा?" सेनापती आश्चर्यचकित होऊन विचारुं लागला, "महाराज, राजकुमारीने आजपर्यंत जे जे मागितलं, ते सारं आणून दिलं. हत्तीचा दांत, मोर, माकड, रत्नें, माणकें, त्यांची प्रत्येक मागणी मी पूर्ण केली आहे. पण आता चांदोबा आणणें मला कसे शक्य आहे? ते काम माझ्या कुवती-बाहेरचे आहे. कारण हा आभाळांतला चंद्र आपल्यापेक्षां पांच हजार योजनांच्या अंतरावर आहे.

राजकन्येच्या दालनाच्या सातपटीने मोठा आहे. त्याची निर्मिती तांब्यापासून केली गेली आहे. असल्या भारी वजनाचा चंद्र आणणं अगदी

- अरुंधती -



अशक्य आहे. कृपा करुन आपण मला क्षमा करावी.''

हे उत्तर ऐकून राजा नाराज झाला व सेनापतीला म्हणाला, ''माझ्या दृष्टीसमोरुन लागलीच दूर हो! आणि राज्यांतल्या जादुगाराला पाठव.''

जादूगार लगेच तिथें उपस्थित झाला. राजाची आज्ञा त्याने सविस्तर ऐकली व नंतर त्याने सुरवात केली, ''महाराज, आपल्या राजकन्येचे मनोरंजन करण्यासाठी मी कित्येक वेळा निरनिराळ्या जादूंचे खेळ इथें केले आहेत. सात प्रकारचे अद्भुत चढाव, मंतरलेली काठी, वगैरे वस्तू मी त्यांना आणून दिल्या आहेत. परंतु चंद्रमा आणून देणे हे कुणालाही शक्य नाही. तो आपल्यापासून चार हजार योजनें दूर आहे. त्या शिवाय, त्याचा आकार आपल्या राजमहालापेक्षां दसपट मोठा आहे. आणि चंद्र हा शुद्ध लोण्याचा व सायीचा बनलेला आहे. आपण कृपया मला हे काम देऊं नये. माफी असावी!''

जादुगाराचे हे लांबलचक उत्तर ऐकून राजा जास्तच नाराज झाला. त्याने जादुगाराला परत पाठवले आणि राज्यांतल्या विद्वान गणितज्ञाला निरोप धाडून बोलावून घेतले. त्या तज्ञाने दालनांत पाय ठेवला नाही तोंच राजा कडाडून ओरडला, ''तुम्ही किती वर्षे आमच्यासाठी कायकाय केलं आहेत त्याची यादी सांगत बसूं नका. आमच्या राजकन्येसाठी चांदोबा कसा आणता येईल ते गणिताचा उपयोग करुन सांगा!''

गणिती पंडितांनी थोडा वेळ आंकडे मोड केली. विचारपूर्वक हिशेब करुन ते म्हणाले, ''महाराज, हा चंद्रमा आपल्यापासून बरोबर तीन हजार योजने आणि चार कोस एवढ्या अंतरावर असतो. चांदीच्या नाण्यासारखा तो चकचकीत व खणखणीत आहे. वाळू व चुना यांच्या मिश्रणांतून तो बनवलेला आहे. इतकंच नव्हे तर, त्याला आकाशांत इतका घट्ट चिकटून बसवलेला आहे कीं त्याला सोडवून आणता येणारच नाही. मीच नव्हे, तर कुणीही त्याला इथें आणूं शकणारच नाही. माझ्यावर दयादृष्टी ठेवा आणि मला यांतून सोडवा.''

आता मात्र संतापाने राजाचे चेहरा फुलून निघाला. गणितज्ञाला तिथून परत पाठवल्यानंतर राजाने आपल्या दरबारांतल्या विदूषकाला बोलवणे धाडले. राजकन्येच्या आजाराचे कारण सांगताना राजा विदूषकाला म्हणाला, ''चांदोबा इथून किती दूर आहे याबाबतींत सेनापती, जादुगार आणि गणितज्ञ यांचे विचार अगदी भिन्न आहेत.''

विदूषकाने आश्चर्य वाटल्यासारखे दाखवून म्हटले, ''महाराज, ही तर फारच नवलाईची गोष्ट आहे. हे राज्यांतले तिघेही अत्यंत बुद्धिमान गणले जातात! त्यांनी जे म्हटलंय, तो बरोबर असेलही. पण या सर्वांपेक्षां राजकन्येच्या मनांत चंद्राविषयी काय कल्पना आहे हे प्रथम ऐकायला हवे. ते सर्वांत महत्वाचे आहे. त्यांच्या मनांत चांदोबा किती दूर असतो, किती मोठा दिसतो हे पाहणे आवश्यक आहे.''

राजाबरोबर विदूषक राजकन्येच्या महालांत गेला. तिच्या पलंगाजवळ जाताच तिने उत्सुकतेने विचारलं, ''आणलात कां चांदोबा?''

''राजकुमारी, हा तर माझ्या डाव्या हातचा खेळ आहे, पण त्यापूर्वी आपण मला सांगा कीं तो आपल्याला केवढा मोठा दिसतो, किती दूर राहातो आणि तो कशाचा बनवलाय ते माहीती आहे कां?'' विदूषकाने विचारले.

''मला कुणी विचारलं तर मी सांगीन ना! हा चांदोबा माझ्या हाताच्या करंगळीच्या नखाएवढा आहे. माझ्या या खिडकीच्याबाहेर जे हे झाड दिसतंय ना, तेवढा मोठा तो उंच आहे. आणि मी पाहिलंय, कधीकधी तो या झाडाच्या फांद्यात अडकलेला असतो, पण तरीसुद्धां चमकत राहातो. नाहीतरी तो सोन्याचाच केलेला आहे, तेव्हां चमकणारच.''

राजकन्येने आपल्या मनांतले विचार सांगितले. ''राजकुमारीजी! ठीक आहे. आता मला समजलं. आज रात्रीच मी या झाडावर चढून बसेन. चांदोबा फांदीत अडकला कीं मी त्याला पकडून लगेच घेऊन येईन.'' विदूषकाने राजकन्येला आश्वासन दिले. विदूषकाने तडक राजाच्या सोनाराला बोलावले आणि राजकन्येच्या बोटाच्या नखापेक्षां थोडा मोठा असा सोन्याचा चांदोबा बनवायला बसवले.



सुरेखशा एका लहान हारांत तो चिमुकला चांदोबा सोनाराने छानपैकीं बसवला आणि विदूषकाजवळ तो देताना सोनाराने विचारले, ''काय भानगड आहे ही? हे असं कशासाठी बनवायला सांगितलंत तुम्ही?''

''दिसत नाही कां तुला? अरे, हा चांदोबा आहे.'' विदूषकाने हंसतहंसत म्हटले.

''पण चांदोबा तर इथून तीन योजने लांब आहे, तो तांब्याचा आहे आणि गोल गरगरीत देखील आहे!'' सोनाराने म्हटले!

तिथून विदूषक सरळ राजकन्येकडे गेला आणि आपण बनवून घेतलेला चांदोबा त्याने तिच्या हातांत ठेवला तो बघून राजकन्येचा आनंद गगनांत मानेना. दुसऱ्याच दिवशी तिच्या प्रकृतीला आराम वाटायला लागला आणि ती बागेत जाऊन उड्या मारायला लागली.

आता ती सदैव आनंदी व उत्साही दिसायला लागली. एका दिवशी तिच्या पतीने तिच्या आनंदाचे कारण काय असे विचारले.

चंद्रदेव बाळरुपांत रोज तिला भेटायला तिने त्याला कसा येतो ते तिने त्याला कौतुकाने सांगितले.

''चंद्रदेव कांही तुझा खरा मुलगा होऊं शकणार नाही. पण जर तो देव आहे, तर तो तुला बाळ होवो, असे वरदान देऊं शकेल.'' तिचा नवरा म्हणाला.

त्या रात्रीं चंद्रदेव आला तेव्हां ही फार गंभीर दिसत होती. ''अम्मा, तुला कसली आशा आहे?'' (तामिळमधें आसै म्हणजे आशा किंवा इच्छा).

''माझ्या दैवी पुत्रा, मला माझे स्वतःचे मूल हवे आहे.'' ती स्त्री म्हणाली.

''मी तुझ्यासाठी प्रार्थना करीन आणि तुझी इच्छा पुरी होईल.'' चंद्रदेवाने सांगितलं. ''पण मग तू मला विसरणार नाहीस ना?'' तो पुढें हंसून म्हणाला व परत गेला.

लौकरच त्या स्त्रीला एक गोंडस मुलगा झाला आणि तिचा आनंद गगनांत मावेना. आता तिचे बाळ तिच्याजवळ होते, पण रोज रात्रीं चंद्रदेवाला दूधभात खाऊं घालायला मात्र ती कधीही विसरली नाही.

अशी कांही वर्षे उलटली. एक दिवस ती आजारी पडली. जेव्हां आपला अंतिम क्षण जवळ आलाय असं तिला वाटलं तेव्हां तिने आपल्या मुलाला बोलावून सांगितलं, ''रात्रीं चंद्रदेव येईल. मी रोज देते तसा आजही तू त्याला दूधभात दे.''

आणि ती मरण पावली. त्या छोट्या मुलाने भात शिजवला, दूध गरम केले आणि तो चंद्रदेवाची वाट पहात बसला. चंद्र आला आणि अम्माला शोधूं लागला. ''ती आता नाही!'' तिच्या मुलाने सांगितले.

चंद्रदेवाला फार दुःख झाले, ''माझी अम्मावैसे!'' आणि तो दिसेनासा झाला. त्या रात्रीं आकाशांत चंद्र दिसला नाही.

त्या दिवसापासून, दर महिन्यांतून एक दिवस चंद्र आभाळांत अजिबात दिसत नाही, कारण पृथ्वीवरच्या त्याच्या या मानलेल्या अम्मासाठी तो शोक व्यक्त करतो. तो जसं शेवटी म्हणाला होता, ''माझी अम्मावासै'' आणि दिसेनासा झाला, तेव्हां पासून या दिवसाचे नांव अमावासै किंवा अमावास्या असे पडले.







# बदला

उत्तरी पर्वताच्या पलीकडे मारुदेव नांवाचा एक जादुगार राहात होता. त्याला बरेच मंत्र येत होते, पण त्याने पैसे कमावण्यासाठीं त्यांचा उपयोग कधी केला नाही. म्हणून तो नेहमीच गरीब राहिला. त्याला लव नांवाचा एक मुलगा होता. पित्याने त्याला आपली सारी विद्या शिकवली होती.

लवला मात्र आपल्या विद्येचा उपयोग धन व कीर्ती मिळवण्यासाठी करायची इच्छा होती. म्हणून आपले गांव सोडून तो देशविदेशांत हिंडण्यासाठी निघाला. अनेक राजेरजवाड्यांनी त्याची जादू पाहून त्याला भरपूर बक्षिसें दिली. अशा तऱ्हेने फिरताफिरता तो तोरण देशांत पोंचला. तिथल्या राजाला भेटून आपल्या जादूचा प्रयोग करण्याची परवानगी त्याने मागितली.

तोरण देशाच्या राजाला बऱ्याच वर्षानंतर एक मुलगा झाला. त्याची जन्मकुंडली बघून ज्योतिषांनी भाकित वर्तवलं होतं कीं जेव्हां तो दोन वर्षांचा होईल, तेव्हां एक जादुगार येईल आणि त्याच्यामुळें मुलावर संकट येईल. तेव्हांपासून जादू किंवा जादुगार हे नुसते शब्द ऐकले तरी राणी व राजा, दोघेही घामाघूम होत असत. आता लवने जेव्हां त्यांना सांगितलं कीं तो जादुगार आहे, तेव्हां राजा घाबरला. कारण राजपुत्र आता दोन वर्षांचा झाला होता. या जादुगारामुळें राजपुत्रावर कांही ना कांही विपरीत संकट आलं असतं.

राजाने मंत्र्याला सांगितलं, ''कांहीही होतो, या जादुगाराला परत धाडून द्या.'' मंत्र्याने लवला एकांतात बोलावून म्हटले, ''महाराजांना जादूचे प्रयोग पाहायला फार आवडतात. म्हणून तुमचा खास पाहुणचार करावा असं महाराजांनी सांगितलं आहे. आज तुम्ही पाहुणे म्हणून शाही अतिथी-गृहांत राहायचे आहे. उद्यां तुमच्या प्रयोगाची व्यवस्था करण्यांत येईल.''

लव फारच खूष झाला. त्या रात्री मंत्र्याने लवच्या अन्नांत विष मिसळले व त्याला खाऊं घातले. पहांट होताच नोकरांतर्फे त्याचे प्रेत पुरुन टाकण्याची व्यवस्था केली गेली.

हे सर्व जरी गुपचुप झालं असलं तरी ही बातमी शहरांत पसरली. कांही दिवसांनंतर ही बातमी मारुदेवापर्यंत पोंचली. ही गोष्ट खरी आहे

- ओमप्रकाश -



त्याने आपल्या विद्येने तिला मूर्छित केले, आणि राजकुमाराला उचलून घेऊन तो आपला गांवी परत गेला. घरीं पोंचल्यानंतर त्याने राजपुत्राचे कपडे, दागिने काढून एका पेटींत नीट ठेवले आणि आपल्या मुलाप्रमाणें त्याचे पालन पोषण करण्यास त्याने सुरवात केली.

आपल्या मुलाला कुणीतरी उचलून नेले आहे हे समजल्यावर तोरणचा राजा फारच दुःखी झाला. त्याने इतकी अतोनात काळजी घेऊन सुद्धां एकुलता एक पुत्र नाहीसा झाला. मुलासाठी शोकाकुल झालेल्या राजाचे सांत्वन करताना मंत्री म्हणाला, ''महाराज, आपण दुःख आवरावे. जे नशिबांत लिहीलेलं असतं, ते अटळ असतं. माणस युवराजांना घेऊन जाणारा माणूस एक जादुगार असला पाहिजे. आपण ज्या तरुणाला मारलं, त्याचा पिता किंवा इतर कुणी आप्त! आपणच हे संकट आपल्या हातांनी ओढवून घेतलेलं आहे. पण आपल्या ज्योतिषांनी सांगितलेले होते कीं मुलाच्या प्राणाला धोका नाही. योग्य वेळीं तो स्वतः आपल्या राज्यांत परत येईल.''

किंवा नाही याचा शोध घेण्यासाठीं मारुदेव स्वतःच निघाला. ज्या मार्गाने लव गेला तोच मार्ग मारुदेवाने निवडला. वाटेंत ठिकठिकाणीं तो जादूचे प्रयोग करीत होता, आणि मग तो तोरण देशांत पोंचला. लव तोरण देशांत आला होता हे बऱ्याचजणांना ठाऊक होतं. पण तो कुठून आला, कुठे गेला हे कांही कुणाला सांगता येईना. लवला राजवाड्यांत पाहुणा म्हणून बोलावले व त्याच्यावर विषप्रयोग केला गेला हे देखील त्याने ऐकलेलं होतं.

मारुदेव स्वतः एक भला माणूस होता. पण जेव्हां त्याला कळलं कीं आपल्या मुलाला विनाकारण मारलं गेलं आहे, तेव्हां त्याने याचा सूड घेण्याचा निश्चय केला. तो राजवाड्याच्या आसपास हिंडत होता. जेव्हां राजकुमाराला हिंडवण्यासाठीं म्हणून दासी बाहेर पडली. तेव्हां

लवची जेव्हां हत्या झाली होती. तेव्हां त्याचे वय सोळा वर्षांचे होते. राजपुत्र सोळा वर्षांचा होईपर्यंत त्याला जादुगाराने सांभाळले; आणि नंतर तो सूड घेण्याच्या विचाराने राजपुत्रासह तोरण देशीं आला. त्याने राजकुमाराला सांगितलं, ''बाळ, तू ही पेटी घेऊन राजाच्या दर्शनासाठीं जा. जेव्हां तू छोटा होतास, तेव्हां तुझ्या थोरल्या भावाने याच तोरण राजाचा पाहुणचार स्वीकारला होता. राजाने त्याला जे इनाम दिलं त्याच्याबदली



ही पेटी तू घेऊन आला आहेस असं तू महाराजांना सांग.''

राजपुत्राने विचारलं, ''मला एका थोरला भाऊ होता? तुम्ही अगोदर कधीं कसं त्याबद्दल बोलला नाहीत?''

''आधी मी जे सांगतोय ते कर. म्हणजे ला तुझ्या भावाबद्दल आपोआप माहिती कळेल!'' मारुदेव त्याला म्हणाला.

ती पेटी घेऊन राजवाड्याकडे महाराजांच्या दर्शनासाठी राजपुत्र गेला. त्याने राजाला वंदन करुन म्हटले, ''महाराज, मी मारुदेव जादुगाराचा मुलगा आहे. बऱ्याच वर्षांपूर्वी माझा भाऊ इथें जादूचे प्रयोग करायला आला होता. त्याचा पाहुणचार राजवाड्यावर झाला व त्याला इनाम देखील मिळाले होते. त्याबद्दल माझ्या वडिलांनी ही संदूक आपल्याला द्यायला सांगितली आहे.'' त्याने ती संदूक राजाच्या समोर ठेवली. राजाने ती पेटी उघडून पाहिले तर जेव्हां राजपुत्र हरवला तेव्हां अंगावर असलेले कपडे व दागिने त्यांत होते.

अतीव दुःख व संतापाने राजाला भान राहिले नाही. रागाच्या भरांत त्याने आपल्याच मुलाला मारण्याचा प्रयत्न केला. त्याला आवरत मंत्रीजींनी म्हटले, ''घाई करं नये. हे कपडे, दागिने युवराजांचे आहेत हे खरं आहे. पण जर त्याने युवराजांना ठार मारले असते, तर हे कपडे त्याच वेळीं पाठवले असते. या मुलाचे वयही युवराजांच्या वया इतकेच दिसते आहे.''

राजासमोर ठेवलेल्या पेटींतून मंत्र्यांनी एकएक वस्त्र उचलून पाहिले. त्यांच्याखाली एक चिठ्ठी ठेवलेली होती. त्यांत लिहीले होते, ''राजन्, तू स्वतःच्याच मुलाची हत्या केली आहेस. माझ्या मुलाला तू ठार मारले होतेस, त्याचा बदला मी अशा तऱ्हेने घेतला आहे.''

ती चिठ्ठी बघून प्रथम राजा घाबरला. जर मंत्र्याने त्याला आवरले नसते तर जादुगाराला जसे वाटले तसे त्याने आपल्याच मुलाला रागाच्या भरांत ठार मारले असते. राजाला आपल्या अविचारीपणाचा राग आला. त्याने आपल्या मुलाला प्रेमाने जवळ घेतले व मिठी मारली. त्याने जादुगाराला बोलावून घेतले व त्याच्या मुलाला विनाकारण मारल्याबद्दल त्याची क्षमा मागितली, आणि राजाने त्याला एक जहागीर बक्षीस दिली.



# लोकनायकाचे पुण्यस्मरण

यंदा भारतांत लोकनायक जयप्रकाश नारायण यांची जन्मशताब्दी साजरी केली जात आहे.

त्यांचा जन्म ११ ऑक्टोबर १९०२ला बिहार-मधल्या सितबदियारा गावांत झाला. जेव्हां ते पाटण्याचा कॉलेजमधें शिकत होते, तेव्हां स्वातंत्र्य आंदोलनाच्या गुप्त बैठकींना ते हजर राहात असत. तिथेंच या विद्यार्थ्यांना नेत्यांची भाषणें ऐकून देशभक्तीची प्रेरणा मिळाली. कॉलेजचे शिक्षण पूर्ण केल्यानंतर उच्च शिक्षणासाठी त्यांनी अमेरिकेला जायचा निश्चय केला. शिकताना पैसे मिळवण्यासाठी त्यांनी तिथल्या द्राक्षांचे मळे, उपाहारगृहें, कारखाने, इतकेच नव्हे तर कत्तलखान्यांतही काम केले. तिथें श्रमांच्या महत्वाबरोबर श्रमिक वर्गांची दु:खें व अडचणी, यांची त्यांना जाणीव झाली. त्यांनी तिथें समाजशास्त्राचा अभ्यास केला आणि समाजसेवेच्या आदर्श कल्पना घेऊन ते १९२९ सालीं भारतांत परत झाले.



मायदेशी आल्यानंतर गांधीजींच्या नेतृत्वाखाली त्यांनी काँग्रेसमधे प्रवेश केला. त्यांच्या मनांतला भारत देश असा होता कीं तिथे जन्माच्या आधारावर भेदभाव नसावा, कुणी लहानमोठे नसावेत, आणि राष्ट्रीय संपत्तीवर प्रत्येकाला समान अधिकार असावेत. ते लौकरच राष्ट्राचे नेते झाले आणि समाजवादाची एक नवी विचारधारा दाखवणारे एक प्रमुख विचारवंत, म्हणून जनतेसमोर आले. विचारसरणीचे नेते काँग्रेसमधून बाहेर पडले व त्यांनी वेगळा पक्ष स्थापन केला. परंतु १९५२च्या पूर्वी पहिल्या सार्वजनिक निवडणुकांत हा पक्ष सत्तेवर आला नाही. तरीसुद्धां केंद्रीय सरकारांत सामील होण्यासाठी जयप्रकाश नारायण यांना पं. नेहरुंनी आमंत्रण दिले. जयप्रकाशांनी सामील होण्यास नकार दिला. १९५४ सालीं आचार्य विनोबा भावे यांनी सुरुं केलेल्या 'सर्वोदय' आंदोलनांत त्यांनी भाग घेतला आणि स्वतंत्रता व समानता यांच्या सिद्धांतावर आधारलेल्या "सर्वोदय" आंदोलनासाठी त्यांनी आपले सर्वस्व अर्पण केले.

देशाची दिवसेंदिवस होणारी अधोगती पाहून १९७१मधें जयप्रकाश नारायण यांनी सामाजिक व्यवस्थेंत परिवर्तन व्हावे, म्हणून 'पूर्ण क्रांती' चे आवाहन जनतेला केले. त्यावेळीं इंदिरा गांधींच्या सरकारने आपली सत्ता अबाधित असावी म्हणून आणीबाणी जाहीर केली व ह्यांना कैदेत टाकले. आणीबाणी संपल्यानंतर निवडणुका झाल्या. त्यांत बिगर काँग्रेस सरकार सत्तेवर आले. त्यांत देशाला मार्गदर्शन करण्यासाठी जयप्रकाशांना निमंत्रण दिले. पण यावेळींदेखील त्यांनी सरकारांत सामील होण्यास नकार दिला. शेवटी लोकशक्तीचा विजय झाला याचा त्यांना आनंद झाला.

साऱ्या जनतेने त्यांच्या त्यागी भावना जाणल्या आणि त्यांना आपला 'लोकनायक' मानले.

८ ऑक्टोबर १९७९ रोजीं जयप्रकाश नारायण निधन झाले.





# दातृत्व

राजनगरमधें रामभद्र नांवाचा एक धनवंत राहात होता. परमेश्वराने त्याला संपत्तीबरोबरच दान देण्याचा गुणदेखील दिला होता. दुसऱ्या कुणाचेही दुःख पाहिलं कीं याला कळवळा येई. संकटांत सांपडलेल्या लोकांना तो भरपूर साहाय्य करीत असे. या कारणाने त्याची संपत्ती कमी होत गेली.

त्याची पत्नी चंद्रिका हीदेखील दिलदार होती. आसपासच्या लोकांनी तिला वारंवार सांगितले होते कीं तिने नवऱ्याच्या उदारपणाला जरा आळा घालावा. ते म्हणत कीं अशा प्रकारे दान देत राहिलं तर पोराबाळांना कांहीच उरणार नाही आणि त्यांच्या उमेदीच्या काळांत त्यांना जास्त कठीण प्रसंगांना सामोरे जावे लागेल.

अशी बोलणीं ऐकली की चंद्रिका नुसतीच हंसून म्हणायची, "पाऊस पडतो तेव्हां तो बघत नाही कीं खाली माणसे राहातात कीं नुसतेच जंगल आहे ते! तो कुठल्याही प्रकाराने भेदभाव करीत नाही. निसर्गाचा हाच नियम असतो.

"जर ढगांना वाटलं कीं पर्वतांवर, जंगलांच्या डोक्यावर आपण पाऊस कशाला पाडायचा, तर आपल्याला उपयोगी पडणाऱ्या नद्या कशा निर्माण होतील? माझ्या पतीचा हा उदारपणा ही परमेश्वराची देणगी आहे. जर त्याने ठरवलं असेल कीं याच्यामुळें आम्हाला संकटे सोसावी लागतील, तर त्याच्याविरुद्ध आम्ही काय करणार?"

असे दिवस जात होते. रामभद्राचे दोन मुलगे आता सहा आणि आठ वर्षांचे झाले होते. रामभद्राच्या संस्कृत भाषेच्या ज्ञानाबद्दल लोक त्याची स्तुति करताना कंटाळत नसत.

एके दिवशी चंद्रिकाने रामभद्राला सांगितलं, "आपण प्रत्येक मागणाऱ्याला कांही ना कांही



देत राहातो. कधीही नाही म्हणत नाही. त्याबद्दल मी कधीच तक्रार केली नाही. पण आता आपली मुलें मोठी होत आहेत. त्यांना लिहायला, वाचायला शिकवणें, चांगल्या प्रकारचे शिक्षण देणे, हे आपले कर्तव्य आहे. त्यांना मोठ्या शहरांत पाठवावं आणि चांगल्या शाळेंत नांव घालावं अशी माझी इच्छा आहे. याबाबतींत तुम्हाला काय वाटतं ते मला माहीत नाही. तुम्ही संस्कृतचे मोठे विद्वान आहात, हे सगळ्यांना ठाऊक आहे. तुम्ही राजाच्या पाठशाळेंत अध्यापक व्हावं. आपली धनसंपत्ती कमी झाली तरी आपण जन्मभर विद्यादान करुं शकूं. आपल्या मुलांना बरीच संपत्ती ठेवता आली नाही तरी चरितार्थ चालवण्यासाठी आवश्यक ते चांगले शिक्षण देणें हे आपले कर्तव्य आहे. तुम्हाला काय वाटतं?''

रामभद्रने पत्नीच्या बोलण्यांतला व्यवहारीपणा ओळखला, त्याला तो सल्ला पटला आणि तो त्यासाठी शहरांत जायला निघाला. अर्ध्या वाटेवर इच्छापूर नांवाचे गांव होते, तिथे तो पोंचला. त्यावेळीं गांवच्या मध्यावर असलेल्या शिवालयाल्या ध्वजस्तंभाची पुन्हां प्रतिष्ठापना होत होती. गतवर्षीच्या वादळांत तो स्तंभ पडला होता. रामभद्राने शहरांत जायचा आपला विचार बदलला आणि तो त्या शिवमंदिरांत शिरला. तो दानशूर व धनवंत असल्यामुळें सर्वांनी त्याचे आदराने स्वागत केले.

शिवालयाचा जमीनदार मालकही तिथें उपस्थित होता. जेव्हां त्याला समजलं कीं रामभद्र त्याच्या जमीनदारीच्या गांवात राहणारा आहे, तेव्हां त्याला खूप आनंद झाला. नंतर बोलता-बोलता जमीनदाराला समजलं कीं रामभद्र संस्कृतचा महापंडित आहे, आणि जमीन-दाराच्याच मालकीच्या शहरांतल्या पाठशाळेंत तो शिक्षकाची नोकरी धरण्यासाठी शहरांत जातो आहे. ते पाहून त्याला जास्तीच आनंद झाला.

जमीनदाराने रामभद्रला म्हटलं, ''तुम्हाला घाईने शहरांत जायची कांही जरुरी नाही. तुमच्या सोयीनुसार तुम्ही नोकरीवर रुजूं झालात तरी चालेल.''

हे बोलणें ऐकून रामभद्रला खूपच आनंद झाला. त्याने शिवमंदिरांत अभिषेक केला व मोठी पूजा केली. पुजाऱ्यांना घसघशीत दक्षिणा दिली



आणि तो आपल्या गांवी परत आला. त्याने चंद्रिकाला सारी हकीकत सांगितली.

परंतु, गांव सोडून शहरांत राहायला जाणे हे रामभद्रला तितकेसे आवडलेले नव्हते. तो प्रत्येकाची मागणी पूर्ण करणारा होता. त्याच्यासमोर जो जो माणूस हात पसरे, त्याला हा भरपूर मदत करीत होता, पण त्याच्या पत्नीची इच्छाही त्याला डावलता येईना. तो मनांत अस्वस्थ झाला आणि शांतपणा मिळावा म्हणून नदीच्या कांठावर जाण्यासाठी घरांतून निघाला.

नदीकांठावर ग्रामदेवता दुर्गादेवीचे मंदिर होते. मंदिरात देवीसमोर दुसऱ्या गांवातून आलेला एक तरुण उभा होता. तो देवीची प्रार्थना करीत होता. तो देवीला म्हणाला, ''आई दुर्गामाते, मी सुशिक्षित आहे पण माझी किंमत कुणालाच नाही. नोकरी शोधावी तिथे ही गर्दी! माणसाचे आयुष्य म्हणजे एक कुस्तीचा आखाडा झाला आहे. या गांवातला कुणी रामभद्र आहे म्हणे, शहरांतल्या पाठशाळेंत शिकवायला जाणार आहे असं ऐकलं. आई, माझ्यावर दया कर. त्याला शहरांत जाऊं देऊं नकोस. मी त्यांना हे सांगणार आहेच, पण माझे गांवकरी मित्र म्हणाले कीं अगोदर देवीच्या देवळांत जा नि प्रार्थना कर.'' आणि त्याने प्रणाम करुन डोळे मिटले. रामभद्रने खांबाच्या आड उभा राहून त्याचे बोलणें ऐकले. नंतर तो त्या तरुणाजवळ गेला व त्याने चौकशी केली.

त्या तरुणाचे नांव चरणदास होते. त्याने



संस्कृतचा खूप अभ्यास केलेला होता. राजाच्या पाठशाळेंत त्याला नोकरी मिळणार होती. पण तेवढ्यांत त्याला समजलं कीं ती नोकरी रामभद्राला द्यायची असा शब्द जमीनदाराने दिला होता. शाळेच्या प्रमुखांनी चरणदासला सांगितलं कीं ही नोकरी सध्यां नाही. जर सहा महिने शिकवल्यानंतर रामभद्राला ते काम आवडले नाही, तर चरणदासला तीच नोकरी देता येईल. तेव्हां रामभद्र रुजूं झाला तरीदेखील चौकशी करीत राहा, असे त्याने चरणदासला सांगितले.

ही कहाणी ऐकून रामभद्रचे मन द्रवले आणि त्याने चरणदासला मदत करण्याचे ठरवले. तो स्वतःबरोबर चरणदासला घेऊन शहरांत गेला, मुख्याध्यापकांना भेटला आणि आपण सहा महिन्यानंतरच येऊं शकूं असे त्याने सांगितले.

तेव्हां त्या जागी चरणदासला नेमावे असे त्याने सांगितले.

घरी येऊन चंद्रिकाला ही घटना त्याने सांगितली. चंद्रिका आयुष्यांत प्रथमच नवऱ्यावर चिडून म्हणाली, "आपल्या कुवतीपेक्षां जास्त दानधर्म करणे हे अगदी अयोग्य आहे. या सहा महिन्यांत कितीतरी बदल होऊं शकतात. सारा वेळ परमेश्वरावर कसला भरंवसा टाकता हो?" तिने कळवळून म्हटलं.

ही गोष्ट गांवकऱ्यांना समजली. रामभद्राने सहा महिन्यानंतर गांव सोडून जाऊं नये म्हणून त्यांनी गांवांतच नवी पाठशाळा सुरुं करावी म्हणून रामभद्राच्या पाठीशी टुमणे लावले. बराच विचार केल्यानंतर रामभद्राने आपल्याच शेतांत एक लहानशी पाठशाळा बांधली.दोन शिक्षक नेमले आणि त्यांच्या मदतीने पाठशाळा सुरुं झाली.

महिनाभरांतच जमीनदाराला या नव्या शाळेची बातमी कळली. तो नाराज झाला आणि त्याने आपल्या दिवाणजीला बोलावून सांगितले, "आम्हाला वाटलं होतं कीं रामभद्र एक सज्जन, उदार पंडित आहे. म्हणून आपल्या शाळेसाठी आम्ही त्याची निवड केली होती. उलट त्याने स्वत:चीच पाठशाळा सुरुं केली. तुम्ही जाऊन सविस्तर माहिती काढून आणा."

दिवाणजी ताबडतोब राजनगरला गेला. त्याने सगळी माहिती गोळा केली. शाळेला जमीनदाराचे नांव दिले होते, पण खर्च मात्र रामभद्राच्या शेतीच्या उत्पन्नांतून होत होता.

दिवाणजीने रामभद्राच्या कल्पनेचे कौतुक केले व जमीनदाराला सत्य परिस्थिती सांगितली. जमीनदार खूष होऊन बोलला, "आमच्या गावात रामभद्रासारखा दिलदार गृहस्थ आहे याचा आम्हाला फार अभिमान आहे" आणि त्याचक्षणीं त्याने आपल्या खासगी जमिनींतली पन्नास अेकर सुपीक जमीन त्या शाळेच्या नांवाने रामभद्रला खर्चासाठी दिली. याशिवाय रामभद्राच्या दोन्ही मुलांची शहरांत शिक्षणाची व राहाण्याची व्यवस्था जमीनदाराने केली. अशा प्रकारे रामभद्रचा उदारपणा त्याच्या उत्कर्षास चांगल्या प्रकारे कारणीभूत झाला.







# मायासरोवर

## 19

*(मायासरोवरेश्वरने लबाडीने जयशीलच्या गळ्यांत फांस अडकवला होता. जयशीलला तो कापून टाकायचा होता. पण गोड बोलून मायासरोवरेश्वर कांचनमालेबरोबर जयशीललाही मायासरोवराकडे घेऊन गेला. नरभक्षकांकडून ही बातमी सिद्धसाधकाला कळली. त्यानंतर...)*

नरभक्षकांनी सारी घटना सविस्तर सांगितली. विचित्र हत्तीवर स्वार झालेल्या व्यक्तीने बंदी बनवलेल्या व्यक्तीचे जेव्हां वर्णन केले, तेव्हां तो जयशीलच असला पाहिजे हे सिद्धसाधकाने ओळखले. परंतु मग त्या शत्रूबरोबर राहाणारी ती तरुणी कोण असूं शकेल?

नरभक्षकांची माहिती ऐकून राजा कनकाक्ष थक्क झाला होता. त्यावर सिद्धसाधकाने राजाला समजावले, "महाराज? मला आज्ञा करावी. माझा मित्र जयशील ह्याला मायासरोवराच्या दुष्ट लोकांनी बंदी बनवले आहे. हा इतका महान वीर त्यांच्या हाती कसा काय सांपडला असेल. ते मला समजत नाही. कांहीही असो, त्याचे रक्षण करणे हे माझे कर्तव्य आहे. मी असाच निघतो."

असं म्हणून तो नरवानराच्या खांद्यावर स्वार होण्यास निघाला.

त्याला थांबवीत कनकाक्ष राजाने म्हटलं, "सिद्धसाधक! जयशीलचे रक्षण करणे ही



माझीही जबाबदारी आहे. थोडे सैनिक व घोडेस्वार बरोबर घेऊन मीही तुझ्याबरोबर येतो. पण आपण मायासरोवरचा मार्ग शोधणे हे अत्यंत आवश्यक आहे. तू आपल्या जलवृकलाच कां विचारत नाहीस?''

सिद्धसाधकाने मान डोलावून आपली संमती दर्शवली, आणि जलवृक राक्षसाच्या छातीवर नेम धरुन आपला शूळ रोखून विचारले, ''अरे जलवृक सेवक! खरं सांग, तू माझा विश्वासू सेवक आहेस कीं मायासरोवर राक्षसाच्या गुप्तचर बनून इथें आला आहेस?''

हा प्रश्न ऐकून जलवृकने दगडी गदा सिद्ध-साधकाच्या पायावर ठेवली व तो म्हणाला, ''मालक, सच्चा जलवृक कधी खोटे वचन देत नाही. मी आपल्यासाठी माझे प्राणदेखील द्यायला तयार आहे.''

''असं आहे तर सांग, मायासरोवर कुठे आहे?'' सिद्धसाधकने विचारलं.

''मालक! मी पूर्वी एकदा आपल्याला सांगितलं आहे कीं सरोवराचा मार्ग जर मी सांगितला तर माझं मस्तक फुटेल. सरोवराच्या राजाबरोबर आमच्या राजाने हा शाप आमच्या जातीला दिला आहे.'' जलवृकने दीनवाणे होऊन सांगितले.

'वृकभट! तुझ्या प्राणांना मुळींच धोका नाही. मी महाकालीचा भक्त आहे. जरी कांही कारणाने तू मेलास तरी तुला कांही क्षणांतच कैलास पर्वतावर पाठवून स्वर्गसुख देववीन.'' आकाशाकडे शूळ उंचावीत सिद्धसाधक म्हणाला.

त्यावर जलवृकने म्हटलं, ''तरीदेखील मी लांकडाच्या सहाय्याने तुम्हाला सांगण्याचा प्रयत्न करीन.'' एक वाळलेली ढलपी घेऊन जमिनीवर रेघा काढायला लागला व किंचाळायला लागला, ''अरे अरे, आता माझं डोकं फुटणार!''

जलबृकने काढलेल्या रेघोट्या बघत सिद्धसाधकने विचारले, ''अरे जलवृक! या कसल्या रेघा आहेत? या वांकड्या तिकड्या रेषांचा अर्थ काय?''

डोके वर न उचलता व आपादमस्तक थरथर कांपत, जलवृक राक्षस म्हणाला, ''मालक, हा जवळचा पर्वत आहे आणि हे अरण्यांतले वृक्ष! त्यांतला सर्वांत उंच वृक्ष एका कड्यावर आहे. त्या झाडावर चढून वरच्या फांदीवर चढायचं;



एकदा पूर्वेकडे नि एकदा पश्चिमेकडे वळून पाहा, कीं उत्तरेकडे तोंड केल्यावर मायासरोवर दृष्टीस पडेल.'' असं म्हणून त्याने आपलं डोकं घट्ट पकडलं, आणि तो खाली पडला. ''मालक, मी रहस्य सांगितलं आहे. माझे डोके फुटेल. मेलो, मेलो मी!''

सिद्धसाधकने चटकन वांकून जलवृकच्या नाकाजवळ हात नेला व त्याचा श्वास पाहून म्हटले, ''महाराज! अंधविश्वास किती घातकी असतो, याचं उदाहरण म्हणजे हा जलवृक राक्षस आहे. शापाच्या भितीने हा खाली पडलाय, पण मेलेला नाही.'' हे शब्द उच्चारुन जवळच उभे असलेल्या नरभक्षकांस त्याने आज्ञा केली, ''अरे, लौकर जाऊन चारपांच घडे पाणी घेऊन या.''

जलवृक राक्षसाकडे बघणारे नरभक्षक निमूट उभे होते. त्यावर सिद्धसाधकाने शूळ उचलत म्हटले, ''दुष्टांनो, तुम्ही माझी आज्ञा ऐकलीत कीं नाही?''

नरभक्षकांच्या नेत्याची खूण पाहून त्यांचा पुजारी गणाचारी पुढे आला. कनकाक्ष राजासमोर साष्टांग नमस्कार घालीत तो म्हणाला, ''आपण कृपा करुन या भुतांच्या नेत्याला इथून घालवून आम्हाला हा जलवृक राक्षस द्यावा. आपल्या नांवाने आम्ही याला मारुन खाऊन टाकू.''

गणाचारीचे बोलणे पूर्ण होण्याच्या पूर्वीच सिद्धसाधकाने त्याची शेंडी पकडून त्याला दटावले, ''अरे क्रूर नरभक्षका, हा शूळ खूपसून तुलाच मी महाकालाला बळी देतो!''

सिद्धसाधक गणाचारीला शूळ टोचणार,



तितक्यांत जलाश्ववर स्वार होऊन वेगाने येणारा सर्पनख ओरडला, ''सिद्धसाधक! घाई करुं नकोस. मायासरोवराच्या जलवृक राक्षसांच्या-बरोबर लढायची आपली वेळ आता आलेली आहे. आपल्या या प्रयत्नांत या नरभक्षकांची मदत आपल्याला मिळतेय कां नाही ते आपण पाहायला हवं ना?''

हा आवाज ऐकून सिद्धसाधकाने मागे वळून पाहिलं. ही संधी साधून गणाचारी दूर पळाला व त्याच्या गटांत जाऊन सामील झाला.

सर्पनख सिद्धसाधकाच्या जवळ पोंचल्या-नंतर घोड्यावरुन खाली उतरला आणि जमिनीवर मेल्यासारखा पडलेल्या जलवृकला पाहून म्हणाला, ''सिद्धसाधक, तू याला परलोकांत धाडलंस कीं काय? पण हा तर आपला विश्वासू सेवक आहे ना?''



''हा विश्वासू नोकर आहे खरा, पण त्याचा तुमच्याप्रमाणे केवळ आपल्या राजावरच नव्हे तर सरोवरेश्वराच्या शक्तिवर देखील विश्वास आहे. मायासरोवरापर्यंत जायचा मार्ग दाखवताना त्याला जुना शाप आठवला, आणि त्या भीतीने तो खाली पडला. पण विश्वास ठेव, तो मेलेला नाही.'' सिद्धसाधकाने उत्तर दिले.

तोपर्यंत कनकाक्ष राजाच्या कांही सेवकांनी भांड्यातून पाणी आणले आणि जलवृकच्या डोक्यावर शिंपडले. थंडगार पाण्याचा स्पर्श होताच जलवृकने हालचाल केली आणि डोळे मिटूनच तो ओरडायला लागला - ''मी कुठे आहे? नरकांत कीं मायासरोवरांत?''

सिद्धसाधकाने जलवृकच्या पाठीवर लाथ मारीत म्हटले, ''अरे जलवृक! तू शापमुक्त झाला आहेस. मी तुला जिवंत केलंय. चल उठ!''

हे शब्द ऐकून जलवृक उठून बसला. सर्पनखने जवळच उभे असलेल्या राजा कनकाक्ष आणि त्याच्या सैनिकांना पाहून विचारले, ''हंसांच्या रथांत बसताना वैद्यदेवाने आम्हाला सांगितलं होतं, ते हे हिरण्यपुरचे राजा कनकाक्ष आहेत ना?''

तोपर्यंत सर्पनखचा विचित्र वेष आणि त्याचा जलाश्व पाहून राजा चकित झाला होता. पण त्यांचे बोलणें समजले नाही म्हणून राजाने विचारलं, ''वैद्यदेव कोण आहे? माझ्याच राज्यांतला आहे कां?''

''महाराज, ते मला माहीत नाही. पण तोच आता इकडे येतो आहे.'' सर्पनख म्हणाला.

''सिद्धसाधक, तू त्या वैद्यदेवाला ओळखतोस कां?''

राजा कनकाक्षने विचारलं, हे गुपित उघड करावे किंवा नाही यावर सिद्धसाधकाने विचार केला व नंतर म्हटले, ''महाराज, त्या वैद्यदेवाच्या विषयी मायासरोवरांत परम शत्रू बनून राहणारे जलवृक राक्षस आणि मायासरोवरेश्वराचे अनुयायी यांना माहीत नसलेले एक लहान रहस्य आहे. ते देखील जयशीलप्रमाणे अमरावती नगराचे निवासी आहेत.''

''काय म्हणालास? जयशील अमरावतीचा निवासी? त्या देशाचा राजा रुद्रसेन हा माझा कट्टर शत्रू आहे. माझ्या गुप्तचरांकडून मला खात्रीपूर्वक समजले आहे की मी अडचणींत आहे असं बघून तो माझ्यावर हल्ला करण्याचा बेत करतो आहे.'' कनकाक्ष राजाने संतापून म्हटले. ''महाराज,



आपण जयशीलच्या निष्ठेबद्दल शंका घेऊं नये. तो कोणत्याही देशाचा नागरिक असला म्हणून काय झालं? राजपुत्र व राजकन्येला आणून आपल्या हाती सुपूर्द करण्याचे वचन त्याने दिले आहे, ते पूर्ण करण्याचा तो अवश्य प्रयत्न करीलच. आपल्या देशाचा एक नागरिक या नात्याने मीच आपल्याला वचन देतो.'' सिद्धसाधक म्हणाला.

सिद्धसाधक बोलत असताना थोड्या अंतरावर उभे असलेल्या नरभक्षकांच्या समूहांत गडबड सुरुं झाली. त्याचं कारण जाणून घेण्यासाठी तो इकडेतिकडे बघत होता, तेव्हां नरभक्षकांचा नेता शेरसिंह व गणाचारी त्याच्याजवळ पळतपळत आले व म्हणाले, ''हे पहा, आपल्यासारखे चौघेजण दहाबारा जलवृक राक्षसांच्याबरोबर लढत आहेत. आम्ही आपल्याला मदत करुं कां? आम्हालाही भोजन मिळेल.''

दुसऱ्याच क्षणीं सर्पनख उडी मारुन घोड्यावर स्वार झाला नि म्हणाला, ''सिद्धसाधक, ते लोक परके नाहीत, वैद्यदेव, माझा छोटा भाऊ, हंसांच्या रथाचा सारथी व राजाचा अंगरक्षक आहेत.'' असं म्हणून तो निघाला.

''जय महाकालकी!'' अशी गर्जना करुन सिद्धसाधक नरवानराच्या खांद्यावर उडी मारुन बसला, आणि राजाला म्हणाला, ''महाराज, सर्वांत प्रथम प्रथम आपण त्या जलराक्षसांच्या तावडीतून आपल्या माणसांना सोडवलं पाहिजे.'' एवढं म्हणून तोही सर्पनखांमागून निघाला.

''हे अरण्यदेवा! आता आपणच आमची भूक



भागवा.'' असं ओरडून नरभक्षकांचा समूह ह्यांच्या पाठोपाठ पळत सुटला.

सर्पनख व सिद्धसाधक जेव्हां तिथे पोचले, तेव्हां घोड्यावर स्वार होऊन सर्पस्वर जलवृकांच्याबरोबर लढताना आपल्या तलवारीने त्यांना मारणार होता. पण त्याच्या वारापासून जलवृक बांचले. देवशर्मा हा वैद्यदेव, हंसाच्या रथाचा सारथी व लंगडा मंगलवर्मा यांना जिवंतपणींच पकडण्याचा प्रयत्न करीत होते. परंतु देवशर्मा आपली हिरेजडित छडी फिरवीत त्यांना सावध करीत होता - ''अरे मूर्खांनो, सावधान! या छडीच्या टोंकावर बसवलेला कांटा विषांत बुडवलेला आहे. तुमच्या शरीराला टोंचला तर क्षणार्धांत तुम्ही मरुन जाल.''

तेवढ्यांत सिद्धसाधक आणि सर्पनखही तिथें पोंचले. दुरून आरडाओरडा करीत नरभक्षक

आणि कनकाक्ष राजाचे सैनिकदेखील त्यांच्या दिशेने येत होते. त्यांना पाहून जलवृक राक्षस पळून जायच्या प्रयत्नांत होते. तेव्हां त्यांचा नेता त्यांना ओरडून आज्ञा करुं लागला - थांबा! आमच्या राजाची आज्ञा आहे कीं त्यांना ठार मारुनच परत या." असं म्हणून दगडी गदेने देवशर्मावर प्रहार करण्यासाठी पुढे आला.

देवशर्मा एक पाऊल मागे सरला नि म्हणाला, "तुझा मृत्यू जवळ आलाय. त्याला मी कसा थांबवूं?" असे म्हणून त्याने आपली छडी त्याच्या शरीरांत टोंचली. दुसऱ्याच क्षणीं राक्षसांचा नेता किंचाळून खाली कोसळला व तडफडूं लागला.

त्यानंतर देवशर्माने आपली छडी वर उचलून म्हटले, "अरे, उरलेल्या जलवृक राक्षसांनो, मी तुम्हाला शेवटची सूचना देतो आहे. सरोवरांत राहणाऱ्या मायासरोवरेश्वराबरोबर असणारी कांचनमाला आणि राजकुमार कांचनवर्माला जर तुम्ही कांही इजा केलीत तर तुमच्या राजाबरोबरच मी तुमचे सर्वांचे प्राण घेईन. लक्षांत ठेवा! जाऊन तुमच्या राजाला तसं सांगा!" त्यावर जलवृक राक्षस ओरडत अरण्यांत परत जाण्यासाठीं उभे राहिले.

त्याबरोबर सर्पनख देवशर्माच्याजवळ जाऊन घोड्यावरुन खाली उतरला आणि म्हणाला, "वैद्यदेव! मायासरोवरेश्वर, कांचनमाला आणि जयशील यांना जलवृक राक्षसांकडून होणाऱ्या घातपाताची माहिती नाही, म्हणून ते सारेजण सरोवराकडे जात आहेत. त्यांना आपण सावध करायचं नाही कां?"

"हे काम तुम्ही दोघे भाऊ, हंसांच्या रथाचा सारथी व मायासरोवरेश्वराचा अंगरक्षक यांनी करायचं आहे. तेव्हां लवकर चला." देवशर्माने आज्ञा केली.

त्यावर सर्पनख आणि सर्पस्वर जलाश्वांना हांकीत वेगाने दौडूं लागले. जवळच्या झाडांच्या मागे जाऊन अंगरक्षकाने कांही क्षणांतच हंसांचा रथ आकाशांत उडत नेला. नरभक्षक उत्साहाने गडबड करीत जलवृक राक्षसांचा पाठलाग करुं लागले.

*(क्रमशः)*





वेताळ कथा

# साहसी

निश्चयाचा महामेरु विक्रमार्क पुन्हां झाडाजवळ गेला. झाडावरुन त्याने शव खाली उतरवले, खांद्यावर घेतले. आणि मुकाट्याने तो स्मशानाकडे जाऊं लागला. तेव्हां शवाच्या आंत लपलेल्या वेताळाने त्याला म्हटले, "राजन्, या भयानक स्मशानाकडे तू धीटपणे जातो आहेस. तुझ्या धैर्याचं मला कौतुक वाटतं. पण निदान तू मला सांग कीं तुझा हेतू तरी काय आहे? पावलोपावली तू सावध राहायला हवंस. मी तुला महेंद्रगिरीच्या राजकुमारीची गोष्ट सांगतो. एका सुशील तरुणाने तिच्या देशाला एका भयंकर राक्षसाच्या तावडीतून वांचवले. राजकुमारीने शब्द दिला होता कीं हे काम जो करील, त्याच्याशी ती विवाह करील. परंतु काम संपल्यानंतर तिने आपले वचन



पाळले नाही. तुझं तसं कांही होणार नाही ना? तू सावध राहावंस म्हणून मी ही कहाणी तुला सांगतो आहे. लक्ष देऊन ऐक.'' आणि वेताळ महेंद्रगिरीच्या राजकुमारीची गोष्ट सांगू लागला.

फार फार पूर्वीची गोष्ट आहे. महेंद्रगिरीला मधुसूदन राजा राज्य करीत होता. माधवी त्याची एकुलती एक मुलगी होती. तिला धाडसी वृत्ती आवडत होती. ती म्हणायची, जरी एखादा तरुण गरीब, अशिक्षित असला, व त्याने कांहीतरी धाडसी काम केलं, आणि त्याची प्रशंसा झाली तर ती त्याच्याशी लग्न करील.

ही बातमी राज्यांत सगळीकडे पसरली. अनेक तरुण माधवीशी लग्न करण्याच्या हेतूने पुढें आले व त्यांनी अनेक साहसी कामें करुन दाखवली. एकाने उंच पर्वताच्या शिखरावरुन खाली तरंगत, जखमी न होता जमिनीवर उतरुन दाखवले. दुसऱ्या तरुणाने भर वादळांत आपली नाव समुद्रांत नेली व तिथून तो पोहत किनाऱ्यावर सुखरुप परत आला. तिसऱ्या एका तरुणाने शस्त्र न घेता अरण्यांत प्रवेश केला आणि तिथें एका अस्वलाला त्याने वश केले. त्याच्या पाठीवर बसून तो नगरांत आला.

अशा प्रकारे अनेक शूर तरुणांनी तऱ्हेतऱ्हेचे प्रयोग करुन दाखवले आणि आपण धाडसी असल्याचे सिद्ध केले. पण राजकुमारी त्यांना म्हणाली, ''तुम्ही केलेले धाडस खात्रीने प्रशंसनीय आहे, पण त्यामुळें कुणाचा फायदा झालेला नाही.'' असं सांगून तिने त्या सर्वांना सोन्याच्या मोहरा बक्षीस दिल्या आणि ते घरी परतले.

अशा वेळी महेंद्रगिरीच्या सीमेवर एका राक्षसाने प्रवेश केला. जाडजूड पारंब्या असलेल्या एका वडाच्या झाडाखालीं तो राहूं लागला. त्या बाजूने जात असलेल्या शिव व शंकर या दोन मित्रांना त्याने पकडले. राक्षस त्यांना म्हणाला, ''मी राक्षस आहे, पण शाकाहारी आहे. तुम्हा दोघांपैकी मी एकाला माझ्याजवळ ठेवतो. दुसरा नगरांत जाईल. आणि मला जेवढा आहार हवा, तेवढा घेऊन येईल. त्याच्यासाठी मी तुम्हाला एका दिवसांची मुदत देतो आहे. एका दिवसांत जर मला जेवण मिळालं नाही तर मी आपली भूक भागवण्यासाठी जो माझ्याबरोबर आहे. त्याला खाऊन टाकायला मागेपुढें पाहाणार नाही.''

शंकर राक्षसाबरोबर राहिला, आणि शिव त्या राक्षसासाठीं आहार घेऊन येण्यास आसपासच्या गांवात गेला. तिथल्या लोकांना त्याने वस्तुस्थिती समजावून सांगितली आणि गाडीभर आहार-सामुग्री लादून राक्षसाजवळ आला.

त्यामुळें राक्षस फार खूष झाला आणि शंकरला



मुक्त करीत म्हणाला, ''आपल्या राजाला जाऊन सांगा कीं मी इथें राहायला आलो आहे. त्याला हेही सांगा कीं दररोज मला असंच भरपूर भोजन मिळालं पाहिजे. ज्या दिवशी तुम्ही मला भोजन पाठवणार नाही, त्या दिवशी मी राज्यावर चाल करीन आणि तुमचा नायनाट करीन.''

हा निरोप राजापर्यंत पोंचला. राजाने आपल्या सैन्यानिशी या राक्षसावर चालून जायचा विचार बोलून दाखवला. पण माधवीने आपल्या पित्याला थांबवीत म्हटले, ''राक्षस आणि शाकाहारी असणें हे जरासे विचित्र वाटते. या राक्षसाचे रहस्य जाणून घेण्यासाठी साहस अवश्य हवे. आपण घोषणा करावी कीं शूर वीरांसाठी ही एक परीक्षा आहे. तोपर्यंत त्याला हवे ते भोजनसाहित्य आपण पाठवत राहूं या.''

माधवीच्या सांगण्यानुसार राजा मधुसूदनने घोषणा केली. ती ऐकून कांही धाडसी तरुणांनी राक्षसाशी बोलणी केली. त्यांच्या प्रश्नांची उत्तरें देताना राक्षस म्हणाला, ''मी एक देवता होतो, पण शापामुळें राक्षस बनलो आहे. मला शापमुक्त करणें हे साधारण माणसांच्या हातून होणारी गोष्ट नाही. महेंद्रगिरीच्या उत्तरेस जो पर्वत आहे, तिथें एक उजाड विष्णू मंदिर आहे. त्या मंदिरांत एक भुयारी मार्ग आहे. त्या भुयारी मार्गात विषारी सर्प, विंचू वगैरे भरलेले आहेत. त्या मार्गाने पुढे जाता आलेच तर तिथें एक अग्निकुंड आहे. त्यांत उडी मारली कीं थेट पाताळापर्यंत पोंचता येतं. तिथें एक भला मोठा अजगर आहे. मनुष्य पाहिला कीं लगेच तो त्याला गिळून टाकतो. त्या अजगराच्या पोटांत एक अंगठी आहे. ती अंगठी आणून जर कुणी माझ्या अंगठ्यात घातली, तर मी शापमुक्त होईन.''



राक्षसाची ही कथा ऐकून कांही शूर वीर निमूटपणें मागे फिरले. कांही तरुण विष्णु मंदिराच्या भुयारापर्यंत गेले व परत आले. एकाने भुयारांत प्रवेश केला, पण विषारी सर्पांचे फुत्कार ऐकून तो पळतच बाहेर आला. एकाने धाडस केले नि तो भुयारांत पुढें गेला, पण कांही क्षणांतच त्याची किंकाळी ऐकूं आली. बघताबघता त्याचे शव घसरत बाहेर आले. आंतून कुणीतरी फेंकल्यासारखे!

त्या राज्यांतल्या एका गांवात सत्यवान नांवाचा एक गरीब युवक होता. त्याने साऱ्या शास्त्रांचा अभ्यास केला होता. पण त्याच्यात धाडसी वृत्ती नव्हती. म्हणून त्याचे ज्ञान निष्फळ ठरत होते. तो मेहनत करुन आपले पोट भरीत होता. त्याला अंधाराची भिती वाटे, भुतांची भिती वाटे; कुणी भांडायला आले तरी तो बावरुन जाई. म्हणून लोक त्याला महाभित्रा म्हणत.

एके दिवशी अचानक सत्यवानाचा परिचय जयद्रथ नांवाच्या तरुणाशी झाला. खरं तर जयद्रथच



सत्यवानाला शोधत आला होता. जयद्रथ राजवंशातला होता. माधवीशी विवाह करण्यास आवश्यक ती धडाडी त्याच्यांत नव्हती. म्हणून त्याने मंत्रशक्तींची मदत घ्यायचे ठरवले. एका प्रसिद्ध सिद्धयोग्याला तो जाऊन भेटला. जयद्रथाची इच्छा ऐकून सिद्धयोगी म्हणाला, "माझ्याजवळ एक ताईत आहे. तो हाताला बांधला कीं तीन संकटांमधून सहज सुटका होऊं शकते. पण हा ताईत सर्वांनाच उपयोगी पडेल असं नाही. हातांत बांधल्यानंतर त्याचा रंग जर बदलून हिरवा झाला तर तो उपयुक्त ठेल." असं म्हणून सिद्धयोग्याने एक काळ्या रंगाचा गंडा जयद्रथच्या हाताला बांधला. पण त्याचा रंग बदलला नाही. ते पाहून जयद्रथ निराश झाला.

त्याच्या खांद्यावर प्रेमाने थोपटत सिद्धयोगी त्याला म्हणाला, "प्रत्येक समस्येचे निराकरण या भूमीवर होत असते. हा ताईत बांधून तू महेंद्रगिरी राज्यांत सगळीकडे हिंडत राहा. ज्या तरुणाच्या उपस्थितींत याचा रंग निळा होईल, त्या तरुणाच्या हातांत हा बांध. तेव्हां जर रंग बदलून हा ताईत हिरवा दिसायला लागला तर राक्षसाच्या पीडेतून मुक्त होण्यासाठीं त्या व्यक्तीचा तू उपयोग कर. हे सर्व केल्यानंतर जेव्हां त्याचं फळ दिसायला लागेल, तेव्हां त्याचा फायदा कसा घ्यायचा ते तुझं तू ठरव."

सत्यवान जयद्रथासमोर उभा असताना ताईताचा रंग निळा झाला. म्हणून जयद्रथाने हा सारा वृत्तांत सत्यवानाला सांगितला.

हे ऐकून सत्यवान घाबरून गेला व म्हणाला, "अस्सं, अशी गोष्ट आहे! पण मला तर सापांची, आगीची, अजगराची खूप भिती वाटते. मी अगदी भित्रा आहे. असलं काम मला नाही जमणार!"

जयद्रथाने हंसून त्याला म्हटलं, "ठीक आहे, पण अगोदर हा ताईत तुझ्या हातांत बांधून तर दे मला! जर त्याचा रंग बदलून हिरवा झाला तर हे कठीण कार्य तुझ्या हातून पुरे होईल."

जयद्रथाने सत्यवानाच्या हाताला तो ताईत बांधला आणि त्याचा रंग लगेच बदलला व हिरवा झाला. ते पाहून सत्यवान आश्चर्याने थक्क झाला.

आता सत्यवानाचे मत बदलण्यासाठी जयद्रथाने, साम, दाम, दंड व भेद, या चारी मार्गांचा अवलंब केला. त्याला तो म्हणाला, "महेंद्रगिरी राज्याचे भवितव्य आता तुझ्या हातांत आहे. जर हे काम तू केलंस तर तुला आयुष्यभर पुरेल इतकी धनराशी मी तुला देईन. जर तू हे नाकारलंस तर राजाकडे तुझ्याविरुद्ध तक्रार करीन आणि तुला कडक शिक्षा देववीन." असं म्हणून त्याने पोशाखांत लपवलेली सुरी बाहेर काढली.

ताईत हातांत बांधल्याबरोबर सत्यवानाच्या





अंगात धाडस आले. जयद्रथाबरोबर तो भुयारापर्यंत गेला आणि त्याने आंत प्रवेश केला. विषारी सर्पांनी त्याला कांहीही केलं नाही. ते अग्निकुंड तर जणूं कांहीं थंड होतं. अजगर जणूं कांहीं दगडाची मूर्ती असावा असा स्तब्ध होता. सत्यवान सरळ त्याच्या पोटांत शिरला आणि ती आंगठी त्याने घेतली. त्यानंतर काय झालं कोणास ठाऊक. सत्यवान तिथून नाहीसा झाला नि भुयाराच्याबाहेर जयद्रथाच्या समोरच थेट उभा राहिला.

आंगठी पाहून जयद्रथ भलताच खूष झाला. त्याने सत्यवानाला राक्षसाकडे येण्यासाठी बोलावले. राक्षसाचे नांव घेतल्याबरोबर सत्यवान थरथर कांपत म्हणाला, "मी तीन आपत्तींमधून वांचलोय. आता या ताईताची शक्ती संपली आहे. राक्षसाच्याजवळ जायची मला फार भीती वाटते."

अशा परिस्थितींत जयद्रथ माधवीला भेटला आणि तिला ती आंगठी देऊन तो म्हणाला, "आपण ही आंगठी राक्षसाला दिलीत तर तो शापमुक्त होईल, आणि आपले राज्य सोडून निघून जाईल."

ती अंगठी पाहून माधवी चकितच झाली. ती जयद्रथ व आपल्या पित्याला घेऊन राक्षसाच्या भेटीला गेली. राक्षसाने ती अंगठी बोटांत घातली मात्र, आणि त्याचे एका दिव्य पुरुषांत रुपांतर झाले. तो माधवीला म्हणाला, "आता तुझ्या विवाहाचा विषय मुख्य आहे. जो तुझा पती होईल, त्याला आणखी एक धाडसी काम करायला लागेल. इथून एका कोसावर एक खोल विहीर आहे. त्यांत एक रत्नजडित कंकण आहे. जो तरुण हे कंकण तुझ्याकडे आणून देईल, तो तुझा पती होण्याच्या योग्यतेचा असेल. पण एक गोष्ट आहे. त्या खोल विहिरींत तीन भुतें आहेत. त्यांच्याशी सामना करणे हे कुणाही मानवाला शक्य होणार नाही अशी माझी समजूत आहे. पण त्यांच्याशी सामना केल्याखेरीज ते रत्नजडित कंकण घेऊन येणेंही अशक्य आहे." एवढं म्हणून तो अदृश्य झाला.

त्या दिव्य पुरुषाने सांगितलेल्या गोष्टीवर आश्चर्य प्रकट करीत माधवी म्हणाली, "जयद्रथ, हे अशक्य काम तू करून दाखवलंस. रत्नकंकण आणण्यांतदेखील जर तू यशस्वी झालास तर मी तुझ्याशी विवाह करीन. हातांत वरमाला घेऊन मी तुझी वाट पाहीन."

माधवीच्या बोलण्याने जयद्रथ बावचळला. गळ्यांत जणूं कांहीतरी अडकलंय असं त्याला वाटलं. कांहीही न बोलता, तिची परवानगी देखील न घेता, तो तिथून निघून गेला. सत्यवानाला तो पुन्हां भेटला आणि रत्नकंकणाची गोष्ट जयद्रथाने त्याला सांगितली. सत्यवानाला त्याने विनंती केली कीं या कामांतही त्याने जयद्रथाला मदत करावी.



सत्यवान पुन्हां थरथर कांपत म्हणाला, "काय? त्या खोल विहिरींत रत्नकंकणाच्याखेरीज आणखी काय काय आहे?" "मी ऐकलंय कीं त्यांत फक्त रत्नकंकणच आहे!" जयद्रथाने अगदी विश्वासाने सांगितलं.

"पण माझा नाही यावर विश्वास बसत. जर त्यांत फक्त ते रत्नकंकणच आहे, तर ते तू स्वतःच जाऊन आणूं शकतोस, आणि राजकन्येला देऊं शकतोस कीं!" सत्यवानाने सांगितलं. त्याची खात्री पटावी म्हणून जयद्रथ त्याला म्हणाला, "राक्षसाने सांगितलंय कीं ज्याने अंगठी आणून दिली आहे, तोच तरुण हे रत्नकंकणदेखील आणूं शकेल. म्हणून मी तुझ्याकडे आलो आहे."

जयद्रथाच्या बोलण्यावर विश्वास ठेवून सत्यवान त्याच्याबरोबर त्या खोल विहिरीजवळ गेला, आणि विहिरींत उतरला. तिथें त्याला भूत वगैरे भेटलं नाही. विहिरीच्या तळाशी ते कंकण चमकत होतं ते सत्यवानाला दिसलं. ते हातांत घेऊन तो निर्वेधपणें बाहेर आला.

ते रत्नकंकण पाहिल्याबरोबर जयद्रथाचा आनंद गगनांत मावेना. "शाबास, सत्यवान, शाबास! मी म्हटल्याप्रमाणें अशक्य होतं, जे ते तू शक्य करून दाखवलंस. मला तर वाटलं होतं कीं त्या विष्णु-मंदिरांतून तू बाहेर येऊं शकणार नाहीस; पण तू अगदी सुखरुपपणें बाहेर आलास. मला वाटलं होतं कीं या खोल विहिरींतून कांही तू सहीसलामत बाहेर येत नाहीस, कारण त्या विहिरींतल्या भुतांनी तुला गिळून टाकलं असतं, पण यांतही तू यशस्वी झालास. तू सर्व संकटांना मोठ्या धैर्याने सामोरा गेलास आणि त्यांतून वांचलास व परत आलास. खरोखरच, तू फारच श्रेष्ठ साहसीवीर आहेस!"

जयद्रथाचे बोलणें संपण्यापूर्वीच राजकन्या माधवी, राजा मधुसूदन आणि कांही सैनिक तिथें येऊन पोंचले. जयद्रथाकडे जळजळीत नजरेने पाहात माधवी म्हणाली, "जयद्रथ, त्या दिव्य पुरुषाने जेव्हां तुला आणखी एक धाडसी काम करायला सांगितले, तेव्हांच मला वाटलं कीं तू एक लबाड माणूस आहेस. तुला वाटलं कीं तुझे बोलणें ऐकायला आजूबाजूला कुणीच नाही; आणि तू खरी गोष्ट लपवलीस. आता तुझ्या बोलण्यावरुन माझी शंका खरी ठरली हे स्पष्ट झालंय. तू कांही साधासुधा ठक नाहीस, तू महाठक आहेस?"

माधवीचे हे बोल ऐकून जयद्रथ एकदम भेदरला, व म्हणाला, "राजकुमारीजी, मी नसतो तर या सत्यवानाने हे धाडसी काम केलं असतं कां? मुळींच नाही. मी हे राज्याच्या भल्यासाठी केलं, राक्षसाच्या तावडीतून राज्य वाचवलं; म्हणून आता



आपल्याशी विवाह करण्याचा अधिकार फक्त माझाच आहे."

माधवीने जयद्रथाची निर्भत्सना करीत म्हटलं, "मी धैर्यवान व साहसी तरुणाशी विवाह करीन असं जाहीर केलं होतं. ज्याचं लक्ष्य केवळ राज्याची भलाई आहे, अशा माणसाशी नव्हे! हा सत्यवान खरा साहसी आहे." हे ऐकून सत्यवानाने म्हटलं, "मला क्षमा करावी, राजकुमारीजी! आपल्याला वाटतंय तसा कांही मी धीट, धाडसी नाही."

माधवी हंसून त्याला म्हणाली, "तू किती धाडसी आहेस हे तुलाच माहीत नाही. तूच माझ्याशी विवाह करण्याच्या योग्यतेचा आहेस."

वेताळाने ही संपूर्ण कहाणी सांगून म्हटले, "राजन्, आपले लक्ष्य साध्य करण्यासाठी जयद्रथाने आपलं सारं बळ वापरलं. तो सिद्धयोगीच्या आश्रमांत गेला. ताईत मिळवला. त्याच्या मदतीने सत्यवानमार्फत अनेक अद्‌भुत वस्तू मिळवल्या. आणि महेंद्रगिरी राज्याला राक्षसाच्या आक्रमणा-पासून वांचवले. पण आश्चर्याची गोष्ट म्हणजे ही कीं राजकुमारीने अशा कर्तबगार तरुणाला डावललं व त्याच्याशी विवाह करण्याचे नाकारले. इथें तिने आपला शब्द मोडला नाही कां? सत्यवानाच्या बोलण्यावरुन हेही स्पष्ट समजतं कीं तो साहसी मुळींच नाही, उलट भित्रा आहे. त्याच्या हातून कांही साधलं तर ते केवळ जयद्रथाच्यामुळेंच जमूं शकलं होतं. नाहीतर कांहीच शक्य झालं नसतं. असल्या घाबरट माणसाशी विवाह करण्याचा राजकुमारीचा निर्णय चुकीचा नाही कां? माझ्या या शंकेचं समाधानकारक उत्तर माहीत असूनही तू मौन पाळलेस तर तुझ्या मस्तकाचे तुकडे तुकडे होतील."

विक्रमार्कांनी उत्तर दिले, "निर्भयपणें सत्याचा स्वीकार करण्याइतके दुसरे मोठे साहस नाही. खरी गोष्ट लपवून जयद्रथाला त्याचे फलित हवे होते. खरं पाहिलं तर जयद्रथच खरा घाबरट होता. सत्यवान धीट नव्हता. पण विश्वास निर्माण झाल्यावर तो कोणतेही साहस करायला तयार झाला होता. या दोघांमधला फरक राजकुमारीला समजला. म्हणून तिने सत्यवानाशी विवाह करण्याचे ठरवले. तेव्हां तिचा निर्णय चुकीचा नाही."

राजाचे मौन भंग करण्यांत सफल झालेला वेताळ त्या शवासहित पुन्हां अदृश्य झाला व झाडावर जाऊन बसला.

***आधार : सुमंगलीची रचना***





# वांया गेलेले वरदान

हेलापुरींत राहाणार सीताराम गरीब होता. अरण्यांतून लांकडें तोडून व ती विकून कुटुंबासाठी लागणारा खर्च तो चालवत होता. त्याचा परिवार मोठा होता. त्याच्या कमाईवरच सारे अवलंबून होते. कधीकधी त्याला खूप निराश वाटे. कधीकधी त्याच्या मनांत विचार येई कीं कुणी देवी-देवता त्याला दर्शन देऊन त्याची परिस्थिती सुधारेल तरी किती बरे होईल!

नेहमीप्रमाणे एक दिवस लांकडे तोडायला तो अरण्यांत गेला. त्याने एक मोठे झाड निवडले, आणि त्याच्यावर घाव घालण्यासाठी त्याने कुऱ्हाड वर उचलली. पण कांहीतरी गडबड झाली. त्याची कुऱ्हाड कुणीतरी धरली आहे असं त्याला वाटलं. त्याने मागे वळून पाहिलं तर वृक्षदेवीने त्याची कुऱ्हाड वरच्यावर घट्ट पकडली होती.

तो तिच्याकडे बघतच राहिला. तेव्हां वृक्षदेवीने म्हटलं, "मी वृक्षदेवी आहे. हा वृक्ष तू तोडू नकोस. मी कित्येक वर्षे इथें राहाते आहे. तुझी बिकट परिस्थिती मला माहीत आहे. मी तुला तीन वर देते. तुला जे हवे असेल ते माग. तुझे दारिद्र्य दूर होईल."

"माते, मी असंच करीन. हा वृक्ष तुझे निवासस्थान आहे, त्याला मी हात लावणार नाही, वा कुऱ्हाड चालवणार नाही. एकेक दिवस एक एक वर मागून घेईन. तू आपला शब्द मात्र पाळशील ना?" सीतारामने शंका येऊन विचारले.

"माझे वचन मी अवश्य पाळीन." असं म्हणून देवी अदृश्य झाली.

सीताराम खुषींतच घरीं परतला. दुपार होताच त्याच्या मनांत आले, "माझा परिवारांतल्या सगळ्या लोकांना पक्वान्नाचे स्वादिष्ट भोजन मिळायला हवे."

त्याला वाटलं कीं आपले मिटलेले डोळे उघडले कीं समोर भोजन तयार असेल. पण तसं झालं नाही. त्याने डोळे उघडले पण एकही पदार्थ समोर नव्हता. त्याला वाटलं कीं मिळालेला वर फलद्रूप होण्यासाठी आणखी थोडा वेळ हवा असेल. तो शांतपणें वाट पहात राहिला.

- मजिदीप शर्मा -

तितक्यांत कुणीतरी दार ठोठावले म्हणून त्याने उठून दरवाजा उघडला. समोरच्या रस्त्यावर राहणाऱ्या सोमशेखरने हातांत एक मोठी टोपली आणली होती. त्यांतून अन्नाचा सुगंध येत होता. "आज आमच्या घरीं सत्य-नारायणाची पूजा केली होती. तुमच्यासाठी हे पदार्थ माझ्या पत्नीने पाठवले आहेत." सोमशेखरने सांगितलं.

सीतारामने ते घ्यायला नकार दिला. "थोड्याच वेळांत आमच्याकडेही नाना प्रकारची मिठाई येणार आहे. आणि मग, तुम्ही पाठवलेले जिन्नस वांया जातील. तेव्हां तुम्ही ते परत घेऊन जा." आणि आणखी कांही बोलणें होण्यापूर्वीच त्याने दरवाजा बंद केला.

संध्याकाळ होत आली तरी सीतारामला कुठल्याच प्रकारचे भोजन मिळाले नाही. वाट पाहूनपाहून तो थकला आणि शेवटी बायकोला त्याने पेज करायला सांगितली व आपली भूक भागवली.

वृक्षदेवीचा वर निष्फळ ठरला हे पाहून सीतारामला आश्चर्य वाटले. त्याने मनोमन ठरवले कीं आज दुसरा वर मागायचा. आणि सर्व प्रकारच्या सुखसोयीदेखील त्यांत हव्यात. हा वर मागताना त्याने डोळे मिटले. अर्ध्या घटकेनंतर त्याने डोळे उघडले आणि पाहिले तर त्याची जुनी झोंपडी जशीच्या तशीच होती. यावेळीं



सीतारामला आश्चर्य तर वाटलेच पण त्याची निराशाही झाली.

तेवढ्यांत दारावर थाप पडली. दरवाजा उघडून तो पाहातो तो एक अनोळखी व्यक्ती समोर उभी! तो गृहस्थ म्हणाला, "हे पाहा, मी सुगंधिपुराहून आलो आहे. आपले मामा कोणत्याही क्षणीं मरतील. त्यांनी तुम्हाला तावडतोब घेऊन येण्यासाठी मला पाठवले आहे."

सीतारामने मनांतल्या मनांत निश्चय केला होता कीं जोपर्यंत वृक्षदेवीचा वर सफल होत नाही, तोपर्यंत तो घरांतून बाहेर पडणार नाही. म्हणून त्याने त्या निरोप आणणाऱ्या गृहस्थाला सांगितले, "रागावूं नका. पण मी एका फार महत्वाच्या कामांत गुंतलो आहे. माझ्या मामांना सांगा कीं याकारणामुळें मला तिथें आत्ता लगेच येता येणार नाही."



रात्र झाली तरी झोंपडीत कांही बदल झाला नाही. अशा रितीने वृक्षदेवींचा दुसरा वरही असफल झाला म्हणून सीताराम दुःखी झाला. तिसऱ्या दिवशी त्याने खूप विचार करुन देवीकडे वर मागितला व त्यानुसार सोन्याच्या एक लाख मोहरा मागितल्या.

त्याच्या डोळ्यांसमोर सोन्याच्या लाख मोहरा कांही दिसल्या नाहीत. उलट त्याच्यासमोर दोन पहिलवान लाठ्या घेऊन उभे होते. त्यांनी सीतारामला म्हटले, ''आम्हाला वीरभूपतीजी जमिनदाराने पाठवले आहे. त्यांनी आज्ञा केली आहे कीं आम्ही तुम्हाला त्यांच्याकडे तावडतोब घेऊन यावे.''

त्यांचे बोलणें ऐकून सीताराम घामाघूम झाला. पूर्वी एकदा जमीनदाराने त्याला पाहिले होते. तेव्हां सीतारामने त्याच्या जमिनीतले एक झाड तोडले होते. जमीनदाराच्या नोकरांनी त्याला पकडायचा प्रयत्न केला, पण तो निसटला. त्याला वाटलं याच्यासाठीच शिक्षा द्यायला त्याला बोलावले असेल आणि म्हणून या दोन पहिलवानांना त्यांनी पाठवलंय.

सीताराम कापऱ्या आवाजांत म्हणाला, ''हे पहा, मला आत्ता लगेच सुगंधिपुरला जायचं आहे. तिथून मी परत आलो कीं जमीनदारांच्या दर्शनाला येईन.''

रात्र संपली, सीतारामची तिसरी इच्छाही पूर्ण झाली नाही. तो नाराज होऊन उठला आणि कुऱ्हाड घेऊन त्या वृक्षदेवीच्या वृक्षाजवळ गेला.

वृक्षदेवी प्रत्यक्ष अवतरली आणि तिने त्याला विचारले, ''सीताराम, हे काय? हातांत ही कुऱ्हाड कशासाठीं? मी तुला तीन वर तर दिलेले आहेत.''

''त्यांतला एकही वर मला मिळाला नाही.'' आणि जे घडलं ते त्याने सविस्तर सांगितलं.

''काय सांगतो आहेस तू? तुला ते वर मिळाले नाहीत असं कसं म्हणूं शकतोस तू? मी तर तुला पक्कार्ने पाठवली होती. तुझे मामा मरतेसमयी सुगंधिपुरांतली त्यांची सारी संपत्ती तुला देणार होते कारण त्यांना मूलबाळ नव्हते. त्यांचा वाडादेखील तुलाच द्यावा असे त्यांच्या मनांत होते. त्यांन निरोप धाडला, तरी तू गेला नाहीस. मी बोलतेय ते बरोबर आहे ना?'' वृक्षदेवींने विचारले.

सीतारामच्या तोंडातून शब्द फुटेना. त्याच्या अडाणीपणामुळें हे दोन्ही वर त्याला मिळूं शकले नाहीत. आपल्याच पायावर कुऱ्हाड मारुन घेण्याचा हा प्रकार झाला होता. आपल्या दुर्दैवाबद्दल विचार करीत त्याने दीनवाण्या स्वरांत विचारले, ''एक लाख सोन्याच्या मोहरा मी मागितल्या होत्या. पण त्या तूं कां दिल्या नाहीस?''

वृक्षदेवीने हंसून म्हटले, ''तिन्ही वर सफल होऊं शकले नाहीत, हे तुझं दुर्भाग्य आहे. याचं कारण तुझा प्रमाणाबाहेर स्वार्थीपणा! तुला हांव होती. सोन्याच्या मोहरा देण्यासाठीच तर जमिनदाराने तुला बोलावणें धाडले होते. त्यांच्या जमिनीमधला जो वृक्ष तू म्हणत होतास, त्या वृक्षाच्या पायथ्याशी त्यांना त्यांच्या पूर्वजांनी लपवलेला एक तांब्याचा मोठा हंडा सांपडला. त्यांत सोन्याच्या दहा लाख मोहरा होत्या. तो हंडा तुझ्यामुळेंच त्यांना मिळाला, म्हणून एक लाख मोहरा तुला देऊन ते तुझा सन्मान करणार होते. पण तू त्यांना भेटायला गेलाच नाहीस. त्यामुळें तू फार घमेंडखोर आहेस असं समजून त्यांनी त्या लाख मोहरा गोरगरीबांना वाटून टाकल्या.''

वृक्षदेवीचे बोलणें ऐकून तो दगडासारखा स्तब्ध उभा राहिला. नंतर स्वतःला सांवरत त्याने दीनवाण्या सुरांत म्हटलं, ''वृक्षदेवी, पुन्हां एकदाच मला हे तीन वर दे ना!''

वृक्षदेवीने 'नाही' अशाअर्थी मान डोलावली आणि म्हटले, ''पुन्हां हेच वर दुसऱ्या वेळेला देण्याची शक्ती माझ्यांत नाही. अज्ञान, अविवेक आणि लोभ याकारणांमुळें मी दिलेले वर तू वांया घालवलेस. मनुष्याच्या जीवनांत भाग्य एकदाच दार ठोठावते, पुन्हां पुन्हां नव्हे! पण तुझ्यासाठी तीन वेळां भाग्य दारांत आले. आता तुला स्वतःच्या शक्तीवरच भरंवसा ठेवून आयुष्य कंठावे लागेल. यापुढें तू फक्त वाळलेली लांकडेच तोडीत जा. झाडाझुडपांची दैना करुं नकोस. जोपर्यंत तू त्याचं संरक्षण करशील, तोंपर्यंत माझ्या कृपेने तुझा परिबार व तू उपाशी राहाणार नाही. हाच माझा तुला आशिर्वाद आहे असं समज.'' असं सांगून देवी अदृश्य झाली.





# गुरुदक्षिणा

खूप वर्षांपूर्वी समरस नांवाचे एक गुरु होते. ते व्यायामशाळा चालवीत असत. मल्लयुद्ध, खड्गयुद्ध, वगैरे युद्धविद्या ते शिकवीत होते. द्रोण, हा समरस परंपरेतला असाच एक गुरु, गोपालपुरांत या कला शिकवीत होता. या विद्यांचे शिक्षण संपल्यानंतर तो आपल्या शिष्यांना नीतिशास्त्राचे शिक्षणही देत होता. शिक्षण संपले कीं शिष्यगण यथाशक्ती गुरुदक्षिणा गुरुला देऊन घरीं परतत होते.

विजयवर्मा हा त्रिपुराच्या जमीनदाराचा मुलगा होता. तो द्रोणाकडून शिक्षण घेत होता. मल्लयुद्धांत तो अतिशय चपळ होता. गदा फिरवण्यांतदेखील त्याची बरोबरी करणारा दुसरा कुणी नव्हता.

एकदा परशुराम नांवाच्या सहाध्यायाने विजयवर्माला मल्लयुद्धांत हरवले. तो समरसच्या कडे येणाऱ्या लोकांपैकीं एका सामान्य परिवारांतला होता. एका सामान्य तरुणाने आपला पराभव करावा हा विजयवर्माच्या अहंकाराला एक धक्का होता.

हे द्रोणाच्या लक्षांत आले आणि तो विजयला म्हणाला, ''वर्मा, प्रतिभेच्या बाबतींत सांगायचं तर ती श्रीमंत वा गरिबांकडे सारखीच असते. या विद्या शिकण्यासाठीं परशुरामाने अत्यंत परिश्रम घेतलेले आहेत, आणि मनःपूर्वक अभ्यास केल्यामुळें तो प्रतिभावंत बनला.'' कांही काळ गेल्यानंतर जेव्हां विजयवर्मा व परशुराम यांचे शिक्षण संपले, तेव्हां त्यांनी गुरुदक्षिणा द्यायचे ठरवले. गुरुला काय हवंय हे देखील त्यांनी विचारलं. तेव्हां त्या दोघांना द्रोणाने सांगितलं, ''जे माझ्याकडे शिकले आहेत, त्यांच्यामधे तुम्ही दोघे सर्वांपेक्षां जास्ती प्रतिभावंत व बुद्धिमान आहात. तुम्ही दोघांनी शिकलेली विद्या उपयोगांत आणा, त्यांत अधिक प्राविण्य मिळवा आणि कौशल्य वाढवा. वेळ पडेल तेव्हां मीच तुम्हाला दोघांना भेटायला येईन आणि गुरुदक्षिणा घेईन.''

- लता उत्तुंग -

चार वर्षे उलटली. पित्याच्या निधनानंतर विजयवर्मा त्रिपुराचा जमीनदार बनला. जमीनदारीचा कारभार सांभाळताना तो मल्लविद्येंत विशेष रस घेत होता. देशांतल्या सर्व मल्ल-योद्ध्यांच्यात तो एक स्पर्धा ठेवीत असे. त्यांत जिंकणाऱ्या मल्लाशी तो स्वतः सामना करीत असे. तो त्याला सांगायचा, ''मला हरवलंस तर मी तुझा सन्मान करीन. पण माझ्या हातून जो पराजित होईल, त्याने नंतर पुन्हां मल्लयुद्धांत भाग घेता कामा नये. पण हो, त्याच्या चरितार्थासाठी आवश्यक त्या सोयींची व्यवस्था मात्र मी करीन.''

स्पर्धेत जमीनदाराला जर हरवले तर एकदाच सन्मान झाला असता, पण त्याच्या हातून जर पराजय स्वीकारला तर आयुष्यभराची चिंता मिटली असती. म्हणून बहुतेक मल्लांनी ठरवलं कीं जिंकण्याऐवजी हार पत्करणेंच जास्त चांगले! सारेच मल्ल या प्रलोभनाने आकर्षित झाले. त्याकारणाने जमीनदाराच्या हातून हारण्याचे महाभाग्य प्राप्त करण्यासाठी ते इतर मल्लांशी निर्धारपूर्वक लढत होते, पण शेवटी जेव्हां विजयवर्माशी दुसरा विजेता वीर मल्लयुद्ध करीत होता, तेव्हां मात्र हारण्यांतच त्याला आपले हित आहे असे वाटत होते.

विजयवर्माचे हे कपटी नाटक द्रोणाला समजले. त्याने परशुरामला आपल्याकडे बोलावून घेतले व सांगितले, ''विजयवर्माने चालवलेल्या



मल्लयुद्धाच्या स्पर्धांबद्दल मी ऐकले आहे. त्यांत तू भाग कां घेतला नाहीस?'' परशुरामने नम्रपणें उत्तर दिले, ''गुरुवर्य, विजयवर्माला आपण महान योद्धा असल्याचा गर्व आहे. प्रतिभावान मल्लांना सुखसोयींची आशा दाखवून तो त्यांना सहजपणें हरवतो आहे. मी त्याला अजूनही हरवूं शकेन, पण मला तसं करण्याची इच्छा नाही. कारण त्यामुळें त्याचा अहंकार दुखावेल, आणि तो कांहीही अनर्थ करुं शकेल.'' द्रोणला हे म्हणणे पटले.

''विजयवर्माच्यामुळें कितीतरी समर्थ व निपुण योद्धे आळशी होत आहेत. ते आपली कला दाखवण्यास तयार नाहीत. सुखाच्या जाळ्यांत अडकून ते निष्क्रीय बनत चालले आहेत.'' द्रोणाने विचार करुन ठरवले कीं गुरुदक्षिणेच्या नांवाखाली परशुराममार्फत विजयवर्माला धडा



शिकवायचा आणि त्याला योग्य मार्गावर आपण परत आणायचे.

परशुरामला घेऊन द्रोण त्रिपुराला आला. त्याने परशुरामला एका विश्रामगृहांत राहायला सांगितले आणि तो एकटाच विजयवर्माला भेटायला गेला. विजयवर्माने गुरुचे आदरपूर्वक स्वागत केले. आगत-स्वागताच्या गप्पा झाल्यानंतर द्रोण वर्माला म्हणाला, ''वर्मा, मी मागेच म्हटलं होतं कीं माझ्या सर्व विद्यार्थ्यांच्या-मधें तू व परशुराम हे दोघे जास्त प्रतिभावान आहात. माझ्या या दोन सर्वश्रेष्ठ विद्यार्थ्यांमधें होणारे मल्लयुद्ध पाहावे अशी माझी फार तीव्र इच्छा आहे. तू जमीनदार आहेस हा अभिमान सोडून मी शिकवलेली विद्या दाखवून तू परशुरामाला हरव.''

विजयवर्माने गुरुचा हा प्रस्ताव आनंदाने स्वीकारला. विश्रामगृहांत परत आल्यानंतर द्रोणाने सारी माहिती परशुरामला सांगून म्हटले, ''परशुराम, तू व विजयवर्मामधे होणारे मल्लयुद्ध तूच जिंकले पाहिजेस. ती तुझी गुरुदक्षिणा होईल. परंतु तुला आणखी एक गोष्ट करायला हवी. जिंकल्यानंतर तुला लोकांना असा दिलासा द्यायला हवा कीं ही तुझी जीत नसून हार आहे. आता हे कसे शक्य होईल ते तू मला विचारुं नकोस. मी तुम्हाला व्यवहारज्ञान आणि नीति शास्त्रही शिकवले आहे. वेळोवेळीं ते तुमच्या मदतीस येत राहील.''

दुसऱ्या दिवशी सकाळींच विजयवर्मा व परशुराम यांच्यात मल्लयुद्धाला सुरवात झाली. विजयवर्माने यापूर्वी कितीतरी विजयी वीरांना हरवले होते, पण ते मुद्दामच हार पत्करत होते. परंतु परशुरामशी स्पर्धा आगळी होती. तोही एक अत्यंत कुशल योद्धा होता. आणि कोणत्याही लालसेने लढत नव्हता. दोघांनीही आपापले डावपेंच लढवले. प्रेक्षक मोठ्या उत्कंठेने ही स्पर्धा पाहात होते. यांत कोण जिंकले ते त्यांना सांगता येईना. परशुरामने कुठलीही संधी सोडली नव्हती. विजयवर्माचा पराभव करुन गुरुदक्षिणा द्यायचा त्याचा दृढनिश्चय होता. शेवटी तो आपल्या इच्छेनुसार यशस्वी झाला व विजयवर्माचा पराजय झाला.

विजयवर्माला हारलेला पाहून लोक स्तब्ध राहिले. तेव्हां परशुरामने सर्वांना प्रणाम करुन म्हटले, ''जमीनदार मल्लयुद्धांत अत्यंत प्रवीण आहेत. मी पराजित होण्याचा भरपूर प्रयत्न केला होता, पण त्यांनी मला तसे करुं दिले नाही. माझ्यासारखा मल्लयोद्धा सुखाच्या प्रलोभनांपुढे हरावा हे त्यांना मान्य नव्हते. म्हणून त्यांनी हार स्वीकारली. तेव्हां खरे विजेता तर जमीनदारच आहेत.''

लोकांनी टाळ्यांचा कडकडाट केला. विजयवर्माने एक दीर्घ श्वास घेऊन म्हटले, ''परशुराम असामान्य योद्धा आहेत. त्यांच्या हातून होणारा हा माझा दुसरा पराभव आहे. युद्धविद्येंत स्वार्थ व गर्व यांना स्थान नसते. मी आजपर्यंत मल्लयोद्धांना सुखाचे प्रलोभन दाखवले, त्यांना हरवताना माझा अहंकार वाढतच चालला होता. पण आज माझ्या या गुरुबंधूने माझे गर्वहरण केले. मी अगदी मनापासून परशुरामला शुभेच्छा देतो आहे.''

दोन्ही शिष्यांची पाठ थोपटत द्रोणाने म्हटलं, ''तुम्ही दोघांनी आपापल्या परीने माझ्या मनांत होती तीच गुरुदक्षिणा मला दिलीत, त्याचा मला फार आनंद वाटतोय. यापुढें मल्लयुद्धाच्या स्पर्धांमधे प्रतिभा व कौशल्य यांनाच स्थान मिळेल. भावी काळांतले मल्लयोद्धे सुखाच्या मागे लागून आळशी व सुस्त होणार नाहीत असा मला विश्वास वाटतो.''

गुरु द्रोण गोपालपूरला परत गेला. जाण्यापूर्वी दोन्ही शिष्यांना त्यांनी गुरुकुलांत केव्हां तरी येऊन जावे व नवीन विद्यार्थ्यांसाठी कांहीतरी नवी योजना सुरुं करावी असे सुचवले. विजयवर्मा व परशुराम यांनी अर्थातच त्यांची सूचना स्वीकारली.



# भारताची ओळख

१. पं. नेहरु यांनी तीन पुस्तके लिहिली. खाली त्यांची नांवे व प्रकाशनाचे वर्ष दिले आहे. त्यांच्या जोड्या लावा.

| | |
|---|---|
| अ. आत्मचरित्र | १. १९३४ |
| ब. भारताचा शोध | २. १९३६ |
| क. जागतिक इतिहासांतले कांही झरोके | ३. १९४६. |

२. मोतीलाल नेहरुंचा कोणता व्यवसाय होता?
अ. प्राध्यापक
ब. वकील
क. वैद्यकी

३. या फोटोंत पं. नेहरु कुणाबरोबर घड्याळ बघत आहेत?



४. पं. नेहरुंची भगिनी, विजयालक्ष्मी पंडित या कोणत्या देशांत भारताच्या राजदूत होत्या?
अ. चीन,
ब. रशिया,
क. अमेरिका.

५. पंतप्रधानपद स्वीकारताना इंदिरा गांधींचे वय किती होते?
अ. ४९, ब. ५३, क. ५७

६. पंतप्रधान होण्यापूर्वी इंदिरा गांधी केंद्रात मंत्री होत्या. त्यांच्याकडे कोणते खाते होते?
अ. माहिती व प्रसारण,
ब. शिक्षण, क. आरोग्य.

७. इंदिरा गांधींनी एक महत्वाचा कायदेबदल अंमलात आणला. तो कोणता?
अ. नद्यांचे राष्ट्रीयीकरण.
ब. पोलादउद्योगाचे राष्ट्रीयीकरण.
क. बँकांचे राष्ट्रीयीकरण.

८. इंदिरा गांधींनी दुसऱ्या वेळीं पंतप्रधानपद केव्हां स्वीकारले?
अ. १९७१, ब. १९७५, क. १९८०.

*(उत्तरें पुढल्या अंकात)*

**ऑगस्टमधल्या प्रश्नावलीची उत्तरें**

१. अ - ३, ब-१, क - २.
२. रामचंद्र
३. बाळ गंगाधर टिळक, गणेशचतुर्थी
४. या चित्रांत होळी व दिवाळी यांचे मिश्रण आहे. हे दोन सण वेगवेगळ्या महिन्यांत असतात.
५. ब.





# गणेश पुराण

**हो**माग्नीतून जन्मलेला भयंकर प्राणी अदृश्य होतांच काळाने विघ्नासुराचे रूप धारण करून कालपाश फेंकला. कालपाश गरगर फिरत प्रळ्यासारखा सर्व प्रदेशावर पसरला. अभिनंदनाने पराक्रम दाखवून त्याला तोडून टाकण्यासाठी प्रयत्न केला. कालपाशाचे तांडव वाढतच गेल्याचे पाहून व सर्व प्राणिमात्रांत हाहाकार उडालेला पाहून वसिष्ठादी सप्तर्षी व इतर ज्यांच्या हृदयांत लोककल्याणाची चिंता होती अशा सर्व ऋषींनी मिळून ब्रह्मदेवाची प्रार्थना सुरु केली.

ब्रह्मदेव म्हणाला - ''कालपाशांतून कोणी ही सुटणे शक्य नाही. कालप्रभाव थांबवू शकणारा आणि कालाला आवरू शकणारा एकटा गणनायक आहे. त्यानंतर ब्रह्मदेवासह सर्वांनी मिळून जगतावर आलेले संकट टळावे म्हणून गणनायकाची प्रार्थना केली.

महागणपती स्वस्तिक पीठावर बसला व सर्वांना त्याचे दर्शन घडले. त्याने आपल्या हातांतील पाश सोडला. गणेशाच्या पाशाने कालपाशाचे तुकडे तुकडे करुन ते गणेशासमोर आणून टाकले.

कालाचा अशा तऱ्हेने पराभव होताच त्याने आणखी भयंकर अशा विघ्नासुराचे रूप धारण केले आणि कालदंड धारण करून त्याने प्रहार करायला सुरवात केली. गणेशाने त्यावर आपला अंकुश फेकला. तो अंकुश विघ्नासुराच्या कण्यांतच शिरला. विघ्नासुराला अंकुश लागतांच निरुपाय होऊन इकडे तिकडे कोलांट्या खात, आतां विघ्नेश्वराच्या हातून आपली सुटका नाही हे ओळखून, त्याने गणेशाच्या पायावर लोटांगण घातले. त्याचा बंदी असल्यासारखा तो निचेष्ट पडला. गणेशाने आपल्या दोन्ही पायांनी एक दोनदां लत्ता प्रहार केला.

२१. अब्वाचे चरित्रोपाख्यान



तेव्हां काळ विघ्नासुराचं रूप फेकून देऊन गणेशाचे पाय धरून विनवण्या करु लागला - ''गणेशा! तुझ्या भयंकर विश्व पाशासमोर पृथ्वीवर फक्त सूर्योदय व सूर्यास्त समयी प्रगट होणारा माझा पाश कोठे? सर्व विश्वाला वश करू शकणाऱ्या तुझ्या अंकुशांसमोर माझा कालदंड काय टिकूं शकणार? पर्वतासारख्या भव्य भुतांना तुझ्या इवल्याशा चिटुकल्या मूषकवाहनाने धुळीत मिळविले. तू विघ्नासुराला काबूत ठेवणारा विघ्न-नाशक विघ्नेश्वर आहेस. देवा, तू मला क्षमा कर!'' या शब्दांत काळ गणेशाची प्रार्थना करु लागला.

गणेश त्याला रागावून म्हणाला, ''काळा, इतरांची कामे आपल्या शिरावर घेण्याचे मनांत आणून तू स्वतःचा जीव संकटात लोटलास. तू आपलं काम व्यवस्थित कर म्हणजे झाले.''

काळाने दोन्ही कान धरले. तीन उठाबश्या काढल्या व तोंडात मारून घेऊन म्हणाला - ''बुद्धि आली, बुद्धि आली! माझी बुद्धी त्या इंद्राचं ऐकून गवत चरूं लागली होती. पण आता ठिकाणावर आली! तुझ्या भक्तांच्या व तुझे स्मरण करणाऱ्यांच्या वाटेस मी कधी जाणार नाही. त्यांना आधीव्याधींचा त्रास होणार नाही.'' असे सांगून काळाने गणपतीचा निरोप घेतला.

गणपतीने काळाचा गर्वभंग करतांच काळाच्या पाशामुळे जमिनीवर पडलेले अभिनंदन महाराज वगैरे सर्व सजीव झाले व झोंपेतून जागे झाल्यासारखे उठून उभे राहिले. त्यांच्यावर आकाशांतून पुष्पवृष्टी झाली. तेव्हांपासून कोणतेही मंगल कार्य किंवा सत्कार्य करायचं झालं की रांगोळीचे स्वस्तिक काढून गणपतीचे सांकेतिक रूप म्हणून त्यावर हळदीची गोळी ठेवून तिची पूजा करण्याची रीत चालू झाली.

''कालपुरुषाचा गर्वभंग करुन त्याला पादाक्रांत करणाऱ्या विघ्ननाशक गणनायकावर ज्यांचा पूर्ण विश्वास आहे, ते कालप्रवाहाच्या विरुद्ध दिशेने पोहत जाऊनही पाय रोवून उभे राहतात व त्यांना कार्यसिद्धी सहजी प्राप्त होते.'' असे सांगून पावन मिश्र गप्प झाले.

एके दिवशी एक लहान मुलगी पावन मिश्रांची करंगळी धरुन त्यांना एका चित्राजवळ घेऊन गेली.

त्या चित्रांत एक अत्यंत रूपवती मुलगी गणपतीच्या मूर्तीसमोर गुडघे टेकून नमस्कार करीत होती. पावनमिश्र तिची गोष्ट सांगू लागले. एका पुण्यवान दंपतीला गणपतीची आराधना



केल्यावर प्रसाद म्हणून एक कन्यारत्न झाले. जन्मताच ती मुलगी समोरच्या कोनाड्यांतल्या गणेशमूर्तीकडे टक लावून पाहू लागली. तो आपल्याला बोलावतो आहे असे वाटून रडूं लागली. कांही वेळाने हंसू लागली. त्या मुलीचे नाव सुंदरी ठेवले. नांवाला साजेल अशीच ती सुंदर होती. सौंदर्याबरोबर ती हुशार, चतुर, व प्रेमळही असल्यामुळे तिला सर्वजण ज्ञानसुंदरी म्हणू लागले.

तिच्या सौंदर्याची चर्चा जवळपासच्या पंचक्रोशीत होत असे. सर्व म्हणत की ती कोणी देवकन्या किंवा अप्सरा असावी. शापामुळे ती या मर्त्यलोकी आली असावी. तिच्याशी लग्न करुन या, म्हणून मोठेमोठे श्रीमंत लोक मागण्या घालू लागले. राजेरजवाड्यांमध्येही तिचे पाणिग्रहण करण्यासाठी चुरस लागली. त्या देशाचा राजाच स्वतः तिला आपली राणी करून घेण्यासाठी आपल्या लव्याजम्यासह राजधानीहून निघाल्याची बातमी आली.

ज्ञानसुंदरी दररोज ज्या गणेशाची पूजा करी ती गणपतीची मूर्ती नदीच्या घाटावर होती. ती त्या गणेशमूर्तीसमोर गुडघे टेकून बसे आणि डोळे मिटून म्हणे - ''विघ्नेश्वरा! मी आपल्या शैशवावस्थेपासूनच तुझी आराधना करीत आले. लग्न करुन संसार करण्याची मला इच्छा नाही. मला म्हातारी कर. मला ज्ञानसंपदेचा अनुग्रह कर. माझा जन्म सार्थक व्हावा, असं काही तरी काम माझ्या हातून घडू दे!'' असं म्हणत ती ध्यान लावून बसली असतां तिचा काळाभोर अंबाडा चांदीसारखा चकाकूं लागला. तिच्या सुंदर



गालावर सुरकुत्या पडल्या. तिच्या कपाळावर सुरकुत्या आल्या. नदीवर जे कोणी आले ते तिचे ते विकृत रूप पाहून थक्कच झाले. एक सुंदर तरुणी एक म्हातारी आजी झाली.

''मुली, मुली, ज्ञानसुंदरी! हे असं काय ग झालं?'' असं म्हणत रडत तिचे आई वडील आले त्यांना ती म्हणाली - ''मी आतां मुलगी राहिले नाही. मी सुंदरी राहिले नाही, मी आजी झाले. तुम्हां सर्वांना आनंद व्हायला पाहिजे आणि तुम्ही असे रडता काय? तुम्ही मला आपल्या पोटी जन्म दिलात, तो सार्थक व्हावा असा गणपतीने मला आशीर्वाद दिला आहे. माझ्याहून जे अज्ञानी आहेत त्यांना मला माहीत आहे तेवढे ज्ञान मी त्यांना देईन. जे माझ्याहून ज्ञानवान आहेत त्यांच्याकडून शिकण्यासारखं असेल ते मी शिकेन. अज्ञान अवस्थेत जे आहेत ते वयाने कितीही मोठे दिसत असले तरी ती कुकुली बाळेच



आहेत. ती सर्व माझीच मुले, नातवंडे आहेत व मी त्यांची आजी आहे!''

''मी जन्मले तो हाच दिवस नाही का? हाच माझा वाढदिवस! मी आतां पायी तीर्थयात्रेला निघत आहे. मला सर्वांनी आशीर्वाद द्या.'' असे म्हणत ती आजी झालेली सुंदरी उठली. तिने झाडाची एक काठी टेकायला म्हणून करून घेतली.

त्याच वेळी तेथे त्या देशाचा राजा आला. त्याला ती आजी म्हणाली - ''प्रजेचे धन, प्राण व गौरव आणि त्यांच्या मुलींचं रक्षण करण्याचा भार तुझ्यावर आहे, आणि तूच एका कन्येला उचलून घेऊन जायला आला आहेस कां? गांवे, घरें चोरून नेणारा तू चोर लुटेरा आहेस कीं राजा आहेस?'' तिने राजाला विचारले.

राजा शरमिंदा होऊन अर्धमेला झाला. त्याने आपला किरीट व तलवार बाजूला काढून ठेवली व आजीच्या पायां पडून म्हणाला - ''देवी, अव्वा! तुझ्या दर्शनाने माझे अज्ञान नाहीसे झाले. मी राज्यकारभार सोडून प्रजेचा सेवक म्हणून काम करतो.''

अव्वा म्हणजे आजी तीर्थयात्रेला निघाली, तेव्हां राजाने तिच्यासाठी एक पालखी व इतर सर्व तयारी करून दिली.

तेव्हां अव्वा सर्वांस नकार देत म्हणाली - ''राजा, ज्यांना पायांत घालायला चपला किंवा वहाणा देखील नाहींत, अशा कष्टाने आयुष्य कंठणाऱ्या सामान्य प्रजेकडे मी पालखीत किंवा रथांत बसून कोणत्या तोंडाने जाऊ आणि त्यांना ज्ञानबोध करू? तू प्रजेला विद्यादान कर आणि सुखी कर. तू आपले काम कर. मी सामान्य प्रजेसारखी सामान्य लोकांत मिसळून त्यांची जी सेवा करता येईल ती करीत राहीन. विघ्नेश्वर व त्याचा धाकटा भाऊ सुब्रह्मण्यम् माझी सर्व काळजी वाहतील!''

अव्वाने काठी घेतली व पायी निघाली. ती ज्ञानपीठ नांवाच्या एका मठात आली. पीठाधिपतीला नमस्कार करून म्हणाली - ''स्वामी! मला ज्ञानोपदेश करावा!''

पीठाधिपती संकोच करीत म्हणाला - ''आई, तुमची स्त्रीजात, ज्ञानोपदेश घेतल्याचा तुम्हाला काय उपयोग?''

अव्वा म्हणाली - ''पाणी आणि दिवा फक्त पुरुषांकरितांच कां, स्त्रीला काही उपयोगाचे नसतात का? त्यांना त्यांचा उपयोग करता येणार नाही कां? आंधळ्याच्या हातांतला दिवा इतरांना वाट दाखवीत नाही का? प्राणिमात्रांत 'मी' हे ज्ञान फक्त नरालाच असते का, की स्त्रीलाही असते? कांहीच नव्हते ते सर्वच झाले, शून्यांतून जग निर्मिले गेले. चहूंकडे आहे ते एकच आहे, असे जन्माबरोबर म्हणत असतां ही कमी व जास्त, योग्य व अयोग्य यांची निवड करणे, फक्त ज्ञानी लोकांचेच काम आहे कां?''

पीठाधिपति नम्रपणे म्हणाला - ''देवी! ज्ञानपीठावर मी नाही, तू असायला हवी होतीस!''

अव्वा- ''ही पीठें आणि मठ हवेत कशाला? सर्वांना सहजी कळेल अशा तऱ्हेने जवळ जाऊन ज्ञानोपदेश करणं बरं नाही कां? पंचपक्वान्ने, खीर, पुरी वगैरे राजभोग एकाला वाढण्यापेक्षा खाण्या- लायक जे असेल ते दहाजणांना वांटले तर काय हरकत?''

पीठाधिपती म्हणाला - ''होय, मी त्याच प्रमाणे वागेन!'' असे म्हणत मान वांकवून त्याने नमस्कार केला.

अव्वा अशीच पुढे जात असतां एका गोड पाण्याच्या विहिरीजवळ चार बायका पाणी काढून घेऊन जाण्याविषयी एक बाई कांही सांगत होती व इतर ऐकत होत्या. ती अधिकारवाणीने म्हणत होती - ''कोणी आधी आली किंवा मागाहून आली तरी मीच पहिल्याने पाणी काढणार. नंतर या बाई, नंतर या, आणि त्यानंतर ती बाई!''

दूर एक मुलगी दीनवाण्या आवाजात ओरडत होती - ''पाणी घाला बाई! घसा कोरडा पडला आहे!''

चौघी बायका एकदम ओरडल्या- ''जा ग,



दूर हो! इकडे जवळपास येऊच नकोस!" त्या किंचाळून तिला सांगत होत्या आणि ती दूर उन्हांतून चालत आलेली मुलगी जीव कासावीस झाल्यामुळे घेरी येऊन पडली.

त्याच वेळी अव्वाने पुढे जाऊन आपल्या झारीतील पाणी त्या बिचाऱ्या मुलीच्या तोंडात घातले, व उरलेले पाणी स्वतः पिऊन तहान भागविली. ते पाहून त्या चौघीजणींनी तोंड फिरवून म्हटलं - "काय ग बाई तरी! म्हातारे, तिला तू पाजलेस त्यातलं उरलेलं तू पितेस? ती खालच्या जातीची आहे!"

अव्वा शांतपणे म्हणाली - "अहो बायांनो, मला तर मुळांत कोठलीही जात नाही. त्या मुलीच्या व माझ्या शरिरांत, आमच्या नाड्यांत जे पाणी वाहाते आहे, ते एकच आहे!" असं म्हणत ती त्या बायकांच्या घागरींतलं पाणी पाहून चकित होऊन म्हणाली - "तुमच्या अंगात फक्त दूधच असतं असं वाटतं? मग तुम्हाला पाणी कशाला? प्यायला तर नाहीच ना? मग बायांनो तुम्ही दूधच प्या, पाणी आम्हाला सोडून द्या!" असे म्हणत आपला तांब्या भरून तिने पाणी भरून घेतले.

त्या बायकांना म्हातारी म्हणाली त्यातले तत्व कळले व त्यांची बुद्धी ठिकाणावर आली.

अव्वा अशीच पुढे जात असतां एका गांवी प्राण्यांचे बळी दिले जात होते. लोक घाबरून गेले होते आणि देवाची प्रार्थना करीत होते.

अव्वा त्यांना पाहून म्हणाली - "केवढा मोठा अन्याय चालविला आहे हा, माते! हे लोक स्वतः तर छान शिजवून मांस खातात आणि तुला मात्र, कच्चं रक्त पिऊन जगणाऱ्या क्रूर जनावरांसारखे, वागवीत आहेत. ही सर्व मातेचा अपमान करणारी मुलं झाली आहेत!"

"अहो नको, असं नका म्हणू! मातेला राग आला तर सर्वनाश करील!" असं त्यांनी म्हणताच अव्वा म्हणाली - "लांच दिली नाही म्हणून कोणी आई झाली तरी मुलांना ठार करील का? तुम्ही उगाच भितां आहात. भयाला भक्ति मानता आहात! तुमच्या मनात मातेविषयी खरी भक्ती ज्या दिवशी उत्पन्न होईल त्या दिवशी तुमच्या मनांत भय म्हणून राहणार नाही! तुमच्यावर संकटे येणार नाहीत!" असे म्हणत तिने त्यांना समजेल अशा भाषेत भक्तिमार्गाचा उपदेश केला.







# दोन वर



**फार** फार पूर्वी सत्यकीर्ति नांवाचा एक तरुण होता. त्याच्या लहानपणींच त्याचे आईवडील वारले होते. त्याच्या आजीने त्याचं पालन पोषण केलं नि त्याला वाढवला.

कांही वर्षांनंतर आजी फार आजारी पडली आणि पुष्कळ दिवस अंथरुणाला खिळून होती. मरण्यापूर्वी तिने दोन चित्रें नातवाला दिली आणि म्हटले, "हे बघ सत्यकीर्ति, ही दोन देवींची चित्रें आहेत. तू श्रद्धापूर्वक यांची पूजा जर केलीस, तर तुझे कल्याण होईल."

आजी वारल्यानंतर त्याने दुसऱ्या एखाद्या गांवी राहायला जायचे ठरवले, व तो निघाला. तो रस्ता एका जंगलातून जात होता. तिथें त्याला एक घर दिसले. त्यांत एक स्त्री राहात होती. तो तिला म्हणाला, "मला असे घर हवे आहे, जिथें मला उपाशी राहावं लागणार नाही. मी तिथें या दोन्ही चित्रांची पूजा करीत राहीन."

ती स्त्री हंसली नि म्हणाली, "इथून पुढें पूर्वेला चालत जा. तिथें तुला एक पठार दिसेल. तिथें अनेक प्रकारच्या फळांचे वृक्ष आहेत. तिथें एक उजाड घर आहे. तिथें तू तुझ्या चित्रांची पूजा करुं शकशील."

सत्यकीर्ति तिथें पोंचला. त्या स्त्रीच्या सांगण्याप्रमाणें तिथें एक रिकामे घर होते. चारी बाजूला निरनिराळ्या फळांचे वृक्ष होते. ती फळें खाऊन आपले पोट भरीत तो त्या घरांत राहूं लागला, आणि आजीने दिलेल्या चित्रांची मनोभावे पूजा करायला लागला.

कांही काळानंतर एक देवी प्रत्यक्ष अवतरली. तिने सत्यकीर्तिला म्हटले, "तुझ्या पूजेमुळें मी फार संतुष्ट झाले आहे. बोल, तुला कोणता वर हवाय?"

"माते, तू कोणती देवी आहेस?" सत्यकीर्तिने विचारले.

"मी स्वार्थाची देवी आहे. तू जो वर मागशील, त्यांत स्वार्थ अवश्य असला पाहिजे. हे सत्य

२५ वर्षांपूर्वी चांदोबांत प्रसिद्ध झालेली गोष्ट



ध्यानांत ठेवून काय ते माग.'' ती देवी म्हणाली.

''इतक्या लवकर तू दर्शन देशील असं मला वाटलंच नव्हतं. कृपा करुन उद्यां तू परत दर्शन दे आणि मी मागेन तो वर दे.'' सत्यकीर्तिने म्हटलं.

स्वार्थदेवी 'हो' म्हणून अदृश्य झाली.

स्वार्थ हे कोणत्या पक्ष्याचे नांव असावे असा सत्यकीर्तिला प्रश्न पडला. तो तडक तिथून निघाला आणि जंगलात राहणाऱ्या त्या स्त्रीच्या घरीं गेला. त्याने तिला स्वार्थ-देवीची गोष्ट सांगितली, आणि विचारले, ''हा स्वार्थ म्हणजे काय असतं?''

''आधी घरांत ये.'' असं म्हणून तिने सत्यकीर्तिला घरांत बोलावले आणि त्याला जेवायला घातले. त्यानंतर तिने त्याच्यासमोर एक मुलगी आणली आणि विचारले, ''ही मुलगी कशी आहे?''

''फारच सुंदर'' सत्यकीर्ति म्हणाला. आजपर्यंत त्याने इतकी सुंदर स्त्री पाहिली नव्हती.

''बाळा, ही माझी मुलगी आहे. ती सुंदर आहेच, पण जन्मापासून मुकी आहे. स्वार्थदेवीकडून तू वर माग आणि हिचे मुकेपण नाहीसं कर, म्हणजे मी हिचे लग्न मी तुझ्याशी लावून देईन.'' त्या स्त्रीने म्हटलं.

सत्यकीर्ति पुन्हां पठारावर परत आला. दुसऱ्या दिवशी जेव्हां तो पूजेंत मग्न होता, तेव्हां स्वार्थदेवीने दर्शन दिले. त्याने देवीला म्हटले, ''मला एका मुलीशी लग्न करायची इच्छा आहे. ती मुकी आहे. मला असा वर दे, कीं त्यामुळें ती बोलूं शकेल.''

स्वार्थदेवीने त्याची मागणी पुरी केली आणि ती अंतर्धान पावली. सत्यकीर्ति पुन्हां त्या स्त्रीकडे गेला. तिथें पोंचल्यावर त्याने पाहिलं कीं ती मुलगी आता बोलूं शकत होती.

''तू मला वचन दिलं होतंस कीं तुझ्या मुलीचे लग्न माझ्याशी करशील म्हणून. तेव्हां आता तसं कर.'' सत्यकीर्तिने जोर देऊन सांगितलं.

''सत्यकीर्ति, तू बावळट आहेस. आता माझी मुलगी मुकी राहिलेली नाही, म्हणून या सुंदर मुलीचे लग्न मी एखाद्या महाराजाशी मी करीन. कोणीही राजा, महाराजा हिच्या रूपाकडे बघून हिच्याशी लग्न करील.'' त्या स्त्रीने म्हटले.

सत्यकीर्तिने निराश स्वरांत विचारलं, ''हे तुम्हाला तरी योग्य वाटतंय कां?'' ''हो, हो, शंभर टक्के योग्य आहे. तूच मला विचारलं होतंस ना स्वार्थ म्हणजे काय ते? ह्यालाच स्वार्थ म्हणतात. माझ्या मुलीचे लग्न तुझ्याशी न करता एखाद्या महाराजाशी करणे ह्याला स्वार्थ म्हणतात!'' त्या स्त्रीच्या आवाजांत कुत्सितपणा होता.



सत्यकीर्तिला स्वार्थ बरोबर वाटला नाही. तो आपल्या जागेवर परत गेला आणि दुसऱ्या देवीच्या पूजेंत गुंतला. त्याने पुढची कित्येक वर्षे तिची मनःपूर्वक पूजा केली परंतु ती देवी कधीच त्याला दिसली नाही. त्याची दाढी व मिशा लांब वाढल्या. अनेक वर्षांनंतर त्या दुसऱ्या देवीने दर्शन दिले, आणि तिने सत्यकीर्तिला वर मागण्यास सांगितला. सत्यकीर्तिने तिला भक्तीपूर्वक वंदन करीत म्हटले, ''माते, तू कोण आहेस?''

''मला निस्वार्थी देवी म्हणतात. माझ्या वराचा जर तुला फायदा हवा असेल तर त्यांत कोणताही स्वार्थ असता कामा नये!'' देवीने म्हटले.

सत्यकीर्तिने तिला दुसऱ्या दिवशी यायला सांगितले आणि जंगलातल्या त्या स्त्रीला भेटायला गेला. आता ती खूपच म्हातारी झालेली होती. दुसऱ्या देवीने दर्शन दिल्याची गोष्ट त्याने तिला सांगितली आणि विचारले, ''ही निस्वार्थता कशी असते?''

ती म्हातारी हसूं लागली व म्हणाली, ''कलिंग देशाच्या राजाने माझ्या मुलीशी लग्न केले. त्यांना एक मुलगी झाली. तिचे नांव वत्सला आहे. ती आता अठरा वर्षांची तरुणी आहे. खूप सुंदर आहे. पण ती मुकी आहे. निस्वार्थ देवीकडे वत्सलेला बोलायला यावे म्हणून वर माग. ती जरी ठीक बोलूं शकली तरी त्यानंतर मी कांही तिचे लग्न तुझ्याशी करणार नाही. हा निःस्वार्थी वर होईल.''

सत्यकीर्ति परत जाताना याच्यावरच विचार करीत होता. विचाराच्या नादांत तो दुसऱ्या दिशेला एका मुनींच्या आश्रमांत पोंचला. मुनीने त्याची सगळी कहाणी ऐकल्यानंतर म्हटले, ''वत्सा, तुझ्यापेक्षां वीस वर्षे अगोदर मी इथें तपश्चर्या करतो आहे. पण माझी तपस्या सफळ झालेली नाही.



याचं काय कारण असूं शकेल? तू निस्वार्थदेवीला विचारुन मला सांग.''

सत्यकीर्तिने हो म्हटलं आणि तो आपल्या घरीं परत गेला.

दुसऱ्या दिवशी निस्वार्थदेवी पुन्हां अवतरली. त्यावेळीं सत्यकीर्तिने तिच्याकडे मुक्या वत्सलेला वाचा मिळावी असा वर मागितला, आणि त्या तपस्वीने विचारलेला प्रश्न त्याने देवीला सांगितला.

निस्वार्थदेवी म्हणाली, ''वत्सला आता लौकरच बोलायला लागेल. आता राहिली त्या तपस्वीची समस्या! त्याची सारी तपस्या त्याच्या कमंडलूमधे सांठून राहिली आहे. त्या तपोशक्तीचा त्या मुनीला कांहीच उपयोग होणार नाही. त्याचा लाभ इतर कुणालातरी मिळेल. ती तपोशक्ति दुसऱ्याला देऊन टाकल्यानंतरच त्या मुनीच्या तपश्चर्येचे फळ त्याला मिळूं शकेल.'' असं सांगून ती निस्वार्थदेवी अंतर्धान पावली.

सत्यकीर्ति पुन्हां त्या मुनीला भेटायला गेला, आणि देवीने सांगितलेला उपाय त्याने मुनीला सविस्तर सांगितला. मुनीने लागलीच तो कमंडलू त्याला देऊन टाकला. तो कमंडलू हातांत धरल्याबरोबर त्यांतल्या तपोशक्तिमुळें प्रौढ सत्यकीर्ति एकदम तरुण सत्यकीर्ति दिसूं लागला. तो सरळ त्या म्हाताऱ्या स्त्रीकडे गेला आणि त्याने तिला सांगितलं, ''आजीबाई, देवीने म्हटलंय कीं तुमची नात जेव्हां आपल्या होणाऱ्या पतीला प्रथम बघेल, तेव्हां तिला वाचा फुटेल.''

''बरं झालं, तू आला आहेस ते! माझी नात कालच इथें आलेली आहे. थांब, मी तिला बोलावून आणते हं!'' असं म्हणत ती आंत गेली. तिलक्यांत तिची नात राजकन्या घरांतून बाहेर आली आणि सत्यकीर्तिला पाहून म्हणाली, ''आजी, हे कोण आहेत?''

नातीच्या तोंडचे हे शब्द ऐकल्यावर तिला बोलता येतंय, हे पाहून आजी स्तंभित झाली. जरा वेळाने भानावर येत ती म्हणाली, ''तुला बोलायला येतंय? याचा अर्थ हाच तुझा होणारा पती आहे!''

सत्यकीर्ति व राजकुमारी वत्सला यांचा विवाह अत्यंत थाटामाटांत झाला. प्रथम तो कलिंग राजाचा जांवई झाला आणि नंतर त्या देशाचा राजाही झाला.







# मूर्ख

धनिया एक साधा शेतकरी होता. कांही वर्षांपासून त्याला नशिबाची साथ मिळत नव्हती. पिकें कापणीला तयार झाली नि जोराचा पाऊस आला. सारं पीक बुडालं. आंब्याच्या झाडांवर मोहोर लागला नाही तोंच त्यावर कीड पडली आणि बघताबघता मोहोर गळाला. त्याच्या लेकीचें लग्न ठरलें, पण कांहीतरी कारणांवरुन फिसकटलें.

धनियाचा मुलगा रतन स्वतःला खूप शहाणा समजत असे. त्याने जेव्हां पाहिलं कीं प्रत्येक गोष्ट विपरीत होते आहे तेव्हां तो ज्योतिषीमार्तंड शिवशर्मा यांना भेटला. त्यांनी गणिती आंकडेमोड करुन रतनला सांगितले, ''एक बारीकशी देवता तुमच्या घरावर रागावलेली आहे. एक आठवडाभर पूजा करा आणि त्यानंतर एका मूर्खाला पोटभर खाऊं घाला.''

''मूर्खाला? आपला तोडगा तर मला विचित्र वाटतोय.'' रतन म्हणाला.

''यांत कांहीएक विचित्र नाही. तुमच्या घरांत तुम्ही सारेजण बुद्धिमान आहात. बुद्धिवंतांना त्रास द्यायला त्या देवतेला आनंद होतो. तिच्यापासून मूर्ख माणूस अनेक कोस दूर असतो. तुमच्या घरच्या पूजेमुळें ती खूष होऊन जाईल. आणि त्यानंतर तुमचं घर सोडून कुणा दुसऱ्या बुद्धिवंताच्या घरांत घुसेल. म्हणून कुणी मूर्ख माणूस तिला दाखवला ना, तरी पुरे; ती तुमच्या घरांतून कायमची जाईल.'' शिवशर्मांनी सांगितलं रतनने घरी येऊन आईवडिलांना ही गोष्ट सांगितली.

''आता मूर्ख माणूस कुठे शोधायचा?'' धनियाने विचारलं.

तेव्हां रतनला वीरभद्रची आठवण आली. वीरभद्र हा सूरदासचा मुलगा होता. त्यांचीही परिस्थिती गेली कांही वर्षे कठीण होती. नशीब साथ देत नव्हतं. पुष्कळजण म्हणत कीं वीरभद्रही याला कारणीभूत आहे. तो स्वतःला फार शहाणा समजत असे. पण खरं म्हणजे तो बावळटच होता.

पण जर कुणी त्याला तसं म्हटलं तर तो रागावत असे. म्हणून लोक मुद्दामच त्याला हुशार

अशोक राणा



म्हणत, त्याच्या बुद्धीचं भरमसाट कौतुक करीत. त्यामुळें तो अतिशय खूष होत असे.

रतनने, धनियाला वीरभद्रबद्दल सांगिले. "मला मान्य आहे कीं तो खुळा आहे. पण तू खुळा आहेस म्हणून आमच्या घरी जेवायला ये, असं सांगून आपण त्याला निमंत्रण कसं काय देणार?" धनियाने प्रश्न केला.

"बाबा, तू खुळा, मूर्ख आहेस हे त्याला थोडंच सांगायचं? आपण त्याला इंद्र, चंद्र आहेस म्हणायचं. आपली कौतुकांची फुलं उधळली कीं तो आनंदून जाईल. त्याला खूष कसं करायचं ते मला ठाऊक आहे. हे काम तुम्ही माझ्यावर सोडून द्या."

धनियाने होकार दिला. रतन वीरभद्रला जाऊन भेटला आणि इकडच्या तिकडच्या गप्पा झाल्यानंतर म्हणाला, "तुझा आवाज किती गोड आहे रे? तू संगीत साधना करतोस कीं काय?"

"हो करतो ना कवितादेखील करतो मी." असं म्हणून त्याने स्वतः लिहीलेली एक कविता ऐकवली.

"वा वा! काय छान कविता आहे ही! अशा विद्येत पारंगत होणे हे अहोभाग्यच आहे. परमेश्वराने जर तुला थोडं आणखी रूप दिलं असतं तर किती बरं चांगलं झालं असतं!!" रतन म्हणाला.

"पण लोक तर मला 'देखणा आहेस' म्हणतात." वीरभद्र जरा चिडूनच म्हणाला.

"हे बघ, मी खोटं बोलत नाही. जे दिसतंय, तेच सांगतोय. तुझी कविता चांगली आहे, तिला मी चांगलं म्हटलं. तुझा आवाज गोड आहे, ते मान्य केलं. तू खूप हुशार आहेस तेही मला माहीत आहे. आता थोडं रुप जरासं कमी आहे असं मला आपलं वाटतं. जे खरं दिसलं, वाटलं ते मी स्वच्छ बोलून दाखवलं. थोडा कमी देखणा म्हणजे कुरुप नव्हे रे. लोक तुझी स्तुती करतात कारण तुला वस्तुस्थिती आणि सत्य यांची जाणीव आहे." रतनने त्याची अशी कांही तारीफ केली कीं तो हवेंतच तरंगायला लागला.

वीरभद्र भलताच खूष झाला. त्यानंतर एका ठरवलेल्या दिवशी रतनने वीरभद्रला भोजनास यायचे निमंत्रण दिले. वीरभद्राने होकार दिला.

धनियाच्या घरांत शिवशर्मांनी यथोचित पूजा करवून घेतली. पूजा संपल्यानंतर वीरभद्रला पोटभर स्वादिष्ट भोजन जेवू घातले. त्यानंतर लौकरच धनियाकडची आर्थिक स्थिती सुधारली. एका दूरच्या नातेवाईकाने मरतेसमयी आपली सारी संपत्ती धनियाच्या नांवावर करुन दिली. दुसऱ्या पिकांपासून भरपूर कमाई झाली. मुलीचे लग्न एका श्रीमंत घरांत ठरले.

कांही महिन्यांनंतर त्यांचा आणखी एक दूरचा नातलग मुकुंद हा त्यांच्या घरी आला. रतनच्या हुशारीचे कौतुक करीत तो म्हणाला, "पुढल्या शुक्ल पक्षांत तू आमच्या घरी जेवायला आलं पाहिजेस."

"तुझं आमंत्रण जर निराळं वाटतंय. एखाद्या देवतेचा कोप शांत करण्यासाठी तू पूजा बिजा करतो आहेस कीं काय?"

"हो तर, तू बरोबर बोललास. पण तुला कसं काय हे माहीत रे?" मुकुंदने विचारलं.

तेव्हां रतनने मुकुंदला सर्व सविस्तर हकीगत सांगितली व म्हटले, "त्या पूजेनंतर एखाद्या मूर्ख माणसाला भोजन द्यायचं असतं! माझ्यासारख्या बुद्धिमान माणसाला नसतं बोलावणं करायचं! सूरदासच्या मुलाला आम्ही जेवायला बोलावलं, आणि त्यानंतर आमच्या परिस्थितींत आकाश नि पाताळा इतकं अंतर आलं, अगदी कायापालट झाला आहे! त्यामुळें वीरभद्र हा महामूर्ख आहे हे ही सिद्ध झालंय. म्हणून तू त्यालाच जेवायला बोलाव. तुझ्या पूजेच्यासाठी तो अगदी योग्य व लायक आहे."

"अरे, असंच समजून मी त्याला आमंत्रण द्यायला गेलो होतो. त्याला ताबडतोब समजलं, कीं मी एका लहानशा देवतेची पूजा करायला जातो आहे. त्यावेळीं तो काय म्हणाला याची तुला कल्पना आहे कां?" त्याचे स्पष्ट शब्दांत मला सांगितले, "हा सगळा अंधविश्वास आहे. शुद्ध खुळचटपणा आहे. पूजाबिजा न करताच आमच्या घरींही परिस्थिती पालटली. हरप्रकारें आता आम्ही सुखी नि समाधानी आहोत. तुमचा अपमान करण्याची त्याची इच्छा नसेल; म्हणून तुझ्या-बद्दल तो कांहीच म्हणाला नाही." मुकुंद म्हणाला.

"मग तू माझ्याकडे कां आलास? तुला काय वाटतं कीं मी एक मूर्ख माणूस आहे?" रतनने चिडून विचारले.

"हे कसं काय म्हणतो आहेस तूं? तुझ्याबद्दल मला तरी जास्त कांही माहिती कुठे आहे रे? मी कसा तुला मूर्ख समजेन? तुला जेवायला बोलावण्याची सूचना आमच्या गांवचे ज्योतिषी मार्तंड शिवशर्मांनी दिली होती. त्यांच्याच सांगण्यावरुन मी तुला निमंत्रण दिले, "मुकुंदने आपली बाजू सांगितली.

देवतेचा राग जावा म्हणून पूजा करण्याचा सल्ला देणारे शिवशर्मा; त्यांच्या मनांत रतनविषयीं काय मत बनले होते ते स्पष्ट झाले. आता रतनची मान शरमेने खाली गेली. तो एकटक जमिनीकडे पहात राहिला.



# सेनापतीचे मत

अनंतवर्मा हा सौवीर देशाचा राजा होता. त्याच्या घोडदळाचा सेनापती चंद्रपाल होता. शेजारच्या राज्यांबरोबर सौवीर देशाला लढावे लागत होते. त्या लढायांत शत्रूंवर आक्रमण करण्यांत आणि त्यांचे डावपेंच हाणून पाडण्यांत चंद्रपाल अत्यंत यशस्वी होत असे. त्यामुळें समृद्ध सौवीर देशावर हल्ला करण्यास शत्रू नेहमीच घाबरत असे.

आता चंद्रपाल म्हातारा झाला होता. त्याने निवृत्त होण्याचा निर्णय घेतला. त्याला राजाने संमती द्यावी म्हणून चंद्रपालने राजाला विनंती केली. राजाचाही नाईलाज झाला. या निर्णयाला संमती देताना राजाने सांगितले, ''चंद्रपाल, तुझ्या या इच्छेचा मी अनादर करु शकणार नाही. मला वाटतं कीं तुझ्यानंतर सेनापतीपद गौरीनाथला देणं योग्य ठरेल. त्याच्याबद्दल तुझं काय मत आहे. ते सांगशील कां?''

''माझ्या मते गौरीनाथ त्या पदाला योग्य आहे.'' चंद्रपालने उत्तर दिलं. त्यावेळीं राजाच्याशेजारी प्रधानमंत्री बसलेला होता. त्याने चटकन म्हटलं, ''पण गौरीनाथच्या मनांत तुमच्याबद्दल चांगले मत नाही दिसत!''

चंद्रपाल त्यावर म्हणाला, ''महाराजांना गौरीनाथबद्दल माझं मत हवं होतं. त्यांनी गौरीनाथचे मत कुठे विचारलंय?''

*- कौसल्या*





# चांगुलपणाचा महिमा

विष्णुस्वामी रामापूरमधें राहात होता. त्याची मुले लहान होती, तेव्हां जमीनदाराने कृष्णापुरमधें त्याला राहण्यासाठी जागा व पांच अेकराचा सुपीक जमिनीचा तुकडादेखील दिला. म्हणून तो कृष्णापुरला राहायला झाला.

आता त्याच्या दोन्ही मुली मोठ्या झाल्या व त्यांची लग्नें चांगल्या घराण्यांत झाली. त्यांचा एकुलता एक मुलगा माधव आता विवाहयोग्य वयाचा होता. तोही विष्णुस्वामीसारखाच हुशार विद्वान होता, स्वभावाने सौम्य व सुशील होता. म्हणून त्याच्यासाठी अनेक वधूपिते चौकशी करायला येत होते.

एक दिवस विष्णुस्वामीची पत्नी महालक्ष्मी हिने आपल्या मुलाला म्हटले, ''बाळ, कितीतरी मुली तुला सांगून येत आहेत. पण या विषयी मला तुला कांही सांगायचे आहे.

''तुला ठाऊकच आहे कीं आपण पूर्वी रामापुरांत राहात होतो. तेव्हां तू लहान होतास. आपल्या घराच्या शेजारी रामशास्त्री राहात होते. त्यांचा परिवार मोठा होता. त्यांना पांच मुली होत्या. लक्ष्मी किंवा सरस्वती, दोघींची कृपादृष्टी त्यांच्यावर नव्हती, म्हणून आपण नेहमी त्यांच्या अडीअडचणीला मदत करीत होतो. त्यावेळीं त्यांची तिसरी मुलगी श्रीदेवी, तेव्हां पांच वर्षांची होती. ती फार सुरेख होती, आणि नेहमी आपल्या घरी येतजात असायची.

मोठी गोड बोलायची आणि मला तर ती फारच आवडत होती. ''माझी सूनबाई'' असं तिला म्हणून मी तिचा पापा घेत होते. आणि माझ्या मुलीसारखेच तिचे लाड करीत होते.

कृष्णापुरला येण्यापूर्वी माझ्या लक्षांत आलं कीं रामशास्त्रींच्या बायकोला आपण तिथून जाणार याचं फार वाईट वाटत होतं. तिला



समजावत मी म्हटलं होतं, ''अग, वाईट वाटून घेऊं नकोस. आम्ही गेलो तरी आपले संबंध कांही तुटणार नाहीत, बघ! मी श्रीदेवीला नक्की माझी सून करुन घेईन.

''तुझ्या वडिलांनी त्यावेळी या बोलण्यावर मान डोलावली होती. तेव्हां मला वाटतं कीं दुसऱ्या मुलींच्याबद्दल विचार करण्यापूर्वी एकवार आपण रामापुरला जाऊन येऊं आणि मुलगी बघून येऊं.''

आईचे बोलणे ऐकून माधव थोडा वेळ गप्प बसला. त्याने हळूंच म्हटलं, ''तुम्ही दिलेल्या या शब्दाबद्दल मला अगोदर सांगितलं असतंत तर बरं झालं असतं.''

माधवला श्रीदेवीचा प्रस्ताव पटलेला नव्हता हे महालक्ष्मीच्या लगेच लक्षांत आलं. तिने जेव्हां त्याचं कारण सांगण्याचा त्याला आग्रह केला, तेव्हां माधवने उत्तर दिलं, ''आई, आपलं घराणं सर्व सुशिक्षित मंडळींचं आहे. म्हणून आपल्या घरी येणारी सूनदेखील शिकलेली व सुशील असली पाहिजे. म्हणून रामशर्माजींनी जेव्हां मला त्यांची मुलगी शारदा हिच्याबद्दल विचारले तेव्हां मी नकार देऊं शकलो नाही. म्हणजे मी त्यांना 'होय' म्हटलेलं नाही. दसऱ्यानंतर ते इथें येऊन तुमच्याशी याविषयी बोलणार आहेत.''

महालक्ष्मी तोंड मिटून गप्प बसली. तिकडे राजधानींतल्या विद्वानांच्या सभेंत विजयी होऊन रामशर्मा व शारदा परत गेले होते. माधव व महालक्ष्मी यांच्या बोलण्यांत शारदाचा विषय अनेकवेळा येत होता. रामशर्मा दरबारांत पंडित होते. शारदादेखील पंडिता होती. नुकत्याच झालेल्या वादविवाद सभेंत शारदाने माधवखेरीज इतर सर्व स्पर्धकांना आपली विद्या आणि वाक्चातुर्य दाखवून हरवले होते. आपल्या मुलीला हरवणाऱ्या माधवचे अभिनंदन करीत रामशर्माने त्याला आपल्या घरी येण्याचे निमंत्रण दिले होते.

आईच्या चेहऱ्यावरचे बदलते भाव पाहून माधव तिला म्हणाला, ''आई, तू माझ्याबद्दल गैरसमज करुन घेऊं नकोस. याबाबतीत मी स्वतंत्रपणें निर्णय मुळींच घेणार नाही. तुला वाईट वाटेल म्हणून मी रामशर्माबद्दल कांही बोललो नव्हतो. माझ्या मनांत तुझ्याविषयी जे प्रेम पूर्वी होते ते तसेच आहे.''



एक दीर्घ श्वास घेत महालक्ष्मी म्हणाली, ''ठीक आहे. प्रथम या सगळ्या गोष्टी तुझ्या वडिलांना तू प्रथम सांग. याचा निर्णय त्यांनाच घेऊं दे.''

पण सगळं सांगितल्यानंतरदेखील विष्णुस्वामीला कांही निर्णय घेता येईना. आईवडिलांची मानसिक घालमेल पाहून माधवने स्वतःच निर्णय घेऊन सांगितले, ''आई, तू रामशास्त्रींना जो शब्द दिला होतास, तसा कोणताही शब्द मी रामशर्माजींना दिलेला नाही. म्हणून कांही ठरवण्याच्यापूर्वी आपण श्रीदेवीला भेटून येऊं या.''



चांगला दिवस बघून तिघेही रामापुरला गेले. अचानक सहकुटुंब आलेल्या विष्णुस्वामींना पाहून रामशास्त्री व त्यांची पत्नी चकित झाले, पण नंतर त्यांचा हेतू समजल्यानंतर ते निराश झाले.

कांही वेळानंतर रामशास्त्रीने गदगदलेल्या आवाजांत म्हटलं, ''विष्णुस्वामी, अनेक वर्षांपूर्वी दिलेलं वचन लक्षांत ठेवून तुम्ही इथें याल अशी आम्ही स्वप्नांतदेखील कल्पना केली नव्हती. मला वाईट इतकंच वाटतं कीं आपल्या चांगुलपणाचा फायदा मला घेता येत नाही. जर श्रीदेवी आमच्याजवळ असती तर मी लगेच कन्यादान केलं असतं.''

हे ऐकून विष्णुस्वामीने आतुरतेने विचारलं, ''श्रीदेवी कुठे आहे? कुठे गेली होती ती?''

रामशास्त्रीने सांगितलं, ''तुम्ही इथून निघून गेल्यानंतर एका महिन्यानंतर मूलबाळ नसलेले एक पंडित पत्नीसह इथें रंगनाथाच्या मंदिरात मूल व्हावं म्हणून महापूजा करायला आले होते. ते उन्हाळ्याचे दिवस होते. उन्हाचा तडाखा सहन होईना म्हणून मंदिरातून परत आल्यानंतर पंडित व त्यांची पत्नी कडुनिंबाच्या सांवलीत जरा विश्रांति घ्यायला थांबले. त्यांची ती केविलवाणी अवस्था बघून आम्ही त्यांना आंत येण्यास सांगितले. तेवढ्यांत पंडिताची पत्नी घेरी येऊन बेशुद्ध पडली.

माझी पत्नी आणि श्रीदेवीच्या मदतीने आम्ही त्या बाईंना घरांत आणले. नंतर गांवातल्या मोठ्या वैद्यांना बोलावून बाईंची तपासणी केली. आठवडाभर ते वैद्य तपासणी करीत होते. त्या

दिवसांत त्यांची जमेल तशी प्रेमाने शुश्रूषा सेवा केली. लौकरच पंडिताच्या पत्नीला आराम वाटू लागला. हळूहळू दोन्ही कुटुंबांत एकमेकांचा परिचय वाढला.

"हे सारं ठीक आहे. पण श्रीदेवीचं काय झालं ते नाही सांगितलंत?" विष्णुस्वामीने विचारलं.

"तेच तर सांगतोय. त्या पंडिताने श्रीदेवीला मोठ्या प्रेमाने जवळ बसवले, आणि तिच्या डोक्यावरुन हात फिरवून तो म्हणाला, "मला वाटतं, ही सारी रंगनाथाची कृपा आहे आमच्यावर! सहा वर्षांची ही सर्वगुणसंपन्न मुलगी त्याने आम्हाला प्रसाद म्हणून दिली आहेसं दिसतं. या छोटीला आम्ही दत्तक घेऊं. तुमची कांही हरकत आहे कां?" हे म्हणताना त्या पंडिताचे डोळे सारखे भरुन येत होते. आम्हाला वाटलं कीं यांच्यामुळें श्रीदेवी सुखांत राहील. म्हणून आम्ही काळजावर दगड ठेवून त्यांचा प्रस्ताव मान्य केला."

"श्रीदेवीला कुणी दत्तक घेतलं होतं?" विष्णुस्वामी व माधव दोघांनी एकदम विचारलं. त्यावर रामशास्त्रीने उत्तर दिलं, "त्यांचं नांव रामशर्मा आहे. श्रीदेवीला दत्तक घेतल्यानंतर त्यांना दरबारांत स्थान मिळाले. दत्तक घेताना त्यांनी तिचे नांव आपल्या आवडीनुसार बदलले व लक्ष्मीशारदा नांव ठेवले."

रामशास्त्रीचे बोलणें ऐकून विष्णुस्वामी, त्यांची पत्नी व मुलगा किती खूष झाले त्याचे वर्णन करणें अशक्य आहे. विष्णुस्वामीकडून सर्व सविस्तर हकीकत ऐकल्यानंतर रामस्वामीच्या कुटुंबातदेखील सगळ्यांना फारच आनंद झाला.

या घटनेनंतर दोन महिने झाल्यावर नवीन दांपत्य शारदा व माधवला आशिर्वाद देताना रामशर्माने विष्णुस्वामीला म्हटलं, "बघा हं व्याहीबुवा, चांगल्या मनाने केलेल्या कामाचे फळ किती चांगले असते! त्या श्रीरंगनाथाने तुम्हा सर्वांना रामापुरला नेले आणि हा चमत्कार दाखवला. त्यांत महालक्ष्मीची इच्छाही पूर्ण झाली आणि माधवच्या मनांतला हेतूही सफल झाला. हा सारा चांगुलपणाचा महिमा, बरं कां!"







# माया सरोवर

## 20

*(सिद्धसाधकला जेव्हां समजलं कीं मायासरोवरेश्वर, जयशीलला आपल्याबरोबर घेऊन जात आहे, तेव्हां तो देखील जायला निघाला. त्यावेळीं त्याला जलवृक राक्षसांची बातमी कळली. त्यानंतर राजा कनकाक्ष आणि सिद्धसाधक जाऊं लागले; त्यांना जलवृक राक्षसांबरोबर लढत असलेले देवशर्मा व इतर लोक दृष्टीस पडले. त्यानंतर...)*

नरभक्षी लोक आपली भूक भागवण्यासाठी जलवृक राक्षसांमधल्या कांहीजणांना पकडण्याची आशा धरुन त्यांच्यामागे धावत होते. पण राक्षस त्यांना कोणत्या दिशेने नेत आहेत इकडे त्यांनी लक्ष दिले नाही. त्यावेळीं दोन जलवृक राक्षस एका घनदाट वृक्षाच्या फांद्यांत लपून हे दृश्य बघत होते. ते लोक आपल्या राजाच्या आज्ञेनुसार त्या प्रदेशांत शत्रूची टेहळणी करण्यासाठी पहारा करीत होते.

झाडावरच्या जलवृक राक्षसांपैकीं एक आपल्या सहकाऱ्याला म्हणाला, "अरे ऐक! शत्रूच्या बळाची आपल्या राजाला कांहीच कल्पना दिसत नाही. यापूर्वी सरोवरांत झालेल्या लढाईंत आपण मायासरोवरच्या राजाच्या सेवकांना मारुन पळवून लावलं होतं, पण आत्ता त्यांच्या मदतीसाठी कांही लोक आणखी पुढें येत आहेत. सांग, आता काय करायचं?"

दुसऱ्या जलवृकचं लक्ष भलतीकडेच होतं.



त्याची दृष्टी मायासरोवराकडे पळत जाणाऱ्या आपल्या जातभाईंवर आणि त्यांचा पाठलाग करणाऱ्या नरभक्षकांवर केंद्रित होती. त्यांच्या-पासून थोड्या अंतरावर काठीच्या आधारीने लंगडत चालणारा हिरण्यपुरच्या सेनापतीचा मुलगा मंगलवर्मा याच्याकडे तो विस्मयाने बघू लागला.

मंगलवर्माकडे बोट दाखवून पहिल्या जलवृकने आपल्या जोडीदाराला म्हटले, "अरे बघ! याला जर नेऊन आपण आपल्या राजासमोर हजर केलं तर काय होईल? त्याच्याकडून आपल्याला नक्कीच समजेल कीं आत्ताच अरण्यांत जो राजा आला आहे त्यांच्याबरोबर किती सैनिक आहेत ते!"

"ते ठीक आहे. पण दोन तुकड्यांत विभागून मायासरोवराकडे जाणाऱ्या शत्रूचं काय? त्यांच्या योजनेची माहिती काढून आपल्या राजाला अगोदरच सावध करायला नको कां?" दुसऱ्या जलवृकने म्हटलं.

"ते काम तूच बघ. ते लोक मायासरोवराकडे जात आहेत. यांत कांही गुप्त रहस्य नाही. या लंगड्याला मी खांद्यावर उचलून घेतो नि आपल्या राजाच्या हाती सोंपवतो." असं म्हणून पहिला जलवृक झाडावरुन खाली उतरला आणि मंगलवर्माच्या पाठोपाठ चालूं लागला.

आपल्यावर आलेल्या या नव्या संकटाचा अंदाज घेण्याच्या परिस्थितींत मंगलवर्मा नव्हता. पायीं चालणारे आणि घोडेस्वारदेखील आवेशाच्या भरांत त्याची सूचना विसरुन मायासरोवराकडे चालले होते. त्याला लवकर चालता येत नव्हते म्हणून तो मागे राहिला होता. सरोवरावर लौकर पोंचून त्यालाही जलवृक राक्षसांच्याबरोबर होणाऱ्या लढाईत भाग घ्यायचा होता. कारण त्याला वाटतं होतं कीं वीरतेचा निर्णय तलवारीपेक्षां शौर्यनिच होतो.

अशा विचारांत तो पुढे जात असताना पाठीमागून कांहीतरी आवाज ऐकूं आला. त्याने वळून मागे पाहिले. जलवृक राक्षस त्याला पकडण्यासाठी वेगाने पुढे येत होता, पण एका खड्ड्यांत त्याचा पाय अडकून तो पडला, आणि त्याच्या हातांतली दगडी गदा निसटून लांब फेकली गेली. त्याने पाय उचलायचा प्रयत्न केला. परंतु त्याचा पाय चांगलाच मुरगळला होता.

जलवृक राक्षस वेदनेने कळवळून ओरडत होता, "हे जलवृक देवा, तूच मला वांचव रे."

आपण मोठ्या संकटातून वांचलो आहेत हे



मंगलवर्माच्या लक्षांत आले. तो जलवृक राक्षसाच्या-जवळ जाऊन जोराने म्हणाला, "अरे, मला पकडायला आलास, पण खड्ड्यांत पाय दुखावला ना? तुला चांगला धडा मिळालाय. पण आत्ता यावेळीं अगोदर मला तुझ्या पायावर इलाज करायला हवा. तुझा राजा जलवृकनाथ आहे दूर; तो तुला आत्ता मदत करुं शकणार नाही. यापूर्वी तुम्ही जलराक्षसांनी सरोवरेश्वरच्या महालावर हल्ला केला होता ना? त्यांत कोण जिंकलं? तू मला जर खरं सांगितलंस, तर मी संजीवनी सारखी वनौषधी तुझ्या पायावर बांधीन म्हणजे तुला चालता येईल."

हे शब्द ऐकल्यानंतर जलवृक कांहीतरी उत्तर देणार होता, तोंवर झाडाच्या फांद्यात लपलेला त्याचा साथीदार आपली गदा उचलून ओरडायला लागला, "अरे, मायासरोवरेश्वराच्या सेवका, मी याक्षणींच तुला या जगांतून नष्ट करुन टाकीन."

संकट ओळखून मंगलवर्माने आपली वैशाखीकाली काठीची मूठ वर खेंचली. क्षणार्धांत एक धारदार, चकचकीत, निमुळती तलवार बाहेर ओढली गेली. पाय मुरगळलेल्या जलवृकच्या कंठावर त्याने आपल्या तलवारीचे टोंक ठेवले, आणि आपल्याकडे येणाऱ्या दुसऱ्या जलवृक राक्षसाला म्हटलं, "अरे दुष्टा! ऐक, मी तीन अंक मोजतो. त्यापूर्वी तू आपली गदा दूर फेंकून गुडघे टेकून रांगत माझ्यासमोर ये. असं केलं नाहीस तर तुझ्या मित्राचे मुंडके जमिनीवर पडलेले दिसेल, आणि त्यानंतर तुझी पाळी येईल. ऐक, अेक, दोन...!"



मंगलवर्माच्या तोंडातून 'तीन' शब्द येण्या-पूर्वीच जलवृकने गदा दूर फेंकली आणि गुडघे टेकून तो कांपऱ्या आवाजांत म्हणाला, "मी तुझ्या स्वाधीन होण्याचे स्वीकारतो. पण माझ्या मित्राला मारुं नकोस."

"अरे भेदरट जलमूर्खा! तुझा मित्रधर्म कौतुका-स्पद आहे. माझ्याबरोबर चल, मी तुला औषधी वनस्पतीची पाने दाखवतो." असं म्हणून मंगलवर्मा जवळच्या झाडीकडे वळला.

मंगलवर्माने झाडांची नीट पाहाणी करुन कांही जून पिकलेली पाने व कांही कोंवळी पाने तोडून हातावर ती चुरडली व त्यांची एक चकती करुन जलवृकच्या हातांत देत तो म्हणाला, "ऐक. ही औषधी चकती तुझ्या मित्राच्या गुडघ्यावर ठेवून त्यावर पट्टी बांध. निदान बारा तास तरी त्याने त्याजागी न हलता पडून राहिले पाहिजे. तरच हे औषध लागू पडेल."



हे दोघे जलवृक कांही खास कामासाठीच अरण्यांत आले असावेत आणि खरी गोष्ट सांगायची त्यांची इच्छा नाही असे मंगलवर्माला वाटले. मंगलवर्माने यापूर्वी कांही दिवस मायासरोवरमधें काढलेले होते. म्हणून त्याला तिथें जाण्याचा जवळचा मार्ग माहीत होता. पण ती काठी घेऊन त्या खाचखळग्यांच्या वाटेवरुन जाणें त्याला त्रासदायक होत होते.

तसाच लंगडत तो कांही वेळ चालत राहिला, तेव्हां एका उंच वृक्षावरुन कुणीतरी त्याला हांक मारली, "मंगलवर्मा!"

त्याला वाटलं झाडावरच्या एखाद्या भुतानेच हांक मारली असावी. त्याने वर पाहिले. एका मोठ्या वृक्षाच्या फांदीवर पसरलेल्या वेलींच्या जाळ्यांत अडकलेली कुणीतरी व्यक्ती त्याला दिसली. तो दुसरा तिसरा कुणी नसून मायासरोवरेश्वराच्या हंसांच्या रथाचा सारथी होता. रथ जेव्हां उलटला, तेव्हां तो रथांतून घसरुन त्या झाडावरच्या वेलींत अडकला आणि मरतामरता वांचला.

"अरे, तू वाचलास ना? फार आनंदाची गोष्ट आहे. खाली येण्यासाठी तुला एखादी फांदी मिळण्यासारखी नाही कां?"

हंसाच्या रथाच्या सारथीने होकारार्थी मान डोलावीत म्हटले, "वर्मा, हळू बोल. यमदूतासारखा एकजण भयंकर नरवानरावर स्वार होऊन या वाटेने येतो आहे. मला वाटतं हे लोक म्हणजे आपले शत्रू जयशील व सिद्धसाधक असावेत."

हे ऐकून मंगलवर्माचा उत्साह उफाळून आला. त्याला वाटलं कीं त्या तुकडीत वैद्यदेव देवशर्माही असतील. म्हणजे त्यांच्याबरोबर तो लौकरच मायासरोवरापर्यंत पोंचेल.

"ह्या वेळीं हे लोक आपले शत्रू नाहीत. पण ते आपले मित्र आहेत कां ते मला नीट ठाऊक नाही. त्यांच्यामधे आपले हितचिंतक वैद्यदेवदेखील आहेत. मी तर पडलो लंगडा! झाडावर मला चढता येत नाही. तुला खाली उतरता येत नाही. म्हणून तू टाळ्या वाजवून त्या लोकांना इकडे बोलाव." मंगलवर्माने सुचवले.

सारथ्याला जेव्हां समजलं कीं त्या नरवानरावर स्वार झालेल्या व्यक्तीबरोबर वैद्यदेवदेखील आहे, तेव्हां त्याच्या जीवांत जीव आला. जर तो आणखी थोडा वेळ त्या फांदीवर अडकून राहिला तर कुणी नरभक्षक किंवा जलवृक राक्षसाने त्याला मारले असते.

हा विचार करुन रथसारथीने थोड्या अंतरावरुन जाणाऱ्या सिद्धसाधक, राजा कनकाक्ष आणि त्याचे अनुयायी यांच्याकडे बघून उंच स्वरांत पुकारले, "महाराज, मला वांचवा. मी या झाडावरच्या वेलींच्या जाळ्यांत गुरफटलो आहे."

त्याचा आवाज सर्वप्रथम नरवानराच्या कानीं पडला. आणि तो अचानक थांबला. त्याने मान उंचावून वर बघितले आणि आपल्या खांद्यावर बसलेल्या सिद्धसाधकास इशारा केला. तोपर्यंत सारथ्याने पुन्हां एकदा ओरडाओरड केली.

या वेळेला मात्र त्याचा आवाज सर्वांनी स्पष्ट ऐकला. देवशर्माने म्हटलं, "हा आवाज मायासरोवरेश्वराच्या रथाच्या सारथीचा वाटतो आहे. हंसांच्या रथांतून तो या भागांतच खाली पडला होता."

"वा, वा"! मी त्याला पकडीन. त्याच्याकडून त्याच्या मालकांची सगळी रहस्ये काढून घेईन. जयशीलने दाखवल्याप्रमाणें या सर्वांना या झाडांना बांधून टाकीन आणि महाकालाला त्यांचे बळी चढवीन." असं म्हणून सिद्धसाधकाने नरवानराला हांकलले.

त्याबरोबर नरवानर खूप जोरांत पळायला लागला आणि सारथीच्या झाडाखाली थांबला. त्यावर मंगलवर्मा म्हणाला, "सिद्धसाधका, झाडाच्या फांद्यांत अडकलेल्या आमच्या साथीला असेल तसा खाली उतरवला पाहिजे."

सिद्धसाधक ओरडून म्हणाला, "जय महाकाली! हे सगळं मला आश्चर्यजनक वाटतंय. मायासरोवरेश्वरने केवळ कनकाक्ष राजाच्या मुलांनाच पळवून नेलं असं नाही, पण आता तर माझा मित्र जयशील यालाही तो घेऊन गेला आहे. परंतु तुम्ही तर असं बोलता आहात कीं जणूं तो आपला शत्रू नसून मित्र आहे."



सिद्धसाधकाला शांत करीत देवशर्मा म्हणाला, "सिद्धसाधक! यावेळीं आपला आणि मायासरोवरेश्वराचा भयानक शत्रू म्हणजे सरोवरांत आणखी एका ठिकाणीं राहात असणारे जलवृक राक्षस हे आहेत. आपण सर्वांनी मिळून जर त्यांचा सर्वनाश केला नाही, तर आपण कनकाक्ष राजाच्या मुलांना वांचवूं शकणार नाही. आता माझा होरा आहे कीं सध्यां सरोवर जलवृक राक्षसांच्या ताब्यांत आहे." तेवढ्यांत कनकाक्ष राजाही आपल्या सैनिकांसह तिथे येऊन पोंचला.

"अरे वीरांनो, मला वांचवा. एक भयंकर मोठा अजगर फांद्यावरुन सरपटत मला गिळून टाकायला येतो आहे!" रथाचा सारथी मोठ्याने ओरडून म्हणाला.

दुसऱ्याच क्षणीं सिद्धसाधकाने नरवानराला आपल्या हाताने खूण करीत आदेश दिला, "हे नरवानरा, वरती वेलींच्या जाळ्यांत गुरफटलेल्या व्यक्तीला खाली घेऊन ये."

नरवानर तत्काळ विजेच्या चपळाईने वरच्या डहाळीवर पोंचला. एका हाताने रथाच्या सारथ्याजवळ जाणाऱ्या अजगराला त्याने घट्ट पकडून ठेवले आणि दुसऱ्या हाताने सारथ्याला रानटी वेलींच्या जाळीमधून बाहेर ओढून काढले. नरवानराला पाहून सारथी थरथर कांपायला लागला व एक मजबूत फांदी पकडून म्हणाला, "आता मी खाली उतरुं शकेन."

त्याचवेळीं जलवृक राक्षसांचा एक समूह दगडी गदा हातांत घेऊन तिथें आला आणि "जलवृकनाथ की जय" असं ओरडत त्यांच्यावर तुटून पडला.

जलवृक राक्षसांच्यात एक व्यक्तीं गेंड्यावर स्वार झाली होती. आपली गदा जोराने हालवीत धोक्याची सूचना देत म्हणाला, "हे बघा, आपल्या शत्रूंमधून एकजण देखील पळून जाता कामा नये."

झाडाच्या फांदीवरुन नरवानराने हे दृश्य पाहिले. तो जोराने गर्जना करत सुटला; त्यामुळें साऱ्या अरण्यांत त्याचा आवाज घुमला. आपल्या हातांतला अजगर चाबकासारखा झटकीत त्याने गेंड्यावर स्वार झालेल्या जलवृक राक्षसावर झेप घेतली.

*(पुढल्या अंकात समाप्त)*





वेताळ कथा

# व्याजाच्या नाण्यांचे झाड

निश्चयी विक्रमार्क पुन्हां झाडाजवळ गेला. त्याने झाडावरुन शव खाली उतरवले आणि खांद्यावर घेतले, व तो निमूटपणे स्मशानाच्या दिशेने चालायला लागला. तेव्हां प्रेताच्या आंत लपलेल्या वेताळाने त्याला विचारले, "राजन्, तुला या प्रयत्नांत जरा तरी यश मिळतंय कां ते सांग! लक्ष्य साधण्यासाठी तुझा प्रयत्न कौतुकास्पद आहे, परंतु त्याचा उपयोग काय? जगांत कांही माणसांचे वर्तन अगदी विचित्र नि गूढ असते. असली माणसें परोपकार करीत असल्याचे ढोंग करतात, आणि आपल्या नातेवाईकांत भांडणें लावतात, द्वेष निर्माण करतात. अशा प्रकारच्या एखाद्या माणसाने तुला प्रोत्साहन दिले असेल, म्हणून हे काम करायला तू तयार झालास.



तुला सावध करण्यासाठी मी तुला जडनाथ नांवाच्या एका व्यक्तीची गोष्ट सांगणार आहे. लक्ष देऊन ऐक." आणि वेताळाने पुढील गोष्ट सांगितली.

भद्रपुरांत मणिदीप नांवाचा एक धनवंत राहात होता. त्याची पत्नी वेदवती ही देखील संपन्न परिवारांतून आलेली होती. दोघेही सुस्वभावी व दिलदार होते. जे कुणी मदत मागायला येत, त्यांना मणिदीप भरपूर सहाय्य करीत असे. घरी येणाऱ्या प्रत्येकाचे वेदवती आईच्या मायेने आदरातिथ्य करीत असे.

सांचलेली संपत्ती बसून खाल्ली तर संपायला लागते असं म्हणतात. आता मणिदीपचा एकुलता एक मुलगा गुणदीप मोठा झाला होता. त्याच्यासाठी वडिलोपार्जित घराखेरीज बाकी कांहीही उरलं नाही.

आणि खरं सांगायचं तर घरी काय चाललंय हे गुणदीपला ठाऊकच नव्हतं. जडनाथ नांवाच्या एका मित्राबरोबर वैद्यकीचा अभ्यास शिकण्यासाठी तो सुदूर प्रांतात गेला होता. आपल्या मुलाचाच नव्हे, तर जडनाथच्या वैद्यकी शिक्षणाचा सारा खर्च मणिदीप करीत होता. जेव्हां विद्याभ्यास संपवून गुणदीप घरी परतला, तेव्हां घरांतल्या परिस्थितीची त्याला खरी कल्पना आली.

"पूर्वजांनी दिलेली संपत्ती तुम्ही खर्च करुन टाकलीत, आणि माझ्या हातांत आता फक्त करवंटी शिल्लक उरलीय असं दिसतंय. आता या अशा अवस्थेत मी काय करावं तेच मला समजत नाही." गुणदीपने संतापून पित्याला सांगितलं.

"पोरा, संपत्ती कधी स्थिर नसते. आपला चांगुलपणाच आपले रक्षण करीत असतो. तुझ्या वडिलांनी केलेल्या प्रत्येक गोष्टीला मी दुजोरा दिलेला आहे. जर तुला ही चूक वाटत असेल तर ही चूक आम्हा दोघांची आहे. अजूनही कांही आपण दुसऱ्यांच्यावर अवलंबून राहाणार नाही. राहायला हक्काचे घर आहे. तू जर वैद्यकीचा व्यवसाय सुरुं केलास तर तू ही रग्गड पैसा मिळवूं शकशील." असं म्हणून वेदवतीने मुलाची समजूत घालण्याचा प्रयत्न केला.

गुणदीपने वैद्यकीला सुरवात केली. त्यांतून थोडीफार कमाई सुरुं झाली, पण त्यावर तो संतुष्ट नव्हता. आणि त्याचं कारण होतं जडनाथ! वर्षभरांतच जडनाथचे उत्पन्न खूप वाढले, व दिवसेंदिवस त्याची प्रसिद्धी वाढत चालली. इतका चांगला वैद्य आजपर्यंत पाहिला नव्हता असं लोक आपसांत बोलायला लागले. त्याच्या औषधांत संजीवनी होती असं म्हणायला लागले.



दूरदूरच्या प्रांतांतून तपासणी करुन घ्यायला लोक जडनाथकडे येऊं लागले. साहजिकच, संपत्तीचा ओघ वाढायला लागला.

"तुमच्याच पैशावर जडनाथ वैद्यकी शिकला आणि आता तो तुमच्या मुलाचा प्रतिस्पर्धी बनला आहे. तुमच्यामुळेंच माझी संपत्ती गेली आणि माझा व्यवसायही निरर्थक ठरायला लागला." गुणदीप आपल्या वडिलांवर आरोप करीत राहिला.

"अरे बाळ, तुझीही कमाई कांही कमी नाही. वैद्यकीच्या वृत्तींत सेवा ही महत्वाची असते. तुझ्याकडून जमेल तितकी लोकांची सेवा कर, त्यांच्या उपयोगी पडत राहा. तेव्हां लोक तुला मान देतील, तुला मोठेपणा देतील. जे आपल्या-जवळ नाही असं तुला वाटतं ना, ते म्हणजे एक भ्रामक कल्पना आहे." मणिदीपने देखील गुणदीपला खूप समजावून सांगण्याचा प्रयत्न केला. त्याची नजर फक्त कमाईवरच होती, आणि ती तर कांही केल्या जास्ती वाढत नव्हती.

ही गोष्ट त्या शहरांतला तांदळाचा व्यापार करणारा व्यापारी महासेन याला कळली. रत्नमाला ही त्याची एकुलती एक मुलगी होती. महासेनला मुलगा नव्हता, म्हणून तो रत्नमालेसाठी चांगला नवरामुलगा बघतच होता. तिचे लग्न करुन देऊन जांवयाला घरींच राहायला बोलवावे व आपला व्यापार त्याच्या स्वाधीन करावा असे महासेनला वाटत होते. तो गुणदीपला भेटून म्हणाला, "मुला, तुझ्या परिवाराबद्दल मला संपूर्ण माहिती आहे. तुझ्या पूर्वजांनी बराच दानधर्म केलेला आहे. तुमचा परिवार नेहमीच संपन्न होता.



लक्ष्मीदेवीची कृपादृष्टी तुमच्या कुटुंबावर होती. पण तुझे आईवडील अभागी ठरले. तू जर त्यांच्याजवळच राहिलास तर तुमची परिस्थिती कांही सुधारणार नाही. उलट ती जास्तच बिघडत जाईल. तू माझ्या मुलीशी लग्न कर, आणि घरजांवई म्हणून माझ्या घरीं राहायला ये. तुझ्या आईला नि वडिलांना मात्र आपल्याजवळ फिरकूं देऊं नकोस," असं सांगून त्याने गुणदीपचे कान भरले. महासेनच्या मानभावीपणाचा गुणदीपवर बराच परिणाम झाला. शिवाय सुंदर रत्नमालेला बघितल्यानंतर तो तर फारच भारल्यासारखा झाला.

गुणदीपचे रत्नमालाशी लग्न झाले आणि तो सासरी राहायला गेला. या काळांत जडनाथला मणिदीपच्या वाईट परिस्थितीबद्दल समजले तो त्यांना भेटायला गेला तेव्हां त्या दोघांनी त्याला सांगितले, "आम्ही अगदी सुखांत आहोत. आमचा मुलगा म्हणत होता कीं आम्हीदेखील



त्याच्याबरोबरच राहावे, पण आम्हाला कांही त्याच्या सासुरवाडी राहाणें आवडले नसते. मरेपर्यंत याच घरांत राहावे अशी आमची इच्छा आहे. आणखी कुठे जाण्याची इच्छाच उरली नाही आता!"

कांही क्षण जडनाथ गप्प बसला होता. नंतर तो म्हणाला, "इथें येण्यांत माझाही थोडा स्वार्थ आहे. तुमच्या घराच्या मागीलदारी एक झाड आहे. त्याचं नांव कुणालाच माहीत नाही. पण त्या झाडाच्या फळांपासून एक अद्भुत औषधी बनवता येते. हे रहस्य मला नुकतेच माहीत झाले. या झाडाला बारा महिने फळें येत असतात. एकेका फळाची किंमत दहादहा मोहोरा होईल. पण इतकी रक्कम द्यायची कांही माझी शक्ती नाही. आपण रोज एक फळ मला द्या, त्याबदली मी तुम्हाला रोज एक सोन्याची मोहोर देत जाईन. पण त्यासाठी आपण मला लेखी करार लिहून दिला पाहिजे, आणि त्या करारानुसार ही फुलें आपण इतर कुणालाही विकणार नाही अशी लेखी हमी हवी."

मणिदीप विचारांत पडला. नंतर भानावर येऊन म्हणाला, "तू सांगितले नव्हतेस तोपर्यंत या झाडाचे महत्व आम्हाला मुळीच ठाऊक नव्हते. तू सांगतोस त्या किंमतीला मी तुला फळें देत जाईन. पण हे लेखी स्वरुपांत तू कां मागतो आहेस हे मात्र मला समजत नाही!

"नाही, त्याचं काय आहे कीं या फळांचं महत्व जर इतर लोकांना कळले तर तो मोठाच धोका होईल. अनेकजण ही फळें खरेदी करायला येतील. आपल्यावर त्यासाठी दडपण आणतील. जर त्या फळांचा उपयोग एका विशिष्ट पद्धतीने केला तर त्यांत संजीवनीसारखे औषध तयार होऊं शकेल. जर आणखी इतर पद्धती वापरल्या तर ते औषध विषारी होऊं शकेल, प्राणघातक ठरुं शकेल. माझ्यासारख्याच्या हातांत हे औषध आले तर त्याचा दुरुपयोग होणार नाही. म्हणून तुम्ही मला हा अधिकार लेखी स्वरुपांत दिलात तर इतर कुणीही तुमच्यावर दडपण आणूं शकणार नाही." जडनाथने त्यांना समजावून सांगितले.

मणिदीपने त्याप्रमाणें हा अधिकार जडनाथला करारपत्रकावर लिहून दिला. त्या दिवसापासून मणिदीपच्या परिस्थितींत बदल झाला. तो आता आरामांत राहूं लागला व जमेल तशी इतरांना मदतदेखील करुं लागला.

आपल्या वडिलांची परिस्थिती सुधारली आहे हे गुणदीपला समजलं, पण त्याचं कारण मात्र त्याला उमगलं नाही. गुणदीप वडिलांना भेटायला



आला. त्यांच्या आर्थिक व्यवहाराबद्दल त्याने खोदून चौकशी केली. मग मात्र मणिदीपला मागील दारच्या झाडासंबंधी सांगावे लागले. ते रहस्य कळल्याबरोबर गुणदीप धावतच त्या झाडाजवळ गेला. झाडाला लागलेली असंख्य फळें पाहून तो उर बडवीत पित्याला सांगू लागला, "या झाडाचे रहस्य तुम्ही माझ्यापासून लपवून ठेवलेत. मला चिरल्याशिवाय या फळांचे हक्क तुम्ही लेखी लिहून दुसऱ्याच्या स्वाधीन केलेत. हा फार मोठा अन्याय आहे. माझा वांटा मिळवण्यासाठी मी आता वरिष्ठ अधिकाऱ्यांकडे याची तक्रार करीन."

मणिदीपला हे आवडले नाही. म्हणून त्याने जडनाथला ही बातमी कळवली. सर्व बातमी समजल्यानंतर जडनाथ म्हणाला, "गुणदीपच्या तक्रारींत तथ्य आहे. त्याला मी एक उपाय सुचवतो. या झाडाची मी चार हजार फळें घेऊन जातो. त्याची किंमत म्हणून रोज एका मोहोरेच्या हिशेबाने पुढची अकरा वर्षे आपल्याला मला रोज एक मोहोर द्यावी लागेल. जोपर्यंत आपण जिवंत आहात तोपर्यंत मी रोज एक मोहोर देत राहीन. आजपासून या झाडावर गुणदीपचाच अधिकार राहील." मणिदीपला त्याने उपाय सुचवला.

गुणदीपला हा प्रस्ताव आवडला. त्यानंतर ती फळें विकण्यासाठी गुणदीपने प्रयत्न केले. पण वैद्यांनी स्वच्छ सांगितले, कीं त्या फळांमधे औषधी गुण मुळींच नाहीत. हे ऐकून गुणदीप निराश झाला. त्याच्या आशेवर पाणी पडले. तो जडनाथला भेटला व म्हणाला, "तुला जी किंमत द्यायची असेल ती देऊन ही सगळी फळें तूच घेऊन टाक."



जडनाथ हंसून म्हणाला, "ही निरुपयोगी फळें घेऊन मी काय करुं?" "ही फळें निरुपयोगी आहेत? अरे, तूच तर प्रत्येक फळाला एकेक सोन्याची मोहोर द्यायची असा करार केला आहेस ना?" गुणदीपने आश्चर्याने विचारले. "तुझ्या वडिलांकडून ती फळें घेतली तरच ती किंमती होतात. तुझ्या मागील दारचे हे झाड व्याजाच्या नाण्यांचे झाड आहे. तुझ्या वडिलांनी जे उपकार केले आहेत, ती पुंजी आहे आणि त्या पुंजीवरच्या व्याजाची ही फळें आहेत." जडनाथने सांगितलं.

त्याचे हे भेदक शब्द ऐकून गुणदीपचा चेहरा उतरला. खाली मान घालून तो तिथून निघून गेला.

ही गोष्ट सांगून वेताळाने विचारले, "राजन, जेव्हां वैद्यकीचे शिक्षणपूर्ण करुन जडनाथ परत आला, तेव्हांपासून मणिदीपच्या परिवाराशी त्याचे वागणें विचित्र नि संदिग्ध होते, हे स्पष्ट दिसून येते. त्याचा सहाध्यायी गुणदीप आपल्या

आईवडिलांच्यावर नाराज होता, त्यांच्याबद्दल त्याच्या मनांत आदर नव्हता आणि त्याला त्या दोषांपासून दूर राहायचे होते हे जडदीपला समजले होते. तरीसुद्धां त्याने गुणदीपला सुधारण्याचा प्रयत्न केला नाही. वैद्यकीच्या व्यवसायांत त्याला भरपूर कमाई होऊं लागली, आणि म्हणून त्या झाडाच्या आडून तो आपली करमणूक करीत होता. ज्या धर्मात्म्याच्या मदतीमुळेंच तो इतका मोठा वैद्य होऊं शकला, त्याच्याबाबतीत जडनाथने अन्याय केला व त्याचा अवमान केला. हा त्याचा कृतघ्नपणा नाही कां? माझ्या या शंकांचं समाधानकारक उत्तर तुला माहीत असूनही जर तू मौन पाळलेस तर तुझ्या मस्तकाची शंभर शकलें होऊन पडतील.''

विक्रमार्कने उत्तर दिले, ''जडनाथच्या व्यवहारांत कोणताही विचित्रपणा नाही किंवा त्याचे वागणें संदिग्धही नाही. उलट त्याचे धोरण चांगले होते. जिथें मानसिक आणि आर्थिक विचारसरणींत फरक असतो त्या लोकांशी कसे वागावे हे त्याला चांगले ठाऊक होते. त्यांच्या विचारांशी सुसंगत असेच वागावे लागते. निर्मळ मनाच्या मातापित्यांना जरी त्यांच्या मुलांनी अनादराने व तिरस्काराने वागवले, तरी ते इतरांसमोर आपल्या मुलांचा पाणउतारा करीत नाहीत. म्हणून मणिदीपने जडनाथला सांगितलं, ''आमचा मुलगा सारखा म्हणत असतो कीं आम्ही त्याच्याबरोबर राहावे! पण त्याच्यावर आमचा भार टाकणें हे आम्हाला आवडणार नाही.'' अशा परिस्थितींत जडनाथ काय करणार? आपली कृतज्ञता व्यक्त करण्यासाठी जडनाथने झाडाच्या फळांच्या आडून त्याला मदत केली. जेव्हां गुणदीपने म्हटलं कीं जी किंमत देतोस ती देऊन ही सारी फळें तू घे, तेव्हां जडनाथने काय उत्तर दिलं होतं? तो म्हणाला होता, ''तुझ्या वडिलांकडून घेतली तरच या फळांची किंमत आहे. नाहीतर त्यांचे कांहीच मूल्य नाही.'' त्याचे हे सूचक बोलणें गुणदीपला समजले. आपल्या आईवडिलांचा परोपकार किती मूल्यवान आणि महत्वपूर्ण आहे याचीही त्याला जाणीव झाली.

राजाचे मौनभंग करण्यांत सफल झालेला वेताळ पुन्हां शवासहित अदृश्य झाला आणि पुन्हां झाडावर जाऊन बसला.

*(सुभद्रादेवींच्या रचनेवरुन)*








## ठळक भित्तीचित्रें



त्रिचूरजवळच्या काळडी इथल्या श्रीशंकरा विद्या पीठाच्या बाराशे फूट लांबीच्या भिंतीवर ठळक भित्तीचित्रें रंगवली आहेत. पांच फूट उंचीची ही सुबक चित्रमालिका, यांत गुरु शिष्याला सत्ययुग, त्रेतायुग, द्वापारयुग व कलीयुग या चारी युगांबद्दल माहिती देत असल्याचे ओळीने चित्रित केलेले आहे. त्याशिवाय रामायण, महाभारत, शाकुंतल, मेघसंदेशम्, रघुवंश, भरतमुनीचे १०८ करण आणि आदि शंकराचार्यांचा जीवनपट, यांचीही चित्रें आहेत. तीन वर्षांच्या कष्टपूर्वक कामानंतर ही चित्रमालिका १९९८ मधें पूर्ण झाली. या भित्तीचित्राची नोंद गिनेस बुकांत झाली आहे.

## शाकाहारी खेडेगांव

हल्लीं बरेच लोक शाकाहाराकडे वळायला लागले आहेत. ओरिसांतले एक खेडे याबाबतीत आगळे आहे. त्यांत राहाणाऱ्या पन्नासएक कुटुंबांमधे मांस किंवा मासे शिजवले जात नाहीत. ते फक्त शाकाहारी भोजन करतात. पूर्व ओरिसामधें, धेनकनल पासून पन्नास किलोमीटरवर असलेल्या बेंटसालिया हे इतर खेड्यांसारखेच एक खेडेगांव दिसले, तरी त्यांत एक प्रमुख फरक आहे. इथले गांवकरी संत अच्युतानंदांचे अनुयायी आहेत. ते अनेक वर्षें वैष्णव संप्रदायी आहेत. आणि म्हणूनच बहुधा, त्यांचे जीवन शांतीचे व दीर्घायुषी आहे. त्यांच्याकडे रोगराई किंवा राष्ट्रीय संकटे आली नव्हती. इथले रहिवासी व गुरेढोरे सुखाने एकत्र नांदताना दिसतात.



लोंकर हाताने चांचपीत ती म्हणाली, "त्यांत काय मोठंसं? अगदीच सोपं आहे. तुम्ही हिच्या अंगावरची लोंकर कापून व्यापाऱ्यांना विकत कां देत नाही? ते त्यांतून लोंकरीची जाकिटे तरी बनवतात किंवा गालिचे विणतात!"

हे सोपे उत्तर ऐकून नेगी थक्क झाला. त्याच्या वडिलांची अट पुरी करणारा हा किती सोपा उपाय होता!

"शमा, खरंच, तुला धन्यवाद! मला हे कधी सुचलंच नव्हतं!" नेगी आनंदाने म्हणाला.

त्याच दिवशी नेगीने बुलबुलला जवळच्या गांवांत नेले, व तिची लोंकर व्यवस्थित कापून काढली. ती सारी एका पोत्यांत गोळा केली; आणि ती गोण घेऊन तो लोंकरीच्या व्यापाऱ्याकडे गेला. तिथे लोकरीचे वजन करुन ती लोकर विकायची होती. बुलबुलची स्वच्छ लोकर मऊ सूत होती. त्यांत गांठी नव्हत्या आणि लोकर नीट विंचरलेली होती. त्यांत केरकचरा जरासादेखील नव्हता. ही मऊ लोकर जाकिटे बनवायला फारच छान होती. त्या व्यापाऱ्याने नेगीला त्या लोकरीची चांगली किंमत दिली.

दुसऱ्याच दिवशी नेगी, बुलबुल आणि भुत्या तो पर्वत ओलांडून पुन्हां आपल्या घरी परत आले. घरी पोंचल्याबरोबर नेगीने आपल्या आईवडिलांना आनंदाने मिठी मारली. नंतर त्याने नीट बांधलेली पैशाची पुरचुंडी उघडली व त्यांतून कांही नोटा व कांही नाणीं बाहेर काढली. इतक्या लवकर पैसे कमवून मुलगा परत घरी आला हे बघून त्या म्हाताऱ्या आईवडिलांना फारच आनंद झाला.

"तुलाच ही कल्पना सुचली कीं दुसऱ्या कुणीतरी तुला सुचवली?" वडिलांनी प्रश्न केला. नेगीने त्यांना खरी हकीकत सांगितली, "बाबा, शमा नांवाच्या एका तरुण मुलीने मला मदत केली. त्या पर्वतापलीकडे ती राहाते." म्हाताऱ्या जोडप्याने एकमेकांकडे सार्थ नजरेने पाहिले.

"ही पोरगी शमा बुद्धिमान दिसते आहे. आपल्या नेगीला ही चांगली जोडीदारीण होईल. आपल्यानंतर ती त्याची नीट काळजी घेईल." नेगीच्या आईने आपले मत सांगितले.

दुसऱ्या दिवशी नेगीचा पिता नेगी गेला त्या वाटेने डोंगरापलीकडे गेला. तो सरळ शमाच्या घरी गेला आणि त्याने नेगीसाठी तिला मागणी घातली. नेगी व शमाचे लग्न लागले आणि ती दोघेजण सुखांत राहूं लागली. आजदेखील ते आपल्या नातवडांना त्यांची भेट कशी झाली त्याची कहाणी सांगतात. त्यांची भेट झाली होती केवळ एका मांजरामुळेंच!

(बी. सुमंगल यांचे पुनर्कथन)







# एकाच घरचा भिकारी

पवन एक अत्यंत चिक्कू मनुष्य होता. सात पिढ्या आरामात बसून खाऊं शकतील इतकी अलोट संपत्ती त्याच्याजवळ होती. पण आरामांत राहिलं तर संपत्ती कमी होईल म्हणून तो आराम कधी करीतच नसे. खर्च जास्त होईल म्हणून तो कमीच जेवत असे.

जरी तो कंजूष होता, तरी बुद्धिमत्ता मात्र चांगली धारदार होती. कोणतेही काम तो नीट विचार करुनच करत असे. प्रथम त्याने ठरवलं होतं कीं लग्न करायचेच नाही, कारण लग्न केले कीं बायकोचे पालनपोषण करायला हवे, आणि त्यांत बरेच पैसे खर्च होतील. घरांतले काम करायला त्याने एक मोलकरीण ठेवली, पण ती कांही नीट काम करीत नव्हती. दर महिन्याला तिला पगार देतेवेळी पवनला अतिशय वाईट वाटे. आता त्याला वाटायला लागलं कीं लग्न केलं तर पत्नीला पगार द्यायला लागणार नाही. जन्मभर घरीं तर राहीलच आणि घरांतले सारे कामकाज करत राहील. शेवटी खूप विचार करुन त्याने लग्न करायचे ठरवले.

पवन जरी महाकंजूष म्हणून प्रसिद्ध होता तरी अनेक उपवर मुलींचे बाप त्याला मुलगी द्यायला तयार होते कारण त्याच्याकडे भरपूर संपत्ती होती. ते जास्त हुंडा द्यायलादेखील तयार होते, त्यावरही पवनने बराच विचार केला. गरीबाघरच्या मुलीशी लग्न करण्यांतच भलाई आहे असे त्याने ठरवले. श्रीमंत बापाच्या मुलीशी लग्न केले तर अनेक कष्टांशी सामना करावा लागला असता. लग्नही थाटांत करावे लागले असते. श्रीमंताघरची मुलगी ऐटींत राहील, नोकरचाकर ठेवील आणि राणीसारखे हुकूम सोडीत बसले. असा विचार करुन त्याने एका गरीब कुटुंबातल्या मुलीशी लग्न केले.

- सुरेश तलवाडी



पननची पत्नी पवित्रा फारच सुंदर होती. आपला पती आपल्याला रेशमी साड्या देईल, गळा भरेल असे दागिने बनवील, आणि घरांत भरपूर नोकर ठेवील, अशी स्वप्नें तिने पाहिली होती. पण लग्न झाल्यानंतर तसं कांही एक झालं नाही.

पवित्राच्या आईवडिलांनी दिलेला एक हार ती गळ्यांत घालत असे. तोदेखील पवनने तिला काढायला लावला. तो म्हणाला, "शरीरावर सारखं घासत राहिलं कीं सोनं झिजतं. लग्नसमारंभाला वगैरे जाताना तू हा हार वापरीत जा."

तिच्यासाठी पवनने ज्या साड्या खरेदी केल्या त्यादेखील स्वस्त आणि भरभरीत होत्या. माहेरीसुद्धां पवित्राने कधी इतक्या हलक्या किंमतीच्या साड्या नेसलेल्या नव्हत्या.

पण एक गोष्ट मात्र खरी होती. तो येताजाता पवित्राचे कौतुक करायचा. "तू कांहीही नेसलंस तरी सुंदर दिसतेस, दागिने न घालताच सहज सुंदर दिसतेस," असं म्हणायचा.

पवित्रा स्वभावाने नम्र व चांगली होती. तिलाही आपल्या पतीने केलेली स्तुती आवडत असे. पण जेवणाच्या बाबतीत मात्र ती कोणतीही काटकसर करायला तयार नव्हती.

जेवणावर जास्त खर्च करण्याचा पवनचा स्वभाव नव्हता. पण नीट जेवलो नाही तर आजारी पडून जास्तच खर्च होईल हे त्याला ठाऊक होतं. वैद्यांचा सल्ला घेऊन त्याने आरोग्यदायी आहाराबद्दल माहिती जमवली. स्वस्त जिनसांची एक यादी तयार केली. आणि तो सगळ्या पालेभाज्यांच्या वापर करुन रोज एक कालवण नव्या पद्धतीने बनवायला लागला. पैशाच्या मागे लागलेल्या पवनला हे जेवण स्वादिष्ट वाटत होते, परंतु पवित्राला मात्र ते पदार्थ खाणें जड जात होते.

अशा स्थितींत आपल्या नवऱ्याचा हा स्वभाव बदलायला जर कुणा देवदेवतेची मदत झाली तर किती चांगले होईल असे तिला सारखे वाटत होते. रात्रीं स्वप्नांत तिला एक देवी दिसू लागली. पण उठल्यानंतर तिला ते स्वप्न कांही नीट आठवत नसे.

एके दिवशी पवन घरी परत आल्यावर जेवण वाढायची घाई करुं लागला. त्यावेळीं पवित्रा पहाटेचे स्वप्न आठवण्याचा प्रयत्न करीत होती. तिने पवनला भोजन वाढले. त्याने तिलाही बरोबर जेवायला बसण्याचा आग्रह केला. तेव्हां तिला चटकन रात्रीचे स्वप्न आठवले.



ती पवनला म्हणाली, "काल रात्री मला स्वप्नांत पार्वतीदेवीने दर्शन दिले. तिने सांगितले की आज जर आपण एखाद्या भिकाऱ्याला अन्नदान केले तर आपले सर्व प्रकारे भलेच होईल, आपले उत्पन्न वाढेल. या अन्नदानामुळें दुप्पट खर्च होऊं नये म्हणून मी उपवास करणार आहे. माझे भोजन एखाद्या भिकाऱ्याला देऊन टाका."

पवनने पत्नीच्या हुशारीचे कौतुक केले आणि जेवण झाल्यानंतर तिच्या वांटणीचे जेवण देता यावे म्हणून तो एखाद्या भिकाऱ्याच्या शोधांत निघाला. थोड्या अंतरावर झाडीच्या मागून त्याला कण्हल्याचा आवाज आला. त्याने तिथे जाऊन बघितलं तर तिथे होता एका घरचा भिकारी!



या एका घरच्या भिकाऱ्याबद्दल गावांत अनेक मजेशीर कथा प्रचलित होत्या. तो दिवसांतून एकवेळ जेवण करीत असे. तेदेखील एका घरासमोर उभे राहून तो भिक्षा मागत असे. कुणी पैसे दिले तर तो कोणत्याही परिस्थितींत ते घेत नसे. म्हणून ज्या घरासमोर जाऊन तो उभा राही व भिक्षा मागे, त्या घरांतले लोक त्याला पोटभर सुग्रास भोजन जेवायला देत असत. अनेक जणांचा विश्वास होता कीं ज्या घरांतले अन्न हा भिकारी खात असे, त्या घरमालकाला हे दान लाभत असे, त्याचे भले होत असे. एकाच घरी तो जात होता म्हणून त्याला नांव पडले एका घरचा भिकारी!

हा भिकारी कोणत्या घरासमोर जाऊन उभा राहील ते सांगता येत नसे. परंतु आजपर्यंत पवनच्या दारांत हा भिकारी एकदाही आलेला नव्हता.

त्या दिवशी त्या भिकाऱ्याच्या खांद्यावरचा पंचा वाऱ्याने उडाला. तो पकडायला तो जोरांत पुढे गेला आणि खड्ड्यांत पडतापडता वांचला. पण त्याचा पाय मुरगळला. त्याला तिथून उठता येईना. त्यावेळीं पवन तिथें आला.

पवनला बघून भिकाऱ्याने दीनवाण्या स्वरांत म्हटले, "साहेब, मी फार भुकेला आहे. तुमच्याजवळ खायला असेल तर मला थोडं कांही द्या. खाल्ल्यानंतर मी काठीच्या आधाराने उभा राहीन आणि हळूहळू चालत जाईन."

पवनदेखील एखाद्या भिकाऱ्याच्या शोधांत होता. त्याला हे बोलणें ऐकून खूप आनंद झाला. आपल्या पत्नीचे स्वप्न खरे ठरणार याचे त्याला



समाधान वाटत होते. त्याने आणलेले जेवण भिकाऱ्याला दिले.

भिकाऱ्याने मोठ्या उत्सुकतेने एक घांस तोंडात घातला, बराच वेळ घांस चावून भिकाऱ्याने पवनला विचारले, "साहेब, भुकेल्याला कांहीही चवढव कळत नाही असं म्हणतात. माझ्या पोटांत कावळे ओरडत होते, तरीदेखील हा घांस कसातरी कडवट लागतोय. हे भोजन कसं बनवलंय, साहेब?"

जेव्हां पवनने त्या जेवणाच्या सामुग्रीचे वर्णन केले, तेव्हां भिकारी म्हणाला, "माणसे नव्या चवीचे, स्वादाचे उत्तमोत्तम पदार्थ शोधून काढत असतात. आपण कोणत्या कारणाने हा पदार्थ शोधून काढला आहेत?"

"हा खाल्ल्यामुळें आरोग्य चांगले राहाते व त्याचा खर्चही अगदी कमी होतो." पवनने सांगितलं. "बाप रे, मी भिकारी आहे तरीसुद्धां मी असलं अन्न कधीच खाल्लं नव्हतं. आपण रोज हे असलं जेवण कसं काय जेवता हो?" भिकाऱ्याने विचारलं.

"काय करणार? माझ्या नशिबांत हेच लिहिलंय ना!" एक दीर्घ श्वास घेत पवन म्हणाला.

वाढलेलं अन्न टाकायचं, फेकायचं नाही हा भिकाऱ्याचा नियम होता. त्याने मोठ्या कष्टाने पवनने आणलेले भोजन कसेबसे संपवले. मग पवनच्या मदतीने तो उठून उभा राहिला आणि लंगडतच सावकाशपणें चालत, तिथून निघून गेला.

दुसऱ्या दिवशी पवित्राने पवनला अगदी चविष्ट स्वयंपाक करून वाढला. घाबरून जाऊन पवनने तिला विचारले, "हा स्वयंपाक करायला लागणारे सामान तू कुठून आणलेस? तुझ्या माहेराकडून तर कुणी हे पाठवलेलं नाही ना?"

"छे छे, तसं कांहीही नाही. एकाच घरी



जाणाऱ्या भिकाऱ्याने हे सामान आणून दिलं. मी नको नको म्हणत होते, तरी तो हे सामान इथें ठेवूनच निघून गेला. मला वाटलं कीं हा सगळा माझ्या स्वप्नाचा महिमा असेल, म्हणून मी त्या सामानांतून स्वयंपाक केला." पवित्राने सांगितलं.

त्या भिकाऱ्याला भोजन देणाऱ्या घरमालकाचे भले होते हे पवनने ऐकलेलं होतं. त्याची सत्यता पडताळून पाहाण्यासाठी त्याने आसपासच्या बोळांतून या भिकाऱ्याबद्दल चौकशी केली. तेव्हां एकजण म्हणाला, "आज तो एका घरचा भिकारी राहिलेला नाही. आज त्याने अनेक घरी भीक मागितली, व पैसे देणाऱ्यांकडून पैसेदेखील घेतले आहेत."

भिकाऱ्यामधे हा असा बदल कां झाला असेल हे जाणायची उत्कंठा पवनच्या मनांत होती. तो भिकाऱ्याला शोधत निघाला. गांवाबाहेरच एका चिंचेच्या झाडाखाली भिकारी बसला होता, तो पवनला दिसला. पवनच्या मनांतली शंका ऐकून भिकाऱ्याने उत्तर दिले, "साहेब, जेव्हां मी उपाशी होतो, तेव्हां तुम्ही भोजन देऊन मला मदत केलीत. म्हणून मी आपला ऋणी आहे. पण, जे भोजन आपण रोज जेवता, ते बघून मला तुमची अगदी दया आली. मी तुमच्यासाठी आज पुष्कळ घरांतून पैशाची भीक मागितली, वाणसामान खरेदी केले आणि आपल्या पत्नीकडे ते दिले. आपण दररोज स्वादिष्ट भोजन करावे अशी माझी मनापासून इच्छा आहे."

भिकाऱ्याचे शब्द ऐकून पवन लाजेने अर्ध मेला झाला. त्याला वाटलं कीं जणूं आपली मानहानीच झालीय. तो विचारांत पडला. एकवार जेवण जेवून एक भिकारी आपल्या दानाची परतफेड करूं पाहातो आहे. त्याने पैशाची भीक मागितली, पण तीदेखील इतरांना देण्यासाठीच! आता राहिली त्याची स्वतःची गोष्ट!

घरांत पैशाचा ढीग लागलाय, पण काय उपयोग? पवनने कधीच आजूबाजूच्या लोकांना मदत केली नव्हती!

त्या दिवसापासून पवनच्या स्वभावांत बदल झाला. आता एकाच घरचा भिकारी पुन्हां एकाच घरी भिक्षा मागायला लागला. आता तो अधूनमधून पवनच्या घरासमोर उभा राहून भिक्षा मागायला लागला.





# नमस्कार नारंग

जमीनदाराच्या कचेरींत नारंगला नोकरी मिळाली. दशरथच्या मदतीमुळेंच हे शक्य झाले. त्याने नारंगला समजावले, "तुझा स्वभाव फार चांगला आहे. पण दुसऱ्यांचा मान कसा राखावा ते तुला माहीत नाही. जेव्हांजेव्हां जमीनदार मालक तुला दिसतील, तेव्हां तू तावडतोब त्यांना नमस्कार करीत जा. कोणत्याही परिस्थितींत हा कानमंत्र विसरुं नकोस."

नारंगने हा सल्ला चांगलाच लक्षांत ठेवला. पहिल्या दिवशी जेव्हां त्याने जमीनदाराला बघितलं, तेव्हां त्याने लवून विनयपूर्वक नमस्कार केला. मालकाला फार आनंद वाटला. जे लोक तिथें उपस्थित होते, त्यांच्याशी बोलत असताना जमीनदाराने पुन्हां नारंगकडे बघितले. नारंगने पुन्हां एकदा त्यांना नमस्कार केला.

त्याच्या या नम्रपणावर जमीनदार खूष झाला व त्याने नारंगला कांहीतरी काम करायला दिले. ते काम संपवून नारंग परत आला. आणखी एकदा नमस्कार करुन नारंगने त्यांनी सांगितलेलं काम पूर्ण केल्याचं सांगितलं.

अशा प्रकारे, जमीनदारसाहेब दिसले कीं अगदी न चुकता नारंग त्यांना नमस्कार करत होता. त्याला त्याची संवय होऊन बसली. जमीनदार कुणाशी तरी बोलत असला आणि मधेंच जर त्यांनी नारंगकडे पाहिलं तर तो लगेच आणखी एकदा नमस्कार करीत होताच.

त्याचा हा विनयी स्वभाव पाहून जमीनदार खूष झाला आणि नारंगला त्याने आपला अंगरक्षक बनवले. तेव्हांपासून नारंग जमीनदाराच्या पाठीमागून चालत येऊं लागला. वाटेंत जर जमीनदाराने कांही सांगण्यासाठी नारंगकडे मागे वळून पाहिले, तर नारंग त्यांना नमस्कार करायचा. विचार करीत असताना येरझाऱ्या घालायची जमीनदाराला संवय होती. नारंग एका बाजूला उभा राहात होता. जेव्हां जमीनदार त्याच्या दिशेला यायला लागे, तेव्हां नारंग आणखी एक नमस्कार करायचा.



एकदा जमीनदाराची मान दुखायला लागली. मान लचकली होती, म्हणून वैद्याने सांगितल्या-प्रमाणे जमीनदार एकदा डावीकडे व एकदा उजवीकडे, अशी मान वळवायला लागला. नारंग त्याच्या डाव्या बाजूला उभा होता, म्हणून जेव्हां जमीनदार आपले डोके डाव्या बाजूला वळवत होता, तेव्हां तेव्हां प्रत्येक वेळेला नारंग त्याला नमस्कार करत होता. नारंगचे हे नमस्कार कचेरींत सर्वांना ठाऊक झाले.

एके दिवशी शहराच्याजवळची शेते पाहायला म्हणून जमीनदार तिकडे चालत निघाला. त्यांच्या पाठोपाठ नारंगदेखील चालायला लागला. थोड्या अंतरावर गेल्यावर एका चोराशी नारंगची टक्कर झाली आणि नारंग खाली पडला. चोर पुढे गेला आणि त्याने जमीनदाराच्या गळ्यांतली सोन्याची सांखळी खेचून काढली. जमीनदाराने घाबरुन मागे पाहिले, तो नारंग तर जमिनीवर पडलेला होता! नारंगने त्यांना पडल्यापडल्याच नमस्कार केला.

नारंग उठण्याच्या अवस्थेंत नाही हे जेव्हां जमीनदाराला कळलं, तेव्हां "चोर, चोर" असं ओरडत जमीनदार चोराचा पाठलाग करायला पळूं लागला. त्याचा आवाज ऐकून नारंग उठून उभा राहिला. तो पळत पुढें गेला आणि चोराला पकडायला त्याने दोन्ही हात पुढें पसरले. पण चोर निसटून पळायला लागला. नारंगला चोराला सहज पकडता आलं असतं, पण त्याने तसें केले नाही, कारण चोराच्या दिशेने पुढे सरसावणारा जमीनदार नारंगला दिसला. झालं, नकळत नारंगने दोन्ही हात जोडून जमीनदाराला



नमस्कार केला. ही संधी साधून चोर पळाला व दिसेनासा झाला.

जमीनदार फार नाराज झाला. हाती आलेल्या चोराला नारंगने सोडून दिले म्हणून जमीनदाराने त्याला सटकावले. नारंगने हात जोडून उत्तर दिले, "सरकार, आपल्याला नमस्कार केल्याशिवाय मला राहावत नाही. म्हणून चोर माझ्या हातून निसटला. मी नमस्कार केला हे चूक होतं कां ते आपणच सांगावं. मी ही संवय सोडण्याचा प्रयत्न करीन."

"तुझ्या नमस्कारामुळें माझी सोन्याची सांखळी गेली." जमीनदार संतापून ओरडला. नारंगने त्यावर म्हटले, "मी चोराचा चेहरा पाहिला आहे. तो आपल्या शहरांतलाच आहे. त्याचं नांव मला ठाऊक नाही.. पण पुन्हां पाहिला तर मी त्याला नक्कीच ओळखेन. म्हणून आपण दवंडी



पिटवावी की नारंगने चोराला ओळखलंय. चोराने मुकाट्याने सांखळी परत करावी, म्हणजे ही गोष्ट इथेंच मिटेल. नाहीतर तक्रार केली जाईल व चोराला कडक शिक्षा दिली जाईल.''

नारंगने सांगितल्याप्रमाणें दवंडी पिटली गेली. दुसऱ्याच दिवशी ती सांखळी जमीनदाराच्या पलंगावर ठेवलेली सांपडली.

नारंगच्या सूचनेबद्दल त्याचे कौतुक करताना जमीनदार म्हणाला, ''माझी सांखळी मिळाली याचा अर्थ आपल्या कचेरींतल्या कुणाचीतरी चोराशी ओळख असली पाहिजे. त्याचा तपास कसाही कर, नि मला येऊन सांग.

नारंग क्षणभर सटपटला नि म्हणाला, ''मालक, मी खरं सांगतो, मी चोराचा चेहरा पाहिलेला नाही. माझ्यामुळें आपली सांखळी चोरीला गेली म्हणून मला वाटलं कीं आता यापुढे आपण मला नमस्कार करु देणार नाही. मी विचार केला आणि हा उपाय अंमलात आणायचे ठरवले. मी चोराला ओळखू शकणार नाही हे मला पक्कं ठाऊक आहे. पण हे कांही त्या चोराला माहीत नाही, म्हणून त्याने घाबरुन जाऊन सांखळी परत दिली.''

''तुझे हात नमस्कारासाठीच केवळ असले तरी तुझी बुद्धी मात्र अगदी अजब आहे. अरे, जर तू चोराला नीट बघितले नव्हतेस तर ही गोष्ट माझ्यापासून कां लपवलीस?'' जमीनदाराने विचारले.

''सरकार, आपण माझ्यावर खूप चिडला होतात. मी जर म्हटले असते कीं मी चोराला बघितले नाही, तर आपण आणखी जास्त संतापला असतात. शिवाय माझ्या सांगण्याप्रमाणे आपण दवंडीदेखील पिटवलीत कीं मी चोराचा चेहरा बघितलेला आहे म्हणून! जर मी असं सांगितलं नसतं तर आपण माझ्यावर विश्वास ठेवला नसता.'' नारंगने प्रामाणिकपणें सांगितले.

त्याच्या चतुराईची तारीफ करीत जमीनदार म्हणाला, ''पण आता मी तुझ्यावर खूष झालो आहे. तू पाकशाळेंत जा आणि आचाऱ्याला मी दोन पक्वान्ने करायला सांगितली होती ती तयार आहेत कां बघ.''

नारंगने आचाऱ्याला निरोप सांगितला तेव्हां आचाऱ्याने 'हो' म्हटले. ''गुलाबजाम आणि जिलब्या तर मी आज बनवल्या आहेत. जरा चव बघ.'' असं म्हणून त्याने एक मोठी जिलबी नारंगला दिली.



नारंगने ती खाल्ली. इतकी स्वादिष्ट जिलबी आजपर्यंत त्याने कधी खाल्ली नव्हती. त्याला आणखी एक खावीशी वाटली. पण संकोचाने तो गप्प बसला. जमीनदाराकडे परत गेल्यानंतर कांही वेळाने जमीनदाराने त्याला पुन्हां पाकशाळेंत दुसरा निरोप देऊन धाडले. आचाऱ्याने पुन्हां एक जिलबी त्याला दिली.

त्या दिवशी जमीनदाराला काय झालं होतं कोण जाणे, तो सारखा नारंगला पाकशाळेंत निरोप घेऊन पाठवत राहिला. जेव्हां नारंग तिथें गेला, तेव्हां आचारी त्याला जिलब्या खायला देत होता. दहाबारा जिलब्या खाऊन झाल्यानंतर नारंगला जिलबी नकोशी झाली. आणखी जिलब्या खायला त्याने नकार दिला.

''नाही म्हणूं नकोस. जिलबी खाल्लीच पाहिजे. हा जमीनदाराचा हुकूम आहे.'' आचाऱ्याने दटावले.

''अरे, मी सारख्या जिलब्या खातोच आहे कीं! दुसरं कांहीतरी मला खायला दे ना त्याऐवजी!'' नारंग आचाऱ्याला म्हणाला.

''जमीनदाराने हुकूम दिलाय कीं मी तुला जिलबीच खायला द्यायची! तुला दुसरी मिठाई हवी असेल तर मालकांना विचारुन ये. मग मी देतो.'' आचारी म्हणाला.

नारंगने ही गोष्ट जमीनदाराच्या कानावर घातली.

जमीनदार म्हणाला, ''तुला जिलबी आवडते ना?'' ''हो आवडते तर. पण एका दिवशी जर मी फक्त जिलब्या खात सुटलो तर त्याचा वीट येणार नाही कां मालक?'' नारंगने म्हटले.

त्याचे बोलणे ऐकून जमीनदाराने हंसतच म्हटले, ''ऐक, मला खूष करायला तू सारखा मला नमस्कारावर नमस्कार ठोकत राहातोस. ते मला आवडतं. तुला जिलबी आवडते म्हणून तुझ्या पोटाला हव्या तितक्या जिलब्या खायला घालायची व्यवस्था मी केली. माणूस काय किंवा मन काय, कोणतीही गोष्ट प्रमाणाबाहेर केली कीं त्याचा वीट येतो, राग येतो. समजलं कां तुला?''

त्यांतला अर्थ नारंगला समजला. त्या दिवसापासून नारंग एकदाच नमस्कार करायला लागला, कंटाळेपर्यंत नव्हे! त्याचे इतर सहकारी मात्र न कंटाळता त्याला नमस्कार नारंगच म्हणत राहिले.



# भारताची ओळख - प्रश्नावली

१. हे चित्र भारतांतल्या एका राज्याचे आहे. छापताना उत्तर-दक्षिण बघितलेली नाही. हे राज्य कोणते आहे व त्याची राजधानी कोणती आहे?



२. भारतांतले सध्यां सर्वात मोठे राज्य कोणते आहे?
   अ. उत्तर प्रदेश
   ब. मध्य प्रदेश
   क. राजस्थान
   ड. आंध्र प्रदेश

३. हिंदुस्थानची राजधानी कलकत्त्याहून दिल्लीला हलवण्यांत आली, त्यावेळीं व्हाईसरॉय कोण होते?
   अ. लॉर्ड कर्झन
   ब. लॉर्ड हार्डिंज
   क. लॉर्ड वॅव्हेल
   ड. लॉर्ड डलहौसी

४. चिपको चळवळ कुणी सुरुं केली?
   अ. मनेका गांधी, ब. अरुंधती रॉय
   क. मेधा पाटकर, ड. सुंदरलाल बहुगुणा

५. हैदराबाद ही आंध्र प्रदेशाची राजधानी होण्या पूर्वी तिथली राजधानी कोणती होती?
   अ. नेल्लोर
   ब. कर्नूल
   क. विजयवाडा
   ड. विशाखापट्टणम्

६. जालियनवाला हत्त्याकांडामुळें रविंद्रनाथ टागोरांनी 'सर' ही ब्रिटिश सरकारने दिलेली पदवी परत केली. हे हत्याकांड केव्हां घडले?
   अ. १९१९
   ब. १९२२
   क. १९२४
   ड. १९२७

*(उत्तरें पुढील महिन्यांत)*

## सप्टेंबरच्या प्रश्नांची उत्तरें

१. सी- १, आ - २, ब - ३
२. वकील
३. व्यंगचित्रकार शंकर
४. यू.ॲस.ॲस.आर्
५. ४९ वर्षे
६. माहिती व प्रसारण मंत्री
७. बँकांचे राष्ट्रीयीकरण
८. १९८०





# गणेश पुराण

अव्वा एके दिवशी फलवृक्षांनी भरलेल्या मार्गाने जात असतां एक सुंदर मुलगा झाडावर बसून छान गात होता. झाडावर फळांचे घोसच्या घोस होते आणि फळेही पिकलेली होती.

त्या मुलाशी हाक मारुन बोलावेसे अव्वाला वाटले. ती म्हणाली, - "बाबा रे! एक फळ माझ्याकडे नाही टाकणार कां? तोंडाला पाणी सुटले आहे, बघ!"

मुलगा हसत म्हणाला - "अव्वा! तुला कोणते फळ हवे आहे? झाडावर खूप फळे लागली आहेत! तुझे म्हातारपण नाहीसे करणारे फळ देऊं का? तुझ्या मृत्यूला दूर पळविणारे फळ हवे आहे का? तुला धनाच्या राशी मिळतील असे फळ हवे आहे का? कसले फळ हवे आहे?" तो मुलगा सुब्रह्मण्येश्वर कार्तिक स्वामी असावा असे अव्वाला वाटले. तिने हात उचलून नमस्कार केला व गुडघे टेकून म्हणाली - "सुब्रह्मण्य स्वामी! किती वाटले तरी कमी न होणारे अपार ज्ञानधनराशी देणारे फळ मला दे, बाबा! ज्ञानफळाचा अनुग्रह कर!"

सुब्रह्मण्य कार्तिकेय प्रभू आपल्या स्वस्वरूपात दंड धारण करून मोरावर बसून प्रगट झाला. अव्वाच्या डोक्याला आपल्या दंडाच्या टोकाने हळूच स्पर्श करुन त्याने तिच्या वर अनुग्रह केला. तेव्हां अव्वाला एकदम विराट रूप धारण केलेले ओंकार तत्व, ब्रह्मज्ञान, जीवनमुक्ति मार्ग गवसला आणि अपार ज्ञानप्राप्ती झाली. सुब्रह्मण्यप्रभूने अव्वाला आशीर्वाद दिला आणि अंतर्धान पावला.

अव्वा पायीच एका गांवाहून दुसऱ्या गांवी चालत घरोघरी ज्ञान, भक्ति, उत्तम जीवनधर्म



जनसामान्याला कळेल, अशा सोप्या भाषेत सांगत, व प्रचार करीत देशभ्रमण करू लागली.

अव्वाच्या तोंडी निघालेली मधुर वचने गीतांत बदलून सामान्य जनता जनार्दनपर्यंत काव्यरूपांत पसरू लागली. आणि चिरस्थायी झाली.

अव्वा अशीच भ्रमण करीत एके दिवशी काळोख पडायच्या सुमारास अरण्यमार्गावर आली. आकाशात काळे ढग दिसू लागले आणि सर्वत्र काळोखी आली. मधूनमधून विजा चमकू लागल्या. अव्वाच्या पायाला ठेच लागली व ती खाली पडली. तिच्या हातांतली काठी दूर जाऊन पडली.

त्या काळोखांत कोणीतरी येत असल्याची चाहूल आली. अव्वाने मान वर करून पाहिले. त्याच वेळीं वीज चमकली. त्या विजेच्या उजेडात एक गोड मुलगा पावले टाकीत पुढे येत असलेला दिसला. त्याचे पोट गोल व थोडे मोठेच होते. त्या मुलाने अव्वाला हात देऊन उभे केले आणि तिची काठी आणून तिच्या हातात दिली. अव्वाने धरलेली काठी हालूंडुलूं न देतां घट्ट धरून तो मुलगा तिला म्हणाला - ''अव्वा! कोठे निघालीस? कोणत्या तरी तीर्थयात्रांत दर्शनाला चालली आहेस कां?''

अव्वा म्हणाली - ''बाबा रे, ही सर्व पृथ्वीच मला एक दिव्य क्षेत्र आहे. तीर्थ दर्शन करण्याची माझी तेवढी इच्छा नाही. तरी एक क्षेत्र दर्शन व्हावे असे वाटते, तेथे पोचायचे त्याची वाट दिसत नाही. परंतु तू कोण हे नाही सांगितलंस? तू एवढासा मुलगा दिसतोस. या काळोखात कसा काय आलास?''

''अव्वा, मी तुझा लहानपणापासूनचा मित्र नाही का? मला जन्मल्यापासून ओळखतेस. पण तू कोणत्या क्षेत्रदर्शनास निघालीस हे नाही सांगितलेस!'' तो म्हणाला.

''सांगून काय उपयोग? तू घेऊन जाशील कां? ते शंकराचं निवासस्थान असे महाक्षेत्र आहे!'' अव्वा म्हणाली.

''एवढेच ना! ते काही मोठे काम नाही! मी तुझा हात पकडून घेऊन जातो चल!'' असे म्हणत त्या मुलाने अव्वाचा हात पकडला आणि पुढे पाऊल टाकले. दुसऱ्या हातांत काठी धरून अव्वा पुढे निघाली तेव्हां एक मोठी वीज चमकली. त्या उजेडात आपला हात आपल्या सोंडेत धरून चालविणाऱ्या गणपतीला पाहून अव्वा डोळे मिटून ती मनात म्हणाली - ''देवा! तू मला लहानपणा-



पासूनच चालवीत आहेस. मी डोळे उघडून चालले काय, किंवा मिटून चालले काय एकच!'' ती डोळे उघडल्याशिवाय अव्वा गणपती चढवीत नेत होता, त्या पायऱ्या ती चढून चालली होती. किती पायऱ्या चढून गेली, किती काळ लोटला ते तिला कळले नाही.

अशी जात जात असतां अव्वाला गणपती म्हणाल्याचे ऐकू आले - ''अव्वा, आपण शिवसन्निधीजवळ आलो आहो!'' तिने डोळे उघडले.

तेथे प्रकाशाशिवाय दुसरे काही दिसले नाही. खाली पाहिले तर अनेक नक्षत्र मंडळें पायऱ्यांसारखी व जिन्यांसारखी दिसली. कित्येक सूर्यमंडळे व अनेक शेंडे नक्षत्रें वायुरूपे फिरत असलेली आणि नित्य वाढत असलेल्या ज्योती, नित्य फिरत असलेली प्रकाशवलये, तिला आपल्या पायाखाली डोळ्यांना चकित करून सोडणारी दिसली.

गणपतीने अव्वाचा हात सोडून म्हटले - ''अव्वा! तू शिवसन्निध्यात पोंचली आहेस. येथे काळवेळ नांवाची वस्तू नाही. नाश, नश्वर असे कांही नाही. सृष्टी, स्थिती आणि लयविरहित अशी शिव सन्निधी आहे. म्हणजे खरेखरे कैलास! विश्वेश्वर अशा शिवाचे दर्शन कर!'' असे सांगून गणपती अंतर्धान पावला.

अव्वाला खालीवर सर्वत्र व्यापून टाकून टाकणारी लिंगाकार ज्योती दिसली. त्या ज्योतीत शिवाचे गण शिवस्तुती करीत असलेले ओंकार ध्वनिरूपे ऐकू येत होते. विश्वेश्वर शिवाचे दर्शन



घडले. त्याच्या दोन्ही बाजूला गणपती, पार्वती व कुमारस्वामी, नंदी, भृंगी, वगैरे होते.

अव्वाला शंकराचा साक्षात्कार घडला. शंकराने आपला अभयहस्त अव्वाच्या मस्तकावर ठेवून तिच्यावर अनुग्रह केला. अव्वाला शिवसायुज्य मुक्ती लागली. सभामंडपातल्या एका चित्रांत गणपतीच्या हातांत उसाचे एक कांडे होते आणि एक शेतकरी त्याच्याकडे पहात होता. ते चित्र पाहून मिश्र कथा सांगू लागला.

एकाद्या राजासारखे मोठे जमीनदार दरवर्षी विनायकाची पूजा, उत्सव वगैरे मोठ्या थाटामाटाने करीत. म्हणून त्याला भक्त शिरोमणी म्हणून म्हणत. त्याच्याकडे पिके निघत. उसाचा मळाही होता.

त्या मळ्यांत काम करणारा एक गडी होता. तो गणपतीचा भक्त होता. दर वर्षी शेतांत काम सुरु करते वेळी प्रार्थना करीत असे - ''देवा,



यावर्षी चांगले पीक येऊ दे!'' त्याप्रमाणे उसाचे पीक फारच छान येत होते व ते वाढतच होते.

तो गडी, त्याची बायको व त्याचा दहा वर्षाचा मुलगा, खूप काबाडकष्ट करून शेतांत काम करीत. परंतु जमीनदार त्यांना फार कमी मजुरी देत असे. तीसुद्धा नियमित देईच असेही नाही. तो गडी भोळाभावडा होता, अल्पसंतोषीही होता.

जमीनदाराची बायको चांगली होती. बरेवाईट सर्व गणेशाला निवेदन करीत असे. नवरा गड्याला पगार, मजुरी देण्यात कुचराई करी, तेव्हां ती म्हणे - ''ते किती काबाडकष्ट करतात आणि तुम्ही त्यांना काय देता? बरोबर देत जा!''

''तुला सल्ला द्यायला काय जातं? अशी काटकसर करतो म्हणून तर आपल्याला गणपती उत्सव करायला कांही उरतं!'' तो तिला म्हणे.

ती मनांत म्हणे - ''काबाडकष्ट करणाऱ्यांच्या तोंडात माती कोंबून गणपतीची पूजा आणि उत्सव करण्यापेक्षां, ते नाही केले तर काय बिघडणार आहे? देवा, आमच्या ह्यांना, चांगली बुद्धी दे!''

त्या वर्षी ऊंस हत्तीच्या सोंडेसारखा जाडजूड आणि लांबसडक आला. हजारो ऊंस बांधलेले भारेच्या भारे जमीनदाराच्या आवारांत येऊन पडत होते.

''ही सर्व गणेशाची कृपा! पूजाअर्चा आणि उत्सव फुकट जातात का? आपण हे सर्व कशाला करतो मग?'' जमीनदार म्हणाला.

''एवढेच का? म्हणजे आपल्या गड्यांनी जी एवढी मेहनत केली ती कांहीच कामाची नव्हती, असे म्हणावयाचे आहे कां तुम्हाला?'' बायकोने विचारले.

''बरंच झालं की, तुझी ही फुकटची कीव आणि उदारपणा! आपण जर नोकरांचाकरांना असे मानूं लागलो तर पुढे आपल्याला त्यांच्या पाठोपाठ हिंडावे लागेल. माणसाच्या हातून काय घडणार? ही सर्व त्या विनायकाची कृपा आहे!'' जमीनदार म्हणाला. जमीनदारणीने मनांतल्या मनांत गणेशाची प्रार्थना केली - ''हे विघ्नेश्वरा! यांच्या मनांत ज्ञानोदय तुझ्याच करुणेने झाला तर होणार!''

गड्याच्या मुलाची गणपतीवरच अपार भक्ती होती. गणेशचतुर्थी आली की तो हिंडून फिरून पांढरी, तांबडी, कमळे हुडकून आणी, फुले, पत्री जमा करी, आणि पूजेसाठी आणून देई.

त्या वर्षीची गणेशचतुर्थी आली. नेहमीप्रमाणे उत्साह या वर्षीही वाढला. जमीनदाराच्या आवारांत



उसाचे भारे टाकीत असलेल्या वडिलांकडे जाऊन तो म्हणाला - ''बाबा, आपणसुद्धां एक ऊस गणपतीला वाहू या. ऊस घेऊन जाऊ या कां?'' गड्याने एक ऊस काढून मुलाच्या हातात दिला. तो घेऊन तो घरी निघाला. तेव्हां त्याला जमीनदाराने पाहिले.

जमीनदाराने एकदम नरसिंहावतार धारण केला व ओरडला - ''काय रे, माझा ऊंस घरी पळवून नेतो आहेस का?'' असे म्हणत तोंडाला आले ते गड्याला बोलला आणि त्याला मारूं लागला. जमीनदाराच्या घरची माणसं व गांवकरी ते पाहून गप्प राहिली, कोणी हूं कीं चूं केलं नाही. जमीनदाराची असा धाक होता गांवात. त्याने काय वाटेल ते केले तरी चाले, कोणी विचारणारा नव्हता.

गडी असह्य वेदनेने म्हणाला - ''मालक, गणेश चतुर्थी नाही कां, एक ऊस घेऊन जावं म्हटलं - एकच एक ऊस!''

जमीनदार म्हणाला - तो ऊस टाक इकडे!''

''एका उसासाठी तुम्ही इतके रागवतां काय मालक? मी गाड्या भरभरून ऊस आणून टाकला आहे येथे!'' एका उसाने काय कमी होणार आहे?'' गडी म्हणाला. ''किती उर्मटपणाने बोलतो आहेस रे! एकच काय, दहा, शंभर किंवा हजार मला सारखेच! तू उद्यां सकाळी उजाडायच्या आत एक हजार ऊस खाल्ले पाहिजेस. सगळा चोथा मला



दिसला पाहिजे, नाहीत एकेका उसाबद्दल तुला कोरडे बसतील!'' असे म्हणत त्याने गड्याला एका खांबाला बांधून ठेवले आणि नोकरांकरवी त्याच्यासमोर एक हजार ऊस टाकून ठेवले.

जमीनदार तसाच हट्टी होता. त्याच्या मनांत येईल तेच खरं! त्याने गड्याला एका खांबाला बांधून ठेवले. त्याच्यावर पहाऱ्याला शिपाई उभे केले. जमीनदाराच्या बायकोने गणेशाचे स्मरण करून मनांतल्या मनात त्याला आळवीत म्हटले- ''देवा, गडी अगदी भोळा भाबडा आहे. ऊस खायचे त्याने ठरविले तर निष्कारण मरेल. खाऊं शकला नाहीतर माझे यजमान त्याची चामडी लोळवितील. त्याचं कसं ते रक्षण तूच कर!''

गड्याला काय करावे सुचेना. करायला कांहीच नव्हते. देवाचे स्मरण करुन डोळे मिटून तो पडून राहिला आणि त्याला झोप लागली.

उजाडताच जमीनदाराने जाऊन पाहिले तर त्याच्या आवारात हिमालयासारखी चोध्याची पांढरी रास पडलेली होती. मानेवर भूत बसल्यासारखा तो मोठ्याने ओरडत जागच्या जागी 'आ' वासून उभा राहिला.

त्याच्या ओरडण्याचा आवाज ऐकून त्याची बायको धावत आली. तिला तो म्हणाला - ''सर्वस्वाचा नाश झाला. आपल्या आवारात एकही ऊस उरला नाही, सर्व चोथा होऊन पडला आहे! गडी म्हणजे भूत आहे भूत! आपणा सर्वांना खाऊन टाकील. चल, पळून जाऊ या!'' तो ओरडून सांगत होता. ते ऐकून स्मित करून ती म्हणाली - ''तो भूत नाही व त्याने ऊस खालाही नाही. मी स्वतःच्या डोळ्यांनी पहात होते. तेवढे उजाडलं नव्हते आणि हत्तीचा चित्कार ऐकून माझी झोप मोडली. मी खिडकीतून पाहिलं तर, एक मोठा हत्ती ऊस खातखात नाहीसा झाला.''

''हत्ती काय म्हणतेस? या पंचक्रोशीत हत्ती असल्याचं मी या जन्मांत कधी ऐकलं नाही.'' असं जमीनदार सांगत असतां काहीजण उत्सवमंडपातून धावत आले आणि सांगू लागले, ''रात्री आम्ही पूजा केली ती गणपतीची मूर्तीच अदृश्य झाली आहे. चहूंकडे शोधून पाहिले.' असे म्हणत असतां त्याचं लक्ष ठेवलेल्या पडवीकडे गेले आणि सर्व ओरडू लागले - ''ती पहा! ती पहा!'' आणि त्या बाजूला धावले.







# भार्गवची तपस्या

फार पूर्वीची गोष्ट आहे. द्रविड देशांत एक पंडित राहात होता. त्याला चार मुलगे होते. तीन मुलांनी त्याचे शिष्यत्व स्वीकारले होते आणि थोडेफार पांडित्यदेखील मिळवले होते. परंतु चौथा मुलगा मात्र लिहावाचायला शिकलाच नाही. वडिलांनी जमेल तितका खूप प्रयत्न केला, पण तो निरक्षरच राहिला.

आपल्या मुलाचे अभ्यासांत लक्ष नाही ही पाहून त्याच्या वडिलांना खूप काळजी वाटत होती. भार्गवच्या डोळ्यांसमोर त्याच्या भावांच्या बुद्धिमत्तेचं कौतुक होत होतं आणि त्याचा अनादर होत होता. आपण निरक्षर आहोत म्हणून अनादर होतोय हेही त्याला ठाऊक होतं. त्याच्याबर तो कधीकधी खूप गंभीरपणे विचार करीत बसे. त्याला शिकायची इच्छा होती. पण कां कोण जाणे, तो शिकूं शकत नव्हता. शिकायला सुरवात करण्यापूर्वी कांहीतरी क्षुल्लक बाबीवर तो विचार करुं लागायचा आणि त्यांत रमून जायचा.

भार्गवच्या वडिलांना वाटलं कीं आपल्या शिकवायच्या पद्धतीत कांहीतरी कमी आहे म्हणून त्यांनी भार्गवला गुरुकुलांत दाखल केलं. तिथें भार्गवने पशुपालन आणि झाडाझुडपांचे संरक्षण करण्याचे शिक्षण घेतले पण इतर अभ्यासाच्या विषयांत त्याला रुची नव्हती.

त्या दरम्यान एक घटना घडली. भार्गवच्या दुसऱ्या भावाच्या लग्नाबद्दल बोलणी करायला मुलीकडले कांही लोक ह्यांच्या घरी आले होते. भार्गवला बघून त्यांनी त्याची चौकशी केली.

भार्गवच्या वडिलांनी त्यांना कांही उत्तर

कुलभूषण पांडे



देण्यापूर्वींच भार्गवची मोठी वहिनी खवचटपणें म्हणाली, ''हे आमचे धाकटे दीर. वाल्मिकीच्या बरोबरीचे आहेत.''

भार्गवला कळलं कीं वहिनी त्याची तुलना तपस्येपूर्वीच्या वाल्मिकीबरोबर करते आहे. लाजेने तो काळवंडला. तो तडक तिथून निघून गांवाबाहेर आला.

त्याच्या मनांत विचार येत होते, ''वाल्या कोळ्याने तपश्चर्या केली आणि त्याचे फळ म्हणजे तो महाज्ञानी वाल्मिकी झाला. मीही तपस्या केली तर मीही तसाच महान बनूं शकेन कां?'' हा विचार मनांत येताच त्याने परत घरी न जाण्याचा निश्चय केला व तो अरण्याच्या दिशेने चालूं लागला.

सूर्योदयानंतर एक प्रहर चालत गेल्यावर त्याला एक आश्रम दिसला. आश्रमासमोरच एक ऋषी ध्यानधारणा करीत होते. एका मोठ्या वडाखाली भार्गव बसला आणि त्यानेही ध्यान करण्याचा प्रयत्न केला. संध्याकाळपर्यंत त्याने ध्यान केले, परंतु त्याचे मन एकाग्र होऊं शकले नाही.

सूर्यास्त होण्यापूर्वी ऋषीचे ध्यान समाप्त झाले. त्याने डोळे उघडले आणि चारी बाजूंना बघितले.

तेव्हां भार्गव त्यांच्याजवळ आला व त्याने साष्टांग नमस्कार करुन त्यांना आपली सारी व्यथा त्याने सांगितली, ''ऋषिवर्य, माझ्या घरांतले लोकसुद्धां आता माझी टर उडवायला लागले आहेत. मला आता जीवनाबद्दल वैराग्य निर्माण झाले आहे. मला वाटलं कीं जरी मी अशिक्षित असलो तरी देवाची भक्ती करायचा मलाही हक्क आहेच. मी तुमच्याकडे सेवा करायला आलो आहे. माझे आयुष्य तपश्चर्येत घालवावे अशी माझी इच्छा आहे. माझ्यावर कृपा करावी. तपस्या करण्याची शक्ती मला द्यावी. मी एकाग्रचित्त होऊन तपश्चर्या करुं शकेन असे वरदान मला द्यावे.''

भार्गवचे बोलणे शांतपणें ऐकल्यानंतर ऋषीने सांगितले, ''पुत्रा, परमेश्वराने केलेल्या नियमानुसार मानव प्रथम गृहस्थाश्रमांत प्रवेश करतो आणि नंतर वानप्रस्थाश्रमांत जातो. अशा लहानसहान कारणांवरुन विरक्त होणे आणि परमेश्वराने सांगितलेल्या जीवनधर्मात बदल करणे हे निसर्ग-नियमांच्या विरुद्ध आहे.''

भार्गवने ऋषीचा उपदेश ऐकून म्हटले, ''असं आपण म्हणूं नका, महाराज. परमेश्वराच्या चिंतनात तल्लीन होऊन शांतपणें आयुष्य घालवावे हे माझे



ध्येय आहे. जीवन असे जगणे हे मला सहज शक्य आहे.''

त्यावर ऋषींनी म्हटलं, ''भार्गव, मी आत्ता नदीवर स्नानासाठी जातो आहे. उद्यां याच वेळेला येऊन मला भेट.''

दुसऱ्या दिवशी भार्गवला बघितल्याबरोबर ऋषींनी हंसतहंसत म्हटलं, ''पुत्रा, तपस्येपूर्वी तुला जरी गृहस्थाश्रमांत प्रवेश करायचा नसेल तरी निदान तुला शारिरिक कष्ट तरी अवश्य केले पाहिजेत. त्याला तुझी तयारी आहे कां?''

त्याला भार्गवने आपली संमती दिली. तेव्हां ऋषींनी सांगितलं, ''माझ्याबरोबर चल.'' आणि ते त्याला घेऊन एका गांवांत गेले.

गांवात एक मध्यमवयीन गृहस्थ घराच्या ओसरीवर बसला होता. ऋषींना पाहून त्याने नम्रतेने प्रणाम केला आणि तो पुढें आला.

ऋषींनी त्याला म्हटले, ''लोकनाथ, तुझ्याकडून एक मदत मला मिळेल म्हणून मी आलो आहे. या मुलाचे नांव भार्गव आहे. तुझ्या जमिनींतली एकरभर जमीन वर्षभर कसण्यासाठी या मुलाकडे तू सुपूर्द कर. त्याच्याकडून शेती करुन घ्यायची जबाबदारी तुझी! शेतींतून जे उगवेल, ते विकायची जबाबदारीदेखील तुझीच राहील.''

लोकनाथने ऋषींचा प्रस्ताव आनंदाने मान्य केला. परत जाण्यापूर्वी ऋषींनी भार्गवला विचारले, ''तूं ऐकलंस ना? एक वर्षभर लोकनाथकडे कष्ट करुन काम शीक. वर्ष पूर्ण झालं कीं नंतर माझ्याकडे ये.''

भार्गवने वर्षभर फार कष्ट केले. त्या एकरभर



जमिनींत त्याने निरनिराळ्या भाज्या व फळें यांची रोपें लावली. लोकनाथखेरीज गावांतले इतर लोकही त्याची प्रशंसा करायला लागले.

पाहातापाहाता वर्ष केव्हांचं संपलं. त्याने एका टोपलींत तऱ्हेतऱ्हेची फळें घेतली आणि ती घेऊन तो ऋषींकडे गेला व त्याने त्यांना साष्टांग नमस्कार केला.

ऋषींनी प्रेमळपणे हंसून विचारले, ''काय भार्गव, संसाराबद्दल तुझ्या मनांत जी विरक्ती निर्माण झाली होती, ती काय अजून तशीच आहे कीं त्यांत कांही बदल झाला आहे?''

''फार मोठा बदल झाला आहे, महाराज.'' क्षणभर थांबून भार्गवने उत्तर दिले. ''त्या गांवातल्या राममंदिराचे पुजारी आपल्या मुलीचे लग्न माझ्याशी व्हावे असे म्हणत आहेत.''

''असं आहे होय? याचा अर्थ असा होतो

कीं तू संन्यासी होण्याऐवजी गृहस्थ होणार आहेस आता!'' ऋषीने म्हटलं. भार्गवने खाली मान घालून संकोपाने अडखळत म्हटलं, ''महाराज, आपला आशिर्वाद असला तर मला गृहस्थाश्रम स्वीकारायचा आहे.''

ऋषींनी 'तथास्तु' म्हणून त्याला आशिर्वाद दिला व म्हटले, ''तुझ्यांत जो बदल झालेला आहे तो बघून मला फार आनंद होतो आहे. पुत्रा, तुझ्यांत असा बदल व्हायला हवा म्हणून तर मी तुला लोकनाथच्याकडे सोंपवला होता. माझा तर्क खरा ठरला. माणसाला नेहमी सुखासमाधानांत राहायला हवं असतं. त्याच्यासाठी जास्त शिक्षण घेतलेच पाहिजे असे नाही. व्यवहारज्ञान हवे व थोडीफार समज! प्रत्येकाची विचारसरणी व आवड निरनिराळी असते. परिश्रम ही देखील एक तपस्या आहे. तू मला सांगितलं होतंस कीं गुरुकुलांत राहात असताना तुला बागकाम व गोरक्षणाची फार आवड होती. आठवतं कां?''

''होय, महाराज.'' भार्गव उत्साहाने उत्तर दिले.

''ते ऐकतानाच मी निश्चय केला होता कीं तुला मी शेतकी कामाकडे लावीन. खरं सांगायचं तर आईवडिलांनी आपल्या मुलांना त्यांच्या आवडीचे शिक्षण देणे आणि त्यांना उत्तेजन देणे हे पालकांचे कर्तव्य ठरते. पण दुर्दैवाने याबाबतीत तुला आपल्या मातापित्याचे मार्गदर्शन याबाबतीत मिळाले, नाही. त्यामुळें तुझ्यासारखी मुलें निराश होऊन वैराग्याच्या दिशेकडे वळतात. आता मला सांग, मी तुला तपस्येचा योग्य मार्ग दाखवला आहे ना?'' ऋषींनी म्हटलं.

त्यांचे हे प्रेमळ बोल ऐकून भार्गवच्या डोळ्यांत पाणी आले. दोन्ही हात जोडून त्यांना वंदन करीत तो म्हणाला, ''माझ्या मनांत कोणताही किंतु राहिला नाही, महाराज. मी आपला उपदेश नेहमी लक्षांत ठेवीन आणि याच प्रकारची तपश्चर्या करीत असताना जर माझ्या-सारखा कुणीतरी गोंधळलेला माणूस आढळला तर त्यालाही मी समजावून सांगीन. त्याला योग्य मार्गावर आणण्याचा प्रयत्न करीन. येतो मी, महाराज, आता मला आपण अनुमती द्यावी.''

आणि त्यांची अनुमती घेऊन भार्गव तिथून निघून परत गेला.







# गोष्टीवेल्हाळ

शारदापुर गांवात शिव नांवाचा एक वृद्ध राहात होता. गोष्टी रंगवून सांगण्यात तो फारच हुशार होता. त्याची कोणतीही गोष्ट ऐकताना लोक मंत्रमुग्ध होऊन ऐकत राहात. गोष्ट संपेपर्यंत तिथून हलत नसत, आणि गोष्ट संपली कीं नाईलाजाने उठत. गोष्ट इतक्या लवकर कां संपली याचे त्यांना वाईट वाटे.

मुलें जेवताना हट्ट करुं लागली किंवा त्रास देऊं लागली, तर आया मुलांना घेऊन शिवजवळ येत. शिव मुलांशी गोड बोलत त्यांना एखादी गोष्ट सांगायचा, आणि मुलें गोष्टींत गुंगली कीं एकीकडे त्यांच्या आया त्यांना भरवायच्या. मुलांना गोष्टी सांगताना शिवला फारच समाधान होत असे.

प्रतापनारायण हा रामापुरचा मोठा जमीनदार होता. आसपासच्या गांवातून त्याच्याइतकी जमीन कुणाकडेच नव्हती. गेले कांही दिवस तो आजारी पडून सारखा झोंपून राहात होता. प्रकृति ठीक नसल्यामुळें त्याचे मनही तितके स्वस्थ नव्हते. दूरदूरचे वैद्य येऊन त्याला पाहून गेले, पण कांहीही उपयोग झाला नाही. मन शांत झालं कीं त्याची प्रकृति सुधारेल असं वैद्यांचं मत पडलं.

मनाला शांति मिळावी म्हणून त्याने संगीत ऐकलं. रामायण, महाभारत, पुराण कथा ऐकल्या. अध्यात्मावरचे ग्रंथ वाचले. पण त्याचे चित्त कांही शांत होईना.

अशा परिस्थितींत प्रताप नारायणने शिवच्या गोष्टी सांगण्याबद्दल ऐकले. त्याने निरोप धाडून शिवला बोलावून घेतले. शिव त्याच्या महालांत राहायला आला आणि एक आठवडाभर प्रतापनारायणला सारा वेळ गोष्टी सांगत बसला.

शिवच्या गोष्टी ऐकून त्याचे मन प्रसन्न झाले.

मांगेश्वर



त्याची प्रकृतिही सुधारुं लागली. एके दिवशी प्रतापनारायणने शिवला म्हटले, "शिवा, तुझ्या गोष्टी ऐकायला मला फारच आवडल्या. तुझ्या गांवी तू एकटाच आहेस. तू इथेच राहा ना! इथे मी तुला सगळ्या सुखसोयींची व्यवस्था करुन देईन. मला गोष्टी सांगत जा."

प्रतापनारायणचे हे बोलणे शिवलाही पटले. जमीनदाराच्या वाड्यावर सगळा आरामशीर थाट होता, स्वादिष्ट भोजन मिळत होते; त्याबरोबर नारायणसारख्या वजनदार गृहस्थाचा लोभही जडला, म्हणून शिवने तिथेच राहायचा निर्णय घेतला.

शिवच्या गोष्टी ऐकत प्रतापनारायणाचे दिवस आनंदात जात होते. परंतु तिकडे शारदापुरांत मात्र गांवकऱ्यांचा असंतोष दिवसेंदिवस वाढत चालला होता. कोणत्याही परिस्थितींत आपण शिवला परत गांवी बोलवायचे, असे गांवातल्या प्रमुखाने ठरवले. म्हणून त्याने गांवातली चार वडील माणसे प्रतापनारायणकडे पाठवली.

त्या चौघाजणांनी प्रताप नारायणला सांगितले "शिव गावांत नसल्यामुळें तिथली परिस्थिती गंभीर झाली आहे. मुलें धड नीट जेवत नाहीत, त्यांच्या आया कंटाळून रडकुंडीला येतात. त्यांची मनस्थिती केविलवाणी झाली आहे. कृपा करुन आपण शिवला आमच्याकडे परत पाठवावे."

प्रतापनारायणने कडवट स्वरांत त्यांना सांगितले, "शिव आता इथें रमला आहे. आता तो कांही गांवी परत जाणार नाही. आपण त्याला विसरुन जावं हे उत्तम!" आणि त्यांना गांवी परत धाडले.

असेच दोनतीन महिने गेले. हळूंहळूं शिवची नाखुषी वाढायला लागली. पूर्वीसारखी त्याच्या गोष्टी सांगण्यांतली रंगत कमी होऊं लागली. प्रताप नारायणाच्या देखील लक्षांत आले कीं शिवच्या गोष्टींत पूर्वीसारखी मोहिनी राहिली नाही. त्या गोष्टी त्याला आता नीरस वाटूं लागल्या होत्या.

एक दिवस शिवने नारायणला म्हटले, "महाराज, आपण रागावणार नसाल तर माझी एक विनंती आहे."

"सांग," प्रताप नारायणने म्हटलं.

"माझं मन अस्वस्थ झालंय. शेजारच्या गांवात रामचंद्र नांवाचा एक तरुण आहे. गोष्टी रंगवून सांगण्यात तो प्रवीण आहे असं ऐकलंय. मला त्याच्या गोष्टी ऐकायची फार इच्छा आहे. म्हणजे माझं मनही जरा शांत होईल."

शिवच्या या बोलण्याचे प्रतापनारायणला मुळींच आश्चर्य वाटले नाही. त्याने म्हटले, "तुझं मन कां अस्वस्थ आहे ते मला ठाऊक आहे. त्याच्यासाठी रामचंद्राच्या गोष्टी तू ऐकायला हव्यास हा उपाय नाही. तू लागलीच गांवी परत जा.. तिथली थंड हवा, स्वच्छ पाणी यामुळें तुला बरे वाटेल. मुलांना गोष्टी सांगताना तुला खूपच समाधान मिळते हे मला माहीत आहे."

शिव खूष होऊन म्हणाला, "आपण अगदी बरोबर बोललात. माझ्या मनांत अगदी हेच होतं. पण मला आपल्याला सांगायला संकोच वाटत होता. गांवातले लोक मला बोलवायला आले होते, तेव्हांपासून माझा आनंद कमी होऊं लागला. माझं कांहीतरी हरवलंय असं मला वाटायला लागलं. माझी गोष्ट ऐकताना मुलांना जो आनंद होत होता, त्यांचे चेहरे उजळून जात असत, तो चित्र माझ्या डोळ्यासमोरुन जाईना. अजूनही ते चेहरे माझ्या नजरेसमोर आहेत. त्यांना संतुष्ट करणे, खूष ठेवणे, हे माझे कर्तव्य आहे. आपली संमती असेल तर मी माझ्या गांवी परत जाईन."

त्यानंतर जेव्हां केव्हां प्रतापनारायणचे मन उदास झाले तर, शिवच्या गांवी जाऊन त्याच्या गोष्टी ऐकल्यानंतर प्रसन्न होऊन तो घरी परत जाऊं लागला.





# गजराजाचा निर्णय

महासागराच्या मध्यभागी अरण्यें आणि पर्वत यांनी व्यापलेले एक बेट होते. त्यांत भयंकर व साधेभोळे, असे दोन्ही प्रकारचे प्राणी राहात होते. पण त्या बेटावर माणसें नव्हती. सगळ्या प्राण्यांनी एकत्र येऊन ऐरावत हत्तीला आपला राजा म्हणून निवडले.

ऐरावत मोठा बलिष्ठ आणि बुद्धिमान होता. दररोज समुद्राच्या किनाऱ्यावर तो सभा बोलावीत असे आणि बेटावरच्या प्राण्यांची भांडणे ऐकून त्याचा न्यायनिवाडा करीत असे.

या बेटाच्या चारी बाजूंना समुद्र पसरलेला होता. त्यांत एक जलकन्या राहात होती. तिचे शरीर कमरेपर्यंत एका मासोळीसारखे होते आणि कमरेच्या वरचा भाग मानवी स्त्री सारखा होता. ती सारखी समुद्राच्या पाण्याबाहेर येई आणि बेटावरच्या प्राण्यांच्यामधे खेळीमेळीने वागे. कधीकधी ती ऐरावताच्या सभेलाही हजर राहात असे.

एका संध्याकाळीं सभा भरलेली होती तेव्हां दोन कोल्ह्यांनी एका घायाळ कोंकराला तिथें आणले आणि गजराजाच्यासमोर ठेवले. ऐरावताने त्या चिमुकल्या बकरीकडे दयाळू नजरेने पाहिले आणि कोल्ह्यांना विचारले, ''भांडण कोणत्या कारणामुळें झालंय?'' करडा कोल्हा म्हणाला, ''राजन, हे बकरीचं पिल्लूं ही माझी शिकार आहे.''

''राजन, ही बकरी कळपांत आपल्या आईबरोबर चालली होती. मी बकरीचे सोंग घेतले आणि हिला आईपासून दूर नेले. त्याच वेळीं हा म्हणतोय कीं ही त्याची शिकार आहे.'' भुऱ्या कोल्ह्याने आपले म्हणणें सांगितले.

दोघांची तक्रार ऐकल्यावर ऐरावत विचारांत पडला. आणि थोड्या वेळानंतर तो म्हणाला, 'तुम्ही दोघेही त्या नारळाच्या झाडापाशी जा आणि आपापसांत खूप विचार विनिमय करून घ्या. नंतर इथें येऊन कोणता निर्णय ठीक आहे ते मला सांगा.''

दोन्ही कोल्हे नारळाच्या झाडाखाली गेले. कांही वेळ विचार करीत उभे राहिले. नंतर दोघेही सभेंत आले ''कीं माझेच म्हणणे खरे आहे!'' असे म्हणत राहिले.

ऐरावताने दोघांनाही सूचना करीत भुऱ्या

- तुकाराम -

कोल्ह्याला सांगितले, "अंधारात तू बकरी असल्याचे सोंग केलेस आणि छोट्या कोंकराला पळवून आणलेस हे कोल्ह्यांच्या स्वभावाविरुद्ध आहे. या अपराधाबद्दल मी तुला एक आठवड्यासाठीं अंधाऱ्या गुहेंत एकटा राहाण्याची शिक्षा देतो आहे. हा माझा निर्णय आहे."

झालं, हा निकाल सांगितल्याबरोबर दोन वाघ उठून आले आणि भुऱ्या कोल्ह्याला गुहेच्या दिशेने घेऊन गेले.

दुसऱ्या कोल्ह्याला वाटलं कीं आता त्याच्या बाजूनेच निर्णय लागणार.

तेवढ्यांत ऐरावताने करड्या कोल्ह्याला म्हटलं, "आईपासून बछड्याला हिरावून घेण्याचे फार वाईट काम तू केलेले आहेस. बकरीच्या या बछडीला तिच्या आईकडे पोंचवणे ही तुझी जबाबदारी आहे. यांत जराशी जरी चालढकल केलीस तर मी तुला आजन्म कैदेची शिक्षा ठोठावीन."

जलकन्या हे न्यायदान नीटपणें ऐकत होती. तिने ऐरावताला नमस्कार करुन विचारले, "गजराज, आपला निर्णय सर्व प्राण्यांनी स्वीकारला आहे. पण मला एक शंका वाटते आहे." "बोल ना काय शंका आहे ती!" ऐरावताने म्हटले.

"दोन्ही कोल्ह्यांनी दावा केला कीं बकरीची बछडी त्यांचीच आहे. पण तुम्ही दोघांचेही म्हणणे अमान्य केलेत आणि आपला निर्णय सांगितलात. आता बलवान प्राणी निर्बल प्राण्यांची शिकार नेहमीच करतात आणि हे सहजच आहे. तेव्हां या बछडीची शिकार करणें हा अपराध कसा ठरतो?" जलकन्येने विचारले.

ऐरावताने म्हटले, "वन्य प्राण्यांसाठी शिकार करणें ही साधी गोष्ट आहे. पण त्यांची सीमा अरण्यापुरतीच आहे. त्या सीमेपलीकडे राहणाऱ्या निर्बल व निष्पाप प्राण्यांची वन्य प्राण्यांनी शिकार केली तर त्यांतून अनेक समस्या निर्माण होतात. आणि शेवटी त्या समस्या वन्य प्राण्यांनाच तापदायक ठरतील. जरी माणसांनीही रानटी प्राण्यांची शिकार करुन त्यांना नामशेष करायचे ठरवले तर माणसेंही जिवंत राहाणे कठीण होईल. आपण आपली मर्यादा जाणून घेऊन त्यानुसार वर्तन ठेवणे हे सर्वांनाच सोईस्कर आहे. ही वस्तुस्थिती ध्यानांत ठेवून मी हा निर्णय सांगितला आहे."

हे ऐकून जलकन्या समाधानाने बोलली, "गजराज, आपली बुद्धिमत्ता अफाट आहे. आपले विचार उत्तम आहेत." आणि पुन्हां त्याला नमस्कार करुन ती परत समुद्रांत निघून गेली.







# मायासरोवर

## 21

*(मायासरोवराकडे जाणाऱ्या लंगड्या मंगलवर्माला वृक्षाच्या फांद्यांत अडकलेला त्याचा सारथी दिसला. त्याचा आर्त आवाज ऐकून सिद्धसाधक व कनकाक्ष राजादेखील तिथें पोंचले. त्यावेळीं जलवृकांना चिडवत गेंड्यावर स्वार झालेला एकजण तिथें आला, तेव्हां झाडावरुन नरवानराने त्याच्यावरच उडी घेतली. त्यानंतर ...)*

आपला नेता संकटात सांपडलाय हे पाहून जलवृक राक्षसांनी आपल्या गदांनी नरवानराला बेदम मारायला सुरवात केली. कनकाक्ष राजाने आपल्या सैनिकांना सावधान केले. सिद्धसाधकाने शूळ उचलून गर्जना केली, "जय महाकालकी!" यानंतर जलवृकांच्यावर चालून जात त्यांच्यावर शूळाने तो प्रहार करायला लागला.

दोनतीन मिनिटें भयंकर लढाई झाली, नरवानर दगडी गदेच्या प्रहाराने हतबल होऊन खाली पडला. त्याचवेळीं जलवृक राक्षसांचा नेता आपल्या वाहनाभोवती चारी बाजूंनी असलेल्या सैनिकांसह पुढे आला व आपली गदा सरसावीत ओरडायला लागला, "अरे क्षुद्र माणसा! मी कोण आहे ते तुला ठाऊक आहे कां? मी माया-सरोवराचा सर्वाधिपती जलवृकनाथ आहे. पद्ममुखी नांवाच्या कुमारीखेरीज बाकी सगळ्यांचा मी या दगडी गदेने बळी देणार आहे."

नरवानर अद्याप पूर्णपणे शुद्धीवर आलेला



नव्हता. सिद्धसाधकाने विचार केला कीं त्याचा सेवक जलवृकच नरवानराला शुद्धीवर आणूं शकेल. त्याला हांक मारुन तो म्हणाला, "अरे वृकभटा! तू कुठे आहेस? नरवानराला जखमा झाल्या आहेत, तरी त्या कांही प्राणघातक नाहीत. त्याला उठवून उभा कर!"

"मालक, अशा जनावरांमधें मृत्यूच्या भीतीमुळेंच पुन्हां चैतन्य निर्माण होते" असं म्हणून जलवृकभट नरवानराजवळ गेला, डाव्या हातांत त्याने त्याची मान घट्ट पकडली आणि दगडी गदा त्याच्या डोक्यावर टेकवून तो किंचाळला, "नरवानर! तुझे मस्तक आता फुटणार आहे." दुसऱ्याच क्षणीं नरवानर ताडकन उठून उभा राहिला आणि भयंकर मोठ्याने आरोळी ठोकीत त्याने जलवृकभटाला उचलून दूर फेकले.

त्याच्यानंतर जलवृक राक्षसांच्या नेत्याने गेंड्यावर स्वार होऊन पळून जाण्याऱ्याच्याकडे नजर फिरवली आणि म्हटले, "आता ह्या दुष्टाला कसे पकडता येईल? तो मायासरोवरापर्यंत पोंचला असेल कां? ते आणखी किती दूर आहे?"

वैद्यदेव शर्मा त्याच्याजवळ जाऊन म्हणाला, "सिद्धसाधक! मायासरोवर इथून कांही फारसे लांब नाही, आपण सर्वजण माझ्याबरोबर चला."

सिद्धसाधकाने संमति दाखवत मान डोलावली. देवशर्मा वाट दाखवायला पुढे झाला. त्याच्याबरोबर चालत जात कनकाक्ष राजा म्हणाला, "शर्माजी, जलराक्षस फक्त पद्ममुखी नांवाच्या मुलीला जिवंत राहूं देणार आहे असं म्हणत होता. त्याचं कारण मात्र मला समजलं नाही."

"महाराज, आम्ही जे ऐकलं आणि पाहिलं, त्याच्या आधारे असं वाटतं कीं मायासरोवर संपूर्णपणें जलराक्षसांच्या तावडीत सांपडलेले आहे. पद्ममुखी ही मायासरोवरेश्वराची मुलगी आहे. तिला जलराक्षसांचा नायक जिवंत सोडणार, याच्यामागे एक रहस्य लपलेले आहे. आपल्या मुलाशीं पद्ममुखीचा विवाह करावा अशी राक्षसाची इच्छा आहे." देवशर्माने स्पष्टीकरण दिले.

जेव्हां देवशर्मा कनकाक्ष राजाबरोबर बोलत होता, तेव्हां इतर लोकांच्याबरोबर जयशील मायासरोवरला पोंचला. ते सरोवर फारच मोठे होते. त्याच्या चारी बाजूंनी उंचउंच पर्वत आणि दाट अरण्यें होती.

आपल्या तलवारीने सरोवराच्या पाण्यांत



रेषा. काढीत जयशील बोलला, "अरे, तुम्ही या सरोवरांत राहाता ना? पण आधी हे सांगा कीं या क्षणीं आपण मित्र आहोत कीं शत्रू?"

माया सरोवरेश्वराने चिंताग्रस्त नजरेने कांचनमालाकडे बघितले. कांचनमाला अडखळत म्हणाली, "जयशील, इथें कुणीही शत्रू नाही. मी मकरकेतूच्या तोंडून ऐकलंय कीं आपल्या हातांत जी तलवार आहे ती आपल्याला महाकाळाच्या कुणा भक्ताने भेट दिलेली आहे. त्या तलवारीच्या मदतीने आपण जलवृक राक्षसांचा वध करा, आणि त्यांच्या बंदीवासांत अडकलेले माझा भाऊ कांचनवर्मा आणि मायासरोवरेश्वर मामाजी यांची कन्या पद्ममुखी यांना सोडवा."

"मी एकटा इतक्या साऱ्या जलवृक राक्षसांचा वध करुं? मी प्रयत्न करीन. मी तुझ्या पित्याला वचन दिलंय कीं माझ्या प्राणांची पर्वा न करता मी तुला व तुझ्या भावाला त्या राक्षसांच्या तावडींतून वांचवीन. त्याची जबाबदारी माझ्या शिरावर आहे." जयशील म्हणाला.

जयशीलच्या तोंडून हे शब्द ऐकल्यावर मायासरोवरेश्वर पुढे आला आणि त्याचे दोन्ही हात पकडून म्हणाला, "जयशील, हिरण्यपुरच्या राजाच्या मुलांचे अपहरण करुन त्यांना या सरोवरांत मी आणले आहे हा फार मोठा अपराध आहे, असे समजूं नकोस. मी फक्त राजकुमाराला पकडून आणण्याची आज्ञा मकरकेतूला दिली होती. पण तो मूर्ख होता. त्याने कांचनमाला भावाबरोबर दिसली म्हणून तिलाही पकडून आणले, आणि इथें पाठवले. त्यावेळीं राजभटांच्या हातून जखमी झालेला मकरकेतू तुम्हाला दिसला



आणि त्यामुळें हा पुढचा सगळा गोंधळ निर्माण झाला.

"युवराजाचे अपहरण करण्याचे कारण काय?" जयशीलने विचारले.

"त्यांत कांही मोठंसं गुपित नाही. माझ्या एकुलत्या एक मुलीचा, पद्ममुखीचा विवाह युवराजाबरोबर करुन देऊन त्यांना मी हिरण्यपुरला पाठवणार होतो. आणि त्यानंतर हे सरोवर सोडून दूर कुठेतरी जायचा विचार मनांत होता. पण पद्ममुखीने कांचनवर्माशी लग्न करायला स्पष्ट नकार दिला." मायासरोवरेश्वराने खरा हेतू मोकळेपणी सांगितला.

त्याच्या बोलण्यांत सत्य होते हे जयशीलला जाणवले. त्याने कांचनमालेकडे बघितले. ती सरोवराजवळ गेली आणि तिने एका कमळाचा देंठ तोडून आणला. त्या देंठाचा रस तिने पिळून काढला आणि जयशीलच्या कपाळावर तिलक



लावतात, तसा तो रस लावला व ती पुढें म्हणाली, "मामाजींचं म्हणणं अगदी खरं आहे. आता मी मायासरोवराचे रहस्य उघड सांगते. या सरोवरांत उगवणाऱ्या कमळांच्या देंठाचा रस जर कुणाच्या कपाळावर लावला तर त्या माणसाला जन्मभर पाण्यांत जिवंत राहाण्याची शक्ति प्राप्त होते."

"अरे, असं आहे होय! मग मी याची परीक्षाच घेऊन पाहातो." असं म्हणत जयशीलने सरोवराच्या पाण्यांत उडी मारली.

किनाऱ्यावर उभे असलेले मायासरोवरेश्वर, कांचनमाला आणि मकरकेतु, जयशील पाण्यावर तरंगत येईल याची वाट बघत कांही वेळ उभे होते. पण तो कांही पाण्यावर दिसेना म्हणून कांचनमाला घाबरुन म्हणाली, "जयशीलला काय झालंय आता? जलवृक राक्षसांनी त्याला खोल पाण्यांत नेऊन पकडून तर ठेवलं नसेल ना?" क्षणार्धातच पाण्यांत कांहीतरी हालचाल दिसूं लागली. एका तरुण जलवृक राक्षसाची मानगूट पकडून जयशील पाण्यावरती आला आणि त्याला किनाऱ्यावर ओढत घेऊन आला. त्याला पाहून मकरकेतू जोरांत ओरडायला लागला. "अरे अरे, ज्याला आम्ही शोधत होतो, तोच मिळाला. हा जलवृकांच्या नेत्याचा मुलगा आहे. याच्या पित्याच्या हातांत सांपडलेले जे आमचे अनुचर आहेत, त्यांना जर कांही मारहाण झाली तर आम्ही यालाच मारुन टाकू व याचे तुकडेतुकडे करुन टाकू."

"अरे दुष्टा, पाण्यांत लपून तू आमचे बोलणें ऐकत होतास काय? तुझा पिता, तो दुष्ट जलवृकनाथ कुठे आहे?" मायासरोवरेश्वराने तलवार उपसून करड्या स्वरांत विचारले.

"माझे वडील अरण्यांत राहाणाऱ्या एका राजाचा आणि एका कापालिकाचा वध करण्यासाठी गेले आहेत. तिथून ते परत आले कीं तुम्हा सर्वांना मारुन तुमचे तुकडे करुन कावळ्याकोल्ह्यांपुढे टाकतील." तो तरुण राक्षस उद्धटपणें म्हणाला.

"ते नंतर आपण पाहूं. पण आधी सांग, यावेळीं कांचनवर्मा आणि पद्ममुखी कुठे आहेत?" जयशीलने विचारले.

"त्यांना ज्या गुप्त प्रदेशांत ठेवले आहे ती जागा फक्त माझ्या वडिलांनाच ठाऊक आहे." तरुण राक्षसाने सांगितले.

त्याचवेळी दूर अंतरावर कांहीतरी गडबड झालेली दिसली. सर्वांत पुढें गेंड्यावर स्वार झालेला जलवृकनाथ, आणि त्याच्या मागून दगडी गदा हातांत घेऊन येणाऱ्या जलवृकांचे



दल होते. ते ओरडायला लागले, "तुम्ही आपापली हत्यारें टाका आणि आमच्या स्वाधीन व्हा." ही धमकी ऐकून जयशील मकरकेतूला म्हणाला, "मकरकेतु, जलराक्षसाच्या मुलाला तू तुझ्या जलग्रहांना सांगून त्याच्या सोंडेने वर उचल."

त्यावर मकरकेतूने पुकारलं, "हे जलग्रहा, या मुलाला सोंडेने उचल आणि वरती धर!" मकरकेतूच्या तोंडातून हे शब्द निघायचीच खोटी होती. लगलीच जलग्रहाने आपल्या सोंडेने तरुण राक्षसाला वर उचलले.

त्यानंतर आपल्याकडे येणाऱ्या जलवृकांना जयशील म्हणाला, "अरे दुष्टांनो, जर तुम्ही आमच्यावर हल्ला केलात तर सर्वांच्या अगोदर तुमच्या नेत्याचा मुलगा जलग्रहाच्या पायाखाली तुडवला जाईल."

तेवढ्यांत त्यांच्यापाठीमागून नरवानरावर स्वार होऊन त्यांच्याच दिशेने येणारा सिद्धसाधक जोराने ओरडून म्हणाला, "महाराज, आपण आपल्या सैनिकांसह या दुष्टांना वेढा घाला. बघा, तो जयशील आहे." हे बोलत तो जवळ आला आणि नरवानरावरुन खाली उतरला.

जयशीलने आपल्याबरोबर आलेल्या लोकांचा सिद्धसाधकाशी परिचय करुन दिला. तेव्हां जलवृकांचा नेता गेंड्यावर उभा राहिला आणि दगडी गदा दूर फेकून देत म्हणाला, "माझे अनुयायी आणि मी आपली हत्यारें टाकून देतो आहोत. पण माझ्या मुलाला मारुंबिरुं नका. मी पकडलेल्या सर्वांना मी आत्ताच इथें बोलावून घेतो."

त्याच वेळेला कनकाक्षराजा जयशीलच्या



जवळ येऊन पोंचला. कांचनमाला पळतपळत आपल्या पित्याजवळ गेली, आणि त्याच्या गळ्यांत पडून म्हणाली, "बाबा, माझे मामाजी मायासरोवरेश्वर यांना कांही करुं नका. जे कांही घडलं, त्याबद्दल आता त्यांना पश्चात्ताप वाटतो आहे."

"मायासरोवरेश्वराची मुलगी पद्ममुखी तुमची सून होता होता राहिली!" जयशील हंसतच म्हणाला.

"पद्ममुखीच्या मनांत काय आहे ते मला ठाऊक आहे. तिला देवशर्माबरोबर लग्न करायची इच्छा आहे." कांचनमालाने सांगितलं.

त्याच वेळी जलवृक राक्षसांच्या नेत्याला बंदी बनवून कांही सैनिकांबरोबर देवशर्मा जयशीलच्याजवळ येऊन म्हणाला, "जयशील, बंदी असलेल्या पद्ममुखी आणि कांचनवर्माला इथें आणायला या दुष्टाने आपली माणसे धाडली

आहेत. त्यांत कांही दगा-फटका तर होणार नाही ना?''

"जर तसं झालं तर तोही आपल्या मुला-प्रमाणेच हत्तीच्या पायी तुडवला जाईल व मरेल.'' जयशीलने म्हटलं.

घटकाभरांतच चार जलवृक राक्षस कांचनवर्मा आणि पद्ममुखीला तिथें घेऊन आले. त्यांना बघून मायासरोवरेश्वर आणि कनकाक्षराजा यांच्या आनंदाला सीमा राहिली नाही.

सिद्धसाधकाने महाकालचा जयजयकार करीत विचारले, ''इथें मी जे कांही ऐकलं, त्यानुसार हे उघडच आहे कीं पद्ममुखीचा विवाह देवशर्माबरोबर होणार आहे. परंतु राजकुमारी कांचनमालाबद्दल काय विचार आहे?''

कनकाक्षराजाने जयशीलकडे बघत म्हटलं, ''मी घोषणा केलीच होती कीं अपहरण केलेल्या माझ्या मुलांना जो कुणी वीर घेऊन येईल, त्याला मी माझे अर्धे राज्य देईन. हे कार्य पूर्ण करुन आता जयशील एक महान वीर झाला आहे.''

''कांचनमालेसाठी असा वीरच योग्य पती होऊं शकेल. काय कांचना? मी बरोबर बोलतो आहे ना?'' सिद्धसाधकाने विचारलं. कांचनमाला लाजली व आपल्या पित्याच्या मागे जाऊन उभी राहिली.

सिद्धसाधक मोठ्याने हंसून म्हणाला, ''आता जयशीलचा कांचन-मालाशी आणि देवशर्माचा पद्ममुखीशी असे दोन्ही विवाह हिरण्यपुरला मोठ्या थाटामाटांत साजरे होतील. आता सगळेजण तिकडेच या.''

''सिद्धसाधक! तुझं काय होईल आता?'' जयशीलने विचारलं. ''या मायासरोवराच्या किनाऱ्यावर थोडे दिवस मी महाकालाची उपासना करीत. इथें जे सारे जलवृक राक्षस आणि अरण्यांतले नरभक्षक लोक आहेत, ते सगळेजण माझे सेवक आहेत.'' या शब्दांबरोबरच सिद्धसाधकाने आपला शूळ वर उचलून धरला.

त्यानंतर जयशील, राजा कनकाक्ष आणि मायासरोवरेश्वर आपापल्या मुलांना व अनुयायांना घेऊन तिथून निघाले. तेव्हां जलवृक राक्षस आणि नरभक्षक तिथें पळतपळत आले, आणि सिद्ध-साधकाच्याभोवती फेर धरुन, त्याचा जयजयकार करीत ते नाचायला लागले.

*(समाप्त)*





वेताळ कथा

# रत्नकंकण

निश्चयी विक्रमार्क पुन्हां झाडाजवळ गेला. झाडावरचे शव त्याने खाली उतरवले आणि आपल्या खांद्यावर घेतले. स्मशानाच्या दिशेने तो पूर्ववत चालूं लागला. तेव्हां प्रेतांत लपलेला वेताळ त्याला म्हणाला, ''राजन्, तू थकलेला नाहीस. परंतु तुला सांगून सांगून मी मात्र थकलो आहे. तू राजा आहेस. प्रजेच्या-बाबतीत तुझ्यावर अनेक जबाबदाऱ्या आहेत. त्या सर्व विसरुन तू या भयानक जागी इतक्या रात्रीं कां वांया घालवतो आहेस? कार्य सिद्धीसाठी तू जे परिश्रम करतो आहेस, त्याचं कौतुक केल्यावाचून मला राहावत नाही. परंतु या जगांत कांहीजण असे असतात कीं त्यांचे काम ते विनासायास साधून घेतात. आदित्य हा असाच एक तरुण



होता. त्याने अनेक कष्ट झेलले, मनस्ताप सोसला. तरी त्याने आपला कार्यसिद्धी पुरी केली. पण अगदी ऐन मोक्याच्या क्षणीं त्या कार्याचे फळही त्याने ठोकरले, व आपल्या हातांतून जाऊं दिले. तुझ्याबाबतीत तू असली चूक करूं नयेस असं मला वाटतं. तुला सावध करण्यासाठी मी त्याची कहाणी तुला सांगतो. नीट लक्ष देऊन ऐक." आणि वेताळाने आदित्यची कथा सांगायला सुरवात केली.

रत्नपुर राज्यांतल्या वज्रपुर नांवाच्या खेड्यांत आदित्य हा तरुण राहात होता. तो खूप हुशार आणि चटपटीत होता. आपल्या आईवडिलांचा मान तो राखीत असे. त्यांची शेती लहानशी होती. त्यामुळें कष्टांचे जे फळ मिळायला हवे ते त्याला मिळत नव्हते. त्याचे वाडवडीलदेखील त्याच परिस्थितींतून गेलेले होते.

वज्रपुरांत पाऊस वेळेवर पडला तर चांगले पीकपाणी होत होते. पण पाऊस चांगला पडला तरी चांगले पीक हातीं लागेलच याची खात्री नसे. त्याचं कारण होतं. त्या गांवाजवळ असणारी बाष्पधारा नदी. ती नेहमी कोरडीच असे. तिला केव्हां पूर येईल ते सांगता येत नसे. उगमाजवळ जोरदार पाऊस पडला तर अचानक पूर येई आणि गांव आणि शेते जलमय होत असत.

गांवातल्या प्रजाजनांनी ग्रामाधिकाऱ्याच्या मार्फत अनेकवेळा सरकारला विनंती केलेली होती कीं त्या नदीवर एक बंधारा बांधून घ्यावा म्हणजे पुराच्या पाण्यापासून गांव सुरक्षित राहील. राजाच्या अधिकाऱ्यांमार्फत देखील त्यांनी राजाला विनंती केली होती. पण दुर्दैवाने, याबाबतीत राजाने आजपर्यंत फारसे लक्ष दिले नाही. गांवकऱ्यांना गांव सोडून जाणेही शक्य नव्हते, म्हणून दुष्काळी प्रदेश असला तरी ते तिथेंच राहात होते.

त्यावर्षीं चांगला पाऊस झाला. यंदा पीक उत्तम येईल व वर्षभर आराम करता येईल याची आदित्याला खात्री होती. आणि झालंदेखील तसंच. पीक चांगलं आलं. मळणी करून पीक घरी नेण्याची सारी तयारी त्याने केली आणि दुर्दैवाने, नदीला प्रचंड पूर आला, नि सारे पीक नष्ट झाले. त्यावेळीं शेतांत गाई बकऱ्यांच्या बरोबर त्याचे आईवडील होते, ते देखील सारे पुरांत वाहून गेले.

ते दृश्य बघून आदित्य दुःखाने वेडा झाला. तो धाय मोकलून रडायला लागला. त्यानंतर त्या गावांत राहण्याची त्याला इच्छाच उरली नाही.



त्याचे मन विरक्त बनले, व दुःखाने तो तिथून निघून गेला.

दोन दिवस तो चालत राहिला. त्याला कुठे जायचं होतं आणि तो कोणत्या दिशेला जात होता हेदेखील त्याला ठाऊक नव्हतं. तिसऱ्या दिवशी एका वडाच्या झाडाखाली थोडी विश्रांति घेऊन जेव्हां तो तिथून निघाला, तेव्हां त्या झाडींत कांहीतरी चकाकत असल्याचा त्याला भास झाला. त्याने जवळ जाऊन ती वस्तू उचलून पाहिली. ते एक हिऱ्यांचे कंकण होते. त्याच्यावर राजमुद्रा होती. आदित्यने ते कंकण आपल्या कपड्यांत लपवले आणि तो मार्गस्थ झाला.

संध्याकाळपर्यंत तो शशांकपुर या राजधानीच्या वेशीजवळच्या शहरांत पोंचला. जेव्हां तो शहरांतल्या एका रस्त्यावरून चालला होता, तेव्हां राजाचा एक सैनिक तिथें दवंडी पिटताना दिसला.

"राज्यांतल्या नागरिकांना ही शेवटची घोषणा आहे. कांही दिवसांपूर्वी महाराजांचे रत्नकंकण हरवले आहे ते अजून सांपडलेले नाही. चोरांचा तपास चालूं आहे. जर हे रत्नकंकण कुणी महाराजांना आणून दिले तर त्याला भरपूर इनाम दिले जाईल. पण जर चोर सांपडला आणि त्याने ते कंकण महाराजांना दिले नाही, तर मात्र त्याला फांशीची कठोर शिक्षा नाईलाजाने द्यावी लागेल. तेव्हां उद्यापर्यंत महाराजांची राजमुद्रा आणून द्यावी आणि बक्षीस मिळवावे हो ऽऽऽ!"

तिथल्या लोकांशी बोलून आदित्यने त्या रत्नकंकणाबद्दल चौकशी केली, तेव्हां त्याला



समजले कीं महाराजांचे पूर्वज प्रत्येक पिढींत ते हिरेजडित कंकण वापरत आले होते. म्हणून महाराजांना त्या कंकणाचे अतिशय महत्व होते. तो पिढीजात दागिना होता. महाराजांनी महिनाभर सतत घोषणा केली होती कीं जो कुणी ते कंकण पौर्णिमेपूर्वी आणून देईल त्याला भरघोस इनाम मिळेल. जर तोपर्यंत ते कंकण महाराजांच्यापाशी परत आले नाही तर मात्र त्यानंतर ज्याच्यापाशी ते असेल त्याला अटक होईल व त्याला फांशीची शिक्षा होईल. ही दवंडी गांवोगांवी दिली. जात होती परंतु अद्याप कंकणाविषयी कांहीच माहिती मिळालेली नव्हती. ते हरवले होते कीं चोरीला गेले होते याचाही उलगडा झालेला नव्हता. साऱ्या राज्यांत या कंकणाबद्दल चर्चा सुरुं होती. लोक तर्ककुतर्क करीत होते.

शशांकपुरांत आदित्य आणखी दोन दिवस थांबला आणि तिसऱ्या दिवशी तो राजसभेत गेला.



त्याने महाराजांना आदराने वंदन केले आणि भर सभेंत ते हिरेजडित सुंदर कंकण त्याने महाराजांच्यासमोर ठेवले.

ते बघून महाराजांना अतिशय आनंद झाला. त्यांचे डोळे समाधानाने चमकूं लागले. आश्चर्यचकित झालेल्या दरबाऱ्यांसमोर महाराजांनी आदित्यला विचारले, ''हे कंकण तुला कुठे नि केव्हां मिळाले?''

''तीन दिवसांपूर्वी शशांकपुराच्या वेशीबाहेर असलेल्या रानांतल्या एका वडाच्या झाडाखाली मी थोडी विश्रांति घेतली. उठलो तेव्हां जवळच्या झाडींत कांहीतरी चकाकत असलेले दिसले. निव्वळ कुतुहल म्हणून मी जवळ जाऊन पाहिले तर हे कंकण तिथे कुणीतरी टाकलेले दिसले.'' आदित्यने सत्य परिस्थिती सांगितली.

''तर मग तू त्याच दिवशी हे कंकण माझ्या-जवळ कां आणून दिलं नाहीस? त्याबद्दल तुला फार मोठं इनाम आम्ही दिलं असतं.'' महाराजांनी म्हटलं.

कांहीही उत्तर न देता आदित्य निमूटपणे खाली मान घालून उभा होता.

''पौर्णिमेच्यानंतर जो कंकण आणून देईल त्याला कठोर शिक्षा दिली जाईल, हे तुला माहीत होतं कां?'' महाराजांनी करड्या स्वरांत विचारलं.

''माहीत होतं महाराज'' आदित्यने मान डोलावीत म्हटले राहिले. नंतर सिंहासनावरुन खाली उतरुन त्यांनी आदित्यला प्रेमाने मिठी मारली व म्हटले, ''तुला जे कांही हवं असेल ते माग.''

आदित्यने महाराजांना प्रणाम केला व म्हटले,



''महाराज, आपल्या राज्याच्या दक्षिणेच्या टोंकाला वज्रपुर हे छोटेसे गांव आहे तिथला मी रहिवासी आहे. तिथले गांवकरी बाष्पधारा नदीच्याकारणाने फार दुःखीकष्टी आहेत. त्या नदीला एक बंधारा बांधून गांवकऱ्यांची घरेदारे व शेती वांचवावी म्हणून आपल्याला अनेकदा विनंती केलेली आहे.

मी आपला प्रामाणिक नागरिक म्हणून माझे कर्तव्य केलेले आहे. आपण राज्यकर्ते आहात, तेव्हां हा बंधारा बांधणे हे आपले कर्तव्य ठरते. आपण मला आता जायची अनुमती द्यावी.'' असं म्हणून प्रणाम करुन तो सभेतून मागल्या पावलीं परत फिरला.''

ही कहाणी सांगून वेताळाने विक्रमार्क राजाला विचारले, ''ते कंकण परत करण्यासाठी महाराजांनी जो अवधी दिला होता, त्यानंतरच आदित्यने ते कंकण राजाला दिले. ही त्याच्यासाठी एक सुवर्णसंधी होती. तो कांहीही मागू शकत होता. पण त्याने नदीवर बंधारा बांधावा अशी इच्छा व्यक्त केली. गांवकऱ्यांचा लाभ होईल अशी योजना त्याने आंखली. त्याने जाणूनबुजून हातांत आलेली ही संधी कां सोडली? माझ्या या शंकेचे उत्तर माहीत असूनदेखील जर तू मौन पत्करलेस तर तुझ्या मस्ताकाची अनेक शकलें होऊन पडतील.''

विक्रमार्क म्हणाला, ''आदित्य प्रामाणिक आहे. त्याला आपल्या श्रमावर पूर्णपणे विश्वास आहे. ते कंकण परत देताना त्याने बक्षिसाची अभिलाषा धरली नव्हती. म्हणूनच त्याने राजाची पौर्णिमेची मुदत संपल्यानंतर ते कंकण परत दिले. स्वतःसाठी कांहीही न मागता जनतेच्या कल्याणासाठी बंधारा बांधावा अशी त्याने राजाला विनंती केली. आपल्या जन्मग्रामाबद्दल त्याला किती प्रेम आहे आणि दुसऱ्यासाठी सत्कर्म करण्याची भावना त्याच्यांत किती आहे हे सिद्ध करणारी ही घटना आहे. त्याचा प्रामाणिकपणा व चांगली बुद्धी बघून राजाने त्याला प्रेमाने मिठी मारली.''

राजाचे मौनभंग करण्यांत सफल झालेला वेताळ शवासहित अदृश्य झाला आणि पुन्हां झाडावर जाऊन बसला.

*- मंजू भार्गवी*






# पहिला धडा जिभेवर

तुम्हाला कालिदासाची गोष्ट माहीत आहे कां? लहानपणीं तो अगदीच निरक्षर होता. कालीमातेच्या मंदिरांत त्याने स्वतःला कोंडून घेतले आणि देवीने आपल्या त्रिशूळाच्या टोंकाने त्याच्या जिभेवर कांहीतरी लिहिले. पुढे तो उत्तम कवी व साहित्यश्रेष्ठी झाला व विक्रमादित्य राजाच्या दरबारांतल्या नवरत्नांपैकी एक रत्न म्हणून गणला जाऊं लागला. नवरात्रीच्या नऊ दिवसानंतर येणारा दहावा दिवस हा दसरा म्हणून भारतांत सर्वत्र साजरा केला जातो. याच दिवशी देवी दुर्गामातेने महिषासुराचा वध केला होता.

कांही राज्यांत या दिवशी सरस्वतीदेवीची पूजा केली जाते. ही विद्येची देवता आहे त्यामुळें लहान मुलांना लिहायला शिकवण्यास या शुभदिवशी सुरवात करतात. केरळमधे त्याला विद्यारंभ म्हणतात. या प्रथेला आता पुन्हां चालना मिळायला लागली आहे. मंदिरांतून लहान मुलांच्या नावांची नोंदणी केली जाते. तिथले पुजारी किंवा प्रसिद्ध व्यक्तींच्या हस्ते सोन्याच्या लेखणीने लहान मुलांच्या जिभेवर ओम्, हरी, किंवा श्री अथवा पहिले मूळाक्षर लिहितात. कांही संस्थांमधून सुप्रसिद्ध साहित्यिकांना हा गुरुचा मान देण्यांत येतो. गेल्यावर्षी तर, कोडुंगल्लूर इथल्या मशिदीमधेदेखील ही प्रथा सुरुं झाली व आजूबाजूच्या लहान मुलांवर हा लेखणीचा संस्कार केला गेला. पहिले अक्षर तिथल्या मुल्लाने पाटीवर लिहायला शिकवले.

जुन्या काळांत घरांतले लहान मूल आजोबा, काका, मामा किंवा इतर वडीलधाऱ्या मंडळींच्या मांडीवर बसून, जमिनीवर पसरलेल्या तांदळात किंवा वाळूंत बोटाने रेघोट्या काढून पहिले अक्षर गिरवीत असे.





# समोरासमोर



हजारों वर्षांपूर्वी काशीराज्याचा राज्यकर्ता होता ब्रम्हदत्तकुमार. हा तरुण राजा अतिशय साधे-पणाने राहात होता. प्रजाजन सुखी असावेत यासाठी त्याने आपले सारे लक्ष त्यांत गुंतवले होते. त्याच्या दरबारांतल्या विश्वासू सरदार व अधिकारी यांना तो राज्यांत चौकशीसाठी पाठवीत असे गुप्तपणें जाऊन वरचेवर अधिकाऱ्यांची वर्तणूक याची माहिती ते येऊन राजाला सांगत असत. जर एखादा जमीनदार किंवां ग्रामाधिकारी लोकांना त्रास देत असेल, किंवा भ्रष्टाचार करीत असेल तर त्यांना राजाकडे बोलावून त्याचा खुलासा केला जाई व अपराध्यांना कठोर शिक्षा केली जात असे.

खेडूतांनी आपापसांत प्रेमाने व समजूतदार-पणाने वागावे, मतभेद व गैरसमज असल्यास गोडीगुलाबीने ते दूर करावेत अशी पद्धत राजाने जनतेत सुरुं केली होती नागरिकांचे प्रश्न सोडवण्यासाठी मंत्री बैठकी बोलावीत असत. ह्यामुळें वाराणसी उर्फ काशीराज्य हे शांती व समृद्धी नांदत असलेले सुखी राज्य म्हणून मानले जात होते.

आपल्या गुप्तचरांना राजा विचारी, "आपल्या शासनांत जनतेला कांही चुका आढळतात कां? ते मला येऊन सांगा." पण लोकांना तक्रार करायला कांही कारण उरले नव्हते असे निष्ठावंत अधिकारी सांगत असत. तरी राजाचे समाधान होत नव्हते. तो वेष पालटून, यात्रेकरुच्या वेषांत खेडोपाडीं व बाजारांतून हिंडे व जनतेत मोकळे-पणी मिसळत असे. त्यांच्या गप्पा, चर्चा वा वादविवाद निमूटपणें ऐकत असे. पण त्याच्या



कानावर कधी कुरकूर ऐकूं आली नाही. त्याची न्यायबुद्धी, उदारपणा व विद्वत्ता याचे कौतुक त्याला लोकांच्या तोंडून ऐकायला मिळत असे.

एकदा त्याला वाटलं कीं त्याची माहिती फक्त राजधानी व आसपासची गांवे यांच्यापुरतीच सीमित आहे. राज्यांतल्या सीमेवरच्या खेड्यांबद्दल त्याच्याजवळ पुरेशी माहिती नव्हती. तेव्हां त्याने राज्याच्या सीमेवरच्या गांवातून एकदा प्रवास करायला जायचे ठरवले.''

त्याप्रमाणें एक विश्वासू सारथी सोबत घेऊन तो रथांत बसला व राज्याची पाहाणी करायला निघाला. ओसाड रानांतून त्याचा रथ जलदगतीने धावत होता, पण लहान गांवातून किंवा वस्तीमधून जाताना रथ अगदी धीम्या गतीने जाई. त्यामुळें वाटेंत दिसणाऱ्या लोकांचे संवाद अधूनमधून कानावर पडत राहिले. लोकांची चांगली मतें ऐकून राजाला खूप संतोष झाला.

संध्याकाळ होउं लागली तसा राजाने परतायचा निर्णय घेतला. वाराणसी व कोशल या राज्यांच्यामधें एक बिनमालकीचा जमिनीचा पट्टा होता. तो कुणाच्याच राज्यांतला नव्हता. राजाच्या सारथ्याने गांवाबाहेरुन रथ नेण्याचे ठरवले म्हणजे त्याला लौकर परतता आले असते. त्याने लहानसा रस्ता धरला. वाटेत एके जागी रस्ता खूपच अरुंद होता व दोन्ही बाजूंना उतार होता. सारथी अतिशय काळजीपूर्वक रथ हांकीत होता. तितक्यांत समोरुन एक दुसरा रथ आला. दोन्ही रथ थांबले.

एकाने माघार घेतल्याशिवाय दोघांनाही पुढे जाणे शक्य नव्हते.

''हे मित्रा, तू आम्हाला वाट मोकळी करुन दे कारण माझ्या रथांत कुणी सामान्य व्यक्ती नसून खुद्द कोशल देशाचे अधिपती आहेत.'' काशीराज्याच्या राजासमोर आलेल्या रथाच्या सारथ्याने म्हटले.

''तुमच्या महाराजांना आमचे प्रणाम. पण तुमचाच रथ खरं पाहिलं तर तुम्ही मागे घेतला पाहिजे. कारण माझ्या रथांत वाराणसीचे अधिपती आहेत.'' पहिला सारथी म्हणाला.

''वाराणसीच्या महाराजांना आमचे प्रणाम. परंतु आमच्या महाराजांच्या पुढें त्यांचे महत्व कां असावे ते मात्र समजले नाही.'' दुसरा सारथी न चिडता म्हणाला.



''तुझे म्हणणे योग्य आहे. दोघा महाराजांच्या-मधें वयाने कोण ज्येष्ठ आहे ते आपण पाहूं या. लहानांनी मोठ्यांच्यापुढें नमावे आणि त्यांना पुढें जाऊं द्यावे!'' वाराणसीच्या सारथ्याने प्रस्ताव मांडला.

ही सूचना कोशलराजाच्या सारथ्याला पसंत पडली. पण नंतर लक्षांत आलं कीं दोन्ही राजे एकाच वयाचे होते. त्या सारथ्यांनी दोघांच्या पूर्वजांची तुलना केली. दोन्ही कुळें समान योग्यतेची होती.

त्यांच्या राज्यांचे क्षेत्रफळदेखील अगदी सारखे होते. इतर अनेक गोष्टींचा विचार करताकरता त्यांना कळून चुकले कीं दोन्ही राजे सारखेच श्रेष्ठ होते. ''अरे मित्रा, या भौतिक गोष्टींचा विचार सोडून दे. आपण आपल्या अन्नदात्यांचा स्वभाव बघू या. तुमचे महाराज आपल्या प्रजाजनांशी कसे वागतात?'' वाराणसीच्या सारथ्याने विचारले. त्यावर कोशलच्या सारथ्याने उत्तर दिले,

''दुष्टांशी निर्दय आणि जनतेशी सदय,<br>
हे माझ्या राजाचं धोरण आहे - साधं नि सहृदय,<br>
लबाडांना बेडी आणि सज्जनाशी गोड,<br>
यापेक्षां जास्त चांगले, असेल तरी काय?''

''एवढंच? आता मी माझ्या राजाबद्दल सांगतों'' असं म्हणून वाराणसीचा सारथी पुढे म्हणाला.

''दुष्टांना शांतीने जिंकणारा,<br>
लबाडांना गोडीगुलाबीने शिकवणारा,<br>
साऱ्या प्रजेशी भलेपणाने वागणारा,<br>
आणि सत्य व स्नेहशील दृष्टीने बघणारा<br>
हे आमच्या महाराजांचं वर्णन आहे.''

वाराणसीच्या सारथ्याचे हे शब्द पुरे झाले नाहीत, तोवर कोशलनरेश आपल्या रथांतून खाली उतरला आणि त्याने काशीनरेशाला नम्रपणें वंदन केले. ब्रम्हदत्तकुमारही रथांतून खाली उतरला आणि त्याने कोशलनरेशाला प्रेमाने मिठी मारली.

ब्रम्हदत्तकुमार हा बोधिसत्व होता. कोशल-नरेशाच्या आग्रहावरुन ब्रम्हदत्तकुमाराने त्याला आदर्श शासक होण्यासाठी कांही महत्वपूर्ण सूचना केल्या. त्यानंतर दोघे राजे परममित्र बनले.

*- विश्वावसु*





# बुटकी राक्षसीण

जंगलाच्या शेजारी लहानमोठ्या डोंगरांचा एक प्रदेश होता. तिथे गुहादेखील होत्या. इथून एक कोसावर मातंग नांवाचे गांव होते. त्या गांवाच्या शाळेंत मधुकर शिक्षक होता. नुकतेच त्याचे लग्न झाले होते. त्याची पत्नी कोमला सुस्वभावी होती.

एके दिवशी ग्रामाधिकाऱ्याच्या घरी कांहीतरी कौटुंबिक समारंभ होता, तिथें कोमला आपली शेजारीण पल्लवी हिच्याबरोबर जायला निघाली. पल्लवी कोमलला म्हणाली, "तुझ्या अंगावर एकही दागिना नाही. निदान कानांत या कुड्या तरी घाल!" असं म्हणून तिने पेटींतून एक कुडीजोड काढला आणि कोमलच्या कानांत घातला.

समारंभ संपल्यावर जेव्हां कोमल घरी आली तेव्हां तिच्या लक्षांत आलं की एका कानांतले कुडे हरवलंय. त्याची मागची खीळ निघाली असावी आणि ते वाटेत रस्त्यांत कुठेतरी पडले असावे. कोमलाने ही सारी हकीकत मधुकरला सांगितली व म्हटले, "पल्लवीच्या कुड्या मी घ्यायलाच नको होत्या. आता कांही झालं तरी तिला नवीन कुडी बनवून द्यायला हवीत."

पत्नीचे हे शब्द ऐकून मधुकर घाबरला. त्याचा जणूं श्वासच अडकला. नवीन लग्न झालेलं होतं, बायकोला तो रागावणार थोडाच होता? नवीन कुडीजोड बनवायचा तर निदान हजारभर रुपये तरी लागले असते. काय करता येईल ते त्याला समजेना. कुणाजवळ मदत मागावी याचा तो विचार करुं लागला. दिवसभर त्याला चैन पडत नव्हते.

रात्रीं चांदणे पडले होते. विचारांत गढलेला असल्यामुळें आपण कोणत्या दिशेला जातो आहोत ते मधुकरच्या ध्यानांत आले नाही. तो डोंगरांतल्या गुहांजवळ येऊन पोंचला. त्याने मान वर करुन पाहिले तो एका गुहेसमोर एक बुटकी राक्षसीण बसलेली होती. मधुकरला बघून तिने विचारले, "मध्यरात्री तू इथें कशाला आला आहेस?"

- उमा भिडे -

राक्षसीला बघून मधुकर जास्तच घाबरला. त्याच्या तोंडून शब्द आले, "कानांतल्या कुड्या, कानांतल्या कुड्या."

राक्षसी चकित होऊन त्याला म्हणाली, "एक कुडीजोड काय घेऊन बसला आहेस? माझ्याजवळ तऱ्हेतऱ्हेची कर्णफुले व भरपूर दागदागिने आहेत. माझ्या लग्नासाठी माझ्या आईने ते जमवून ठेवलेले आहेत. माझ्या आईला आशा वाटतेय की आज ना उद्या, कुणीतरी सुंदर राक्षस माझ्याशी लग्न करील. राक्षस तरुण येतात. दागिने बघतात नि मलाही बघतात. माझं बुटकेपण बघून ते परत जातात. मला वाटतं, या जन्मांत कांही माझं लग्न होणार नाही. नकोत मला हे दागिने. मी हे तुला देऊन टाकते. खरंच, घेऊन जा तू!" असं म्हणून ती गुहेंत गेली आणि एक जड गांठोडे ओढत ओढत तिने बाहेर आणले. गांठोडेभर सोन्यारुपयाचे दागिने बघून मधुकर तर गोंधळूनच गेला. ते दागिने घेऊन जायला त्याने प्रथम 'नाही' म्हटले, पण त्या राक्षसीने खूपच आग्रह केला म्हणून त्याने ते गांठोडे आपल्या खांद्यावर टाकले आणि तो घराकडे चालायला लागला.

जेव्हां तो पल्लवीच्या घरावरुन जात होता, तेव्हांच गाईला चारा घालायला म्हणून पल्लवी घराबाहेर आली होती. तिने त्याला बघितले आणि आश्चर्याने विचारले, "एवढ्या रात्री कुठे जाऊन येता आहात? नि खांद्यावर हे गांठोडे कसले आहे?" मधुकरने धापा टाकीतच खांद्यावरचे



गांठोडे खाली ठेवले. त्यांतून एक कुडीजोड त्याने बाहेर काढला. पल्लवीला कुडीजोड देत मधुकर म्हणाला, "माझ्या पत्नीने तुमचे एक कुडे हरवले आहे. त्याच्याबदली मी तुम्हाला ही जोडी देतो आहे." पल्लवीने जेव्हां खूप खोदून विचारले की हे गांठोडे कुठे सांपडले, तेव्हां मधुकरला नाईलाजाने खरी गोष्ट सांगावी लागली. बुटक्या राक्षसीबद्दल सांगून तो आपल्या घरी गेला.

मधुकरची कहाणी ऐकून थक्क झालेली कोमला त्या दागिन्यांकडे बघतच राहिली. भानावर येत ती म्हणाली, "त्या मायावी बुटक्या राक्षसीच्या दागिन्यांशी आपल्याला काय देणं घेणं? जर चोरांना या दागिन्यांबद्दल कळलं तर आपल्या जिवाला नसता धोका निर्माण होईल."

त्या दागिन्यांमुळें दोघा पतीपत्नीला रात्रभर झोंप लागली नाही. शेजारच्या पल्लवीने आपल्या



नवऱ्याला झोपेतून उठवले आणि म्हटले, ''तावडतोब आपली बैलगाडी जोडा. आपल्याला त्या बुटक्या राक्षसीकडे जायचे आहे. जिने गांठोडेभर दागिने सहज दिले, तिच्याकडे गाडीभर दागिने निश्चित असतील. आपण ते आणूं या.'' पल्लवी ठामपणे बोलत होती.

पल्लवी नि तिचा नवरा जेव्हां त्या पहाडी गुहेजवळ पोंचले, तेव्हां बुटकी राक्षसीण गुहेच्याबाहेर बसलेली होती. पल्लवी इथें कशासाठी आली आहे हे जेव्हां त्या राक्षसीला कळलं, तेव्हां ती म्हणाली, ''तुझं डोकं तरी अजब आहे. कुणीतरी अनोळखी माणूस येऊन सगळे दागिने घेऊन गेला. जेव्हां माझ्या आईला हे कळलं, तेव्हां ती मला खूप रागावली. संतापाने ती लालपिवळी झाली आहे नि आंत गुहेंत बसलीय. तुम्हाला दोघांना जर तिने पाहिलं ना, तर ती तुम्हाला फाडून तुमचे तुकडे तुकडे करुन टाकील. तिने तर मला सांगितलंय की जोपर्यंत मी ते दागिने परत आणणार नाही तोपर्यंत ती मला गुहेंत घेणार नाही.''

जेव्हां पल्लवीला स्पष्ट समजलं कीं आता राक्षसीकडे दागिने नाहीत, तेव्हां ती म्हणाली, ''हे बघा, ते तुमचे दागिने अगदी सुरक्षित आहेत. आमच्या शेजारी मधुकर राहातो त्याच्याजवळ ते दागिने आहेत. माझ्याबरोबर चला आणि आपले दागिने परत न्या.'' पल्लवीने तोडगा सुचवला.

त्यावर राक्षसी म्हणाली, ''दिवसा कुठे जायला मी घाबरते. माणसांच्यात वावरायची मला भीती वाटते.''

क्षणभर विचार करुन पल्लवी म्हणाली, ''माझ्याबरोबर एक पोतें आणले आहे. त्यांत मी तुम्हाला बसवते आणि पोत्याचे तोंड बंद करते. त्यांत तुम्ही आरामशीरपणे झोंप काढा. मी तुम्हाला बैलगाडीत घेऊन जाईन आणि आमच्या गोठ्यात अगदी सुरक्षित ठेवीन. गोठ्याला बाहेरुन कुलूप लावीन. सकाळीं तुम्हाला पोत्यांतून बाहेर काढीन. मग तुम्ही मधुकरच्या घरी जा आणि त्या नवराबायकोंना चांगला धडा शिकवा. नखांनी बोचकारा, दांतांनी चावे घ्या! तुमचे दागिने परत घेऊन जा म्हणजे तुमची आई खूष होईल नि तुम्हाला घरांत घेईल.'' बुटक्या राक्षसीने तिचे म्हणणे मानले.

इकडे भीतीने मधुकरचा जीव अर्धमेला झालेला होता. त्याला ताप आला. कोमलाने त्याला धीर देत म्हटले, ''तुम्ही इतके घाबरता



कशाला? तुम्ही कांही राक्षसीला फसवलेले नाही, कांही चोरी, लबाडी केलेली नाही. पण हे मात्र खरं, परक्याचे धन विषारी सापासारखे असते. मी एकटी कांही हे जड गांठोडे ओढत त्या गुहेजवळ घेऊन जाऊं शकणार नाही. उन कमी झालं कीं मी स्वत:तिथे जाईन आणि त्या राक्षसीला आपले दागिने घेऊन जायला सांगीन.''

मधुकरने होकार दिला. संध्याकाळी कोमला निर्भयपणे त्या गुहेजवळ गेली. त्यावेळी एक भयंकर आकाराची राक्षसीण गुहेसमोरच्या दगडावर बसली होती. ती स्वत:शीच बडबडत होती, ''माझी लाडकी पोर, माझी बाळी, कुठे गेलीस ग तूं? मी जराशी रागावले म्हणून माझ्यावर रुसून कां निघून जायचंस तूं? तुझ्याशिवाय हे डोंगर, या गुहा, मला अगदी बालवंटासारख्या वाटताहेत ग!''

कोमला निमूटपणें राक्षसीजवळ गेली आणि ''आई'' अशी हांक मारुन तिने प्रणाम केला. नंतर सारी हकीकत तिला सांगितली आणि तिला विनंती केली कीं तिने आपले दागिने परत घेऊन जावेत.

राक्षसीने कोमलाला नखशिखान्त न्याहाळले व नंतर ती म्हणाली, ''त्या दागिन्यांमुळेच तर मी माझ्या लाडक्या लेकीला रागावले. ती बिचारी नाराज होऊन कुठेतरी गेली आहे. कुठे गेलीय कोण जाणे! तिचे हाल होत असतील. मला त्या दागिन्यांची मुळीच गरज नाही.'' ती राक्षसीण रडतरडत बोलत होती.

राक्षसिणीचे बोलणे ऐकून कोमला चिडून म्हणाली, ''हे बघा, मी तुम्हाला आणखी एकवार स्पष्ट सांगते. आम्हाला तुमच्या मुलीचे दागिने नकोत. ते तिचे आहेत. आम्ही कष्टाची कमाई












खरी असते असं मानतो. तुमची मुलगी ठेंगणी आहे म्हणून ती राक्षसजातींत राहणें अशक्य आहे. माणसांच्यामधेही तिचे राहाणे संभव नाही. म्हणून ती लौकरच तुमच्या घरी परत येईल. पण तुम्ही अगोदर माझ्याबरोबर माझ्या घरी चला, आणि आपले दागिने परत घ्या."

राक्षसीचा राग शांत झाला. नाईलाजाने ती कोमलाच्या बरोबर तिच्या घरी निघाली. गांवात पोचेपर्यंत मध्यरात्र झाली होती. कोमलाने दिलेले गांठोडे मोठ्या राक्षसिणीने खांद्यावर घेतले आणि ती जायला निघाली, तेव्हां पोत्यांत बंद केलेल्या बुटक्या राक्षसीचा आवाज तिला ऐकूं आला. "मी तहानभुकेने इथें तडफडते आहे. मला बाहेर काढा. या खोलीचं दार उघडा."

मोठ्या राक्षसिणीने लेकीचा आवाज ओळखला. ती खुषींत ओरडायला लागली, "आले ग पोरी, मी आले हं!" आणि ती गोठ्याजवळ पोचली. एक लाथ मारुन तिने ते दार खाली पाडले आणि पोत्यांत बांधून ठेवलेल्या आपल्या मुलीला बाहेर काढले. तिने मुलीला विचारले, "तुला कुणी हा त्रास दिला? कोण आहेत हे दुष्ट लोक?"

बुटक्या राक्षसीने जवळच असलेल्या पहुवीच्या घराकडे बोट दाखवले. झालं, मोठी राक्षसीण जोरांतच त्या घरापाशी गेली. आणखी एक लाथ मारुन तिने ते दार पाडले व घरांत पाऊल ठेवले. "अरे दुष्टांनो, आता तुम्ही माझ्या तावडीतून वांचणार नाही." असं ओरडत ति चारी बाजूंना बघितले. प्रथम घरांतल्या वस्तू मोडून तोडून फेकल्या आणि पहुवीला तिने बोंचकारले, तिला चावले. नंतर घराबाहेर येऊन ती आपल्या मुलीला म्हणाली, "या दुष्ट माणसांना आपली राहाण्याची जागा ठाऊक झाली आहे. आता आपण दुसरीकडेच राहायला जाऊं या." मुलीला घेऊन लांबलांब पावलें टाकीत ती जाऊं लागली. कोमला तिला दागिन्यांचे गाठोडे घेऊन जायला ओरडून सांगत होती. पण संतापलेली राक्षसीण मागे वळून न बघता तशीच पुढे वेगाने निघून गेली.

इतका मोठा अपमान पहुवीला सहन होणे शक्यच नव्हते. लोकांना सकाळीं समजण्याच्या-पूर्वीच रातोरात ती आपल्या पतीसह ते खेडेगांव सोडून निघून गेली.



# आस्तिक - नास्तिक

**राम** आणि भरत समोरासमोर राहात होते. दोघे श्रीमंत होते. लहानपणापासून ते जिवलग मित्र होते. पण दोघांचे विचार भिन्न होते. राम आस्तिक होता. माणसाच्या आयुष्यांतला आनंद वा दुःख हे दैवाधीन असते असं त्याचं म्हणणं होतं.

"नद्या, धबधबे या साऱ्यांमागे परमेश्वराची कृपा असते" राम म्हणायचा.

"तर मग भूकंप, वादळें हीदेखील त्याचीच कृपा असणार." भरत चिडवायचा.

"तू अगदी नास्तिक आहेस" असं रामने म्हटलं की भरत हंसून गप्प बसायचा.

दोघेही मित्र वयस्कर झाले. राम शेवटच्या घटका मोजीत होता तेव्हां त्याला स्वर्गात न्यायला देवदूत आले. रामने त्यांना नमस्कार करुन म्हटले, "देवदूतांनो, माझा नास्तिक परममित्र भरत समोरच्या घरांत राहातो. तोही माझ्याप्रमाणेच मृत्यूपंथाला लागला आहे. त्यालाही माझ्याबरोबर स्वर्गात घेऊन चला. परमेश्वराचे दर्शन झाले कीं त्याचा भ्रमनिरास होईल."

देवदूतांनी तसे केले. सिंहासनावरचा देव पाहून भरतला आश्चर्य वाटले. तितक्यांत गंभीर आवाज ऐकूं आला. "तुझा संशय दूर झाला कां?"

भरत धिटाईने म्हणाला, "हो, पण जिथं मानवलोक आहे, तिथे परमेश्वर केवळ निर्गुण आहे." असं म्हणून त्याने देवाला प्रणाम केला.

*- रमण शास्त्री*



      

अधेमधे येत जा हं!''

जिनलला खूप आनंद झाला. ते स्वप्न होतं कीं सत्य, हे तिला पडताळून पाहायचं होतं. म्हणून तिने हांक मारली, ''माझ्याबरोबर गप्पा मारायला कुणी येणार आहे कां?'' ''हो, मी येईन.'' पलंगावर पहुडलेली चिमुकली बाहुली म्हणाली.

''अग अे बाहुले, तुलादेखील बोलायला येऊं लागलं? अरे देवा! हे मला माहीत नव्हतं. मला राग आला कीं मी तुला कुठेही फेकून देते. तुला लागतं कां ग?''

''हो तर, मला खूप दुखतं मग!''

''अे, मला माफ कर हं. पुन्हा नाही मी तुला फेकणार.''

जिनलने बाहुलीच्या अंगावर मलम लावलं. दोघीजणी हंसल्या, खेळल्या; त्यांनी गप्पा मारल्या आणि मजेंत वेळ घालवला. पण तितक्यांत दरवाज्यावरची घंटा वाजली. जिनल दार उघडायला म्हणून बाहेर धांवली. तिचे आईबाबा घरीं परत आले होते. जिनल खोलींत परत गेली तर काय, तिची बाहुली पुन्हां निर्जीव झाली होती. जिनलच्या मनांत विचार आला, ''आपण माणसें आपल्या भोंवतालच्या वातावरणाबद्दल, वस्तूंबद्दल इतके बेफिकीर व निष्काळजी असतो कीं आपण सजीव वस्तूंना निर्जीव वस्तूंसारखे वागवतो.''





# दुर्वासाचे हास्य

सीतापुरमधें राहाणारा दुर्वास गांवातल्या कांही सधन गृहस्थांपैकी एक होता. त्याच्या वाडवडिलांपासून घरांत बरीच संपत्ती होती. त्याचा एक मोठा वाडा होता. पंचवीस अेकरांची शेती व पन्नास अेकर चराऊ जमीन त्याच्या मालकीची होती. एक मोठी आमराई होती. त्यामुळें गांवातले लोक त्याचा आदर करीत. त्याचं खरं नांव रामचंद्र होतं, पण त्याच्या संतापी स्वभावामुळें लोक त्याला दुर्वास म्हणत. तो कुणावरही चिडला कीं तोंडाला येईल ते तो बेधडक बोलून टाकत असे. मागेपुढे पाहात नसे. त्याला दुर्वास म्हटलं म्हणून तो चिडला नाही, उलट त्याला तो गौरवच वाटला होता.

दुर्वासला तीन मुले होती. दोन मुली व एक मुलगा. मुलींची लग्नें होऊन त्या सासरी गेल्या. दुर्वासचा स्वभाव त्याच्या व्याह्यांनाही चांगल माहीत होता. आता राहिली त्याची पत्नी. सकाळपासून नवऱ्याचं शिवराळ बोलणं ऐकायची आता तिला संवयच झाली होती.

पण त्याचा मुलगा किरीट ह्याला मात्र आपल्या वडिलांचा स्वभाव मुळींच आवडत नसे. त्याला मुली सांगून येऊं लागल्या होत्या. पण त्याला मनांतून भीती वाटत होती कीं आपल्या वडिलांचा तापट स्वभाव त्याच्या पत्नीला सहन होईल कां? दोघांच्यामधे जर भांडण होऊं लागले तर? भविष्यांत काय वाढून ठेवले आहे कुणास ठाऊक! अखेरीस, वडिलांच्या इच्छेनुसार त्याचे लग्न ठरले.

त्याची वधू अरविंदा ही एका श्रीमंत शेतकऱ्याची एकुलती एक मुलगी होती. एकटेच अपत्य असल्यामुळें तिच्या आईवडिलांनी तिला अतिशय लाडाकोडात वाढवले होते. तिला कोणतेही काम करायला ते सांगत नसत.

लग्न झाल्यानंतर दुसऱ्याच दिवशी किरीटने आपल्या पत्नीला वडिलांच्या तिरसट स्वभावाविषयीं सारे कांही नीट समजावून



सांगितले. त्याने तिला सांगितले कीं वडिलांच्या बोलण्यावर उलट उत्तर देऊं नये व मुकाट्याने त्यांचा राग सहन करावा. नवीन सून घरांत आलेली होती, म्हणून तीनचार दिवस दुर्वास जरा गप्प होता. आपला राग त्याने आवरुन धरला होता. त्यानंतर मात्र त्याला राहावेना. नोकराचाकरांना तो रागावून शिवीगाळ करायला लागला, व तोंडाला येईल ते बोलत सुटला.

एके दिवशी सासूने दिलेली दुधाची भरलेली चरवी घेऊन अरविंदा घराच्या मागील दारांतून येत होती. ते पाहून दुर्वासचे पित्त उसळले. "तुझ्या सासूला काय झालं? तिने स्वतः अशी भरलेली चरवी आणली असती तर तिचं कंबरडं मोडलं असतं कीं काय?"

खरं म्हणजे नव्या सुनेला काम सांगितलेलं त्याला मुळीच आवडलं नव्हतं. पण त्याचा कोरडा खरखरीत आवाज़ आणि बोलण्याची आक्रस्ताळी पद्धत पाहून अरविंदा पार घाबरुन गेली. तिच्या हातातून चरवी निसटली आणि सारे दूध सांडून गेले. ती घाबरली, रडायला लागली, आणि धावतच घरांत गेली. हा सगळा गोंधळ पाहून दुर्वास क्षणभर स्तंभित झाला.

दुसऱ्या दिवशी दुपारी दुर्वास ओसरीवर बसून कुणाशीतरी बोलत होता. तेव्हां अरविंदा फडक्याने एक कांचेचे भांडे साफ करीत होती. ते पाहून दुर्वास संतापला व तिला म्हणाला, "सगळे नोकर कुठे मरायला गेलेत? जेवूनखाऊन नुसत्या ढेकरा देतात, कामाच्या नांवाने शून्य! एकेकाचा चांगला समाचार घेतो मी आता. ऐकायला येतंय ना, कुठे आहेत सगळे? आहे कां कुणी इथें?"

सासऱ्याचा संताप आणि आरडाओरडा पाहून अरविंदा दचकली आणि तिच्या हातातून ते कांचेचे भांडे खाली पडून फुटले. अशा तऱ्हेने देशी परदेशी सुंदर वस्तू अधूनमधून जमिनीवर खाली पडत व कांहीवेळां फुटून जात. सुरवातीला दुर्वासला आपल्या कोपिष्ट स्वभावाची लाज वाटत होती. म्हणून तो स्वतःवरच जास्त चिडत होता.

आणखी एक दिवस अरविंदा आपल्या सासूला व सासऱ्यांना जेवायला वाढत होती तेव्हां दुर्वासने सहज भाजीचा एक घांस तोंडात घातला. झालं, त्याचा राग एकदम उफाळला. "मीठ मिळत नाही कीं काय बाजारामधे? अगं, माहेरी स्वयंपाक करायला शिकली नाहीस; ठीक, पण जेवण वाढायलासुद्धां तुला शिकवायला हवं कां?" तो जोरांत ओरडला. त्याचा चढलेला आवाज ऐकून अरविंदा भेदरुन गेली आणि ती आंत जात होती, तितक्यांत तिच्या हातांतले भाजीचे भांडे खाली पडले. ती रडतरडत आपल्या खोलींत गेली आणि पांघरुण डोक्यावर घेऊन पडून राहिली. आज आपण उगीचच रागावलो असं दुर्वासला वाटलं. भाजींत मीठ घालायचं विसरलंय हे त्याला नीट सांगता आलं असतं. उगीचच संतापून त्याने सुनेचं मन दुखवलं हे त्याच्या लक्षांत आलं. त्याच्या वागण्याचा त्याला जरा पश्चात्ताप वाटला.

त्या दिवसापासून सासरेबुवांचा साधा आवाज जरी ऐकला तरी अरविंदा भीतीने थरथर कांपायला लागली. तिच्या हातांत जे असेल ते हातांतून खाली पडायला लागलं. या नव्याच संवयीची दुर्वासला खूप काळजी वाटू लागली. त्याने वैद्यबुवांना बोलावणें पाठवले.

वैद्याने अरविंदाशी थोडा वेळ बोलून तिच्या भीतीचे कारण विचारले. नंतर तो दुर्वासाशी बोलताना म्हणाला, "हे बघा, तुमची सूनबाई तुमच्या नुसत्या आवाजाला घाबरते. तिचा स्वभाव अगदी कोमल आहे. तुम्ही जरा सावकाश व न रागावता बोललात तर बरं होईल. तिची भीती कमी होईल व त्यानंतरच ती बरी होईल."

वैद्याच्या बोलण्यांत तथ्य आहे हे दुर्वासाला पटले. आपल्या सुस्वभावी सुनेच्या बाबतीत जसाजसा तो विचार करायला लागला आणि आपल्या कहारी स्वभावामुळें ती आजारी पडली आहे हे ही त्याला उमजले. त्याने आपला स्वभाव बदलण्याचे ठरवले.

लौकरच दिवाळीचा सण आला. त्यासाठी त्याच्या मुली व त्यांच्या घरचे सर्वलोक दुर्वासच्या घरी जमलेले होते. घरांत सर्वजण गप्पागोष्टी करीत, हंसत खिदळत बसले होते. दुर्वासच्या मुली, जांवई, नातवंडे आणि दुर्वासची पत्नी आनंदात होती. त्यावेळी अचानक दुर्वास घरांत शिरला. सगळी मंडळी एकदम गप्प झाली. जणू कांही त्यांची तोंडं शिवून टाकली होती. ते सारेजण उठले व एकएकजण आंत जाऊं लागले तोंच दुर्वासने हंसतहंसत म्हटले, "आजपासून मी देखील तुमच्याबरोबर गप्पा मारताना हंसणार आहे, बोलणार आहे. मी रागावणार नाही पण जरी संवयीने रागावलो तरी तुम्ही घाबरुं नका. मला तसं सांगत जा. या सगळे, बसा इथें, अगदी आरामांत बसून गप्पा मारा." दुर्वासचे शब्द ऐकून घरांतले वातावरण बदलले आणि सर्वजण खुषींत हंसूं लागले.



# भारताची ओळख



१. पश्चिम बंगालमधल्या चित्तरंजनच्या कारखान्यांत रेल्वेची इंजिने बनवली जातात. पहिले ॲंजिन केव्हां बनवले होते?
अ. १९५०-५१, ब. १९५५-५६,
क. १९५९-६०, ड. १९६१-६२

२. सम्राट अशोकाचे आज्ञापत्र कोणत्या भाषेत लिहीलेले होते?
अ. मागधी ब. ब्राम्ही
क. सौरसेनी, ड. पाली.

३. अखिल भारतीय हरिजन संघाची स्थापना कुणी केली?
अ. आंबेडकर, ब. गांधीजी,
क. जगजीवनराम, ड. धों.के. कर्वे

४. कोणता कवी चांभार जातीचा होता?
अ. कबीर, ब. साधन,
क. रैदास, ड. नामदेव.

५. केंद्रशासित राज्यांपैकी सर्वात मोठे राज्य कोणते आहे?
अ. दिल्ली, ब. पॉंडिचेरी,
क. अंडमान-निकोबार बेटे, ड. चंडीगड

६. वरील चित्रांतले राष्ट्र नेता कोण आहेत?

७. भाविक मुस्लीमाने दिवसांतून किती वेळां प्रार्थना म्हटली पाहिजे?
अ. १, ब. ३
क. ४ ड. ५

८. कोणत्या राज्यांत सर्वांत जास्त कारखाने आहेत?
अ. तमिळनाड,
ब. महाराष्ट्र,
क. गुजरात,
ड. आंध्र प्रदेश

*(उत्तरे पुढील महिन्यांत)*

## ऑक्टोबर प्रश्नावलीची उत्तरें

१. छत्तीसगड, रायपूर
२. राजस्थान
३. लॉर्ड हार्डिंज
४. सुंदरलाल बहुगुणा
५. कर्नूल
६. १९१९





# गणेश पुराण

आवारात इतकी गडबड होत होती तरी गडी घोरत पडलेला होता. शेजारीच पत्रीफुलांखाली गणेशाची मूर्त होती. उसाचा रस पीत असतां जमिनीवर जो रस गळला त्यामुळे चिखलच झालेला होता. पहारेकऱ्यांना बोलावून त्यांना विचारले तर ते म्हणाले - "बरीच रात्र उलटली, गडी घोरत पडलेला होता, आम्ही सुद्धा पेंगू लागलो. इतक्यात हत्तीचा चीत्कार ऐकू आला आणि डोळे उघडून पाहिले, काळोखात एक मोठा हत्ती दिसला, ऊस ओढून ओढून खात होता आणि चरकातून उसाची ताटे बाहेर येऊन पडतात तशी ताटे टाकीत होता. आम्हाला फार भीती वाटली. आम्ही तेथून पायच काढला!"

जमीनदाराचे मन पार बदलून गेले. तो तसाच निघाला आणि गड्याच्या पायां पडून त्याने साष्टांग नमस्कार घातला. गड्याची झोप मोडली तो उठून उभा राहिला. जमीनदार त्याच्या पायांवर डोके ठेवून त्याते पाय घट्ट धरून पडूनच होता.

जमीनदाराच्या बायकोने गणेशाच्या मूर्तीला नमस्कार केला व म्हणाली - "प्रभो! तू इतक्या दिवसानंतर का होईना आमच्यावर अनुग्रह केलास. आम्ही धन्य झालो!" असे म्हणत तिने रात्री घडलेले वृत्त गड्याला सांगितले.

ते अद्भुत वृत्त ऐकून लोकांचे थवेच्याथवे ते दृश्य पहायला तेथे जमले. सर्व आवार माणसांनी भरुन गेले. जमिनीवर हत्तीच्या पायांनी खड्डे खड्डे झालेले स्पष्ट दिसत होते. त्यांत उसाचा रस साठलेला होता. तोच तीर्थ म्हणून सर्व प्राशन करू लागले, आणि उसाचा चोथा गणेशाचा प्रसाद म्हणून उचलून घेऊन जाऊ लागले.

गडी, त्याची बायको व मुलगा सर्वांनी मिळून गणेशमूर्तीला नमस्कार केला व निवेदन केले -



"देवा, आम्ही पत्रीपाचोळा वाहूनसुद्धा तुझी कधी पूजा केली नाही, तुझ्यासाठी म्हणून पाठविलेला ऊससुद्धा तुला अर्पण केला नाही आणि तू आमच्यासाठी एवढे कष्ट कशाला उपसलेस? तू हत्तीच्या रूपे इतरांना दर्शन दिलेस आणि आम्हाला कां दर्शन दिले नाहीस? मी थोरत पडलो होतो!" असे म्हणत गडी लहान मुलासारखा रडू लागला.

तेव्हां मूर्तीच्या जागी गणपती स्वतः हातात ऊस घेऊन गड्याला साक्षात्कार झाला. गड्याने मुलाला देऊन जोउस पाठविला होता, तोच गणेशाच्या हातात होता.

गणपतीने आपल्या सोंडेने गड्याला जवळ ओढून घेतले व त्याच्या डोक्यावर अभय हस्त फिरवीत म्हणाला - "बाबा रे! कुल, जाती व आचार वगैरे हे मी निर्मिलेले नाहीत. सर्व माणसांनीच कल्पनेने निर्मिले आहेत. माझ्याजवळ लहान, मोठा, गरीब श्रीमंत हा भेद नाही! म्हणूनच तुला दर्शन दिले." असे म्हणत असतांच अंतर्धान पावला.

लोक हात जोडून गड्याला म्हणाले - "बाबा रे, तुझ्या भक्तिप्रसादानेच आम्हाला गणेशदर्शनाचे भाग्य लाभले.

"ईक्षु म्हणजे ऊस! ईक्षु गणपती नामे गणपती प्रसिद्ध झाला. हातात ऊसाचे कांडे करून बसलेल्या गणपतीच्या मूर्तीची प्रतिष्ठा करण्यात आली. तेथे एक मोठे देऊळ बांधण्यात आले." इतके सांगून पावन मिश्राने कथा पूर्ण केली.

देवळाच्या मंडपातल्या चित्रांच्या कथा पावनमिश्राने सांगितल्या, परंतु मंडपाच्या प्रमुखद्वारावर जे चित्र होते त्याची कथा राहिलीच होती. ते चित्र फारच सुंदर होते. चित्रकाराची प्रतिभा स्पष्ट प्रगट होत होती. दररोज ते चित्र फार लक्षपूर्वक फारवेळ पहात राहणाऱ्या एका तरुणाने पावनमिश्राला नमस्कार करुन विचारले - "पंडित प्रवर! या देवळातली सर्व चित्रे कोणी हो काढली? त्या चित्रकाराचं चरित्र आपणांस माहीत असल्यास सांगण्याची कृपा करावी. प्रमुखद्वारावर जे चित्र आहे ते चित्र जणू कांही माझ्या मनावरच कोरले गेले आहे. त्या चित्राची काय गाथा आहे?"

पावनमिश्रांनी त्या तरुण मुलाकडे प्रेमादराने पाहिले व म्हणाले - "बाबा रे! तुला पाहिले की तू स्वतः एक चित्रकार असावासा वाटते आहे! प्रमुखद्वारावर जे चित्र आहे, ते मलासुद्धा फारच आवडले आहे. त्याची गाथा शेवटी सांगून गणेशचरित्र संपूर्ण करतो! तुला सुद्धा ते ऐकण्याची



उत्सुकता आहे, तर मग तू ते ऐकच!" असे म्हणत त्यांनी कांही वेळ डोळे मिटले व कांही वेळ कांहीतरी आठवीत असल्यासारखे दिसले.

वातापी नगराला, साधूंच्या बरोबर सुमारे चवदा वर्षाचा एक तरुण मुलगा आला आणि वातापी गणपतीच्या देवळातच कायम राहू लागला. तो राहणारा कोठला, त्याच्या गांवाचे नांव काय, हे त्यालासुद्धा माहीत नव्हते. त्याच्या कपाळावर मोठी जखम असल्याचा एक वण पाहून बिचाऱ्याच्या डोक्याला कसली तरी मोठी जखम झाल्यामुळे त्याची स्मरणशक्तीच गेली की काय असे सर्वांना वाटले. तो मुलगा मुका बोलतो किंवा आवाज काढतो, तेवढा सुद्धां बोलत नसे. भिंतीवर चित्रे काढीत असे. मंडपाच्या भिंतीवर, जमिनीवर तो चित्र काढी, त्यावेळी त्याचा चेहरा पूर्णचंद्रासारखा जणू कांही चकाकत असे, म्हणून त्याला विघ्नेश्वराची चित्रे काढणारा चित्रकार म्हणून मधली अक्षरे लुप्त होऊन फक्त 'वि-चित्र' या नावानेच लोक त्याला हाक मारू लागले. ते विचित्र हेच नांव त्याला शेवटपर्यंत राहिले.

तोपर्यंत गजानन पंडित बरेच वृद्ध झाले होते. ते मुलांना आपल्या घरी गणपतीच्या गोष्टी सांगत. विचित्र त्या कथा श्रद्धाभक्ति पूर्वक एकाग्र चित्ताने ऐकत असे. कथा ऐके, व त्याच्या दुसऱ्याच दिवशी त्या कथेतील सारांश भिंतीवरच्या कोणत्या तरी दगडावर चित्रित झालेला दिसे.

गजानन पंडितांचे विचित्रावर फारच प्रेम होते. ते त्याला आग्रह करून घरांत येऊन बसायला सांगत, परंतु तो उंबरठ्याबाहेरच बसून कथा ऐके



व म्हणे- "आजोबा! इकडे बसून ऐकत असतां तुम्ही मला एकट्यालाच ती कथा सांगता आहां असे अगदी चांगले ऐकू येते." विचित्र गणेशाची चित्रे काढी ती पाहून गजानन पंडित देहभान विसरून जात व गणेशाविषयीची अनेक आख्याने त्याला म्हणून निराळी सांगत.

विचित्राच्या मागे मागे नेहमी मुलांचे थवे असत. तो चित्रे काढी तेव्हां निमूटपणे पाहून आनंदित होऊन, तशीच लहान लहान चित्रे ती मुले काढीत. अशातऱ्हेने गांवातल्या मुलांना अनायासे चित्रकलेचे लेणे प्राप्त झाले.

विचित्र दिवसभर रस्त्यांवर, भिंतीवर गेरूने किंवा खडूने, खुज्याच्या दगडाने, चित्र काढी आणि वातापि गणपतीचा जो प्रसाद वगैरे मिळे, त्यावर आपली भूक भागवी, व देवळाच्या पायऱ्यांवर किंवा गांवातल्या कोठल्या तरी घराच्या ओसरीत बाहेर झोपत असे.



गांवाच्या बाहेर कुंभार, लोहार, चांभारांची वस्ती आणि महारवाडा होता. विचित्र म्हणजे त्यांना जीव की प्राण वाटे. तो रात्री अपरात्री केव्हांही आला की त्याच्यासाठी ठेवलेली मीठ भाकर त्याला खायला घालीत व त्याला झोपायला सतरंजी, घोंगडी, हातरी, कांहीतरी अंथरून देत आणि मग स्वतः निजत.

तो कोण कोणाचा हे तो विसरून गेला असला तरी विचित्रला भावंडे व आईवडील सर्व होते.

वातापी नगरापासून थोड्या अंतरावर असलेल्या एका गावांत एका मध्यमवर्गीय कुटुंबात विचित्राचा जन्म झाला. वडिलांच्या हाताखाली त्याला लहानपणीच चित्र काढण्याचा नाद लागला. भाऊभावजयींनी त्याच्याशी दुर्व्यवहार करून त्याला घराबाहेर हाकलले. त्या मुलाला गणपती म्हणजे सर्वस्व वाटे. तो वातापि नगराला निघाला. वेळेवर खायला प्यायला नाही, म्हणून अशक्त झाला व आजारातच हिंडू फिरू लागला. तसाच जात असतां घेरी येऊन तो एका दगडावर पडला. तो बेशुद्धावस्थेत पडला असतां साधूंची एक टोळी जात होती त्यांनी पाहिले व त्यावर औषधोपचार करून त्याला बरे केले. यांच्या-बरोबरच तो वातापी शहरी आला. हेच थोडक्यात विचित्राचे बालचरित्र, त्या वर्षी वातापी नगरात गणेशचतुर्थीच्या दिवशी एक प्रदर्शन करायचे ठरले.

गणपतीची पुरुषाएवढी मूर्ती करून ती विभिन्न रंगांनी रंगवून प्रदर्शनात ठेवण्यासाठी चढाओढ लागली. सर्वांत मोठी व सुंदर ठरेल ती मूर्त एक हजार सुवर्णमुद्रा देऊन खरेदी केली जाईल असे जाहीर झाले. नगराध्यक्ष चित्रकाराला रत्नखचित सुवर्णकंकण इनाम म्हणून देणार असल्याचेही जाहीर झाले. त्या प्रदर्शनाच्या चढाओढीला दरबारी चित्रकार व मोठमोठे प्रसिद्ध चित्रकार तयार झाले. त्यांनी खूप पैसा खर्च करुन मागविले. त्यांनी सोनेरी रंग आणविले. निरनिराळ्या रंगाचे वर्ख मागविले आणि अशा तऱ्हेने विद्युत प्रकाशासारखे गणपती तयार करुन प्रदर्शनात ठेवले.

विचित्राचा एक कुंभार मित्र होता. त्याने विचित्राने सांगितल्याप्रमाणे चिकणमातीचा एक गणपती तयार केला. विचित्राने चुना, कोळसा, शेंदूर, गेरू, हळद वगैरे रंग वापरुन त्याला सुंदर रंग दिला.

विचित्राने रंगवून तयार केलेली गणपतीची मूर्ती चित्रकार प्रमुखांनी प्रदर्शनात ठेवायला परवानगी दिली नाही. तो प्रदर्शनाच्या व्यवस्थापकांना भेटला व म्हणाला - "मालक, प्रदर्शनात अगदी टोकाला तरी माझी ही मूर्ती ठेवायला परवानगी द्या! मी खारीच्या भक्तिभावनेने मला जमले तसे रंग एकत्र करून ही मूर्ती रंगविली आहे. ती चांगली कलापूर्ण आहे की नाही हे पाहणारांना ठरवू द्या. उत्तमोत्तम कलाकारांच्या मूर्तीमध्ये आपली ही मूर्ती ठेवली जावी, अशी माझी फार फार इच्छा आहे. मला बक्षिसाचा मोह नाही. तरी माझी एवढी विनंती मान्य करावी."

परंतु ते म्हणाले - "तुझं कुळगोत्र, नांव गांव कांही माहीत नाही. खालच्या जातीच्या लोकांच्या वस्तीत तू राहतोस. अशा व्यक्तिच्या हातून तयार झालेली मूर्ती प्रख्यात वंशात जन्मलेल्या सुप्रसिद्ध चित्रकारांच्या मूर्तींबरोबर ठेवणे आम्हाला योग्य वाटत नाही." असे निष्ठुरपणे उत्तर देऊन व्यवस्थापक मोकळे झाले. विचित्र रडला नाही, परंतु त्याला फार फार वाईट वाटले.

त्याचा कुंभार मित्र त्याला म्हणाला - "आपल्याला ही मूर्ती प्रदर्शनातल्या मंडपात ठेवतां येणार नाही. ते जाऊ दे! आपण ही दुसऱ्या जागी ठेवू, चल!" असे सांगून विचित्राच्या मनाचे त्याने सांत्वन केले आणि जेथे प्रदर्शन होणार होणार होते, त्याच्या जवळच एक केळीची बाग होती तीत ती मूर्ती ठेवली व विचित्राला आपल्याबरोबर तेथे बसवून घेतले.

मोठेमोठे लोक प्रदर्शन पहायला आले. पाहणारांची मोठी गर्दी जमली. कोणत्या



गणपतीला कोणकोणते रंग कोठून व किती किंमत देऊन आणले याची वर्णने चालू होती व लोक कौतुक करीत होते. चित्रकार कोण, त्यांचे कुळ गोत्र काय, याची चवकशी सुद्धां होत होती. परंतु मुलें मात्र विचित्राने केलेल्या गणपतीकडे येऊन तो गणपती पहात होती व टाळ्या वाजवून गणपतीच्या सौंदर्याचे कौतुक करीत होती.

त्याच वेळी आकाशातून घसरुन पडलेल्या विद्युत पुत्रींसारख्या दोन सुंदर तरुणी प्रदर्शन होते त्या मंडपात आल्या. त्यांच्या अंगावरच्या रत्नखचित दागिन्यामुळे वीज चमकल्यासारखा वारंवार भास होत होता.

त्यांना पाहून लोक आश्चर्यचकित झाले असतां मोठी म्हणाली - ''कलानंद नगर हे आमचे गांव. आम्हाला आवडेल ती गणपतीची मूर्ती विकत घेण्यासाठी आम्ही दहा हजार वराह सुवर्णनाणी आणली आहेत.'' असे म्हणत तिने तिच्या हातात असलेली पिशवी हलवून दाखविली. तेथे जमलेले चित्रकार मूर्तिकार धावत जाऊन आपापल्या मूर्तीजवळ जाऊन उभे राहिले.

''आमची अका प्रसन्नवदना ही गायन कलेत निष्णात आहे. एवढेच नव्हे, ती खूप खाते ही. भरपूर नैवेद्य खाल्यावर शरीर प्रकृति चांगली राहते व गायन कलेत ही नैपुण्य लाभते. पोट सुटले तर गाणे कठीण, याचे उत्तर पाहिजे असेल तर आमच्या अका प्रसन्नवदनाला पहा!'' असं म्हणत धाकटी पुढे निघाली. तिने जणूं कांही सर्वांवर संमोहनास्त्रच टाकलं, तिचे चालणे बोलणें सर्वच डौलदार होते.

''आमची धाकटी बहीण मोहना फार गण्पिष्ट; त्याहून जास्त म्हणजे उत्तम नर्तकी! दिसायला ती लहान चिटुकली असली तरी मला उचलून गरगर फिरवू शकेल! इतकी शक्ती आहे तिच्या अंगात. नृत्यांत तिचे नैपुण्य अद्वितीय आहे.'' प्रसन्नवदना म्हणाली.

''आमच्याकडून गाणे म्हणवून घेणे, नृत्य करवून घेणे, इंद्राला किंवा कुबेराला ही शक्य नाही. तशा तऱ्हेचे नृत्य व संगीत आम्हाला आवडेल त्या मूर्तीसमोरच होऊ शकेल असे आम्ही व्रत घेतले आहे.'' मोहना म्हणाली.

त्यांच्या बोलण्यावर मोहित झाल्यासारखे लोक मंत्रमुग्ध होऊन बाजूला सरकले आणि त्यांनी त्यांना वाट दिली.







# मित्र-शत्रू

महानंद हा राजदरबारांत एका मोठ्या जागेवर अधिकारी होता. तो अत्यंत घमेंडखोर व स्वार्थी होता. एका दिवशी दुपारी तो राजमार्गाने पायी चालत जात होता. तेव्हां त्याच्या चपलेचा अंगठा तुटला. चप्पल नीट करायला म्हणून तो जवळच असलेल्या एका झाडानजीक गेला.

त्यावेळीं त्या झाडाखाली महानंदाचा बालमित्र विनोद बसलेला होता. कांही वर्षे दोघांनी एकाच गुरुकडे शिक्षण घेतलेले होते. त्यानंतर महानंदाचे भाग्य फळफळले. पण विनोदची परिस्थिति मात्र बेताचीच राहिली.

''ये मित्रा, किती वर्षांनी भेटतो आहेस रे?'' विनोदने हंसतच म्हटले. त्याचे गुडघ्यांच्यावर बांधलेले धोतर आणि साधा वेष पाहून महानंदाला त्याने आपल्याला 'मित्रा' म्हणून हांक मारलेली अजिबात आवडले नाही. त्याने कोरड्या स्वरांत म्हटले, ''कोण आहेस तूं? तुला माहीत आहे, मी दरबारांत मोठा अधिकारी आहे. मला 'मित्र' म्हणण्याचे धाडस तू कसे काय केलेस?''

त्यावर विनोदने हंसतच उत्तर दिले, ''या एका झाडाने आपल्या दोघांना सांवली दिलीय. म्हणून मी तुम्हाला 'मित्र' म्हणून संबोधित केले इतकेच.''
''सांवली ही कांही मैत्रीचा रस्ता दाखवत नसते. अंगावरचे कपडे तो मार्ग दाखवतात. माझी वस्त्रें बघ आणि तुझीही बघ बरं!'' महानंदने उपहासाने म्हटले.

त्याला उत्तर देताना विनोदने हंसून म्हटले, ''घरीं जाल तेव्हां तुम्हीही पांघरुण घेऊन झोंपता. पण आत्ता कडक उन आहे. घामाच्या धारा लागल्या आहेत, तरीही तूही अंगभर कपडे घालून शरीर झाकलें आहे. म्हणून मला तुमची दया आली. आणि दया येते ती आपल्याला मित्रांचीच येते ना! मित्र म्हणून पुकारण्याचा माझ्या मनांत एवढाच हेतू होता.''

महानंदाला राग आला. त्याने कडवटपणे म्हटलं,

- सुधाकर -



"या क्षुल्लक गोष्टी सोडून दे. तू रोज माझ्यासारखे स्वादिष्ट पक्वान्नांचे भोजन करुं शकतोस कां?"

"रोजरोज पक्वान्नें खात राहिलं तर तीही सामान्य वाटायला लागतात. म्हणून सर्वजण नेहमी सणावारी आणि उत्सवांच्या वेळीच पक्वान्नांचे जेवण करतात. मी तर कधीमधी पक्वान्नें खातो. म्हणून मला ती जास्त चविष्ट लागतात. तुम्हाला असं नाहीं कां कधी वाटलं कीं आता पक्वान्नांना फारशी अपूर्वाई राहिलेली नाही?" विनोदने विचारलं.

त्याचा हा प्रश्न ऐकून महानंद नाराज झाला. त्याने दोन्ही चपला हातांत घेतल्या आणि तो राजमार्गावर चालायला लागला. पण टळटळीत उन होते त्यामुळें त्या तापलेल्या मार्गावर त्याला चालता येईना. तो परत फिरला नि पुन्हां त्या झाडाखाली आला.

विनोदने टाळी वाजवून म्हटले, "वा, हे दृश्य फारच मनोहर आहे. मित्रा, जे आपला भार सहन करतात, त्यांचा भार आपल्याला केव्हां ना केव्हांतरी सहन करावाच लागतो. गुरुजींचे हे शब्द तुम्ही विसरलात कीं काय? इतके दिवस या चपला तुमचा भार वहात होत्या आणि आज त्यांना तुम्हींच हातांत नेता आहात कीं!"

महानंदाला तिथे थांबणे अशक्य झाले. पाय पोळत होते तरी तो त्याची पर्वा न करता तसाच चडफडत घरी गेला. दुसऱ्या नव्या चपला घालून तो दरबारांत गेला. तिथें त्याला राजगुप्त भेटला व तो म्हणाला, "मित्रा, आजचा दिवस मोठा चांगला, शुभ आहे."

हा राजगुप्तही महानंदचा बालमित्र होता. या दोघांनी व विनोदने बरोबरच शिक्षण घेतले होते. राजगुप्त पिढीजात धनाढ्य होता. गरीबी कशी असते ते त्याला ठाऊक नव्हते. त्याने दूरदेशीं जाऊन उच्च शिक्षण घेतलेले होते. राजदरबारांतही त्याचे उच्च स्थान होते. तो महानंदापेक्षां वरच्या अधिकारावर होता. तरीदेखील महानंदाशी त्याचे वागणें प्रेमाचे व शिष्टाचाराला धरून होते.

"तुझ्यासाठी जर हा दिवस शुभ आहे तर माझ्यासाठीदेखील शुभच असणार. पण याचं कारण काय ते तू सांगितलं पाहिजेस." महानंदाने उत्सुकतेने विचारलं.

"महाराजांना मी एक चांगला सल्ला दिला आहे. तो ऐकून ते फार संतुष्ट झाले आणि त्यांनी मला सांगितलं कीं मी त्यांच्याकडे कांहीतरी मागितलं पाहिजे. मी आपला बालमित्र विनोद आहे ना, त्याच्यासाठी दरबारांत एखादी चांगली नोकरी मागितली. त्यांनी लगेच मान्य केले. म्हणून आजचा



हा दिवस मला फार शुभ वाटतोय." राजगुप्त मोठ्या आनंदाने उद्गारला.

पण त्याचे बोलणें ऐकून महानंदचा चेहरा मात्र उतरला. तो म्हणाला, "त्या उद्धटाला राजदरबारांत तू नोकरी दिलीस? अरे, असं करुं नकोस, मित्रा! त्याला नोकरी दिलीस तर तुझ्या नांवाला काळिमा लागेल."

"काय म्हणालास तू? विनोद उद्धट आहे? आपण तर लहानपणी नेहमी म्हणत होतो कीं विनोदच्याइतका सालस नि गुणी मुलगा शोधूनदेखील सांपडणार नाही म्हणून! विसरलास कीं काय?" राजगुप्ताने विचारलं.

"ती लहानपणची गोष्ट झाली. तू जर त्याला हल्लीं कधी बघितलं असलंस तर तू असं म्हणणार नाहीस." महानंदाने मत दिले.

हे ऐकून राजगुप्त आश्चर्य प्रकट करीत म्हणाला "नुकताच मी त्याला राजमार्गाजवळच एका झाडाखाली पाहिला. त्याने मला लगेचच ओळखले आणि मोठ्या प्रेमाने गप्पागोष्टी केल्या. आम्ही दोघांनी लहानपणीच्या आपल्या गंमतीदार आठवणींना उजाळा दिला. त्याने माझ्या रेशमी कपड्यांची प्रशंसा केली. त्याची कमाई फारशी नव्हती. त्यामुळें त्याला थंडीत घाबळी, उन्हांत जाताना चपला आणि रोजच्या वापरासाठी चांगली वस्त्रेसुद्धां घेता येत नव्हती, त्याबद्दल त्याला वाईट वाटत होते. मी दरबारांत उच्च स्थानावर आहे हे ऐकून तो अतिशय खूष झाला.

"त्याने माझ्याकडे कुठलीही मदत मागितली नाही. माझी चांगली परिस्थिती पाहून त्याला मत्सर वाटला नाही. तो खरोखरच एक सज्जन गृहस्थ आहे.



माझ्या मनांत आलं कीं अशा सुशील व्यक्तीला जर मी दरबारांत चांगली नोकरी देऊं शकलो तर मला फारच समाधान वाटेल. माझी खात्री आहे कीं तो माझं नांव आणखी उज्वल करेल.''

महानंद आंतल्या आंत जळत होता, पण त्याने आपला राग प्रकट केला नाही. संध्याकाळीं त्याने विनोदचे घर शोधून काढले आणि महानंद त्याला म्हणाला, ''तू अगदी लबाड आहेस कीं रे! तू प्रत्येक ठिकाणी माझा अपमान केलास. माझ्यापेक्षां श्रेष्ठपदावर असलेल्या राजगुप्ताची तू भरपूर प्रशंसा केलीस. तुझी अशीच बुद्धी आहे, म्हणून तुझ्या घरांत दारिद्र्य ठाण मांडून बसलेलं आहे.'' अशा तीव्र शब्दांत त्याने विनोदची निर्भत्सना केली.

विनोदने त्याला बोलायचे तितके बोलूं दिले आणि त्यानंतर तो म्हणाला, ''जेव्हां मी राजगुप्तला मित्र म्हणून हांक मारली, तेव्हां त्यानेही मला मित्र म्हणूनच बोलणे केले. माझा कुणीही मित्र उच्च पदस्थ असला तर मला त्याचा आनंदच वाटतो. मी तुला मित्र म्हटले, पण तू मला शत्रूसमान मानलेस. आता शत्रूबरोबर मी चांगले वागले पाहिजे कां? माझी व्यवहारपद्धत साधी सरळ आहे.''

''तू खोटे बोलतो आहेस. राजगुप्त माझ्यापेक्षां वरिष्ठ अधिकारपदावर आहे म्हणून तू त्याच्याशी स्नेहशीलपणे वागलास आणि म्हणूनच आता तो तुला दरबारांत चांगली नोकरी देणार आहे.'' महानंदने म्हटले.

ही गोष्ट विनोदला अद्याप माहिती नव्हती. म्हणून ही बातमी ऐकून त्याला आश्चर्य वाटले. नंतर तो म्हणाला, ''राजगुप्ताने माझी वाईट परिस्थिती पाहिली आहे. त्याला माझी दया आली आणि म्हणून त्याने मला मदत करायचे ठरवले. माझ्या कल्पनेपेक्षांदेखील तो जास्त मोठा माणूस आहे.''

विनोदचे बोलणे पूर्ण व्हायच्या अगोदरच राजगुप्त आंत आला व महानंदला म्हणाला, ''मी तुमचे दोघांचे बोलणें ऐकले आहे. आपल्या एका बालमित्राचे भले होत आहे याचा खरं तर तुला आनंद वाटायला हवा. पण तू तर त्याची नालस्ती करीत होतास. हे अत्यंत चुकीचे आहे.''

महानंदला आपली चूक उमजली. त्या दिवसापासून आपला अहंकारी व घमेंडखोर स्वभाव बदलण्याचा त्याने चंग बांधला. आपल्या मित्रांचा तो मित्र होऊं लागला, इतकेच नव्हे तर शत्रूंशी देखील तो मैत्रीचा हात पुढें करूं लागला.







# सत्य व स्वराज्य याच्यासाठी अट्टाहास

शाळेच्या वर्गात मुलांचा दंगा आणि गडबडगोंधळ सुरू होता. जेव्हां शिक्षक वर्गावर आले तेव्हां त्यांना जमिनीवर शेंगदाण्याच्या शेंगांची टरफलें विखुरलेली दिसली. त्यांनी चिडून म्हटले, ''ज्याने ज्याने दाणे खाल्ले आहेत त्यांनी हा सगळा कचरा साफ करून टाकावा.''

एका मुलाखेरीज सगळी मुलें साफसफाईच्या कामांत गुंतली. ''सर्वांच्याबरोबर सफाई करायला तुला काय वेगळे आमंत्रण हवे आहे कीं काय?'' शिक्षकांनी ताशेरा ओढला. तो मुलगा उठून म्हणाला, ''मी दाणे खाल्लेले नाहीत, तेव्हां मी टरफलें उचलणार नाही.''

पण इतर सगळ्या मुलांनी ओरडा केला, ''हे खरं नाही गुरुजी. याने देखील आमच्याबरोबर शेंगदाणे खाल्ले आहेत.'' जेव्हां शिक्षकांनी पाहिले कीं तो मुलगा आपला शब्द बदलायला तयार नाही, तेव्हां त्यांनी विचारले, ''तुला काय म्हणायचंय? फक्त तू खरं बोलतो आहेस आणि सारा वर्ग खोटे सांगतो आहे म्हणून?'' असं रागाने म्हणून त्यांनी वेताची छडी आणली आणि त्याच्या तळव्यावर सपासप छड्या मारल्या. मुलाने ती शिक्षा सहन केली आणि आपले दप्तर उचलून तो घरी निघून गेला. सारे विद्यार्थी थक्क होऊन बघतच राहिले.

शाळा संपल्यानंतर शिक्षक त्या मुलाच्या घरी गेले आणि त्यांच्या वडिलांना त्यांनी सारी कहाणी सांगितली. शिक्षकांना वाटलं कीं वडील मुलाला चांगले रागावतील. परंतु त्याऐवजी त्या पित्याने शिक्षकांकडे रोखून बघत म्हटलं, ''जेव्हां ह्याने म्हटलं कीं त्याने शेंगदाणे खाल्ले नाहीत, तेव्हां तो खरं बोलत होता. माझा मुलगा कधी खोटं बोलत नाही.''

त्या शिक्षकांचा आपल्या कानांवर विश्वासच बसेना. ते त्या तेजस्वी बापलेकांकडे बघतच राहिले.

याच मुलाने मोठेपणी असाच स्पष्टवक्तेपणा इंग्रज सरकारविरुद्ध दाखवला होता. त्याने घोषणा केली कीं ''स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे आणि तो मी मिळवणारच.''

हा मुलगा म्हणजे मोठेपणी लोकमान्यता प्राप्त झालेलो लोकमान्य बाळ गंगाधर टिळक!





# सकलानंदचा सल्ला

खांदेड गांवात दर शुक्रवारी बाजार भरत असे. त्या बाजारांत चांगल्या प्रतीची गुरें खरेदी करायला दूरदूरहून लोक येत असत.

शिवानंद एक शेतकरी होता. शेतीच्या कामासाठी त्याला बैलांच्या जोडीची फारच जरूरी होती. तो खांदेडच्या बाजारांत बैल खरेदी करायला आला. पण त्या गांवी पोचेपर्यंत अंधार पडला, म्हणून त्या रात्रीपुरता एका खानावळींत मुक्काम करायचा असे त्याने ठरवले. तिथे कांही चोरांची भीती नव्हती, तरी जवळचे पांचशे रुपये खानावळीचा जो मालक होता, त्या देवनारायणजवळ सुरक्षित ठेवण्यासाठी द्यावे असे शिवानंदला वाटले. त्याने ती रक्कम देवनारायणजवळ दिली.

सकाळीं उठल्यानंतर बाजारांत जायला निघण्यापूर्वी त्याने ते पांचशे रुपये परत मागितले.

देवनारायणने आश्चर्य दाखवीत म्हटले, ''पांचशे रुपये? तू मला दिले होतेस? तू भोळाभाळा आहेस की मलाच भोळसट समजतो आहेस?''

त्याचे हे उत्तर ऐकून शिवानंद एकदम घाबरला. त्याने बावरलेल्या स्वरांत म्हटले, ''असं काय म्हणता आहात तुम्ही? काल रात्रींच मी नाही कां तुम्हाला पांचशे रुपये ठेवायला दिले? मी म्हटलं देखील होतं कीं बाजाराला जायच्यापूर्वी मी ते घेईन म्हणून.''

''पांचशेच काय, पांच पैसेदेखील तू मला दिलेले नाहीस. कांहीतरी खोटं सांगू नकोस.'' देवनारायणने कडवट स्वरांत फटकारले.

आता मात्र शिवानंद फारच घाबरला. तो तिथून निमूटपणें बाहेर आला. त्याची दीनवाणी अवस्था पाहून एका अनोळखी गांवकऱ्याने त्याला काय झालं ते विचारुन घेतलं. सगळं ऐकून घेतल्यावर तो गांवकरी शिवानंदला म्हणाला, ''तुझी रक्कम परत मिळवण्याचा एक मार्ग आहे. हे बघ, या रस्त्याच्या टोंकाला एक वडाचं झाड

आहे. त्याच्या शेजारीच एक घर आहे. तिथें सकलानंद नांवाचा एक बुद्धिमान व चुतर गृहस्थ राहातो. तिथे जाऊन त्याला सारं कांही सांग."

शिवानंद सकलानंदकडे गेला. त्यावेळीं तो पारावर बसून एक पुस्तक वाचत होता. शिवानंदने आपले नांव गांव सांगितले आणि काय घडलं ते ही सांगितलं.

"जे झालं ते झालं. आता तू एक काम कर. तू आणखी पांचशे रुपये घेऊन ये. येत्या गुरुवारीं पुन्हां त्याच खानावळींत उतर आणि ते पैसे ठेवायला त्या खानावळ मालकाकडे दे. पण यावेळी मात्र राममंदिराच्या पुजाऱ्याला बरोबर घेऊन जा. त्याच्या उपस्थितींत ते पैसे तू देवनारायणजवळ दे." सकलानंदने सांगितलं. नंतरच्या गुरुवारी त्याप्रमाणे शिवानंदाने केले आणि पुजाऱ्याला बरोबर नेले. त्याच्यासमक्ष ते पैसे देवनारायणजवळ दिले.

दुसऱ्या दिवशी सकाळीं शिवानंद सकलानंदाला भेटला व त्याने विचारले, "आता यानंतर मी काय करुं ते सांगा."

"आत्ताच तिथें जा आणि ते पांचशे रुपये परत माग." सकलानंदने सल्ला दिला.

शिवानंदने परत जाऊन ते पैसे देवनारायण-कडे मागितले. पुजाऱ्यासमक्ष पैसे दिलेले होते, म्हणून ती रक्कम देवनारायणने निमूटपणे परत केली. ते काम झाल्यानंतर शिवानंद पुन्हां सकलानंदकडे आला व त्याने विचारले, "पण ते जुने पांचशे रुपये कसे वसूल करायचे ते कांही माझ्या लक्षांत येत नाही."

"तो कांही विशेष गंभीर प्रश्न नाही. आज संध्याकाळीं पुजाऱ्याला बरोबर घेऊन तू पुन्हां खानावळींत परत जा आणि देवनारायणकडे तू दिलेले पांचशे रुपये परत माग." सकलानंदने सल्ला दिला.

शिवानंद पुजाऱ्याला घेऊन खानावळींत गेला आणि त्याने आपले पांचशे रुपये मागितले. देवनारायणने कांहीही न बोलता मुकाट्याने पांचशे रुपये काढून दिले.

शिवानंद खूष झाला आणि रकमेची वसुली झाल्याबद्दल सकलानंदना मनापासून धन्यवाद देऊं लागला. तेव्हां सकलानंदने त्याला हंसतहंसत म्हटले, "पैशाच्याबाबतीत नेहमी खूप काळजी घ्यायला हवी. लबाड लोक जंगलात, खानावळींत किंवा गल्लींत देखील असतात."







# जयसिंह

**श्याम**सिंह हा विजयपुरीचा राजा होता. जयसिंह हा त्याचा एकुलता एक मुलगा त्याचा वारस होता. आसपासच्या अनेक लहानलहान राज्यांना श्यामसिंहाने आपल्या अंकित करुन घेतले होते व विजयपुरीचे राज्य वाढवून सामर्थ्यशाली बनवले होते.

जयसिंहाने युद्धकला व राज्यशास्त्राचे शिक्षण घेतले होते व त्यांत तो निष्णात बनला होता. जयसिंहदेखील एक चांगला राज्यकर्ता व्हावा अशी त्याच्या पित्याची तीव्र इच्छा होती. पण जयसिंहाला राज्यकारभार करण्यांत स्वारस्य नव्हते. तो नेहमी आपल्याच तंद्रीत असायचा. त्याला चित्रे काढण्यांत रस होता आणि तो जास्त वेळ राजवाड्यांतच बसून घालवीत असे.

आपला मुलगा जास्त उत्साही व आनंदी असावा हे पाहाण्यासाठी श्यामसिंहाने अद्‌भुत नृत्य करणाऱ्या नर्तकींना निमंत्रण दिले. संगीतज्ञ मंडळींना खास बोलावून संगीत सभांचे आयोजन केले. पण कांहीही उपयोग झाला नाही. जयसिंहाच्या वृत्तींत व वागण्यांत कांही फरक झाला नाही.

कधीकधी राज्याच्या दक्षिण भागांत असलेल्या डोंगरदऱ्यांचे नैसर्गिक सौंदर्य पाहाण्या-साठी म्हणून जयसिंह त्या भागांत जायचा व कांही दिवस तिथेंच मुक्काम करायचा. त्याचं हे भ्रमंतीच वेड राजाला माहीत होतं.

एक दिवस श्यामसिंहाने जयसिंहाला म्हटलं, "पुत्रा, तुझी ही जीवनाबद्दल अनासक्ती, राज-कारणाबद्दल उदासीनता, याचे कारण मला कांही समजत नाही.

समुद्राच्या लाटांसारखे उचंबळून येण्याचे तुझे हे तरुण वय आहे. पण तू तर सदा गप्पगप्प असतोस. कुणाविषयी तुला खास प्रेम वाटत नाही. तू सदा कांहीतरी विचारांत गुंग असतोस. याचं कारण तरी काय आहे ते मला सांगशील कां?"

जयसिंहाने संथ आवाजांत म्हटलं, "पिताश्री, याचं कांही एक खास कारण नाही. मला अंतः-

- महर्षी -



पुरांतल्या या विलासी, थाटामाटाच्या आयुष्यांत विश्वास वाटत नाही. त्याचा मला वीट आला आहे. कांहीतरी वेगळं, नवीन शोधायच्या प्रयत्नांत मी आहे. मला राजभवनापासून कुठेतरी दूर जायची इच्छा आहे. कृपा करुन आपण याची मला अनुमती द्यावी.''

श्यामसिंहाने चटकन उत्तर दिले नाही. थोडा वेळ विचार केल्यानंतर तो म्हणाला, ''पुत्रा, तू विजयपुरीचा भावी राजा आहेस. माझं ऐक. कांही तरुण मुलींची चित्रे पहा आणि त्यांतून तुला जी कन्या आवडेल तिच्याशी तू लग्न कर. तुझे लग्न झाले की तुला संसाराविषयी आसक्ती वाटेल आणि राज्याबद्दलही तुझी अनिच्छा कमी होईल. ही माझी खात्री आहे आणि हीच माझी आज्ञाही आहे.''

एवढं सांगून श्यामसिंह आपल्या मुलाला कलामंदिरात घेऊन गेला. तिथे अनेक राजकुमारींची चित्रें सुरक्षित ठेवलेली होती. एकापेक्षां एक अशा सुंदरींची चित्रें तिथे ठेवली होती. परंतु जयसिंहाने मात्र कोणत्याही राजकुमारीचे चित्र उत्सुकतेने पाहिले नाही. जेव्हां श्यामसिंहाने मुलाचा निरुत्साह बघितला, तेव्हां त्याने साकेतपुरीच्या राजकुमारीशी जयसिंहाचा विवाह करण्याचा निर्णय घेतला.

कांही दिवसानंतर हा विवाहसोहळा थाटांत साजरा झाला. लग्नानंतर रात्रीं जेव्हां नववधू आपल्या पतीची वाट पहात अंतःपुरात बसली होती, तेव्हां जयसिंह गायब झाला. तो कुठे गेला ते कुणालाच कळले नाही. या घटनेमुळें त्याची पत्नी मरुद्वतीदेवी ही दुःखांत बुडली. तिने फक्त जयसिंहाचे चित्र पाहिले होते. त्याच्या चेहऱ्यावरचे तेज आणि साहसी वृत्ती पाहून तिने मनांतल्या मनांत जयसिंहाची पूजा करायला सुरवात केली होती.

त्या रात्रीं कुणालाही न सांगता जयसिंह घोड्यावर स्वार होऊन वाट फुटेल तिकडे जात राहिला. एक दिवस तो खूप थकला होता, त्याला भूक लागली होती; पण निदान पाणी तरी प्यावे म्हणजे तृषा भागेल असा विचार करुन तो पाणी शोधायला लागला. शेवटी त्या अरण्यांत त्याला एक सरोवर दिसले.

जयसिंह घोड्यावरुन खाली उतरला आणि सरोवराच्या दिशेने पुढे जाताजाता अचानक थबकला. त्या सरोवरांतल्या स्वच्छ पाण्यांत एखादी कळी दिसावी तशी एक सुंदरी जलविहार करीत होती ती त्याच्या नजरेस पडली. त्या तरुणीला पाहून तो स्वतःलाच विसरला. थोड्या



वेळाने ती तरुणी पाण्यांतून बाहेर आली. एका पुरुषाला तिथें पाहून ती जोराने ओरडणार होती. पण जयसिंहाने तिला 'ओरडूं नकोस' असे खुणेने सांगितले. त्याचबरोबर तिला कुठल्याही प्रकारे तो त्रास देणार नव्हता हेही त्याने खुणेने सुचवले.

नंतर तिच्याजवळ जाऊन अतिशय मृदु स्वरांत त्याने त्या युवतीला म्हटले, ''हे सुंदरी, तूं भिऊं नकोस. मी परदेशी आहे. मला तहान लागलीय. तू कोण आहेस ते मला कळेल कां? तू गंधर्वकन्या आहेस कीं किन्नर कन्या आहेस? तुझ्याबद्दल अधिक माहिती मला मिळावी अशी माझी तीव्र इच्छा आहे.''

त्या युवतीने भानावर येत म्हटले, ''माझे नांव चांदणी आहे. मी इथेंच जवळ राहाते. एका लहान सामंत राजाची मी मुलगी आहे. आपण इथून लगेच निघून गेलात तर ते योग्य ठरेल.''

तिचा आवाज ऐकून त्याचे मन उल्हसित झाले. त्याचा निरुत्साह पार पळाला. त्याच क्षणीं त्याने मनोमन निश्चय केला कीं कांहीही होवो, कांही दिवस तरी त्या अरण्यांत, तिथल्या जवळपासच्या डोंगरदऱ्यांत, या वृक्षराजीच्या छायेंत आपण शांतपणे आयुष्य व्यतीत करावे.

आपला विचार त्याने त्या सुंदरीला सांगितला. तेव्हां ती त्याला म्हणाली कीं कदाचित तिची माणसें त्याला त्रास देऊं शकतील. पण तिच्या सूचनेकडे लक्ष न देता जयसिंहाने तिथेच राहायचा विचार केला. तेव्हां त्या सुंदरीने त्याला तिथल्या एका गुहेंत राहायचा सल्ला दिला. ती रोज त्याच्यासाठी भोजन घेऊन येईल असाही तिने त्याला शब्द दिला. नंतर ती तिथून निघून गेली.

त्या दिवसापासून जयसिंहासाठी साध्या



भोजनाबरोबर चांदणी आपल्या घरुन स्वादिष्ट फळें व मधुर मधही घेऊन येऊं लागली.

एके दिवशी तिने चित्रकाराला लागणाऱ्या वस्तू बरोबर आणल्या. ते सारं सामान तिला अरण्यांत सांपडलं असं तिने सांगितलं.

ती सामुग्री मिळाल्यानंतर जयसिंह जास्तच खुषींत आला. त्याने लागलीच चित्रे काढायला सुरवात केली. आणि चांदणीची निरनिराळ्या प्रकारची चित्रें रेखाटली.

असाच एक आठवडा गेला. एके दिवशी अगदी सूर्योदय होण्याच्या वेळेला चांदणी जयसिंहाला भेटायला आली. ती अतिशय व्याकुळ व दुःखी दिसत होती. कांहीतरी गंभीर समस्या निर्माण झाली असावी असे वाटत होते. तिने भेदरलेल्या स्वरांत जयसिंहाला म्हटले, "महाराज, आपण त्वरित इथून निघून जावे. माझ्या घरच्या लोकांना आपला ठावाठिकाणा समजला आहे. आपल्यापाशी कांही हत्यारही नाही तेव्हां आपण त्यांच्याशी सामना कसा करणार?"

तिच्या बोलण्यावर न घाबरता जयसिंहाने म्हटले, "चांदणी, तू माझा निरुत्साह घालवला आहेस, माझा एकलकोंडेपणा दूर केला आहेस, माझ्यांत तू पुन्हां चेतना जागी केली आहेस. आता मी तुझ्याशिवाय राहू शकणार नाही. मी तुला राजधानीला घेऊन जाईन आणि माझ्या मातापित्यांना सांगून, त्यांची अनुमती घेऊन तुझ्याशी विवाह करीन."

क्षणभरांतच झाडाच्या मागून श्यामसिंह महाराज पुढे येऊन म्हणाले, "मुला, तुझी ही इच्छा अवश्य पूर्ण होईल. ही दुसरी कुणी नव्हे, तुझी धर्मपत्नी मरुद्वतीच आहे."

आश्चर्यचकित झालेल्या जयसिंहाला प्रणाम करीत मरुद्वती म्हणाली, "स्वामी, मला क्षमा करावी. मी मरुद्वती आहे. आपला पाठलाग करीत या अरण्यांत आले आणि मी आपला पत्नीधर्म इथें राहून पाळला. जर त्यांत कांही कमतरता राहिली असेल तर मला क्षमा करावी. हे जे कांही घडलंय, ते थोरल्या महाराजांच्या आज्ञेनुसारच झालंय."

यानंतर महिनाभरांतच श्यामसिंहाने राज्याचा कारभार जयसिंहावर सोंपवला. त्याने समर्थपणें राज्य सांभाळले, प्रजेला सुखी ठेवले आणि पित्याप्रमाणेंच पुत्रही चांगला आदर्श राजा असतो, हे सिद्ध करुन दाखवले.







# अस्वल्या मांत्रिक

**फार** पूर्वीच्या काळीं ब्रम्हपुत्रा नदीच्या कांठावर एक भयंकर मोठें अरण्य होते. त्या अरण्यांतल्या एका खेडयांत कालीवर्मा नांवाचा एक क्षत्रिय तरुण राहात होता. त्याचा पिता चंद्रशिला राज्याच्या दरबारांत एक सेनाधिकारी होता. तो एक श्रेष्ठ योद्धा होता. एका युद्धांत तो अद्भुत पराक्रम दाखवीत असताना त्याला वीरगती मिळाली. त्यावेळीं कालीवर्मा फक्त दहा वर्षांचा लहान मुलगा होता. पतिनिधनाचा शोक सहन न करता आल्यामुळें त्याची आई झुरुनझुरुन लौकरच वारली. अशा परिस्थितींत कालीवर्माचे संगोपन बलभद्र नांवाच्या एका विश्वासू सेवकाने मोठ्या हुशारीने केले. क्षत्रिय वीराला योग्य अशा सर्व युद्धकला त्याने कालीवर्माला शिकवल्या.

जेव्हां कालीवर्मा वीस वर्षांचा झाला तेव्हां एक दिवस बलभद्र त्याला समजावीत म्हणाला, "कालीवर्मा, आता तू हे लहान गांव सोडून राजधानीला जा. तिथें राजाच्या दरबारांत कांहीतरी नोकरी मिळवण्याची खटपट कर."

कालीवर्मा म्हणाला, "चंद्रशिला नगरचा राजा जितकेतु अगदीच नेभळट व कर्तृत्वहीन आहे. असल्या राजाच्या दरबारांत नोकरी करुन पोट भरण्यापेक्षां जास्त वाईट मानहानी असूं शकेल तरी कां? म्हणून मला वाटतं कीं दुसरीकडे कुठेतरी जाऊन कामधंदा शोधावा."

वृद्ध बलभद्राने थोडा वेळ विचार करुन म्हटले, "कोणत्याही राजाचे कर्तृत्व त्याच्या दरबारांतल्या अधिकाऱ्यांवर जास्त अवलंबून असते. जितकेतुचे पिताश्री एक महान, पराक्रमी राजा होते. तुझ्या पित्यासारखे शूर व बुद्धिमान अधिकारी त्यांच्या दरबारात होते ना! त्यांच्या मृत्यूनंतर जितकेतू गादीचा वारस ठरला. मला



तर वाटतं कीं त्याच्या भोवती स्वार्थी आणि खोटारड्या लोकांचे जाळें पसरलेले आहे."

"असेलही, पण असल्या राजाचा उद्धार मी एकटा थोडाच करूं शकेन? त्यापेक्षां मी इथेंच राहून शेती करतो आणि आपले पोट आनंदाने भरणें पसंत करतो." कालीवर्मनें म्हटलं.

"शेती करणं हे काम तुझ्यासारख्या क्षत्रिय तरुणाच्या योग्यतेचें नाही. त्याशिवाय तुला ठाऊक आहे कां, तुझ्या वडिलांनी मरतेसमयी मला काय सांगितलं होतं ते?" हे शब्द उच्चारुन बलभद्र कालीवर्माला एका बंद खोलीजवळ घेऊन गेला. आजपर्यंत ती खोली कधीही उघडलेली नव्हती. ती उघडून कालीवर्माला बलभद्र आंत घेऊन गेला.

त्या दालनांत कालीवर्माच्या पित्याने वापरलेली तऱ्हेतऱ्हेची आयुधें, शस्त्रें, कवच व सोन्याच्या मुठीची तलवार ही ठेवलेली होती. बलभद्रने ती तलवार कालीवर्माच्या कमरेला बांधून टाकली आणि त्याच्या शरीरावर सुरक्षाकवच घालून तो म्हणाला, "अरे, ही सारी शस्त्रें जणूं कांही तुझ्याचसाठी तयार केलेली आहेत असं वाटतंय. तुझ्या पित्याची आज्ञा होती कीं तू एक क्षत्रिय योद्धा बनावेस आणि आपल्या कुळाचे नांव सार्थ करावेस. आता त्याउपर तुझी इच्छा!"

आपल्या वडिलांनी ठेवलेले कवच व खड्ग हातांत घेतल्याबरोबर कालीवर्माचा उत्साह उफाळून आला. त्याने तात्काळ म्यानांतून तलवार बाहेर काढली व तिच्या धारेची परीक्षा केली. तिची चमक पाहून त्याला आश्चर्य वाटले व तो म्हणाला, "बलभद्र, मी माझ्या पित्याच्या आज्ञेचं पालन निश्चितच करीन. माझे भवितव्य घडवणारी वस्तू नांगराचा फाळ असणार नाही, पण तेजधार असणारी तलवार आहे."

त्याचे शब्द ऐकून बलभद्र फार प्रसन्न झाला. दुसऱ्याच दिवशी कालीवर्माने कवच धारण केले, तलवार कमरेला बांधली आणि वाटखर्चासाठी शंभर सुवर्णमुद्रा बरोबर घेऊन तो घोड्यावर बसून निघाला.

अरण्यांतल्या मार्गाने दुपारपर्यंत त्याचा प्रवास सुरळीतपणें पार पडला. दुपारी एखाद्या वृक्षाच्या सांवलीत विश्रांति घ्यावी आणि बरोबर आणलेली भाजीभाकरी खावी असा त्याने विचार केला. पाणी कुठे असेल ते शोधण्यासाठी तो डोंगरांत झरा असेलच असा अंदाज करुन आसपास पाहूं लागला. तेव्हां त्याला एका झाडावरुन कुणीतरी कण्हल्याचा आवाज आला.

कालीवर्माने मान उंचावून झाडाच्या फांद्यांकडे पाहिले. त्यांतून एक मानवी आकृती ओरडत धप्पकन जमिनीवर पडली. कालीवर्मा झटकन घोड्यावरुन खाली उतरला आणि त्या व्यक्तीजवळ गेला. तो एक वृद्ध होता.

कालीवर्मा त्याला म्हणाला, "आजोबा, या अवस्थेंत तुम्ही झाडावर कशासाठी चढलात?"

म्हाताऱ्याने क्षणभर कालीवर्माकडे निरखून पाहिले, आणि म्हटले, "बाळा, तू तर कुणी राजभट दिसतो आहेस. पिकाची कापणी सुरुं झाली कीं तुम्ही करवसुलीसाठी इकडे येता. आणि नंतर मात्र कधी दृष्टीस पडत नाही."

"मी कुणी राजभट नाही. इथेंच नोकरी मिळावी म्हणून मी राजधानीच्या शहरांत जातो आहे. पण तुम्ही माझ्या प्रश्नाचं उत्तर दिलं नाहीत. तुमचे हातपाय ठीक आहेत ना? कुठे लागलं नसेल तर नशीबवान आहात." कालीवर्मा एका दमांत सारे बोलत होता.

म्हातारा चुपचाप उठून उभा राहिला. चारपांच पावलें त्याने चालून बघितले आणि समाधानाने मान हालवीत तो म्हणाला, "तुझ्या म्हणण्याप्रमाणें खरोखरच मी नशिबवान आहे. तसं नसतं तर जेव्हां दरोडेखोरांनी गांवावर दरोडा घालून गांव लुटला, तेव्हां जर मी घरीच असतो तर माझे अनेक तऱ्हेने हाल झाले असते."

म्हाताऱ्याचे शब्द ऐकून कालीवर्माला त्यांच्या संकटाची थोडीफार कल्पना आली. त्याचा मथितार्थ असा होता कीं म्हातारा दरोडेखोरांच्या तावडींतून वांचला होता. पळून अरण्यांत आला आणि झाडावर लपून बसला. परंतु पाय निसटल्यामुळें झाडावरुन खाली पडला होता.

"आजोबा, ह्या प्रदेशांत लुटारुंचे हल्ले वरचेवर होत असतात असं मीही ऐकलं होतं. पण



दिवसाढवळ्या लोकांवर हे हल्ला करतात, हे मात्र नवीनच दिसतंय. तुमच्या गांवातले इतर लोक कुठे आहेत?" कालीवर्माने विचारलं.

"बाळ, जसे लुटारु गांवात शिरले तसे गांवकरी चारी दिशांना पळत सुटले. लुटारु गांवातून निघून गेले कीं एकएक करत सगळेजण घरी परत येतील." म्हातारा म्हणाला.

राजाच्याबद्दल माहिती होती, तरी म्हाताऱ्याच्या मनांत राजाबद्दल काय मत आहे ते जाणून घेण्यासाठी कालीवर्माने विचारलं, "आजोबा, लुटारुंच्याविरुद्ध तुम्ही राजाकडे तक्रार कां केली नाहीत?"

उदासवाण्या चेहऱ्याने म्हाताऱ्याने माहिती दिली, "आम्ही कांही सांगायच्या अगोदरच राजाचे शिपाई येऊन कापणी झालेले पीक घेऊन जातात. बाकी उरलेले धान्य गांवाच्या आसपास डोंगरदऱ्यांत चोरलुटारु राहातात ते लुटून नेतात.

त्याचवेळीं झाडींच्यामधून चार दरोडेखोर समोर पुढे आले आणि टवाळखोर सुरांत म्हणाले, "बा बा, म्हाताऱ्याने तर चांगलीच माहिती आम्हाला दिली की! पुढच्या कापणीनंतर राजाचा हिस्सादेखील आम्हीच घेऊन जाऊं!" आणि तलवार उपसून ते कालीवर्माकडे वळून म्हणाले, "तुझं चिलखत, तलवार आणि घोडा बघून तर असं वाटतय कीं तुझ्याजवळ थोडे पैसे नक्कीच असतील. ती पैशांची थैली जमिनीवर तू ठेव आणि चार पावलें मागे जा."

कालीवर्माने चोरांच्याकडे एकवार तीव्र नजरेने पाहिले. नंतर घोड्याजवळ जाऊन खोगीरावर लटकलेली भाकरीची छोटी थैली घेऊन आला व ती जमिनीवर ठेवून चार पावलें मागे सरला. एका चोराने मोठ्या अधीरतेने जवळ येऊन ती थैली वांकून उचलणार तितक्यांत कालीवर्माने म्यानांतून आपली तलवार सर्रकन उपसली आणि त्या चोराचे शिर धडावेगळे केले. दुसऱ्याच क्षणीं जोराने उडी मारुन आणखी दोघांवर त्याने तलवारीचे वार केले.

चौथा चोर धाबरुन किंचाळला व पळण्याच्या तयारींत होता. पण कालीवर्माने वेगाने धावत जाऊन त्याचे केस पकडले आणि त्याच्या कमरेत जोराने एक लाथ मारली. त्याला ओढतच कालीवर्मा म्हाताऱ्याजवळ घेऊन आला.

आपल्या डोळ्यासमोरच तीन चोरांना यमसदनाला पाठवणे आणि चौथ्याला हातीपायी पकडून आणलेले पाहून म्हातारा भीतीने थरथर कापायला लागला होता. तो म्हणाला, "अरे पोरा, काय हे तुझं साहस? आमच्या गांवात तुझ्यापेक्षां बलदंड असे कितीतरी तरुण आहेत. त्यांनी





कधीतरी या चोरांशी दोन हात करायचं धारिष्ट्य दाखवलं होतं कां?"

"हे काम मी त्या तरुणांच्यामार्फत करुनच राजधानीला परत जाईन. भुकेची काळजी आपण नंतर करुं. तुम्ही ही भाकरीची पिशवी घ्या आणि तुमच्या गांवचा रस्ता दाखवा. मी या चोराला घेऊन घोड्यावर बसतो व तुमच्या पाठोपाठ येतोच." कालीवर्मा म्हणाला.

म्हातारा व कालीवर्मा तिथून निघायच्या तयारीत होते. तोंवर कांही गांवकरी धापा टाकीतच तिथे पोंचले आणि त्यांनी विचारले, "आजोबा, काय झालं हो? हे किंचाळणारे लोक कोण होते?"

कालीवर्माने त्यांच्याकडे तिरस्काराने बघितले व म्हटले, "तुमच्यापैकीं कुणीही आंधळा नाही हे उघड आहे. गांवावर दरोडा घालणाऱ्या लुटारुंशी तुम्ही एकत्र होऊन दोन हात करायचे कीं भित्र्या भागुबाईसारखं अरण्यांत पळून लपून राहायचं?"

त्याचे शब्द ऐकून त्या सर्वांनी शरमेने आपली मान खाली घातली. त्यानंतर म्हाताऱ्याने त्यांना सारी हकीकत समजावून सांगितली. "तुम्ही आता ऐका! आसपासच्या गांवातली म्हातारी मंडळी सोडून तुम्ही बाकी सर्वजण या तरुणाला आपला नेता बनवा आणि डोंगरात लपलेल्या चोरांशी सामना करा. आपण सर्वजण घरेदारे सोडून किती दिवस असे लपूनछपून राहाणार आहोत?"

हे बोलणे ऐकून कालीवर्माने मोठ्या समाधानाने मान डोलावली, व म्हटले, "आजोबांनी जे सांगितलंय तेच मी तुम्हाला सांगणार होतो. आमच्या हातांत सांपडलेल्या या



चोराकडून आपल्याला इतर चोरांचे राहायचे ठिकाण सहज समजेल. तुमच्यापैकी जे भाला व लाठीफेंक शिकलेले आहेत, ते सर्वजण माझ्या पाठोपाठ या. एका आठवड्याच्या आंत सर्व चोरांचा नायनाट झाला कीं मी इथून पुढे निघून जाईन."

यानंतर गांवकऱ्यांनी कालीवर्माला मोठ्या आदराने आपल्या गांवी नेले आणि त्याला छान मेजवानी दिली. त्यादिवशी संध्याकाळीं कांही तरुण आजूबाजूच्या गांवात गेले आणि कांही तरुणांना बरोबर घेऊन आले. चोरांशी कसे लढायचे व धैर्याने त्यांना सामोरे कसे जायचे हे कालीवर्माने त्यांना समजावून सांगितले.

हाती सांपडलेल्या त्या चोराने प्राणाच्या भीतीने इतर चोरांच्या लपायच्या जागांबद्दलची सारी माहिती कालीवर्माला दिली. त्यांच्यापैकीं डोंगरातल्या गुहांमधे किंवा घाटींत कितीजण लपून

राहात होते आणि तिथें जायचे गुप्त मार्गही त्याने सांगितले.

गांवातल्या तरुण मुलांना कालीवर्माने बरोबर घेतले व दरोडेखोरांच्या वस्तीवर अचानक हल्ला केला. अनेक चोरांना त्यांनी ठार मारले. थोडे फार जे जीव बचावून पळाले, ते राज्याच्या सीमेपलीकडील अरण्यांत दिसेनासे झाले.

चोरांना पळवून लावून कालीवर्मा मोठ्या उत्साहाने राजधानीच्या दिशेने निघाला. पंधरा दिवसांचा प्रवास करीत करीत तो चंद्रशिला नगराच्या सीमेवर पोंचला. सूर्योदयाच्यावेळीं तो उठला तोच दहा घोडेस्वारांनी येऊन त्याला गराडा घातला. कालीवर्माला आपली तलवार म्यानांतून काढण्याइतका अवसर देखील मिळाला नाही.

घोडेस्वारांच्या सरदाराने कालीवर्माकडे रागाने बघून म्हटले, "तुम्ही कालीवर्मा आहात ना? चोरांना राज्याच्या सीमेपलीकडे शेजारच्या राज्यांत पळवून लावणारे ते तुम्हीच आहात ना?"

"हो हो, मीच ते काम केलेलं आहे. हे धाडसी काम केल्याबद्दल वास्तविक तुम्ही मला राजधानीत महाराजांच्या दर्शनाला न्यायला हवं. पण तुम्ही तर एखाद्या चोराला घेरा घालावा तसे माझ्याभोवती उभे आहात. ही काय भानगड आहे?" कालीवर्माने आश्चर्याने विचारले.

त्याचे हे बोलणे ऐकून तो सरदार हंसायला लागला आणि म्हणाला, "जितकेतू राजाचा तुम्ही अपराध केलेला आहे. इथून पळून गेलेल्या लुटारुंनी शेजारच्या राज्यांत चोऱ्या व लूटमार करायला सुरवात केली आहे. तिथल्या राजाला वाटलं कीं आपणच ते चोर तिकडे अशांतता निर्माण करण्यासाठी इथून धाडले आहेत, म्हणून तो राजा आता आपल्यावर हल्ला करणार आहे. या सगळ्या अनर्थाचे कारण तू आहेस. म्हणून तुला फांसावर चढवून तुझं प्रेत त्या राजाला आम्हाला पाठवायचे आहे."

"तुमच्या जितकेतु राजाच्याबरोबर तुमचीही डोकी फिरली आहेत की काय?" हे शब्द उच्चारुन कालीवर्मा तलवारीच्या मुठीला हात लावणार तितक्यांत घोडेस्वारांनी त्याच्या मुसक्या बांधल्या आणि त्याला पकडून घोड्यावर बसवून, ते सर्वजण राजधानीकडे निघाले.

*(क्रमशः)*



वेताळ कथा

# शंतनूचा निर्णय

निश्चयाचा पक्का विक्रमार्क पुन्हां झाडाजवळ गेला त्याने झाडावरुन शव खाली उतरवले आणि तो स्मशानाच्या दिशेने चालायला लागला. तेव्हां प्रेतांत लपलेला वेताळ त्याला म्हणाला, "राजन्, ही मध्यरात्रीची वेळ आहे. भयंकर श्वापदे आसपास फिरत असतात. ती कोणत्याही क्षणीं तुझ्यावर हल्ला करुन तुझा घात करुं शकतात. जे तुला ओळखत नाहीत, त्यांना तू अशा परिस्थितींत दिसलास तर त्यांना तू देवीचा उपासक किंवा मांत्रिक आहेस असेच वाटेल. तू एक मोठा राजा आहेस. प्रजेचे रक्षण करुन तिला सुखी ठेवणे हे तुझे पहिले कर्तव्य आहे. ते विसरुन तू आपला वेळ विनाकारण वाया घालवीत बसला आहेस आणि आपला जीव



धोक्यांत घालतो आहेस. तुझी समजूत आहे कीं धर्म आणि न्याय तुझ्या बाजूचा आहे, म्हणून तुझा विजय होईल. पण हा निव्वळ तुझा भ्रम आहे. कांही वेळीं असं दिसून येतं कीं राज्यकर्त्या व्यक्तींच्या बाबतीत या न्याय व धर्मावर पडदा पाडला जातो. याचे उदाहरण म्हणून मी तुला शंतनू नांवाच्या राजाची गोष्ट सांगतो. नीट लक्ष देऊन ऐक." आणि वेताळाने पुढील गोष्ट सांगितली.

शंतनू राजाला दोन मुलगे होते. थोरला मुलगा कुंतल शांत स्वभावाचा होता. दुसरा मुलगा चित्रांग हा जरा उतावळा होता.

दोन्ही मुलांनी सर्व शास्त्रांत प्राविण्य मिळवले, शस्त्र-अस्त्र विद्यांमधेही ते तरबेज झाले, तेव्हां या दोघांपैकी राज्यकारभार कुणावर सोंपवावा ही शंतनूराजापुढे मोठीच समस्या निर्माण झाली.

वास्तविक रीतीप्रमाणे थोरला मुलगा कुंतल हाच राज्याचा वारस ठरायला हवा. पण चित्रांगचा हट्ट होता कीं आपल्या पित्यानंतर आपण गादीवर बसले पाहिजे. पित्याने समजावलं तरीदेखील त्याने आपला हेका सोडला नाही. यावर कुंतलने कोणताही विरोधी सूर लावला नाही. उलट तो पित्याला म्हणाला, "बंधू चित्रांगला राजा व्हायचं आहे ना? त्याच्यावरच राज्यकारभार सोंपवावा व त्याला राज्याभिषेक करावा. मी त्याला त्याच्या कामांत मदत करीत राहीन."

"जेव्हां कुंतलदादांना यांत कांही अयोग्य वाटत नाही. तर आपण कां विरोध करता आहात?" चित्रांगने पित्याला विचारले.

"सर्वांत थोरल्या भावाने गादीवर बसायचे ही आपल्या राज्याची परंपरा आहे. आणि ती परंपरा चालू ठेवणे हा माझा धर्म आहे. तुला ही पद्धत कां मोडायची आहे?" शंतनूने विचारले.

"मला राजा व्हायचे आहे, परंतु कुंतलदादांना राजा व्हायची इच्छा नाही. ज्याला गादीवर बसायची इच्छा आहे, त्याला बसवायचे नाही, आणि ज्याला इच्छा नाही, त्याला बसवायचे, ही कांही मोठी चांगली परंपरा नव्हे!" चित्रांगने स्पष्टपणे मत दिले.

"अशा स्थितींत माझ्या परिवारांतलाच कुणी सदस्य राजा व्हावा असे म्हणणे हे देखील योग्य ठरत नाही. देशभरांत जो कुणी समर्थ व लायक असेल त्याच्यावरच शासनाचा भार सोंपवणें उचित ठरेल. तुला माझे विचार पटतात कां?" शंतनूने हंसून चित्रांगला विचारले.

चित्रांगने न घाबरता धिटाईने उत्तर दिले, "आपली प्रजा राजपरिवाराचा विशेष आदर



करते. त्यांच्या मनांत आपल्याविषयी खास प्रेम आहे. त्यांना इतर कुणी गादीवर आलेले आवडणार नाही."

शंतनूने त्यावर म्हटले, "कुंतल माझा थोरला मुलगा आहे. म्हणून लोक त्याला जास्त मानतात. म्हणून मलाही त्यालाच गादीवर बसवायची इच्छा आहे." पित्याची ही प्रतिक्रिया ऐकून चित्रांग रागावून म्हणाला, "माझा याच्यावर विश्वास बसत नाही."

शंतनूने बराच विचार करुन दोघा मुलांना देशभर फिरण्यासाठी धाडले. लोक त्यांचा कितपत मान राखतात ते पाहाण्यासाठी, त्याने एक गुप्तचरही त्यांच्याबरोबर धाडला.

देशांतल्या प्रजाजनांना राजकुमारांच्या स्वभावांची चांगली ओळख होती. म्हणून त्यांनी चित्रांगचे जरा जास्त कौतुक केले. कुंतलबद्दल त्यांच्या मनांत प्रेम अवश्य होते, पण त्याचे त्यांनी विशेष प्रदर्शन केले नाही.

देशभर हिंडून परत आल्यानंतर चित्रांगने पित्याला भेटून सांगितले, "आपण सोबत दिलेल्या गुप्तचरांकडून आपल्याला सत्य परिस्थिती समजली असेलच. कुंतल दादांच्यापेक्षां माझ्यावरच लोक जास्त प्रेम करतात." चित्रांगने मोठ्या प्रौढीने सांगितले.

"कुंतलला प्रजाजन आपलाच मानतात. तो प्रजेचा आहे. तुला प्रजाजन घाबरतात. जो प्रजेला मनापासून आवडतो, तोच राजा व्हायला लायक असतो." शंतनूने म्हटलं.

चित्रांगच्या अंगाचा तिळपापड झाला. तो संतापून म्हणाला, "प्रजेला जो आवडतो तो त्यांच्यापैकीच एक होऊं शकतो, पण त्यांचा



राजा होऊं शकत नाही. ज्याचा दरारा प्रजेवर असतो, आणि ज्याच्याबद्दल प्रजाजन आदर व श्रद्धा दाखवतात, तोच त्यांचा राजा असतो. या तिन्ही भावना प्रजाजनांनी माझ्याबद्दल व्यक्त केल्या आहेत. म्हणून राजा व्हायला मीच जास्त लायक आहे."

शंतनूने हंसत हंसत म्हटले, "एक वार नीट लक्षांत घे. तू राजा झालास नि तुझा राज्यकारभार जर समर्थपणे झाला नाही तर जनता तुझा आदर करणे सोडून देईल."

"ठीक आहे. जर असंच असेल तर दादाच्यापेक्षां मी जास्त समर्थ आहे. म्हणून आपण मला आणखी एक संधी द्यावी." चित्रांग म्हणाला.

"बरं तर. राजधानीच्या शीवेवर एका बाजूला ताडाची तीन झाडें आहेत. त्या झाडांच्यावर



कांही दुष्ट शक्ती राहातात असा समज राज्यांत पसरलेला आहे. वीस वर्षापूर्वी मी माझ्या तलवारीने एका वारांत तिन्ही झाडें एकदम कापली होती. साधारणपणें ताडाचे झाड जर एकदा कापून काढलं तर ते पुन्हां वाढून फुलत-फळत नाही. परंतु ही तिन्ही झाडें पुन्हां वाढली आणि नंतर त्यांना फळेंही येऊं लागली. मलाही वाटतं कीं दुष्ट शक्तींनी तिथें ठाण मांडलं असावं. त्यांच्या प्रभावामुळें तुझ्यांत ही भावाला डावलून स्वतः राजा बनण्याची इच्छा निर्माण झाली असावी. तुला ती तिन्ही झाडें एका घावांत तोडता येतील कां?'' शंतनूने प्रश्न केला.

"मी नक्कीच ती तोडीन!'' चित्रांगने खात्री दिली. पण मनांत मात्र त्याने ठरवलं होतं कीं हे काम कांही त्याच्या मोठ्या भावाला करता आलं नसतं. या ठाम विश्वासामुळें तो म्हणाला, ''प्रथम दादाला हे काम सांगावं!''

शंतनूने जेव्हां कुंतलला ही गोष्ट सांगितली तेव्हां त्याने हंसून म्हटलं, ''माझी पूर्ण खात्री आहे कीं एकाच वारांत ही तिन्ही झाडें मी कापूं शकेन. पण जर मी तसं करुन दाखवलं तर माझ्या भावाला आपले सामर्थ्य दाखवण्याची संधी मिळणार नाही. म्हणून त्याने जर प्रथम प्रयत्न केला तर जास्त बरे होईल.''

चित्रांगने त्या ताडाच्या झाडांजवळ जाऊन तलवारीच्या एकाच फटक्यांत तिन्ही झाडे कापून दाखवली. लोक आश्चर्यचकित झाले. तरीदेखील शंतनू चित्रांगला म्हणाला, ''मी जेव्हां ही झाडें तोडली होती, तेव्हां त्या दुष्ट शक्तींपासून लोकांचा त्रास नाहीसा व्हावा या हेतूने ती झाडें तोडून टाकली होती. पण तू झाडें तोडलीस ती राजा बनायच्या महत्वाकांक्षेने प्रेरित होऊन तोडली आहेस. राजा स्वार्थी असला म्हणजे दुष्ट शक्तींचा प्रभाव सिद्ध होतो.''

''आपण माझ्यावर खोटे आरोप लादता आहात. त्या दुष्ट शक्तींपासून देश मुक्त व्हावा म्हणूनच मी ती झाडें तोडली. आता आपण एक करावे. आम्हा दोघां भावांवर एकएक नगर सोंपवावे. एक वर्षभर आम्ही तिथला कारभार सांभाळूं. त्यानंतर आपल्याला समजून येईल कीं प्रजाजनांना आमच्याबद्दल खरोखर काय वाटते ते! ते पाहून आपण जो निर्णय घ्याल तो मला मान्य होईल.'' चित्रांगने हा उपाय सुचवला. शंतनूने चित्रांगचा हा प्रस्ताव स्वीकारला. त्याने कुंतलला धर्मपुरीचा आणि चित्रांगला सत्यपुरीचा राज्यकारभार वर्षभर करण्यासाठी सोंपवला.

कुंतलने त्या शहराची जबाबदारी नीट सांभाळली; त्याने धर्मपुरीच्या नागरिकांना एकत्र



बोलावले आणि त्यांच्या अडचणी जाणून घेतल्या. कांही जाणकार लोकांच्या मदतीने त्याने लायक व्यक्तींची निवड केली. त्यांना कामाच्याबाबतींत पूर्ण स्वातंत्र्य दिले. कुणीही नागरिक, केव्हांही कुंतलला भेटूं शके व आपल्या तक्रारी सांगत असे. श्रीमंत वा गरीब असा जनतेंत फरक करता कुंतल सर्वांचेच भले होईल अशा योजना आंखायला लागला. जनतेचा एक अभिन्न भाग होऊन तो त्यांच्यात सहजपणे मिसळत होता. जास्त करुन गोरगरीबांच्या घरीं तो जेवायला जाई व त्यांच्या कष्ट, अडचणी यांच्याविषयी स्वतःच माहिती जमवीत होता.

आता उरली चित्रांगची कथा. तो सत्यपुरीचा राजाच झाला आणि आपले मित्र व स्तुतीपाठक यांना त्याने उच्च अधिकाराच्या जागांवर नेमले. हरतऱ्हेच्या करमणुकींना त्याने उत्तेजन दिले. आपल्या विरोधकांना दडपून टाकण्याचे धोरण त्याने राबवले. त्यांना जबर शिक्षाही त्याने ठोठावल्या. त्याच्या कारभाराची लोकांच्यात दहशत निर्माण झाली.

वर्षभरांतच दोन्ही शहरांची चांगली भरभराट झाली. दोन्ही नगरांची माहिती आपल्या गुप्तचरांकडून शंतनूला कळत होतीच. शंतनूने तिथल्या नागरिकांची मनोधारणा काय झाली तेही जाणून घेतले. सत्यपुरीच्या नागरिकांनी मुक्तकंठाने चित्रांगला योग्य राजा आहे असा जयघोष केला. धर्मपुरीच्या जनतेनेदेखील मनापासून कुंतलला योग्य राज्यकारभार केल्याबद्दल त्याचे भरपूर कौतुक केले.

एक वर्ष पुरे झाल्यानंतर शंतनूने दोन्ही मुलांना राजधानींत बोलावून घेतले. तो त्यांना म्हणाला,



''मी प्रजेचं मत आणि मन पूर्णपणे जाणून घेतलं आहे. त्यावरुन मी निर्णय घेतलाय कीं कुंतल हाच गादीवर बसेल व या देशाचा राज्यकारभार करील.''

कुंतलने हंसत म्हटलं, ''मी आपल्या निर्णयाचे पालन करीन.''

परंतु चित्रांगने मात्र चिडून म्हटले, ''जनतेचे मत काय आहे ते जाणून घेऊन ते आपण अंमलात आणणार नाही कां?''

गंभीर स्वरांत शंतनूने उत्तर दिले, ''आपल्या देशांत अनेक मोठी नगरे आहेत. त्या नगरांतल्या कारभारांत कांही राजा दखल घेत नाही. नगरपाल जर समर्थ असेल तर राजा जरी असमर्थ असला तरी त्या नगराची भरभराट होते. पण जर नगरपाल असमर्थ असला तर समर्थ राजा असला तरीदेखील त्या नगराची उन्नती होत नाही. तिथल्या नागरिकांचे कष्ट वाढतच राहातात. हे सत्य धर्मपुरी

व सत्यपुरीचे नागरिक नीट जाणतात. म्हणूनच मी कुंतलला राज्याभिषेक करायचे ठरवले आहे. आणि हा माझा अटळ निर्णय आहे."

वेताळाने ही गोष्ट सांगून राजाला विचारले, "राजन्, शंतनू राजाने घेतलेला निर्णय कांही धर्म आणि न्यायाला धरुन नाही. सुरवातीपासूनच त्याने कुंतलची बाजू घेतली होती. नगरशासनाच्या बाबतीत त्याने जी चांचणीपरीक्षा ठरवली होती, त्यांत चित्रांगचा विजय झाला होता. जनतेनेदेखील चित्रांगच्या बाजूने कौल दिला होता. या गोष्टी डोळ्यांसमोर ठेवल्या तर शंतनूचा निर्णय न्याय व धर्माच्या विरुद्ध असं तुला नाही वाटत? हा निर्णय अगदी अयोग्य आहे कीं नाही? माझ्या या शंकांची उत्तरें माहीत असूनदेखील जर तू गप्प बसलास तर तुझ्या मस्तकाची शकले होऊन पडतील."

त्याचे उत्तर देताना विक्रमार्कानं म्हटलं, "धर्म व न्याय हे सगळीकडे आदरणीय असतात हे मला मान्य आहे. पण कधीकधी वेळ आणि संदर्भ यानुसार राजनीतीला योग्य असा बदल त्यांत होण्याची शक्यता असते. एवढंच नव्हे, धर्म आणि सत्य कालातीत नसतात. समयानुसार त्यांत परिवर्तन होत राहाते. धर्मपुरीची जनता जर कुंतलला योग्य शासक मानत नसेल तर मला वाटतं त्यांनी दुसऱ्या बाजूनेही विचार केला असेल. तो सर्वांचा आवडता झाला तरी गादीवर आल्यानंतर तो कशा प्रकारे कारभार करेल याची त्यांना चिंता राहाणारच. म्हणून त्यांनी तरीसुद्धां त्याच्याच बाजूने कौल दिला. आता सत्यपुरीची जनता पाहूं या. तिथल्या नागरिकांना जितक्या लौकर होईल तितक्या लौकर त्यांना चित्रांगच्या कारभारातून सुटका हवी होती. त्याने जनतेच्या कल्याणाकडे फारसे लक्ष दिले नाही. फक्त आपल्या मित्रांचे व लाळघोट्यांचे हित त्याने सांभाळले. त्याच्यापासून सुटका व्हावी म्हणून त्यांनी त्याला राजा करावे असे मत दिले. ज्या नेत्याला जनता जाऊं देत नाही, तोच त्या देशाचा राजा होण्याला लायक असतो. शंतनू राजाला हे राजनीतिचे हे सूत्र चांगलेच माहिती होते. म्हणून त्याने कुंतलला राज्याभिषेक करण्याचा निर्णय घेतला. आणि हा निर्णय धर्म आणि सत्य यांच्याविरुद्ध नाही."

राजाचे मौन भंग करण्यांत सफल झालेला वेताळ शवासहित गायब झाला आणि झाडावर जाऊन बसला.

*(आधार : रंगनायकी यांची रचना)*








## कर्नाटकचे समुद्र किनारे



कर्नाटक या दक्षिण भारताच्या राज्याला दोनशे मैल लांबीची किनारपट्टी आहे. त्यांतला अर्धा भाग हा उत्तर कर्नाटक (पूर्वीचा नॉर्थ कॅनरा) मधे येतो. इथें एकूण चोवीस उत्तम किनारे आहेत. अतिशय स्वच्छ राखलेले व अद्याप प्रदूषित न झालेले हे किनारे स्थानिक लोकांना व पर्यटकांना आकर्षित करतात. इथली चकाकणारी वाळू आगळेच सुखद समाधान देते. एका किनाऱ्याचा ओम् या अक्षरासारखा आकार आहे म्हणून त्याला ओम बीच म्हणतात. साहजिकच इथें येणाऱ्या पर्यटकांची संख्या मोठी आहे. आणखी एका किनाऱ्याला रविंद्रनाथ टागोर बीच म्हणतात.

## सरस्वती नदीचे मूळ

भारतांतल्या पांच प्रमुख नद्यांमधें जरी सरस्वतीची गणना केली असली, तरी ही नदी कुठेही दिसत नाही.



अलाहाबाद इथल्या प्रयागच्या त्रिवेणी संगमामधें गंगा व यमुनेबरोबर सरस्वती गुप्त स्वरुपांत येते अशी भावना आहे. भारत सरकारच्या पुराणवस्तू संशोधन खात्याने हरियाणा राज्यांत सरस्वतीचा मार्ग शोधून काढण्यासाठी अनेक जागी उत्खनन केलेले आहे. आदि बदरी या ठिकाणालगत मातीच्या भांड्यांचे तुकडे, कोरीवकाम केलेल्या फरशा, अनेक वापरलेल्या वस्तू, एका घराचा सज्जा, एक प्रार्थनासभागृह आणि बुद्धाची एक मूर्ती सांपडली आहे. त्या ठिकाणीं सरस्वती नदी प्राचीन काळीं असली पाहिजे, असा त्या अधिकाऱ्यांचा विश्वास आहे. सरस्वती नदीच्या कांठावर असलेल्या अनेक वस्त्यांपैकीं आदिबदरी हे एक स्थान आहे असे संशोधकांचे मत आहे.

# मध्यरात्रीचे भांडण



डोंगराळ प्रदेशांतल्या एका प्रदीर्घ प्रवासानंतर विजय आणि विपुल, हे दोघे प्रवासी एका खानावळींत येऊन पोंचले. त्यांची एकमेकांशी तासापूर्वीच ओळख झाली होती आणि दुसऱ्या एका जेवणाच्या थांब्यावर ते भेटले होते. दोघांनाही एकाच दिशेला जायचे होते.

दोघांचे पोटभर जेवण झाले. मात्र त्यापूर्वी विपुलने बरीच दारु ढोसली होती.

मध्यरात्र झाली. ते दोघेही खूप दमले होते. जेव्हां या खानावळींत पोंचले, तेव्हां तिथे दोनच खोल्या रिकाम्या आहेत असे त्यांना सांगण्यात आले. एक खोली पहिल्या मजल्यावर होती आणि दुसरी दुसऱ्या मजल्यावर होती.

''हे बघा, दोन्ही खोल्यांत आत्ताच कंदील ठेवलेले आहेत आणि खोल्याही स्वच्छ केलेल्या आहेत. तुम्ही स्वतः जाऊन पाहा. हवी ती खोली घ्या किंवा दोघे दोन खोल्या घ्या.'' खानावळीच्या व्यवस्थापकाने सांगितले.

त्या अरुंद जिन्यावरुन वर जाताना विजयने विपुलला मदत केली. पहिल्या मजल्यावर पोंचल्यावर विपुल विजयला म्हणाला, ''मी इथें थांबतो. पण ही खोली जरा मला उदासवाणी वाटते आहे. तू वर जाऊन बघून ये. ती खोली जर हवेशीर असली तर मी तिथें जाऊन झोंपेन.''

विजय वर गेला आणि लगेच खाली आला, ''खरंच, ती खोली या खोलीपेक्षां खूप चांगली, हवेशीर, प्रशस्त आहे. आपण दोघेही त्या वरच्या खोलींत झोंपूं.'' तो म्हणाला.

''नाही रे मित्रा, मला एकट्यालाच एक खोली हवी असते. दुसरा कुणी माझ्या खोलींत झोंपलेला मला आवडत नाही.'' विपुल तुटकपणें म्हणाला. त्याचे बोलणे जड झाले होते आणि तो विचित्र हालवारे करीत होता. दारुचा परिणाम स्पष्टच दिसत होता. तो उद्धटपणें म्हणाला, ''मी वरती एकटात झोंपणार आहे. तू इथेंच झोंप.''

विजयलाही त्याचे वाईट वाटले नाही. कारण दारुच्या वासाने त्याचेही डोके उठले असते ना!

''ठीक आहे. चला तर. मी तुला वरती तुझ्या खोलीपर्यंत पोंचवून येतो.'' विजयने म्हटले व विपुलची पिशवीही त्याने उचलली. आपल्या नव्या मित्राला जिन्यावरुन नीट वरच्या मजल्यावर पोंचवावे म्हणून त्याने हात पुढे धरला. पण विपुलला त्याचा राग आला. त्याने विजयचा हात तटकन झिडकारला आणि तो ओरडला, ''तुला काय रे वाटलं? मी काय लहान बाळ आहे? कीं तुला वाटलं मला दारु जास्त झाली आहे? तुझी मदत न घेता हा जिनाच काय, मी विंध्यपर्वतदेखील चढून जाऊं शकेन. माहीत आहे कां तुला? मला एकट्याला सहज वरती जाता येईल.'' त्याने विजयच्या हातांतली मोठी पिशवी खेचली.

''जरुर, अगदी जरुर एकटा जा. बराय, गुडनाईट.'' विजय म्हणाला आणि त्याने आपल्या खोलीचे दार लावून घेतले.

विजयला छान झोंप लागली. त्याला पहाटे जाग आली. वातावरण शांत व प्रसन्न होते. तो तयार होऊन पुढल्या मुक्कामाला जाण्यासाठी आवरा आवर करुं लागला. पण त्याच्या सह प्रवाशाचा काय बेत होता? ''त्याला आपल्या बरोबर यायचे आहे कां?'' विपुलला विचारण्यासाठी विजय जिना चढला.

पण विपुल मात्र खोलींत झोंपलेला नव्हता. त्याऐवजीं तो गच्चींत गाढ झोंपलेला होता. विजयने त्याला अगदी हळूवारपणे हांक मारुन जागे केले. तो उठून बसला, त्याने डोळे चोळले, आणि सगळीकडे बघूं लागला. त्याच्या नजरेंत संशय होता आणि चेहऱ्यावर भीतीचे सावट होते. नंतर त्याने विजयकडे पाहिले. तो आपला कालचा



पर्वत श्रेष्ठ आहेत, त्यांच्यापेक्षां पृथ्वी श्रेष्ठ आहे, पृथ्वीपेक्षां विश्व महान आहे; परंतु संकटांना शांत मनाने सामोरे जाणारे मानव या सर्वांपेक्षां जास्त श्रेष्ठ आहेत. - भामिनीविलास



सहप्रवासीच आहे हे लक्षांत आल्यावर त्याला हायसे वाटले. जरासा विचार करुन त्याने विचारले, "ते कालचे गुंड कुठे आहेत? त्यांनी माझी पिशवी नेली असेल बहुतेक!"

"गुंड कुठले? या खोलींत तर तुझ्याखेरीज दुसरंतिसरं कुणीच आलं नव्हतं. आणि तुझी पिशवी तर ती काय, समोरच दिसते आहे." विजयने म्हटले.

विपुलने काय घडले त्याची आठवण करुन विजयला सारी कहाणी सांगितली. विपुल जेव्हां खोलींत शिरला, तेव्हां चार गुंड खोलींत लपून बसले होते, ते चारी बाजूंनी त्याच्यावर चालून आले. विपुलने त्यांचा प्रतिकार केला पण त्यांनी त्याला केव्हां बाहेर गच्चींत फेकला आणि तो केव्हां नि कसा बेशुद्ध झाला ते त्याला आठवत नव्हते.

विजयने आपले हंसू आवरले. "अरे मित्रा, मी तुला या खोलींत आणून सोडायचे ठरवले होते. कारण या खोलींत चारी भिंतीवर मोठेमोठे आरसे आहेत. कंदिलाच्या उजेडांत तुला तुझेच प्रतिबिंब चारी बाजूंनी तुझ्याकडे येतेय असे वाटले असणार. तू खोलींत एकटा शिरलास ना! नशीब तुझं कीं तू कांचेवर गुद्दा मारला नाहीस. नाहीतर कांच फुटून तुला लागले असते. पण तू एकदोन आरशांच्यावर जाऊन आदळला असला पाहिजेस. कारण आरशावर तसे डाग दिसताहेत."

विजयने काय झाले असेल त्याचा अंदाज केला.

विपुल थोडा वेळ गप्प बसल्या. मनांतल्या मनांत तो खजील झाला होता. एक सुस्कारा सोडून तो म्हणाला, "तर मग मी स्वतःशीच मारामारी केली म्हणायची!"

"अरे, अज्ञानापोटी आपण अनेकवेळां असं करतोच कीं! जाऊं दे." विजयने म्हटले.

*-विश्ववसू*







# विचित्र प्रश्न

पूर्णिमा नांवाची एक म्हातारी आपला मुलगा व सुनेबरोबर आरामांत राहात होती. तिला तक्रार करायला संधीच नव्हती, इतकी सारीजण आनंदाने राहात होती. एके दिवशी शेतांतले काम संपवून तिचा मुलगा व सून घरी परत यायला निघाली. अचानक वादळी पाऊस सुरुं झाला आणि त्यांच्यावर वीज पडून दोघेही मरण पावली. त्यांची बारा वर्षांची एकुलती एक मुलगी लता होती. तिचे पालनपोषण करण्याची जबाबदारी म्हाताऱ्या पूर्णिमावर येऊन पडली.

या भयानक संकटाशी सामना देण्यासाठी पूर्णिमाने आपले दोन अेकरांचे शेत खंडाने कसण्यासाठी एका शेतकऱ्याला दिले. नातीच्या मदतीने ती पत्रावळी लावूं लागली व तऱ्हेतऱ्हेची लोणची बनवून आपले दोघींचे पोट भरुं लागली.

बघताबघता आठ वर्षे उलटली. पूर्णिमाची कंबर आता दुखायला लागली होती. तिच्या हातून जास्ती कामधाम होईनासे झाले. त्याशिवाय, त्यांची शेती करणारा कुळवाडी, नीट शेती करीत नव्हता व या दोघींना त्यांचा भाग देत नव्हता. म्हातारीची मात्र फार इच्छा होती कीं लताचे लग्न एखाद्या सुखवस्तू घराण्यांत व्हावे व ती सुखी झालेली बघावे.

तिला शहरांत राहणाऱ्या नागराज या व्यापाऱ्याची आठवण आली. तो पूर्णिमाच्या मुलाचा बालमित्र होता. आता नागराज सुगंधी वस्तूंचा खूप मोठा व्यापारी झाला आहे असं पूर्णिमाने ऐकलं होतं. त्याला दोन मुलगे होते व आता तो लक्षाधीश झाला आहे हेही तिला माहीत होतं.

एक दिवस ती गांवातला सावकार रमेश राठी याच्या घरी गेली. सर्वांची खुशाली विचारुन झाल्यानंतर पूर्णिमाने सावकाराला म्हटलं, "हे बघा शेठजी, मी आता झालेय म्हातारी! माझी एकच इच्छा आहे - माझ्या नातीचं, लताचं लग्न एखाद्या श्रीमंत घराण्यांत व्हावं. मी जर तिचं लग्न एखाद्या गरीब घरांत ठरवलं तर तिला जन्मभर कष्ट उपसायला लागतील आणि तऱ्हेतऱ्हेची दुःखं

- मुरलीधर -



भोगायला लागतील. म्हणून माझ्या मुलाचा मित्र नागराज व्यापारी शहरांत राहातो, त्याला भेटायला मला जायचंय. त्याच्या थोरल्या मुलासाठी मी लताचे नांव सुचवणार आहे. म्हणून मला दोनशे रुपये उधार हवे आहेत. म्हणजे कांही आवश्यक खर्च करता येईल.''

पूर्णिमाने नेहमी आरामांत दिवस काढलेले होते. व तिला कधी कांही कमी पडलं नव्हतं हे रमेश राठीला अगदी पक्कं ठाऊक होतं. म्हणून तो अगदी विनम्रपणे तिला म्हणाला, ''हे बघ पूर्णिमा, तू काय बोलते आहेस तरी काय? नागराजच्या मुलाशी तुझ्या नातीचा विवाह? तुला माहीत आहे ना, तो आता लाखोपती झालाय! तो कशाला तुझ्यासारख्या गरीब बाईच्या नातीशी आपल्या मुलाचे लग्न ठरवील ग? हल्लीं माझी सावकारी कांही नीट चालत नाही. मजूर व्याजाने पैसे घेऊन जातात खरे, पण पैसे परत द्यायची कांही गोष्ट काढीत नाहीत. तू रागावूं नकोस, पण मी कांही ही रक्कम तुला देऊं शकणार नाही.'' रमेश राठीची अटकळ होती कीं हे लग्न कांही ठरणार नाही आणि म्हातारी कांही कर्जाऊ रक्कम परत द्यायची नाही. म्हणून कांहीतरी सबब सांगून त्याने उधार रक्कम द्यायचे टाळले. त्याचवेळीं रमेशचा नोकर ताटांत लाडू घेऊन आला. त्यांतला एक लाडू उचलून रमेशने पूर्णिमाला देऊं केला. पण तिने तो घेतला नाही. ''मला हल्लीं पचत नाही गोडधोड, नको मला.'' असं म्हणून ती निघून गेली.

सर्वांना नेहमी सल्लामसलत देणारे भुजंगशास्त्री तिला वाटेंत भेटले. तिला पाहून त्यांनी विचारले, ''काय ग पूर्णिमाकाकी, इतक्या दुपारीं उन्हांतून कुठे निघाली होतीस?'' पूर्णिमाने त्यांना खरी गोष्ट सांगितली. त्यावर भुजंगशास्त्री मोठ्या प्रेमळ स्वरांत तिला म्हणाले, ''काकी, नातीच्या लग्नाची इतकी काळजी करूं नकोस. तुझा सज्जन परिवार सर्वांना ठाऊक आहे. तुझा मुलगा माझाही जवळचा मित्र होता. त्याने मला खूप मदत केलेली होती. आता मित्राच्या मुलीचे लग्न म्हणजे माझीही जबाबदारी आहेच कीं! शहरांत राहणारा नागराज व्यापारी माझ्या चांगल्या परिचयाचा आहे. तुला जरी सावकाराने उसनी रक्कम दिली असती तरी या वयांत तुला इतकं लांब जाणं कांही झेपलं नसतं. आजच मी शहरांत जातो, नागराजची भेट घेतो आणि तुझ्या नातीच्या लग्नाबद्दल विषय काढतो. सगळं काम उरकूनच मी परत येईन व तुला भेटेन.''

''असंच कर पोरा, तुझे उपकार मी जन्मभर विसरणार नाही.'' असं म्हणून पूर्णिमा घरी परतली.

भुजंगशास्त्री त्याच दिवशी शहरांत जाऊन नागराजला भेटला, त्याच्याशी बोलला व नंतर गांवी परतला. लगेच तो पूर्णिमाच्या घरीं गेला आणि सारी हकीकत त्याने सविस्तरपणें तिला सांगितली. तो पुढे म्हणाला, ''काकी, नागराज श्रीमंत झालाय, पण तुमच्या कुटुंबाबद्दल त्याच्या मनांत खूप आदर आहे. तुझ्या मुलाची व त्याची मैत्री तो विसरलेला नाही. तुझ्या नातीशी, लताशी, आपल्या मुलाचा विवाह करायला त्याची आडकाठी मुळींच नाही. पण त्याला वाटतं कीं त्याची होणारी सून खूप बुद्धिमान, चुणचुणीत व चलाख असायला हवी!'' असं म्हणून भुजंगशास्त्रींनी पिशवीत ठेवलेला एक चांदीचा तांब्या बाहेर काढला. ''या तांब्याबद्दल मी नंतर सांगेन. प्रथम नागराजने दोन प्रश्न तुझ्या नातीला विचारायला सांगितले आहेत. त्यांची तिने ठीक उत्तरें दिली पाहिजेत. त्याचे प्रश्न असे आहेत.''

''खायचंच असेल तर मोठं खावं, आणि ऐकायचंच असेल तर महाभारत ऐकावं.'' हे सर्वांना माहीत आहेच. महाभारताचं आणखी एक नांव आहे. ते तुझ्या नातीने सांगितलं पाहिजे.

दुसरा प्रश्न असा कीं परमेश्वराने दर्शन देऊन त्या मानवाला विचारल्यानंतर त्याचा मृत्यू होतो, कीं परमेश्वर जेव्हां वरदान देतो तेव्हां हा मानव मृत्यूचं वरदान मागतो? हा आहे नागराजचा दुसरा प्रश्न!''

हे अजब प्रश्न ऐकून पूर्णिमा आश्चर्याने थक्क झाली नि तिने दारांत उभ्या असलेल्या आपल्या नातीकडे बघितले. लताने हंसून भुजंग शास्त्रींकडे पाहिले व ती सांगू लागली, ''हे कांही कठीण प्रश्न नाहीत. आपल्या वेणुगोपालस्वामींच्या मंदिरात अवधानीबुवांची प्रवचने मी ऐकलेली आहेत. महाभारताचं दुसरं नांव आहे जयसंहिता किंवा



जयग्रंथ! आता दुसऱ्या प्रश्नाचं उत्तर पाहूं या. जेव्हां मरावसं वाटेल तेव्हां मरणाचे वरदान मिळवणारादेखील एखाद्या दिवशी मरणाची इच्छा करील. कारण केव्हांतरी त्याला हे जीवन नकोसे होऊन जाईल. आणि त्यांतून सुटका होण्याचा एकमात्र उपाय आहे, तो म्हणजे मृत्यू!''

तिचे उत्तर ऐकून भुजंगशास्त्री अतिशय खूष झाले व म्हणाले, ''लता, तुझं उत्तर अगदी बरोबर आहे. हे उत्तर तू कागदावर लिही आणि मला दे. आता राहिली या तांब्याची गोष्ट. यांत तूप आहे. नागराजची इच्छा आहे कीं उद्यां संध्याकाळपर्यंत या तुपाचे लोणी बनवून त्याला दिले पाहिजे.''

हे ऐकून पूर्णिमा निराश झाली. कारण हे अशक्य आहे हे तिला ठाऊक होतं. पण लता मात्र न घाबरता म्हणाली, ''शास्त्रीजी, या तुपाचे मी उद्यापर्यंत जरूर लोणी बनवून ठेवीन. तुम्ही कृपा करुन उद्यां संध्याकाळीं यावे.''

भुजंगशास्त्री मनांतल्या मनांत विचार करत होते, कीं ही वीस वर्षांची कोंवळी पोर तुपाचे पुन्हां लोणी कसे करुं शकेल? हे शक्य तरी आहे कां?'' हा विचार मनांत घोळवतच शास्त्रीबुवांची स्वारी घरी गेली.

त्या रात्रीं लताने त्या चांदीच्या तांब्यातले सारे तूप काढले. मुगाच्या डाळीचा रवा काढून त्याचा स्वादिष्ट तुपांतला हलवा बनवला व दुसऱ्या दिवशी सकाळीं तो हलवा तिने विकला. त्या पैशातून तिने लोणी खरेदी केले आणि तांब्यात काठोकाठ भरले.

संध्याकाळीं भुजंगशास्त्री आले. लताने सगळी केलेली खटपट नीट सविस्तर सांगितली आणि तो लोण्याने भरलेला तांब्या त्यांच्या स्वाधीन केला. तिच्या हुशारीचे कौतुक वाटून शास्त्रीबुवा म्हणाले, ''त्या मोठ्या घरची सून होण्याची सारी चांगली लक्षणें तुझ्यांत आहेत हं!'' तिच्या चतुराईचे कौतुक करीत ते शहरांत तो तांब्या घेऊन गेले. नागराजने विचारलेल्या प्रश्नांच्या लेखी उत्तरांबरोबरच लोण्याने भरलेला तांब्याही त्यांनी दिला.

नागराज भलताच खूष झाला. अशा हुशार व चलाख मुलीचे स्थळ सुचवल्याबद्दल त्याने भुजंगशास्त्रींची तारीफ केली, आणि तो सहकुटुंब पूर्णिमाच्या घरीं पोंचला. लता व नागराजचा थोरला मुलगा यांनी एकमेकांना पसंत केले, आणि महिनाभरांतच त्यांचा मंगलविवाह साजरा झाला.



# खास बातम्या

## सार्थ मंत्र

**कोण**त्याही घरांत किंवा बाहेर, जेव्हां पुरोहित मंत्रपठण करीत असतात, तेव्हां तिथें जमलेल्या मंडळींना त्या पठणांत सहभागी होता येत नाही. कारण त्यांचे पाठांतर नसते किंवा श्लोकांचा अर्थही समजत नसतो. ही वस्तुस्थिती आता बदलायला लागली आहे. पुण्यांतील 'ज्ञान प्रबोधिनी' या संस्थेतर्फे आता पुरोहितांनी प्रत्येक मंत्राचा अर्थ सांगून मंत्रपठण करण्याचा नवा प्रघात सुरुं केला आहे. संस्थेने लहानलहान पुस्तिका प्रसिद्ध केल्या आहेत.

त्यामुळें मंत्रपठणांत पौरोहित्य करणाऱ्यांच्या बरोबर श्रोतेजनही भाग घेऊं शकतात. साहजिकच तो समारंभ वास्तुपूजनाचा असो, नामकरण, विवाह, उपनयन अथवा अंतिम संस्कार असोत, श्रोत्यांना त्यांत मनःपूर्वक सहभाग घेता येतो. ही नवी प्रथा लोकप्रिय झाली आहे आणि मंत्रपठणाच्या या वर्गांमधे डॉक्टर्स, ॲंजिनियर्स व वकील मंडळीही प्रशिक्षण घेऊं लागली आहेत.

## कृतज्ञता

**जेम्स** हॅरीसनला पंधराव्या वर्षी आपला जीव वांचवण्यासाठी रक्ताची फार जरुरी होती. या गोष्टीला एकावन्न वर्षें झाली. त्या रक्तदानाने त्याचा जीव वांचला. पण त्याबद्दल कृतज्ञता व्यक्त करण्यासाठी त्याने स्वतः नियमितपणें रक्तदान करायचे ठरवले. ऑस्ट्रेलियांतल्या न्यू साउथ वेल्सच्या रेड क्रॉसच्या कचेरींत तो आजपर्यंत ८०० पेक्षां जास्त वेळा





# हडळींची संपत्ती

पर्वतराजीच्या पलीकडल्या गांवातल्या रहिवाशांना जेव्हां शहरात कामासाठी जावे लागे, तेव्हां त्यांना जंगलातल्या वाटेनेच जावे लागत होते. दुसरा कोणताही मार्ग नव्हता. एका जरुरीच्या कामासाठी बहादुर शहरांत जायला निघाला. त्याचे काम संपायला त्याला निदान दोनतीन दिवस तरी लागतील असा त्याचा अंदाज होता. पण त्याचे काम त्यादिवशी दुपारपर्यंत पूर्ण झाले. आता एवीतेवी काम संपले आहेच, तेव्हां आणखी एक दिवस शहरांत उगीचच काढण्यापेक्षां आपण सरळ घरीं जावे असा त्याने बेत केला. म्हणून अंधार पडण्या-पूर्वीच तो घरी जायला निघाला.

तो जंगलाच्या वाटेवर आला आणि जोराचा पाऊस सुरुं झाला. पाऊस थांबेपर्यंत त्यालाही थांबावे लागले. त्यानंतर जेव्हां तो निघाला, तेव्हां चांगलाच अंधार पडला होता. रात किड्यांचा किर्र आवाज आणि जंगली जनावरांचे अपरिचित आवाज ऐकून तो बावरला. अशा अंधाऱ्या रात्रीं पुढे जायचे म्हणजे संकटात उडी घेण्यासारखे होते. इथेंच जवळपास आडोश्याला थांबावे असे त्याने मनाशी ठरवले. आजूबाजूला बघताना त्याला एक ओसाड शिवमंदिर दिसले. रात्रीं तिथेच मुक्काम करायचा त्याने विचार केला. जेव्हां तो त्या मंदिराजवळ आला तेव्हां तिथे वळवळणारे सर्प त्याला दिसले. ते बघून मंदिरात जाण्याचा विचार त्याने बदलला. पण जवळच एक वडाचे मोठे झाड होते. त्या झाडाच्या एका जाडजूड फांदीवर तो चढून बसला.

थोड्या वेळाने थकव्यामुळे त्याचा डोळा लागला. अचानक त्याला झाडाखाली कुणीतरी आपसांत बोलत असल्याचा आवाज आला व तो जागा झाला. बहादुरने डोळे उघडून खाली निरखून पाहिले. झाडाखाली कांही हडळी आरामांत गप्पा मारीत बसल्या होत्या. त्यांना पाहून भीतीने त्याच्या तोंडून किंकाळीच बाहेर पडायची! पण त्याने धीर एकवटला आणि तो त्यांच्या हालचाली निमूटपणे बघत बसला.

- नरोत्तम -

त्यांतली एकजण त्यांची प्रमुख होती बहुतेक! ती एका दगडावर एकटीच बसली होती. बाकीच्या हडळी जमिनीवर तिच्या-भोवती बसल्या होत्या आणि ती सांगेल ते ऐकत होत्या. प्रमुख हडळ इतर हडळींना म्हणत होती, "आज कायकाय लूट तुम्ही आणली आहेत ती सगळी दाखवा!" जेव्हां एका हडळीने आपली पिशवी जमिनीवर ओतली, तेव्हां त्या प्रमुख हडळीचे डोळे आनंदाने चमकले असावेत. ती हंसून म्हणाली, "वा, वा, फार छान!"

दुसऱ्या हडळीने आपली थैली उघडून त्यांतला माल दाखवला, तेव्हां पुन्हां ही मुख्य हडळ म्हणाली, "वा ग वा! चांगलंच डबोलं आणलं आहेस कीं!"

इतर हडळींना ती पुढे म्हणाली, "तुम्ही सगळ्या जणींनी खूपच लूट गोळा केली आहेत. ही मिळवायला तुम्हाला बरीच मेहनत करावी लागली असेल, नाही? ही सगळी संपत्ती आपण या वडाच्या ढोलींत लपवून ठेवूं या. उद्यां रात्री पुन्हां आपण साऱ्याजणी इथेच भेटूं या."

तिच्या हुकुमाप्रमाणे सगळ्याजणींनी आपापल्या थैल्या ढोलींत लपवल्या. आणि त्या तिथून आनंदाने उड्या मारत, खिदळत निघून गेल्या.

रात्रभर बहादुर झाडावरच राहिला. सकाळ झाली तेव्हां तो झाडावरुन खाली उतरला आणि त्या झाडांतल्या ढोलीकडे बघून स्वत:शीच बडबडूं लागला, "छी, छी, हडळीचा पैसा म्हणजे स्मशानांतली राख असावी तसा!" आणि त्या पिशव्यांना हात न लावता तो तसाच तिथून आपल्या घरी परत गेला. घरी पोंचल्याबरोबर



त्याने आपल्या पत्नीला ही सविस्तर हकीकत सांगितली. तो जेव्हां सांगत होता तेव्हां त्याचे मोठ्या आवाजांतले बोलणे शेजारच्या दुर्गाने ऐकले. ती त्याचवेळी बहादुरच्या बायकोकडे तुरीची डाळ उसनी मागायला आली होती. ती लगबगीने घरी परत गेली आणि आपला पती चंचल याला म्हणाली, "तो बहादुर तर एक मूर्खच दिसतोय. त्याच्या डोक्यांत नुसती माती भरलीय. तुम्ही देखील त्याच्यासारखेच आहात. आपलं लग्न होऊन दहा वर्षे झाली, अजून माझ्या हातांत लाखेच्याच बांगड्या आहेत. तुम्ही ताबडतोब जंगलात जा.

तिथल्या ओसाड शिवमंदिराच्या शेजारीच एक मोठे वडाचे झाड आहे. त्या झाडाच्या ढोलींत त्या हडळींच्या पिशव्या त्यांनी लपवून ठेवल्या आहेत, त्या उचलून घेऊन या. कितीतरी दागदागिने



नि संपत्ती त्यांत असेल. शेवटी संपत्ती ती संपत्तीच. माणसांची असो नाहीतर भुताहडळींची असो, पैसा सर्वांचा सारखाच असतो कीं नाही?''

बायकोच्या बोलण्यामुळें चंचललाही मोह आवरेना. ते धन चोरुन आणण्याची इच्छा त्याच्या मनांत जागी झाली. त्या झाडाजवळ तो गेला आणि त्या ढोलीतल्या तीन पिशव्या त्याने उचलल्या. त्या खांद्यावर टाकून ते ओझे घेऊन तो रात्रीं घरी आला.

दुर्गाने घराचे दरवाजे, खिडक्या बंद केल्या आणि लगेच एक पिशवी उघडली. त्यांतली वस्तू बघून ती मोठ्याने ओरडली. एका माणसाच्या कवटीचा तो कपाळाचा भाग होता. दुसऱ्या पिशवींत हाडें होती, आणि तिसऱ्या पिशवींत नुसती राखच होती.

''अहो, तुम्ही तरी किती बावळट आहात हो! या पिशवींत काय भरलंय ते तुम्ही अगोदर उघडून बघायचं नाहीत कां?'' ती नवऱ्याला टोंचून बोलायला लागली.

बिचारा चंचल गप्प बसला. पण दुर्गा मात्र विचारांत पडली होती. थोड्या वेळाने ती म्हणाली, ''हडळी यालाच संपत्ती मानत असतील. म्हणजे हे त्यांना हवेच असणार. उद्यां रात्री तुम्ही पुन्हां त्याच ठिकाणी हे घेऊन जा, आणि त्यांचे बोलणे लक्ष देऊन ऐका. त्यांना सरळ सांगा कीं याच्या बदल्यांत त्यांनी धन दिलं तर ही त्यांची संपत्ती त्यांना परत मिळेल. त्यांच्याशी नीट सौदा करा.''

दुर्गासारख्या द्वाड बाईबरोबर दहा वर्षं चंचल संसार करीत होता, तेव्हां हडळींच्याबरोबर सौदा करायला कांही तो घाबरला नसता. त्या तिन्ही थैल्या घेऊन पुन्हां तो जंगलात गेल्या आणि त्या झाडाच्या फांदीवर बसून राहिला. मध्यरात्री रोजच्याप्रमाणें हडळी तिथें आल्या. त्यांच्या पिशव्या कमी झालेल्या पाहून त्या ओरडायला लागल्या, ''चोरी झाली, आमची संपत्ती कुणीतरी चोरलीय.''

त्यांची प्रमुख हडळ पुढे आली. तिने त्या ढोलींत हात फिरवून पाहिले नि म्हटले, ''फार मोठा अनर्थ झालाय. मांत्रिक वराहमुनीच्या जीवनकाळांत आपण त्याचं कांहीही वाईट करुं शकलो नाही. आपले सारे प्रयत्न व्यर्थ ठरले. तो मेल्यानंतर तरी निदान त्याचे हे सगळे अवशेष खोल खड्ड्यांत पुरुन टाकायची माझी इच्छा होती, म्हणजे त्याचा सूड आपण घेतला असे वाटले असते. पण आता मात्र दुःखाची गोष्ट अशी



कीं आपण हेदेखील करुं शकणार नाही. किती दुर्दैव आहे आपलं, नाही कां?''

झाडावर बसलेल्या चंचलला वाटलं कीं खाली उतरायला ही योग्य वेळ आहे. तो उडी मारुन खाली आला आणि त्यांना म्हणाला, ''तुम्ही इतक्या दुःखी कां होता? तुम्ही मला धन दिलेत तर ही तुमची संपत्ती मी तुम्हाला परत देईन ना!''

चंचलच्या खांद्यावर लटकलेल्या आपल्या पिशव्या पाहून त्या मुख्य हडळीला फारच आनंद वाटला. ती मोठ्या उत्साहाने म्हणाली, ''आमच्यापाशी धन नाही, पण कांही दागिने मात्र आहेत. ते आत्ताच आम्ही आणलेले आहेत.''

''दागिने आहेत? फारच छान! माझी पत्नी तर दागिन्यांसाठी जीव टाकते. दागिने मिळावेत म्हणून ती आसुसलेली आहे. द्या, द्या, मला ती दागिन्यांची थैली द्या!'' असं म्हणून त्याने तीन थैल्या त्यांच्यापुढे ठेवल्या.

त्या प्रमुख हडळीने दागिन्यांची थैली त्याला दिली. त्यांतले दागिने त्याने बाहेर काढून बघितले. तो भलताच खूष होऊन म्हणाला, ''बाप रे, इतके दागिने! आता जन्मभर माझी पत्नी कधी दागिन्यांसाठी माझ्याकडे हट्ट धरायची नाही. येतो मी.'' असं सांगून ती थैली खांद्यावर घेऊन तो घराकडे निघाला.

गांवी जेव्हां तो घराजवळ आला तेव्हां होत आली होती. गस्त घालणाऱ्या दोघा पहारेकऱ्यांना चंचल थैली घेऊन येताना दिसला. चोरांचा उपद्रव कमी व्हावा म्हणून कोतवालाने हे पहारेकरी मुद्दाम नेमले होते. त्यांना संशय आला व त्यांनी चंचलला पकडले. चंचलचे बोलणें ऐकून न घेता त्यांनी थैली उघडली. त्यांतले दागिने पाहून तर त्यांची खात्रीच झाली. चंचलला त्यांनी तुरुंगात टाकले. आपल्या पत्नीच्या हावरटपणामुळे चंचलला ही शिक्षा भोगावी लागत होती. तो मनांत स्वतःलाच दोष देऊं लागला. जेव्हां दुर्गाला हे समजलं तेव्हां तिने रडून गोंधळ घातला. ''माझी ही हाव नडली आणि माझा नवरा तुरुंगात अडकला. हावरटपणादेखील हडळीच्या संपत्तीसारखा असतो. तो अंगात शिरला कीं त्याच्यापासून आपल्याला नाही नाही तो त्रास होत राहातो, आणि त्याच्यापासून काडीमात्र फायदा होत नाही.''



# भारताची ओळख



१. वरील चित्र कुणाचे आहे ते ओळखा. सार्वजनिक सेवेसाठी १९९७ साली त्यांना आंतरराष्ट्रीय पारितोषिक मिळाले होते. ते पारितोषिक कोणते होते?

२. ओरिसांतल्या एका गांवाच्या नांवाचा एका भाषेंत अर्थ आहे, 'लोकांचा किल्ला'. ही भाषा स्थानिक मुंडा जमात बोलते. हे गांव कोणते आहे?

३. दोरसमुद्र ही राजधानी कोणत्या दाक्षिणात्य वंशाची होती?

४. हिंदू घरांमधे आंब्याच्या पानांचे तोरण घराच्या दरवाजांना लावायची परंपरा आहे. यामुळे कोणत्या देवाची अर्चना होते? त्या देवाला आंबा हे फळ फार आवडत असे.

५. शीख प्रजासत्ताक राज्याचा औपचारिक जाहीरनामा पंजाबमधल्या एका किल्ल्यावरुन बंदा बहादुर याने केला होता. हा किल्ला कोणता आहे?

६. बुद्धधर्मातल्या संन्यासिनींना कोणत्या नांवाने ओळखतात?

७. एक भारतीय मसाल्याचा वाळलेला पदार्थ पर्शिया (आता इराण) मधें 'लहान खिळे' म्हणून ओळखला जात असे. हा पदार्थ कोणता?

८. चार द्राविडी भाषांपूर्वी दक्षिण भारतांत संस्कृत काव्यें कोणत्या लिपींत लिहिली जात होती?

९. अर्जुन पुरस्कार मिळवणारा पहिला खेळाडू कोण होता?

१०. गांधीजींनी मिठाचा कायदेभंग करण्यासाठी जेव्हां दांडीयात्रा केली तेव्हां तशाच प्रकारची यात्रा दक्षिण भारतांत तिरुचिरापल्ली ते वेदारण्यमपर्यंत काढली होती. या यात्रेचे नेतृत्व कुणी केले होते? *(उत्तरें पुढील अंकी)*

### नव्हेंबरच्या प्रश्नावलीची उत्तरें

१. १९५०-५१
२. ब्राम्ही
३. गांधीजी
४. रविदास
५. अंदमान निकोबार बेटे
६. बाळ गंगाधर टिळक
७. पांच वेळां
८. महाराष्ट्र





# गणेश पुराण

प्रसन्नवदना व मोहना या दोघी बहिणी अनुक्रमाने मूर्ती पहात पुढे गेल्या. शेवटी त्या निराश होऊन परत फिरण्याच्या बेतात होत्या. इतक्यांत बाहेर मुलांचा ओरडा ऐकून दोघी जागच्या जागी थबकल्या.

त्याचवेळी त्यांना कोणीतरी म्हटल्याचे ऐकू आले - ''तिकडे स्वस्तातल्या रंगांनी रंगविलेली एक मूर्ती आहे. ती कां नाही पहात?''

ते ऐकून मोहना म्हणाली - ''चल ना, आक्का! ती मूर्ती कदाचित स्वस्तांत मिळेल.'' असे म्हणत प्रसन्नवदनाचा हात धरून तिकडे निघाली. तेव्हां ते प्रदर्शन पहायला आलेला प्रेक्षकवर्ग त्या बाजूला निघाला. प्रसन्नवदनाने सुवर्णमुद्रांची थैली मूर्ती समोर ठेवली व आपल्या गळ्यातला पाचूमण्यांचा रत्नहार काढून मान खाली करून बसलेल्या विचित्राच्या हातात कंकणासारखा तो बांधला.

ते दृश्य पाहून लोक चकित होऊन आपसांत बोलू लागले - ''ह्या दोघी मुलींना वेडबीड तर नाही लागले? नाही तर तेथे ठेवलेल्या एकाहून एक सुंदर मूर्ती सोडून येथे ठेवलेल्या सामान्य मूर्तीवर आपले सर्व वैभव अशा तऱ्हेने उधळले नसते!''

ते ऐकून प्रसन्नवदना त्या लोकांच्या मनांतली शंका दूर करण्यासाठी म्हणाली - ''येथे स्थापना केलेल्या मूर्तीत जे वैशिष्ट्य पाहून अबोध मुले मुग्ध होत आहेत, तेच वैशिष्ट्य पाहून आम्ही या मूर्तीकडे आकृष्ट झालो. मुलं अबोध असतात म्हणून त्यांची मने देवासारखी निर्मळ व पवित्र असतात. त्यांचे आशीर्वाद म्हणजे ब्रह्मदेवाचाच आशीर्वाद असवा असे समजावे. म्हणून आम्ही त्यांची निवडच पसंत केली.''

मोहना म्हणाली - ''मातीच्या मूर्तीत जे रूप

२४. महाभारताची रचना



व सौंदर्य प्रतिबिंबित होऊ शकलं नाही, ते चुना, कोळसा, गेरू इत्यादी रंगांच्या सहाय्याने मूर्तीमंत करणाऱ्या चित्रकाराची मूर्ती अपूर्व आहे. या सुंदर प्रतिमेकरितां आम्ही दिलेले पारितोषिक कमीच म्हटले जाईल.''

त्याच वेळी विचित्राचे वृद्ध आईवडील तेथे आले. ते म्हणाले - ''बाळा, पावन, वातापी गणपतीच्या कृपेने आमचा प्रयत्न यशस्वी झाला. तू इतका मोठा झाल्यावर आम्हाला भेटलास'' असे म्हणत त्यांनी आपल्या मुलाला पोटाशी धरले, त्यांचा डोळ्यांतून पुत्रवात्सल्याचे अश्रू गळू लागले.

त्यांचे भूतकाळातील सर्व आयुष्य आठवले. खरे मूळ नांवही आठवले.

मायलेकांची कित्येक वर्षांनंतर भेट झाल्याबद्दल प्रसन्नवदनाला फार आनंद झाला आणि म्हणाली - ''आतांच आमच्या मनातली इच्छा पूर्ण झाली. आपला नवस आम्ही आज पुरा करणार.''

त्यानंतर थोड्याच वेळात लोकांनी मांडव उभा केला. प्रसन्नवदना गणेशमूर्ती समोर बसून ताल देत गाणे म्हणू लागली - ''तांडवनृत्य करी गजानन...'' ती हे भक्तिगीत म्हणत असतां मोहना विद्युलते सारखी नृत्य करू लागली. ते दृष्य पाहून प्रजा तन्मय होऊन आनंद सागरात जणूं बुड्या मारू लागली.

प्रसन्न वदनाचे गायन गजानन पंडिताने ऐकले. त्यावेळी गजानन पंडिताचे वय पूर्ण शंभर वर्षांचे झाले होते. त्यावेळी घराबाहेर पडण्याची शक्ती त्यांच्या अंगात नसूनही त्यांच्या अंगात एकाएकी कोठून बळ आले, कोणास ठाऊक, ते धांवतच मांडवात आले. प्रसन्नवदनाला हात जोडून त्यांनी नमस्कार केला आणि ते ध्यानमग्न झाले.

नृत्य करीत असतां मोहनानें तन्मय होऊन ती विनायकाची भव्य मूर्ती सहजी उचलून आपल्या खांद्यावर घेतली. प्रजा ते दृश्य थक्क होऊन पाहूं लागली. बायका म्हणूं लागल्या - ''मुली, तुला एवढे वजन पेलणार नाही!'' त्याच्या उत्तरादाखल मोहना म्हणाली - ''हे मी कांही नव्याने करीत नाही!'' असे म्हणत ती मूर्ती तशीच खांद्यावर राहून देऊन ती मग्न होऊन नृत्य करीत तेथून निघाली. सर्व प्रजा तिच्या बरोबर निघाली. त्या गडबडीत प्रसन्नवदना कोठे अदृश्य झाली, कोणाला कांहीच कळले नाही.

ध्यान मुद्रेतून गजानन पंडित जागे झाले. समोर मूर्तीच्या जागी सुवर्ण मुद्रांनी भरलेली



मखमली थैली दिसली. त्यांच्या पायांजवळ मूर्तीकार विचित्र गुडघे टेकून बसला होता.

त्याला पाहून गजानन पंडित म्हणाले - तू देवळाच्या सभामंडपातील भिंतींवर गणेशलीला काढ. त्यासाठी आवश्यक धन प्रसन्नवदनाने गणपतीला अर्पिलेले धन गणपतीने दिलेच आहे.''

त्यानंतर गजानन पंडित उठून उभे राहिले आणि विचित्रबरोबर मिरवणुकींत चालूं लागले. मोहना ती मूर्ती घेऊन देवळाच्या कुंडाजवळ गेली.

कुंडाच्या पायऱ्या उतरत असतां एकाएकी अदृश्य झाली आणि तिच्या जागी एक उंदीर ती मूर्ती आपल्या पाठीवर घेऊन पाण्यांत शिरला. त्याच दिवशी सर्व मूर्तींना पाण्यांत उतरून स्नान करावयाचे ठरले होते.

ती मूर्ती कुंडाच्या मध्यभागी पोचल्या वर सहस्त्रावधी दीपमालिकांच्या प्रकाशासारखा प्रकाश सर्वत्र पसरला. त्या प्रकाशाच्या मध्यभागी अभयहस्त मुद्रेत गणपतीने सर्वांना दर्शन दिले आणि तो अंतर्धान पावला.

गजानन पंडिताने विचित्राला पोटाशी कडकडून आवळून धरले व म्हणाले - ''बाळा पावना, तुझ्यामुळेच या वातापी नगरीला पवित्रता लाभली. म्हणून तुला आजपासून पावनमिश्रा हे नांव लाभेल.'' एवढे बोलून पावनमिश्र पुढे म्हणाले - ''गर्भगृहाच्याप्रमुख द्वारावर महाभारताची रचना-स्वरूप जे चित्र आहे...'' पावन मिश्रांचे ते वाक्य पुरे होण्या पूर्वीच तरुण चित्रकार म्हणाला - ''गुरुदेव!'' आणि पावन मिश्रांच्या पायांवर मस्तक ठेवून म्हणाला - ''आपले पावन





चरित्र ऐकून मी धन्य झालो. माझे नाव आनंद आहे. आपल्या पावन नावातील पहिली दोन अक्षरे बदलून मी यापुढे "वपानंद" नामे ओळखला जाईन. हा सभामंडप म्हणजे पावन चित्रालय आहे. या पावन मंडपातील चित्रांची हुबेहुब रचना मी करीन पुढल्या पिढ्यांसाठी आपण ज्या कथा सांगितल्या आहेत, त्या मी त्यांना सांगेन. आपला अनुग्रह माझ्या मस्तकावर रहावा!" असे म्हणत तो त्यांचे चरण धरून बसला.

वृद्ध पावन मिश्रांनी त्या तरुणाच्या मस्तकावर हात ठेवून आशीर्वाद देत मंदहास्य वदनाने ते म्हणाले - "व्यासमुनी महाभारताची जी कथा सांगणार होते, ती लिहिण्याचे सामर्थ्य कोणांत आहे, असा ते विचार करू लागले, त्याच वेळी ब्रह्मदेवाने प्रसन्न होऊन दर्शन दिले. गणेशाला आपला लेखक म्हणून नेमायला सांगितले.

ब्रह्मदेवाच्या आसे प्रमाणे व्यास मुनींनी गणनायकाचे स्मरण करून त्याला प्रार्थना केली.

गणपतीने तात्काळ दर्शन देऊन म्हटले - "व्यासमुने, आपण कथा प्रारंभ करावी, आपण बोलत रहावे, मी लिहीत जाईन. परंतु एक अट आहे, आपण चुकून सुद्धा माझ्याकडे पाहतां कामा नये." असे उत्तर देऊन गणपती महाभारत कथा लिहायला बसला. गणपतीने आपल्या दाताच्या तुकड्याची लेखणी करून सतत लिहीत राहिला. व्यास मुनी अर्ध निमीलित नेत्रांनी, म्हणजे डोळे अर्धे मिटून ध्यान मग्न झाले आणि धाराप्रवाहासारखी महाभारत कथा सांगू लागले.

समोर हिमालयाच्या शिखरातून गोमुखीतून जलप्रपात गंभीर स्वरतालावर चालू होता. त्या संगीताबरोबर देवदारू वृक्ष डोलत होते. महाभारताची कथा चालू होती.

जन्मांध धृतराष्ट्र हस्तिनापुराच्या गादीवर बसला. त्याचा धाकटा भाऊ पांडु राजा साम्राज्याचे संरक्षण करीत राज्य विस्तार करण्यात मग्न होता. कालांतराने पांडूला पांच मुलगे झाले आणि धृतराष्ट्राला शंभर पुत्र. बालपणापासूनच कौरव व पांडव यांच्यात परस्पर मत्सर व द्वेष वाढत गेला.

व्यासमुनी कथा सांगत होते आणि गणपती कथा लिहीत होता. सभापर्वाचा प्रसंग चालू झाला. मयसभेत अपमानित झाल्यामुळे दुर्योधनाने सूड भावनेने द्यूतात पांडवांना व द्रौपदीला जिंकले आणि द्रौपदीचे चीरहरण करण्याचे ठरविले.

तेव्हां संतापून भीमाने दुर्योधनाची मांडी व दुःशासनाची छाती फोडून त्यांचे रक्त पिण्याची भीषण प्रतिज्ञा केली.



पांडव बारा वर्षे वनवास पूर्ण करून विराट राजाच्या दरबारात अज्ञातवासाच्या काळात वेश पालटून राहू लागले. द्रौपदी सैरंध्री रूपे विराट राजाच्या राणी बरोबर अंतःपुरात दासी म्हणून राहू लागली. कीचकाने तिचा अपमान केला. म्हणून भीमाच्या हाती तो आपले प्राण गमावून बसला. उत्तर गोग्रहणात बृहन्नलेच्या रूपात राहणाऱ्या अर्जुनाने कौरवसैन्याची धुळधाण उडवून दिली.

त्यानंतर अभिमन्यु व उत्तराचा विवाह झाला. कृष्णाने शिष्टाई करून पांडवांसाठी पांच गावे मागितली. परंतु दुर्योधनाने 'सुईच्या टोका-इतकीही जमीन मिळणार नाही', असे गर्वोक्ती करून उत्तर दिले.

शेवटी युद्धाची वेळ येऊन ठेपली. कृष्णाने अर्जुनाचे सारथ्य करण्याचे कबूल केले आणि त्याला गीतोपदेश केला. भीष्म शरशय्येवर पडल्यानंतर द्रोणाने चक्रव्यूहाची रचना केली. सर्व कौरवांनी मिळून अधर्म युद्ध करून अभिमन्यूचा वध केला. सुभद्रा पुत्रशोक करू लागली.

अर्जुनाने आपले शौर्य व प्रताप दर्शवून जयद्रथाचा वध केला. धृष्टद्युम्नाने द्रोणाचार्यांचा वध केला. तिकडे दुर्योधनाला कर्णाच्या शौर्य व प्रतापाचा आधार वाटला. परंतु त्याच्या मृत्यूनंतर तो देखील हताश झाला.

भीमाने प्रतिज्ञेप्रमाणे दुःशासनाचा वध केला आणि दुर्योधनाची मांडी फोडून तो दोघांचे रक्त प्याला.

द्यूतांत पराभव झालेल्या युधिष्ठिराला आपल्या भावांच्या मदतीने भयंकर युद्ध करून



जय मिळाला आणि त्याची विजय दुंदुभी चतुर्दिक वाजली.

श्रीकृष्णाने आपला अवतार संपविला. परिक्षिताचा राज्याभिषेक करून पंच पांडव द्रौपदीसह महाप्रस्थानाला निघाले.

धर्म कधी मरत नाही व शेवटी धर्माचाच जय होतो. हे सत्य जाहीर करण्यासाठीच जणु कांही युधिष्ठिर मेरु शिखरावर चढून गेला.

हिमालयाच्या शिखरावरुन जलप्रवाहाचा धबधबा मंद पडत चालला. हे सांगणे कठीण आहे की व्यासमुनी सांगत होते ती कथा गणपती लिहीत होता की गणपती लिहीत होता ती कथा व्यासमुनी सांगत होते. इतक्या वेगाने महाभारताची रचना चालू होती.

तिकडे ब्रह्मलोकात ब्रह्मदेव पद्मासनावर बसून आनंदाने हंसत सार्थ दृष्टीने सरस्वतीकडे पहात होता. दुसऱ्या क्षणाला सरस्वतीने वीणेच्या तारा

जुळवून झंकार केला आणि श्रीराग वाजवू लागली.

महाभारताची कथा संपूर्ण होत आली होती. शेवटच्या पर्वाची रचना चालू होती.

सरस्वतीच्या हाती वीणावादनाबरोबर ब्रह्मलोकांतून श्रीरागाचे स्वर व्यास महर्षींच्या कानावर येत होते. त्यामुळे व्यास मुनींच्या रचना कार्यात विघ्न उत्पन्न होऊ लागले.

कथा अद्याप पूर्ण झाली नव्हती. व्यास मुनींनी अन्य मनस्क होऊन लेखकाकडे, म्हणजे गणपतीकडे, पाहिले. दुसऱ्या क्षणाला गणपती अंतर्धान पावला.

महाभारत ग्रंथावर अक्षतांसारखी आकाशांतून सुमन वृष्टी होऊ लागली.

व्यास मुनींनी ग्रंथ उघडून आतुरतेने पाने चाळून पाहिली. त्यांना जो कांही कथा भाग सांगावयाचा उरला होता तो सर्व लिहीला गेला होता. व्यास मुनींच्या डोळ्यांतून कृतज्ञतेचे अश्रू वाहू लागले. त्यांचे सर्वांग आनंदाने पुलकित झाले. त्याच वेळी वीणेवर सरस्वतीने हंसध्वनी राग वाजवायला सुरवात केली.

नारदमुनींनी प्रवेश करून व्यासांना विचारले - "महर्षे, महाभारताची रचना करणाऱ्या महामुने, तुमच्या डोळ्यांत आश्चर्य झळकते आहे कारण काय?"

व्यासांनी सर्व उघड सांगितले. ते ऐकून नारदमुनी म्हणाले - "याचा अर्थ असा की तुम्ही जे कांही सांगायचे म्हणून योजीत होता, ते सांगण्यापूर्वीच लेखक लिहीत होता, म्हणावयाचा!"

"होय, नारदा! तू म्हणतोस खरे आहे. आयुष्यभर तपश्चर्या करूनही कोणाला असा लेखक लाभणे शक्य नाही. मी धन्य झालो. माझा संकल्प पूर्ण झाला, म्हणून मी महाभारताला 'जय' असे ही नाव देईन." असे म्हणून व्यासमुनींनी हात जोडून गणपतीचे ध्यान केले.

महाभारताजवळ एक ज्योतिर्वलय दिसूं लागले. तिच्यातून दर्शन देऊन गणनायक म्हणाला - "व्यास महर्षे! आपले महाभारत पंचमवेद म्हणून आणि एक अपूर्व काव्य या नाव सर्वत्र व सर्व काळ प्रशंसेला पात्र होईल." असा आशीर्वाद देऊन गणपती अंतर्धान पावला.

विघ्नाश गणनायकाने आपल्या दाताने लिहिलेलं महाभारत युगेयुगे साहित्य क्षेत्रांत, नक्षत्र मंडळात, चंद्रासारखा आपला प्रकाश देत चिरस्थायी झाले आहे. *(संपूर्ण)*







# तीन पैशांचं पुण्य

एका गावांत प्रभुगुप्त नांवाचा एक व्यापारी राहात होता. पैसा हा त्याला प्राणाहून आधिक प्रिय होता. त्याच्या पत्नीला, मीनाक्षीला, आपल्या पतीचा हा चिक्कूपणा मुळींच आवडत नव्हता. म्हणून पुण्यकार्य कांही करायचं असेल तेव्हां ती हट्टाने पतीच्या हातून थोडाफार तरी दानधर्म करवीत होती.

प्रभुगुप्ताजवळ भरपूर धनदौलत होती, पण त्याला अद्याप मूलबाळ नव्हते याचे त्याला वाईट वाटत असे. मुलासाठी मीनाक्षीने अनेक नवस सायास, उपासतापास केले, पण त्याचा उपयोग झाला नाही. शेवटी निराशेने मीनाक्षीने नवस केला कीं जर तिची कूस उजळली तर अंगावरचे सारे दागिने ती देवाला अर्पण करील. त्याशिवाय व्यापारांत तिच्या पतीला वर्षभरांत जो नफा होईल, त्यांतला एक टक्का ती देवाच्या हुंडीमधें देईल.

हा नवस बोलल्यानंतर थोड्याच दिवसांत मीनाक्षीला दिवस गेले आणि नऊ महिन्यानंतर तिने एका मुलाला जन्म दिला. त्यानंतर मीनाक्षीने आपण असा नवस बोललो होतो ही गोष्ट पतीला सांगितली.

नवसाची ही कथा ऐकून प्रभुगुप्त चकितच झाला व तिला म्हणाला, "तुझं डोकं ठिकाणावर आहे ना? तुझ्या अंगावरच्या साऱ्या दागिन्यांची किंमत कमीतकमी दोनतीन हजार तरी होईल. त्यांत आणखी नफ्यांतला एक टक्का आणखी वरती द्यायचा; याचा अर्थ तुला समजतो तरी कां? ही गोष्ट माझ्यासमोर पुन्हां कधी सांगू नकोस."

आपल्या पतीचे हे कठोर बोलणें ऐकून मीनाक्षीही संतापून उद्गारली, "याबाबतीत मात्र तुम्ही नाही म्हणूं शकणार नाही. ही गोष्ट मी देवापाशी कबूल केली आहे. जर माझ्या मुलाला कांही झालं तर मीही जीव देईन. समजलं कां?" प्रभुगुप्ताचा नाईलाज झाला. त्याला बायकोचा शब्द पाळावाच लागला.

त्यानंतर कांही दिवसांनी प्रभुगुप्त बायको व मुलाला घेऊन हा नवस फेडण्यासाठी निघाला. मीनाक्षीने आपले दागिने अंगावर घातले होते. प्रभुगुप्ताने ठरवले कीं त्याच्या वर्षभरांत होणाऱ्या

- दिलीप चोपडा -



फायद्याचा एक टका म्हणजे एक हजार रुपये होतात.

"हिशेब करताना परमेश्वराला फसवूं नका हां!" मीनाक्षीने पतीला सावधगिरीची सूचना दिली. वाटखर्चासाठी एक हजार रुपये घेऊन प्रभुगुप्त निघाला. घर बंद करुन दाराला कुलूप लावायला म्हणून प्रभुगुप्त बाहेर आला तर ओसरीवर बैठक मारुन एक बैरागी बसलेला होता तो त्याला दिसला.

बैरागी प्रभुगुप्तला म्हणाला, "बाबूजी, तुम्ही तीर्थयात्रेला जाताय ना? जाताजाता दानधर्म करीत जायला हवं. मी रात्रीपासून कांही खाल्लेलं नाही, मला कांहीतरी द्या ना!"

"तुझ्या उपदेशाची मला गरज नाही. तुझं भुक्कड तीन पैशाचं पुण्य मला नको आहे. हजारो रुपये दान करुन परमेश्वराकडून मी बरंच पुण्य मिळवणार आहे." प्रभुगुप्ताने उत्तर दिले.

प्रभुगुप्ताचे बोलणे ऐकून मीनाक्षीला शरम वाटली. आपल्या पतीचा डोळा चुकवून तिने पिशवींतले दोन लाडू गुपचूप बैराग्याच्या झोळींत टाकले आणि कमरेच्या पिशवीतून तीन सुटे पैसे काढून बैराग्याला दिले.

पण मीनाक्षी त्याला पैसे देत होती ते मात्र प्रभुगुप्ताला दिसले. मीनाक्षीला रागवत तो म्हणाला, "अग, इथेंच खर्च करायला सुरवात केलीस तर येताना भीक मागत कां येणार आहेस?"

पुण्यतीर्थाला पोंचल्यानंतर मंदिरात जाता-जाता प्रभुगुप्ताने मीनाक्षीच्या हातांत एक हजार रुपये देऊन तिला सांगितले - "माझ्याजवळ आणखी एक हजार रुपये आणलेले आहेत. आपण हजार रुपये हुंडीत घालूं या आणि बाकी हजार रुपये आपल्याला खर्चायला राहातील."

देवाचे दर्शन करताना मीनाक्षीने आपल्या अंगावरचे दागिने हुंडीत टाकले व नवऱ्याने दिलेले हजार रुपयेदेखील त्यांत टाकले. ते न पाहाता इकडे प्रभुगुप्ताने आपल्याजवळचे रुपयेही हुंडीत घातले.

दर्शन वगैरे झाल्यानंतर जेव्हां दोघेही मंदिराबाहेर आले, तेव्हां प्रभुगुप्ताने मीनाक्षीला म्हटलं, "रुपये नीट सांभाळून ठेव हां! इथे भुरटे चोर भरपूर असतात!"

"रुपये तर तुमच्याजवळच आहेत. माझ्या-जवळ जे दिलेत ते मी हुंडीत टाकले." मीनाक्षीने म्हटलं.



दोघांनाही लगेच आपली चूक समजली. त्यावर मीनाक्षीने प्रभुगुप्ताला विचारलं, "देवाच्या हिश्श्यामधे तुम्ही चुकीचा हिशेब दाखवला नाहीत ना?"

प्रभुगुप्ताने शरमून जाऊन मान खाली घातली. दोघांच्याजवळ जे पैसे शिल्लक राहिले होते ते एका दिवसाच्या खर्चापुरते देखील पुरेसे नव्हते. येताना रस्त्यांत उपास करीत, याचना करीत, अनेक संकटे झेलीत त्यांना परत यावे लागले.

बऱ्याच दिवसानंतर प्रभुगुप्त गांवी परत आलाय हे कळताच गांवातले कांहीजण त्याच्या-सोबतच घरापर्यंत आले. आश्चर्याची गोष्ट म्हणजे जाताना जो बैरागी दिसला होता, तो अजूनही तिथेच होता.

बैराग्याने पुढे येऊन प्रभुगुप्ताला विचारलं, "तुमची यात्रा व्यवस्थितपणे पार पडली ना?" प्रभुगुप्ताने घुश्श्यांत उत्तर दिले, "हो, हो, अगदी चांगली पार पडली. परत येताना रस्त्यांत भीक मागतच आलो."

"पण जायच्यापूर्वी तुम्ही हेच म्हणाला होता ना? ठीक आहे, आता मी निघतो." असं म्हणून बैरागी तिथून निघून गेला. "या बैराग्याने कल्पनेच्याबाहेर चांगुलपणा दाखवला हं म्हणून त्याला हे बक्षिस मिळालं." एका बाईने टीका केली.

"म्हणजे, तुमच्या बोलण्याचा अर्थ नाही मला समजला." प्रभुगुप्त म्हणाला.

"सांगू? जेव्हां तुम्ही यात्रेला गेलात तेव्हां-पासून एखाद्या इमानी कुत्र्यासारखी या बैराग्याने तुमच्या घरावर रखवाली केली होती. परवा रात्रीं अचानक तुमच्या घरावर दरोडा घालायला चोर आले, तेव्हां ह्या बैराग्याने आरडाओरडा करुन लोकांना गोळा केले. नाहीतर तुमची सारी संपत्ती चोरांनी लुटून नेली असती. पण तुम्ही उलट त्या बैराग्यालाच चोर समजता आहात!" त्या स्त्रीने सुनावले.

"तीन पैशाचे भुक्कड पुण्य - पण त्याने आज आपली सारी संपत्ती राखली!" मीनाक्षीने नवऱ्याकडे टक लावून बघत म्हटले.

प्रभुगुप्ताला आपल्या मूर्खपणाबद्दल फार पश्चात्ताप झाला. त्या दिवसापासून दानधर्म करताना त्याने हात आंखडता घेतला नाही व लोकांच्यातही नांव मिळवले.





# पांढऱ्या दाढीचा काळा साधू

चिंतामणीपुरांत राजाराम नांवाचा एक मुलगा होता. त्याचा पिता रघुवीर हा गांवातला धनिक भूपती याचा नोकर होता. रघुवीरचे आपल्या मुलावर फार प्रेम होते. राजाराम लहान असतानाच त्याची आई वारली, म्हणून रघुवीरने राजारामला फार जपले व त्याचे पालनपोषण केले. आपण खूप शिकावे, लिहावे, वाचावे, अशी राजारामची तीव्र इच्छा होती. आपला मुलगा चांगला शिकावा असे रघुवीरला ही वाटत होतेच.

पण भूपतीची पत्नी भानुमती हिला मात्र हे मुळींच पसंत नव्हते. तिला भीती वाटत होती कीं जर राजाराम सुशिक्षित झाला तर रघुवीरच्या पश्चात तो घरकाम करणार नाही. एक दिवस तिने रघुवीरला समजावले, ''तुझा मुलगा आता दहा वर्षांचा झाला आहे. आता तो घरांतले काम करुं शकेल. याच्यापुढें तू आमराईतले काम सांभाळ. आमराईंत जी झोंपडी आहे, तिथें तुम्ही दोघेही राहूं शकाल.''

''राजारामला खूप शिकवायची माझी फार इच्छा आहे बाईसाहेब,'' रघुवीर हात चोळत म्हणाला.

हे ऐकून भानुमतीने आवाज चढवून म्हटले, ''कसली भिकार इच्छा घेऊन बसला आहेस तूं? शिकून काय असवख लगेच मिळणार आहे कां? तू एक लक्षांत घे. पंचवीस वर्षांचा होईपर्यंत जर तुझ्या मुलाने इथे नोकरी केलीन तर, त्याला जी रकम मिळायला हवी ती मी माझ्याजवळ सांठवून ठेवीन. त्यावेळीं ती संपूर्ण रकम मी त्याला देईन. ते पैसे तू व्याजी लाव म्हणजे त्याला आरामशीरपणें जगता येईल. उगीच वेडेपणा करुं नकोस. त्याला शिकवण्यापेक्षां कामधंद्याला लावलंस तर फायदा आहे बघ.'' तिने जोरांत सांगितलं.

अशा परिस्थितींत बिचारा रघुवीर काय करणार? त्याने आपल्या मुलाला भूपतीच्या घरांत नोकरीला ठेवले, आणि आमराईंतल्या झोपडीत राहून तो बागेचे काम बघूं लागला.

कांही वर्षे उलटली. कांहीतरी आजाराचे निमित्त होऊन अचानक रघुवीर मरण पावला. त्यानंतर वर्षातच भानुमतीने राजारामचे लग्न करुन दिले. त्याची पत्नी चंपा हिला भानुमतीने घरांत मोलकरीण म्हणून कामाला लावले आणि राजारामवर आमराईचे काम सोंपवले.

अशीच सहा वर्षे गेली. राजारामचा मुलगा रघुराम आता पांच वर्षांचा झाला होता. तो फार हुशार आणि चुणचुणीत होता. गांवातल्या शाळेंत शिकायला जात होता. आणि सगळ्या विषयांमधे त्याला पहिला क्रमांक मिळत असे. त्याची बुद्धिमत्ता पाहून एके दिवशी राजाराम आपल्या पत्नीला म्हणाला, ''मला कांही शिक्षण घेणं जमलं नाही. निदान आपल्या मुलाला तरी आपण खूप शिकवूं या, म्हणजे त्याला माझ्यासारखी नोकरी करायची वेळ येणार नाही.'' पण निराशेच्या स्वरांत चंपा पतीला म्हणाली, ''तुमचा विचार अगदी उत्तम आहे. पण त्याच्यासाठी आपल्याजवळ तितके पैसे कांही शिल्लक नाहीत. जेवढे मिळतात ते सारे खर्च होऊन जातात. एक पैसादेखील शिल्लक राहात नाही घरांत. तेव्हां मुलाला कशाच्या जोरावर आपण शिकवणार?''

राजारामने थोडा वेळ विचार करुन म्हटले, ''भूपती साहेबांच्या घरांतली सारी व्यवस्था व देखभाल भानुमती बाईसाहेबच करतात. त्यांच्या हातांत सारी सूत्रें असतात. मी दहा वर्षांचा असताना त्यांच्याकडे नोकरीला राहिलो. त्यांनी वचन दिलं होतं कीं जेव्हां मी पंचवीस वर्षांचा होईन तेव्हां तोपर्यंत जमलेली पगाराची सारी रकम त्या मला एकावेळीं देतील. आतापर्यंत ती रकम जवळजवळ दहा हजारांपर्यंत जमलेली असेल. ते पैसे घेऊन आपण शहरांत कांहीतरी व्यापार सुरुं करुं या. जरा जम बसला कीं रघुरामच्या उच्च शिक्षणाची व्यवस्थाही आपण करुं शकूं.'' चंपाला ही कल्पना पटली.



आपला निर्णय सांगायला म्हणून राजाराम भूपतीच्या घरी गेला. त्याने आपला विचार जेव्हां भानुमतीला सांगितला तेव्हां भूपतीदेखील तिथें हजर होता. सारं कांही ऐकल्यानंतर भानुमती म्हणाली, ''तुझ्या वडिलांचीदेखील अशीच नाहक कल्पना होती. पण जसे मांजरीच्या पोटांतून मांजराचे पिलूं येते, तसे नोकराच्या मुलाने तशीच नोकरी धरायला हवी. आता राहिली पैशाची गोष्ट! माझ्या माहिती व हिशेबानुसार तुमच्या पैशापैकी एक पैसादेखील आमच्यापाशी



आता शिल्लक नाही. खूप वर्षांपूर्वीच तुझ्या वडिलांनी ती रक्कम घेतलेली होती.''

आपली बायको धडधडीत खोटे बोलते आहे हे भूपतीला ठाऊक होतं, पण तिच्या रागाला घाबरुन तो गप्प बसला.

कांहीही न बोलता राजाराम निमूटपणें घरीं परत गेला. त्या रात्रीं फार मोठे वादळ झाले. रात्रभर भूपती व भानुमतीला आमराईतल्या झाडांवरच्या आंब्यांची काळजी लागून राहिली.

सकाळीं उठल्याबरोबर दोघेही घोडागाडींत बसून बागेकडे आले. तिथें चंपा रघुरामला जवळ घेऊन बसलेली होती. साऱ्या बागेंत आंबे इकडेतिकडे पडलेले होते. सगळ्या फळांचा असा नाश झालेला बघून भानुमतीला फारच वाईट वाटले. तिने रागीट स्वरांत चंपाला विचारले, ''तुझा नवरा कुठे आहे? आणि अजून तू आमच्या घरीं कामावर कशी गेली नाहींस?''

चंपाने केविलवाण्या सुरांत उत्तर दिले, ''बाईसाहेब, काल रात्रीं एक विचित्र घटना घडली. वादळ होतं तेव्हां कुणीतरी आमचं दार वाजवलं. तो खडखड आवाज ऐकून माझ्या पतींनी दार उघडलं, तर समोर एक पांढऱ्या दाढीचा एक काळा साधू उभा होता. त्यांचे अंग संपूर्णपणें पावसांत भिजलेले होते.

''मी अगदी उपाशी आहे. कांहीतरी खायला देशील कां ग बाई? थोडा भात आणि ताक असलं तरी पुरे होईल. त्यावर माझी भूक भागवीन.'' कांपऱ्या स्वरांत साधूने विचारले.

''बाईसाहेब, तो साधूमहाराज म्हणजे कुणीतरी मोठा माणूस असला पाहिजे. मी पितळेच्या लहान थाळींत थोडा भात वाढला नि ताक दिले. त्याने तो भात खाल्ला व उरलेले ताक प्यायले. कांहीही न बोलता नंतर तो त्या मुसळधार पावसांत निघून गेला. त्यानंतर मी पाहिलं तर ती पितळी थाळी आणि लोटी कंदिलाच्या उजेडांत खूपच चमकत होती. साधूचा हात लागल्यावर ती भांडी सोन्याची झाली हे आम्हाला कळलं. म्हणून रघुरामचे वडील ती भांडी घेऊन शहरांत सोनाराकडे गेले आहेत. ती विकली कीं तिथेच ते व्यापार सुरुं करणार आहेत.'' रघुरामला कौतुकाने जवळ घेत चंपा म्हणाली.

आपल्या नोकरांच्या या सौभाग्यावर भानुमती मत्सराने जळफळूं लागली. कांहीही न बोलता, एकवार चंपाकडे रागीट नजरेने बघत ती आपल्या पतीबरोबर घरी निघून गेली.

त्या दिवशीदेखील सूर्यास्तानंतर सोसाट्याचा वारा सुटला आणि पाऊस सुरुं झाला. रात्रीची वेळ होती. भूपतीने घोडे तबेल्यांत बांधून तो झोंपी गेला होता. भानुमती उघड्या खिडक्या बंद करायला



म्हणून उठली. विजेच्या चकचकाटांत तिला पांढरी दाढीवाला काळा साधू दिसला. स्वतःच्या डोळ्यांवर तिचा विश्वासच बसेना.

तिने तावडतोब घराचा प्रमुख दरवाजा उघडला आणि ती त्या साधूला म्हणाली, ''स्वामीजी, आपण आंत यावं. पावसांत आपण भिजला आहात.''

आंत आल्यानंतर साधूने म्हटलं, ''मला फार भूक लागलीय. कांहीतरी खायला द्याल कां?'' त्याचा आवाज अस्पष्टसा होता.

भानुमतीने त्याला लगेच बदलायला म्हणून नवीन कपडे दिले आणि त्याला एका गोल टेबलाजवळ खुर्चीवर बसवलं. नंतर ती स्वयंपाकघरांत गेली आणि एका ताटांत जेवण आणि पाण्याचे तांब्याभांडे घेऊन ती आली.

साधूने भोजन केले व नंतर तो भानुमतीला म्हणाला, ''अन्नपूर्णेसारखं सुग्रास भोजन देऊन आज तू माझी भूक भागवली आहेस.'' आणि तो बाहेर पावसाकडे बघूं लागला. भानुमती त्याला म्हणाली, ''इतक्या मुसळधार पावसांत आपण कसे नि कुठे जाणार? त्यापेक्षां इथेंच रहा. या लोखंडी पेटीवर आपण आराम करा. सकाळीं उठल्यानंतर आपण जाऊं शकाल.'' तिला आंतून आनंदाच्या उकळ्या फुटत होत्या.

साधू आनंदाने त्या लोखंडी पेटीवर झोंपला. खूष होऊन भानुमती आपल्या खोलींत झोंपायला गेली.

उशीरा झोपल्यामुळें भानुमतीला सात वाजून गेले तरी जाग आली नव्हती. जेव्हां ती उठून पलंगावर बसली, तेव्हां तिला साधूची आठवण झाली. उठून ती जिथें साधू रात्रीं लोखंडी पेटीवर झोंपला होता, त्याजागी गेली. तिथें साधू नव्हता. भानुमतीला वाटलं कीं संबंध पेटीच सोन्याची झाली असेल, म्हणून तिने जवळ येऊन पुन्हां पुन्हां निरखून पाहिले. पेटींत कांहीही बदल झालेला नव्हता. अगोदर जशी पेटी होती, तशीच आत्ताही होती. पण पेटी उघडी होती. ते बघून भानुमती जोरजोराने ओरडायला लागली.



ती पेटी पुन्हां न्याहाळत ती स्वत:शीच बडबडत राहिली, ''एका चोराला मी मोठा शक्तिमान साधु समजले, घरांत बोलावून त्याला पोटभर जेवू घातले. त्या पेटीमधे कितीतरी दागदागिने होते, सोन्याच्या मोहोरा होत्या, सगळं कांही तो घेऊन गेला. माझं सारं सोनंनाणं त्याने लुबाडलं.'' तिचा राग अनावर झाला, हातापाय थरथर कांपायला लागले. जोराने किंचाळत ती बेभान होऊन जमिनीवर बेशुद्ध पडली.

तिची किंचाळी ऐकून भूपती तिथें आला. त्यावेळीं भानुमती ''धन, चोर, साधू'' असं कांहीतरी असंबद्ध बरळत होती. भूपतीने पेटींत वांकून पाहिले. त्यांतले दागदागिने व इतर किंमती वस्तू सर्व तिथल्यातिथेच होत्या. परंतु राजारामला पंचवीस वर्षांचा झाल्यावर द्यावयाच्या पगाराची रक्कम ज्या थैलींत सांठवून ठेवलेली होती, ती थैली मात्र तिथून नाहीशी झालेली होती.

ते बघितल्याबरोबर हा इथे आलेला साधू कोण असावा ते भूपतीच्या लक्षांत आले. याचा अर्थ इतकाच झाला कीं राजारामचे पैसे ज्या थैलीत होते, ती थैलीच फक्त त्याने तिथून नेलेली होती. आपल्या नोकराच्या प्रामाणिकपणाबद्दल त्याला आश्चर्य वाटले आणि त्याबरोबर तितकाच आनंदही झाला.

त्याने मोठ्या प्रेमाने भानुमतीच्या खांद्यावर हात ठेवला व तिला समजावत तो म्हणाला, ''घाबरुं नकोस, आपले धन अगदी सुरक्षित आहे.''

पण भानुमती उठून बसण्याच्या स्थितींत नव्हती. ती अजूनही बरळत होती. भूपतीने लागलीच वैद्यबुवांना बोलावले. वैद्यांनी तिची सर्व प्रकारे परीक्षा केली आणि आपले निदान सांगितले, ''यांच्या मनावर कांहीतरी जोरदार धक्का बसलेला आहे. सहासात महिने तरी यांच्या मनाला कांहीही त्रास होणार नाही याची काळजी तुम्ही घ्यायला हवी. मी ही योग्य ती परीक्षा करीत राहीन व उपचार करीनच.''

पण सहा महिने झाले तरी भानुमती सांवरली नाही. ''माझे सोने गेले, सगळे सोनेनाणे गेले.'' असं म्हणत ती स्वत:शीच बडबडत राही. तिला वेड लागले होते. या दुर्घटनेनंतर भूपतीने खूप विचार केला, गांवातल्या ज्येष्ठ मंडळींशी चर्चा केली, सल्ला घेतला, आणि आपल्या संपत्तीतून गांवातल्या गरीब मुलांसाठी फुकट शिक्षण देणारी एक शाळा सुरुं केली.







# चतुर चित्रकार

प्राचीन काळीं भारतातल्या मध्यभागातून एक प्रतिभावंत चित्रकार यवनांच्या देशांत गेला. तिथें एक अनोळखी यंत्राचार्य होता. त्याने या चित्रकाराला आपल्या घरीं ठेवून घेतले. त्याची सरबराई व व्यवस्था करण्यासाठी त्याने स्वत: तयार केलेली एक यांत्रिक स्त्री नियुक्त केली.

ती यांत्रिक स्त्री चित्रकाराचे पाय धुऊन परत जात होती. ही यांत्रिक स्त्री दिसण्यांत आणि हालचालींत इतकी जिवंत वाटत होती कीं तिला बघून चित्रकाराला वाटले कीं खरोखरीच ती एक स्त्रीसेविका आहे. तो तिला कांहीतरी विचारुं लागला. पण तिने कांहीच उत्तर दिले नाही.

म्हणून त्याने तिचा हात पकडून खेंचला. त्या धक्क्याने त्या मूर्तीमधले जोडलेले भाग सैल झाले आणि ती मूर्ती खाली पडली. ती एक कृत्रिम यांत्रिक मूर्ती आहे हे चित्रकाराच्या लक्षांत आले. यंत्राचार्याची अचाट बुद्धिमत्ता पाहून तो चकित झाला. त्याचबरोबर ती यांत्रिक आपण बनवलेली आहे, त्याबद्दलचे गुपित त्याने आपल्याला सांगितले नाही म्हणून तो जरासा नाराज झाला. त्याला तो एक प्रकारे अपमान वाटला. या गोष्टीची बोंच त्याला खटकत राहिली. आपल्या अद्भुत चित्रकलेचा परिचय या यंत्राचार्याला आपण द्यायला हवा असा चित्रकाराने निर्णय घेतला.

लागलीच चित्र काढायला त्याने सुरवात केली. त्याने असे चित्र रेखले कीं स्वत: चित्रकाराने आपल्या गळ्याला फांस अडकवला आहे आणि तो त्या फांसावर लटकत आहे. ते चित्र पूर्ण करुन आपल्या दालनांत त्याने अशा जागी लावले कीं कुणी बाहेरच्या खोलींतून आंत डोकावून जर बघितले तर त्याला ते चित्र समोरच दिसावे. चित्र तसे भिंतीवर लावून चित्रकार त्याच दालनांत कांही लांकडे ठेवलेली होती त्या ढिगामागे लपून बसला.

थोड्या वेळानंतर यंत्राचार्य त्या दालनावरुन पुढे जात होता. दार उघडे होते म्हणून त्याने सहज आंत नजर टाकली. जमिनीवर पडलेली ती यांत्रिक मूर्ती आणि फांसावर लोंबकळत असलेला चित्रकाराचा देह त्याने बघितला.

ते दृश्य बघून यंत्राचार्य खूपच घाबरला. त्याने बनवलेली यांत्रिक मूर्ती मोडली व नष्ट झाली त्याची त्याला काळजी वाटत नव्हती; पण भारतांतून आलेला एक पाहुणा चित्रकार त्याच्या घरी राहात होता, त्याचा मृत्यू व्हावा याचे त्याला फार दुःख झाले. त्या अपमृत्यूचा दोष त्याच्या डोक्यावर लादला जाऊं नये म्हणून त्याने या घटनेची माहिती सरकारी अधिकाऱ्यांना कळवून त्यांना याचा तपास करण्यास सांगायचे ठरवले.

त्याप्रमाणे यंत्राचार्य त्याच्या देशाच्या राजाच्या दरबारांत गेला आणि त्याने सारी हकीकत सांगितली. राजाने संपूर्ण चौकशी करण्यासाठी आपल्या दरबारांतले अधिकारी यंत्राचार्यांच्या घरीं पाठवले.

अधिकाऱ्यांनी येऊन चित्रकाराच्या खोलींत डोकावून पाहिले. चित्रकाराचे लोंबकळणारे शव त्यांनी पाहिले.

ते शव खाली कसे उतरवावे याचा विचार ते करुं लागले. कांही लोकांनी चित्रकाराच्या गळ्याभोवतीचा फांस कापावा म्हणून तलवार, भाले व सुऱ्याही आणल्या.

त्यावेळीं तिथें लपून बसलेला चित्रकार पुढे आला. त्याला पाहून सर्वजण आश्चर्यचकित झाले.

चित्रकाराने यंत्राचार्याला म्हटलं, "महाशय, आपण आपल्या यांत्रिक सेविकेला माझ्या दिमतीसाठी दिलेत आणि मला बुचकळ्यांत पाडलेत. आपल्या हुशारीने मला एकट्यालाच गोंधळून टाकलेत. म्हणून मी देखील माझ्या हुशारीचा प्रयोग केला, आणि तुम्ही नि राजेसाहेबांनी पाठवलेले अधिकारी या सर्वांनाच मी बुचकळ्यांत पाडले आहे."

हे ऐकून यंत्राचार्यांनी लाजेने मान खाली घातली. आणि भारताच्या महान कलाकाराची मनोमन वाहवा केली.






जयानंद ध्यान लावतात. वाघ नि वाघी त्यांच्याजवळ येतात.

तुमच्या दोघांकडे माझें कांही काम आहे. या स्त्रीच्या मृत शरीराची तुम्ही राखण करा!

जेव्हां ते प्रेमाने त्यांना थोपटतात, तेव्हां वाघ त्यांचे हात चाटतात.

तिला कुणीही स्पर्श करुं नये किंवा ते शरीर घेऊन जाऊं नये. उद्यां तिला समाधी दिली जाईल.

दोन्ही जनावरांनी स्वामींच्या खांद्यावर आपल्या पंजाने स्पर्श केला. जणूं कांही त्यांचे करायचे काम काय ते त्यांना समजले होते.

दोन्ही वाघ त्या शरीराच्या चारी बाजूंना फिरत आहेत

